भट्टोजी दीक्षितकृत

# प्रौढ मनोरमा

व

त्या ग्रंथावरील' शब्दरत्ननामक टीका
याचें स्त्रीप्रत्ययान्त

विस्तृत विवरणासह व प्रक्रियेसह
मराठी

# सुबोध भाषांतर

## भाग ५ वा

(अजन्तपुल्लिङ्गप्रकरण
'सर्वादीनि सर्वनामानि' पासून)

विवरणकर्ता

कै० रावबहादुर ना. दा. वाडेगांवकर, एम्. ए.
सेवानिवृत्त डिस्ट्रिक्ट व सेशन्स जज्ज, नागपूर.

किंमत रु. १०

# अर्पण पत्रिका



" ज्याचें

त्याला

निवेदन ।"

| विषय | | | पृष्ठ सख्या |
|---|---|---|---|
| ६१ 'आङो नाऽस्त्रियाम्' | सू. २४४ | वरील शब्दरत्न | २५०–२५६ |
| ६२ 'अच्च घे:' | सू. २४७ | ,, मनोरमा | २५६–२६३ |
| ६३ ,, | | ,, शब्दरत्न | २६३–२७२ |
| ६४ 'अनङ् सौ' | सू. २४८ | ,, मनोरमा | २७२–२७५ |
| ६५ ,, | | ,, शब्दरत्न | २७५–२७६ |
| ६६ 'हल्ङ्याब्भ्यः' | सू. २५२ | ,, मनोरमा | २७६–२८३ |
| ६७ ,, | | ,, शब्दरत्न | २८३–२९० |
| ६८ ,, | | ,, मनोरमा | २९०–२९७ |
| ६९ ,, | | ,, शब्दरत्न | २९७–३०१ |
| ७० ,, | | ,, मनोरमा | ३०१–३०९ |
| ७१ ,, | | ,, शब्दरत्न | ३०९–३१५ |
| ७२ ,, | | ,, मनोरमा | ३१५–३१८ |
| ७३ ,, | | ,, शब्दरत्न | ३१८–३२२ |
| ७४ ,, | | ,, मनोरमा | ३२२–३३० |
| ७५ ,, | | ,, शब्दरत्न | ३३०–३३५ |
| ७६ ,, | | ,, मनोरमा | ३३५–३४३ |
| ७७ ,, | | ,, शब्दरत्न | ३४३–३६० |
| ७८ 'सख्युरसम्बुद्धौ' | सू. २५३ | ,, मनोरमा | ३६० |
| ७९ ,, | | ,, शब्दरत्न | ३६०–३६२ |
| ८० 'ख्यत्यात्परस्य' | सू. २५५ | ,, मनोरमा | ३६२–३६४ |
| ८१ 'औत्' | सू. २५६ | ,, ,, | ३६४–३७० |
| ८२ ,, | | ,, शब्दरत्न | ३७०–३७४ |
| ८३ 'पतिः समास एव' | सू. २५७ | ,, मनोरमा | ३७४–३७६ |
| ८४ 'बहुगणवतुडति सख्या' | सू. २५८ | ,, मनोरमा | ३७६–३७७ |

---

॥ श्रीगुरुः शरणम् ॥

रा. रा. रावबहादुर ना. दा. वाडेगांवकर यांनी 'प्रौढ मनोरमा व शब्दरत्न' या ग्रंथाचें जें स्त्रीप्रत्ययान्त विवरण केलें आहे त्याचा बराचसा भाग मी वाचला. या ग्रन्थांत प्रथम प्रत्येक पंक्तीचा अक्षरार्थ देऊन पुढें कंसांत त्या पंक्तीचें विस्तृत व मार्मिक विवरण केलें आहे व आवश्यक ठिकाणीं पूर्ण प्रक्रिया दिली आहे. त्यामुळें ग्रन्थाचा बोध होण्यास साधारण बुद्धीच्या विद्यार्थ्याला देखील माझ्या मतें कांहीं अडचण येऊं नये. या ग्रन्थांत ठिकठिकाणीं भाष्य, प्रदीप, उद्योत, काशिका, पदमञ्जरी इत्यादि ग्रन्थांतून समर्पक उतारे दिले असल्यामुळें हा ग्रन्थ आदर्शभूत झाला आहे व युनिव्हर्सिटीसारख्या संस्थांनी हा माननीय ग्रन्थ संग्रहीं ठेवण्यास अत्यंत लायक आहे. विद्यार्थीवर्गाच्या हिताकरितां हा ग्रन्थ जितक्या लवकर छापला जाईल तितकें बरें व या ग्रन्थाचें हिन्दींत भाषान्तर करून ते छापल्यास यू. पी., पंजाब, बंगाल वगैरे प्रांतांतील विद्यार्थ्यांना फार फायदा होईल. मी हा ग्रन्थ वाचून फार प्रसन्न झालों आहे व एवढे कठिण व्याकरणशास्त्राचे ग्रन्थ महाराष्ट्र भाषेंत उतरविणें दुष्कर असून देखील रा. ब. वाडेगांवकर यांनीं हें जें काम सरळ व सुंदर भाषा लिहून प्रशंसनीय रीतीनें केलें आहे त्याबद्दल मी त्यांचें मनःपूर्वक अभिनन्दन करितों.

बनारस
ता. ६-१२-४४

गोपाल शास्त्री नेने
व्याकरणाध्यापक, ग. सं. कॉलेज, बनारस

॥ श्रीगुरुः शरणम् ॥

संस्कृत भाषेंतील शास्त्रीय ग्रन्थाचे मराठी भाषेंत यथार्थ भाषान्तर करणे हे कार्य सगळ्यानाच उत्तम रीतीनें साधते असे, नाही प आचार्य भक्त विष्णुशास्त्री बापट, दीक्षित, भाऊशास्त्री लेले, म म प. वासुदेव शास्त्री अभ्यंकर प्रभृति दिवगत व विद्यमान प घुण्डिराज शास्त्री उर्फ बापू दीक्षित, बापट, पाचगावकर प्रभृति ग्रन्थकारानी केलेली भाषातरे वजा करिता बहुतेक भावार्थानुवादात्मकच भाषातरे आहेत म्हणावयास हरकत नाही भाषातरित ग्रन्थात सुद्धा वेदान्तादि शास्त्रीय ग्रन्थाची भाषातरे लोकात प्रचलित असलेल्या दृष्टातादिकानी सुरुचिर तरी करिता येतात परतु सर्वथा नीरस व क्लिष्ट अशा व्याकरणशास्त्रातील विशिष्ट टीकाग्रन्थाचे भाषातर सुव्यवस्थित व यथार्थ रीतीनें करणे हे कार्य अति अवघड व फारच कष्टसाध्य असे आहे. म्हणूनच जेथें वेदान्त, धर्मशास्त्र वगैरे शास्त्रातील दहा दहा ग्रन्थाची भाषातरं झालेली मिळतात, तेथें व्याकरणशास्त्रातील दोन तीनच ग्रन्थाची भाषातरे झाली आहेत याचे कारण उघडच आहे प्रस्तुत ग्रन्थकारानी काही वर्षापूर्वी श्री नागोजीभट्ट काळे यानी केलेल्या परिभाषेन्दुशेखर नावाच्या ग्रन्थाचे मराठीत सुदर भाषातर केलेले प्रसिद्ध आहेच आता प्रकृत ग्रन्थकारानी शब्दरत्न मनोरमेचे अव्ययान्त भागाचे मराठीत भाषान्तर केले आहे ते मी बरेच स्थळी आपातत व एकाच प्रकरण अक्षरश सपूर्ण वाचून पाहिले आहे त्यामुळें मला निश्चयानें असे सागता येतें की सदरहू भाषातर प्राचीन परपरेला व मूळातील गभीर अर्थाला कोठेंहि न सोडता उत्तम रीतीनें केलेले आहे व्याकरणासारख्या नीरस, क्लिष्ट, शास्त्रातील अति कठीण टीकाग्रन्थाचे उत्कृष्ट भाषातर करिता येते याकरिता हा ग्रन्थ सर्वदा उत्कृष्ट उदाहरण म्हणून दाखविता येण्यासारखा आहे अस्तु ज्याना व्याकरणशास्त्राचे अध्ययन करण्याची आवड आहे परतु गुरूकडे जाऊन अध्ययन करिता

येणें शक्य नाहीं; तसेंच गुरूजवळ अध्ययन करूनहि ग्रन्थ स्पष्ट होण्याकरितां पुन: चिंतनाची आवश्यकता आहे अशा उभयविध जिज्ञासूंना या ग्रन्थानें फार उपयोग होणार आहे.

७५ चें आंतबाहेर वय, इंद्रियें एका काळीं आपलीं असूनहि आपलीं नाहींत अशी साक्ष पटवीत आहेत. या कालांतील सांसारिक सुख, अशा परिस्थितींत १५–१५ तास दिवसा तसेंच रात्रींहि व्याकरणशास्त्रासारख्या नीरस, क्लिष्ट विषयांत एकाग्रचित्तानें विचार करीत समाधि स्थितींत असलेल्या श्रीमान पंडित बाबासाहेब बाडेगांवकरांना पाहिलें म्हणजे प्राचीन विद्वानांची वर्णनें प्रत्यक्ष डोळ्यांसमोर उभीं राहतात. असो. हा ग्रन्थ लवकरच प्रसिद्ध होण्याचा योग यावा व मराठी भाषेंत एका उत्कृष्ट भाषांतराची भर पडावी अशी सदिच्छा प्रकट करितों.

पौष वद्य ५ २००६ बुधवार
ता. ६–१२–४४, काशी

पं. अनंत शास्त्री फडके
व्याकरणाचार्य, मीमांसातीर्थ
प्रा. ग. स. कॉ., काशी

॥ श्री विश्वनाथो विजयते तमाम् ॥

रा. ब. श्री. ना. दा. वाडेगावकर यांनी 'प्रौढ-मनोरमा आणि शब्दरत्न' ह्या व्याकरणशास्त्रावरील जटिल दोन ग्रंथांचें जें महाराष्ट्र भाषेंत विस्तृत विवरण केलें आहे त्याचा काही भाग मी वाचला. हा ग्रंथ सर्वांगसुंदर जाहला आहे. जसा एखादा वैयाकरणमूर्धन्य आपल्या प्रियतम विद्यार्थ्यांस प्रत्येक पंक्तीचें विशद विवरण करून ग्रंथाचें गूढ ग्रन्थिरहस्य एकान्तात सांगतो तसें हें 'भाषान्तर' वाचकास चटकन ग्रंथ प्रमेय सांगतें. यांत प्रत्येक पंक्तीचा अक्षरार्थ प्रथम देऊन नंतर कंसात त्याचें विस्तृत विवरण केलें आहे व जेथें प्रक्रिया देणें आवश्यक आहे तेथें सूत्रें देऊन सविस्तर प्रक्रिया दिली आहे आणि ठिकठिकाणीं भाष्य, काशिका, प्रदीप, उद्योत, शब्देन्दुशेखर, पदमंजरी इत्यादि ग्रंथांतील समर्पक उतारे दिले आहेत, त्यायोगें ग्रंथ समजण्यांत अडचण जात नाहीं. माझी पूर्ण खात्री आहे की ज्यानें कौमुदीचें अध्ययन केलें आहे त्याला शिक्षकाच्या सहाय्याशिवाय हा ग्रंथ वाचल्यानें मनोरमा व शब्दरत्न यांतील पंक्ति उत्तम रीतीनें समजू शकते. असा सर्वोत्कृष्ट ग्रंथ लिहिल्याबद्दल मी रावबहादुर यांचें सप्रेम हार्दिक अभिनंदन करितो. महाराष्ट्र प्रान्तांत व्याकरणशास्त्राचा विशेष प्रचार विरल आहे. उत्तर (हिंदुस्थानांत) भारतांत व्याकरणशास्त्राचा विशेष प्रचार असल्यामुळें या ग्रंथाचें हिन्दींत भाषान्तर होणें आवश्यक आहे. तसें भाषान्तर केल्यास व्याकरणशास्त्राध्ययन करणाऱ्या छात्रवर्गावर फार उपकार होतील.

बनारस
कार्तिक कृ. १३ सोमवार
ता. १३-११-४४

सदाशिव शास्त्री मुसलगावकर
माजी प्रिन्सिपाल, संस्कृत कॉलेज,
ग्वाल्हेर

॥ श्री ॥

श्री. रा. ना. दा. वाडेगांवकर 'यांनी प्रौढ मनोरमा व शब्द-रत्न' या गहन ग्रन्थाचें महाराष्ट्र भाषेंत जें स्त्रीप्रत्ययान्त विवरण केलें आहे त्याचीं तीन प्रकरणें मी वाचलीं. या विवरणांत प्रत्येक पंक्तीचा प्रथम अक्षरार्थ देऊन पुढें कंसांत विस्तृत विवेचन केलें आहे व अवश्य ठिकाणी सूत्रें व सूत्राङ्क देऊन पूर्ण प्रक्रिया दिली आहे, आणि तसेंच भाष्य, प्रदीप, उद्योत, शब्देन्दुशेखर, काशिका, पदमञ्जरी इत्यादि ग्रंथांतून आवश्यक स्थलीं समर्पक उतारे दिले असून त्यांचा भावार्थहि दिला आहे. त्यामुळें प्रत्येक पंक्तीचा उत्तम रीतीनें अर्थबोध होतो. हा ग्रंथ सरल व सुंदर भाषेंत लिहिला असल्यामुळें सामान्य बुद्धीच्या विद्यार्थ्याला देखील ग्रंथबोध होण्यांत कांही अडचण येऊं नये. शब्दरत्नाची भाषा फार खबडड आहे व त्या ग्रंथाचा गूढार्थ मराठी भाषेंत पूर्णपणें उतरविणें हें दुष्कर असून देखील या विवरणांत तें उत्तम रीतीनें केलें. सारांश हें विवरण अत्यन्त सुंदर, बोधप्रद व आदर्शभूत झालें आहे व या उतारवयांत शरीर रोगग्रस्त झालें असून देखील वाडेगांवकर साहेबांनी जो एवढा प्रचण्ड व सुंदर ग्रन्थ निर्माण केला आहे त्याबद्दल त्यांचें जितकें कौतुक व अभिनंदन केलें तितकें कमीच आहे.

ता. ६-१२-४४

दिवाकर शास्त्री जोशी,
व्याकरणाचार्य,
व्याकरण शास्त्राध्यापक, गव्हर्नमेण्ट संस्कृत कॉलेज व स्या. जैन विद्यालय, बनारस.

# प्रस्तावना



कै रा ब नारायणराव वाडेगावकर याच्या प्रौढ मनोरमा व शब्दरत्न या व्याकरणशास्त्रावरील अनुवाद व विवरणाच्या प्रचड ग्रथाचा हा पाचवा खड होय या ग्रथाची महती व त्याच्या कै वाडेगावकर यानी केलेल्या अनुवादाचे व विवरणाचे स्वरूप याचे स्पष्टीकरण मागच्या ४ थ्या खडाच्या प्रस्तावनेत केलेलेच असल्यामुळें त्याची पुनरुक्ति येथें करण्याचे कारण नाही

याहि खडाच्या प्रकाशनाच्या बाबतीत महाराष्ट्र राज्य सरकारने उदार अत करणाने आर्थिक साह्य करून आम्हाला अत्यत उपकृत केले आहे या साह्यावाचून ग्रथ-प्रकाशनाचे हे कार्य दुर्घट ठरले असते त्यासबधी महाराष्ट्र राज्य सरकारला आम्ही अत करणपूर्वक धन्यवाद देतो

कै वाडेगावकर याचे चिरजीव श्री ख ना वाडेगावकर यानी या ग्रथाच्या प्रकाशनाचे सर्वाधिकार सस्थला देऊन सस्थला ऋपिऋण व व्यक्तिश मला गुरु-ऋण फेडण्याची जी सधी दिली त्याबद्दल त्याना आम्ही अत करणपूर्वक धन्यवाद देतो

या पांचव्या खंडाला उदार आश्रय देऊन सरकारी व अन्य ग्रंथालयें आपली कर्तव्यपूर्ति करतील अशी आशा आहे.

या ग्रंथाची मुद्रितें तपासण्याच्या कामी भोसला वेदशास्त्र महाविद्यालयाचें सहमंत्री श्री. शं. गो. चट्टे, एम्. ए. यांनी जे परिश्रम घेतले त्याबद्दलचें ऋण शब्दांनी फिटणारें नाही.

ग्रंथाच्या यापुढील खंडालाहि असेंच सहकार्य लाभेल असा विश्वास आहे.

**बाळशास्त्री हरदास,**
अध्यक्ष
भोंसला वेदशास्त्र महाविद्यालय
व
वेदशास्त्र महाविद्यालय संशोधन व
प्रकाशन मंडळ.

दि. २६ फेब्रुवारी
१९६३

---



कै० रावबहादुर ना. दा. याडेगांवकर, एम्. ए

सेवानिवृत्त डिस्ट्रिक्ट व सेशन्स जज्ज, नागपूर

॥ श्रीगणेशाय नम ॥

## ॥ अथाजन्तपुंल्लिङ्गप्रकरणम् ॥

(भाग ४ वरून पुढे चालू)

मनोरमा- "सर्वादीनि सर्वनामानि" ॥ सर्वादीनि इति तद्गुणसंविज्ञानो बहुव्रीहि । "हलि सर्वेषाम्" इति निर्देशात् । द्वन्द्वे चेतीति । स हि समुदायस्य निषेधो न त्ववयवानामिति वक्ष्यते । न च तदन्तविधिं विना समुदाये संज्ञाप्रसक्तिरस्तीति भाव । ननु तदन्तसञ्ज्ञाया किं फलम् । न च परमसर्वस्मायित्यादौ स्मायादय फलम् । अङ्गाधिकारे तदन्तविधिनैव तत्सिद्धेरित्यत आह- तेनेति । न चेहापि "प्रातिपदिकात्" इत्यनुवृत्ते सर्वनाम्ना तद्विशेषणे तदन्तविधिर्भवतीति वाच्यम् । "समासप्रत्ययविधौ प्रतिषेध" इत्युक्तेरिति भाव । अकच्चेति । चकारात्परमसर्वत इत्यत्र तसिल् ।

'सर्वादीनि सर्वनामानि' सू २१३ या सूत्रातील 'सर्वादीनि' हा तद्गुणसंविज्ञान बहुव्रीहि आहे व 'हलि सर्वेषाम्' सू १७१ या सूत्रातील 'सर्वेषाम्' या निर्देशावरून हे सिद्ध होते (प्रकृत सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात -'सर्वादीनीति कोऽय समास । बहुव्रीहिरित्याह । कोऽस्य विग्रह ? । सर्वशब्द आदिर्येषां तानीमानीति । यद्येव सर्वशब्दस्य सर्वनामसंज्ञा न प्राप्नोति । किं कारणम ? । अन्यपदार्थत्वाद् बहुव्रीहे । बहुव्रीहिरयमन्यपदार्थे वर्तते । तेन यदन्यत्सर्वशब्दात् तस्य सर्वनामसंज्ञा प्राप्नोति । तद्यथा । चित्रगुरानीयतामित्युक्ते यस्य ता गावो भवन्ति स आनीयते, न गाव । नैष दोष । भवति बहुव्रीहौ तद्गुणसंविज्ञानमपि । तद्यथा । चित्रवाससमानय, लोहितोष्णीषा ऋत्विज प्रचरन्ति । तद्गुण आनीयते तद्गुणाश्च प्रचरन्ति ।'

'बहुव्रीहौ तद्गुणसंविज्ञानमपि'—परि. ७८—या परिभाषेंत 'अपि' हा शब्द घातला असल्यामुळें या परिभाषेचा असा अर्थ होतो कीं, बहुव्रीहि हा तद्गुणसंविज्ञान व अतद्गुणसंविज्ञान असा दोन प्रकारचा असतो. 'तेषां गुणानामवयवपदार्थानां संविज्ञानं विशेष्यान्वयित्वम्' असा 'तद्गुणसंविज्ञान' या पदाचा परिभाषेन्दुशेखरांत अर्थ दिला आहे व याचा अर्थ असा आहे कीं, जेथें अन्यपदार्थप्रधान बहुव्रीहि-समासाचे अवयव अन्यपदार्थाशीं विशेषणरूपानें अन्वित होत असतात त्याला तद्गुणसंविज्ञानबहुव्रीहि म्हणतात व जेथें ते अवयव अन्य-पदार्थाशीं विशेषणरूपानें अन्वित होत नसून उपलक्षणरूपानें अन्वित होतात त्याला अतद्गुणसंविज्ञान बहुव्रीहि म्हणतात. 'सर्वः आदिः येषां तानि सर्वादीनि' या बहुव्रीहिसमासांत 'सर्वनाम' हा अन्य-पदार्थ प्रधान आहे व या अन्यपदार्थामध्यें 'सर्व' या शब्दाचा विशेषणरूपानें अन्वय होत असल्यामुळें, म्हणजे ज्या शब्दांना सर्वनामसंज्ञा होणें सांगितलें आहे त्यांत 'सर्व' हा शब्द अन्तर्भूत होत असल्यामुळें, 'सर्वादीनि' हा तद्गुणसंविज्ञान बहुव्रीहि ठरतो. जर 'सर्व' हा शब्द त्या संज्ञेंत अन्तर्भूत झाला नसता तर 'सर्वादीनि' हा अतद्गुणसंविज्ञान बहुव्रीहि ठरला असता. 'सर्व' या शब्दाला देखील सर्वनामसंज्ञा होते याला 'इति सर्वेषाम्' इत्यादि सूत्रांतील 'सर्वेषाम्' हा निर्देश प्रमाण आहे; कारण या निर्देशांत 'आमि सर्वनाम्नः सुट्' सू. २१७ या सूत्रानें अकारान्त सर्वनामाहून होणाऱ्या 'आम्' प्रत्ययाला जें सुडागमकार्य होणें सांगितलें आहे तें कार्य केलें आहे. जर 'सर्व' हा शब्द सर्वनामसंज्ञक नसता तर, 'ह्रस्वनद्यापो नुट्' सू. २०८ या सूत्रानें 'सर्व' शब्दाहून होणाऱ्या 'आम्' प्रत्ययाला नुडागम करून पाणिनीनें 'सर्वाणाम्' असा निर्देश केला असता.) 'तदन्तस्यापीयं संज्ञा । द्वन्द्वे च इति ज्ञापकात्' असें जें प्रकृत सूत्रावरील कौमुदींत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, 'द्वन्द्वे च' सू. २२४ या सूत्रानें होणारा सर्वनामसंज्ञानिषेध सर्वनामान्त द्वन्द्वसमासरूप समुदायालाच लागू

पडतो व त्या समासातील सर्वनामसंज्ञक अवयवांना तो निषेध लागू पडत नाहीं हें पुढें ('द्वन्द्वे च' या सूत्रावरील कौमुदींत) सांगण्यात येणार आहे तदन्तविधि केल्याशिवाय समुदायाला सर्वनामसंज्ञेची प्राप्ति होत नाही हें उघड आहे ('सर्व, विश्व', इत्यादि शब्द सर्वादिगणात पठित असून 'परमसर्व' इत्यादि सर्वादिशब्दान्त शब्द त्या गणात पठित नसल्यामुळें, केवळ 'सर्व' इत्यादि शब्दानाच सर्वनामसंज्ञा होऊं शकते व सर्वादिशब्दान्त समुदायाला ती संज्ञा होऊं शकत नाही असे कोणी म्हटल्यास त्यावर दीक्षित असे उत्तर देतात की, 'द्वन्द्वे च' या सूत्रानें सर्वादिशब्दान्त द्वन्द्वसमासरूप समुदायाला सर्वनामसंज्ञेचा निषेध केला असल्यामुळें त्यावरूनच हे सिद्ध होत की तदन्त समुदायाला सर्वनामसंज्ञा होते जर केवळ 'सर्व' इत्यादि शब्दानाच ती संज्ञा होते व तदन्तसमुदायाला ती संज्ञा होत नाही असे मानले तर, 'प्राप्तस्यैव निषेध' हा न्याय असल्यामुळें, 'द्वन्द्वे च' सू २२४ हा निषेध व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते म्हणून तो निषेध चरितार्थ ठरण्याकरिता हे मानणे आवश्यक आहे की, सर्वादिशब्दान्त समुदायाला देखील तदन्तविधीनें सर्वनामसंज्ञा होते व त्यामुळेंच 'परमसर्वस्मै, परमसर्वत्र' इत्यादि रूपें सिद्ध होतात आता येथें शंकाकार अशी शंका करतो की, तदन्तविधि करून) तदन्त समुदायाला सर्वनामसंज्ञा केल्यानें कोणते (अधिक) फल सिद्ध होते? 'परमसर्वस्मै' इत्यादि स्थली 'स्मै' इत्यादि आदेश प्रत्ययाचे जागी होणे हे तशा रीतीनें—तदन्तविधीनें—सवनामसंज्ञा केल्याचे फल मानता येत नाही, कारण 'पदाङ्गाधिकारे तस्य च तदन्तस्य च'—परि. २९—या परिभाषान्वयेंच तदन्तविधिनें 'परमसर्वस्मै' इत्यादि स्थली 'स्मै' इत्यादि आदेश प्रत्ययाचे जागी होऊं शकतात ही शंका मनात घरूनच या शंकेपर प्रकृत सूत्रावरील कौमुदीत 'तेन परमसर्वत्र इति त्रल्, परमभवकान् इत्यत्राकच्च सिध्यति' असें उत्तर दिले आहे ('जस शी, सर्वनाम्न स्मै, ङसिङ्यो स्मात्स्मिनौ, आमि सर्वनाम्न सुट्' सू २१४, २१५,

२१६, २१७ इत्यादि सूत्रें अङ्गाधिकारांत पठित असल्यामुळें, 'पदाङ्गाधिकारे तस्य च तदन्तस्य च' या परिभाषान्वयें, त्या सूत्रांत सांगितलेलीं कार्यें सर्वनामान्त समुदायाला सर्वनामसंज्ञा न करितां तदन्तविधीनें करतां येऊं शकतात असें शंकाकारांचें म्हणणें आहे. यावर दीक्षित असें म्हणतात कीं, हें शंकाकाराचें म्हणणें जरी बरोबर मानलें तरी, 'सप्तम्यास्त्रल्' सू. १९५७ व 'अव्ययसर्वनाम्नामकच्' सू. २०२६ हीं दोन्ही सूत्रें पदाधिकारांत किंवा अङ्गाधिकारांत पठित नसल्यामुळें, त्या सूत्रांनीं सर्वनामाला सांगितलेलीं कार्यें, सर्वनामान्त शद्बांना तदन्तविधीनें सर्वनामसंज्ञा होते हें मानल्याशिवाय, कशीं होऊं शकणार? सारांश अङ्गाधिकारांत पठित नसलेले 'त्रल्, अकच्, तसिल्' इत्यादि सर्वनामाहून होणारे प्रत्यय सर्वनामान्त समुदायाहून होण्याकरितां तद्या समुदायाला तदन्तविधीनें सर्वनामसंज्ञा होणें आवश्यक आहे.) 'सप्तम्यास्त्रल्' व 'अव्ययसर्वनाम्नामकच्' (हीं सूत्रें 'ङ्याप्-प्रातिपदिकात्' या अधिकारांत पठित असल्यामुळें) या सर्व सूत्रांत 'प्रातिपदिकात्' या पदाची अनुवृत्ति होते व त्या सूत्रांत निर्दिष्ट किंवा अनुवृत्त असलेलें 'सर्वनाम' हें पद 'प्रातिपदिकात्' याचें विशेषण होत असल्यामुळें 'येन विधिस्तदन्तस्य' सू. २६ या सूत्रान्वयें येथें देखील तदन्तविधि होऊं शकतोच (व सर्वादिशद्बान्त-समुदायरूप प्रातिपदिकाहून 'त्रल, अकच्' इत्यादि प्रत्यय होऊं शकतातच) असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाही; कारण 'समासप्रत्ययविधौ प्रतिषेधः'–सू. २६ वरील वार्तिक–हें निषेधक वार्तिक असल्यामुळें, 'त्रल्, अकच्' इत्यादि प्रत्यय करतेवेळीं 'येन विधिस्तदन्तस्य' या सूत्रानें तदन्तविधि करतां येत नाहीं; (कारण हा प्रत्ययविधि असल्यामुळें 'येन विधिः' या सूत्राची वरील निषेधक वार्तिकान्वयें प्रवृत्ति होऊं शकत नाहीं.) 'अकच्च सिध्यति' असें जें प्रकृत सूत्रावरील कौमुदींत म्हटलें आहे त्यांतील 'च' या पदानें 'पञ्चम्यास्तसिल्' सू. १९५३ या सूत्रानें होणाऱ्या

'तसिल्' प्रत्ययाचे ग्रहण होतें व त्यामुळें 'परममर्वतः' हें रूप सिद्ध होते.

शब्दरत्न— तद्गुणसंविज्ञान इति । तस्य अन्यपदार्थस्य गुणाः विशेषणानि संविज्ञायन्ते कार्यित्वादिना यत्रेत्यर्थः । प्रायः संयोगसमवायान्तरसम्बन्धेन सम्बन्धो यत्रान्यपदार्थस्तत्र तद्गुणत्वम् । तदतिरिक्तस्वस्वामिभावादिसम्बन्धेन सम्बन्धिनस्तत्त्वेऽतद्गुणत्वम् । नागयज्ञोपवीती भोज्यतामित्यादौ यज्ञोपवीतस्य कार्यित्वाभावेऽपि तत्संनिहितत्वमस्त्येवेति तद्गुणत्वमेवेति हरिग्रंथे स्पष्टम् । तसिद्धेरिति । न च सर्वनाम्नो विहितत्वाभावः । तदन्तसंज्ञाभावे "द्वन्द्वे च" इत्यादीनामवयवसंज्ञानिषेधकत्वेन विहितविशेषणे फलाभावादिति भावः । तसिलिति । अवयवसर्वनामत्वेन तु न निर्वाहः, सर्वनामप्रकृतिकसप्तम्याद्यन्तत्वाभावादिति भावः ।।

'तद्गुणसंविज्ञानः' या सामासिक पदाचा 'तस्य अन्यपदार्थस्य गुणाः विशेषणानि, संविज्ञायन्ते कार्यित्वादिना यत्र' असा विग्रह आहे ज्या बहुव्रीहिसमासात त्या समासातील अवयवाचा अन्यपदार्थाशी समवायरूप किंवा संयोगरूप संबंध असतो तशा स्थली बहुधा तद्गुणसंविज्ञान बहुव्रीहि होत असतो. ज्या बहुव्रीहिसमासातील अवयवाचा अन्यपदार्थाशी समवायसंबंध किंवा संयोगसंबंध नसून स्वस्वामिभाव इत्यादि प्रकारचा संबंध असतो तशा स्थली बहुधा अतद्गुणसंविज्ञानबहुव्रीहि होत असतो. ('अन्यपदार्थप्रधानो बहुव्रीहिः' या वचनान्वयें बहुव्रीहिसमासात अन्यपदार्थ प्रधान असतो व त्या समासातील अवयव–घटक पदें–त्या अन्यपदार्थाची विशेषणे असतात. उदाहरणार्थ 'महाबाहु' या बहुव्रीहिसमासात ज्याचे बाहु मोठे आहेत असा अन्यपदार्थ पुरुष प्रधान असून त्या समासातील 'महान्' व 'बाहु' हे अवयव त्याची विशेषणे आहेत. जेथें अन्यपदार्थासह त्याची विशेषणे वाक्यातील क्रियेशी अन्वित असतात तेथें बहुधा तद्गुणसंविज्ञानबहुव्रीहि होत असतो. जेथें ती विशेषणे तशी अन्वित नसतात तेथें बहुधा अतद्गुणस-

विज्ञानबहुव्रीहि होत असतो. वरील दोन्ही वाक्यांत 'बहुधा' असें जें म्हटलें आहे त्याचें कारण हें कीं, वर जो नियम सांगितला आहे तो सामान्य नियम असून त्याचे क्वचित् स्थलीं अपवाद आढळतात.) 'नागयज्ञोपवीती भोज्यताम्' इत्यादि उदाहरणांत जरी यज्ञोपवीत कार्य नाहीं, म्हणजे यज्ञोपवीताचा भोजनक्रियेंत अन्वय नाहीं, तरी भोजन करतेवेळीं यज्ञोपवीताचें सान्निध्य राहत असल्यामुळें, म्हणजे जो भोजन करतो त्याचे गळ्यांत तें यज्ञोपवीत राहत असल्यामुळें, अशा ठिकाणीं तद्गुणसंविज्ञानबहुव्रीहि मानला जातो असें हरीच्या ग्रन्थांत स्पष्ट म्हटलें आहे. (प्रकृत विषयाचें विस्तृत विवरण परिभाषेन्दुशेखराच्या मराठी भाषांतरांत पान ३७४–७५ मध्यें केलें आहे व तें वाचल्यास संपूर्ण विषय नीट ध्यानांत येईल. 'नागयज्ञोपवीती' या स्थलीं 'नागयज्ञोपवीत' या कर्मधारयाहून 'अत इनिठनौ' सू. १९२२ या सूत्रानें मत्वर्थीय 'इनि' प्रत्यय झाला आहे, व 'अनेकमन्यपदार्थे' सू. २–२–२४ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारानीं 'अर्थनियमे मत्वर्थग्रहणम्' हें वार्तिक पठित करुन त्या वार्तिकाचें व्याख्यान करितांना 'अर्थनियमे मत्वर्थग्रहणं कर्तव्यम् । मत्वर्थे यः स बहुव्रीहिरिति वक्तव्यम् । इह मा भूत् । कण्ठे श्रितमनेनेति।' असें म्हटलें आहे. त्यामुळें 'नागयज्ञोपवीती' हा मत्वर्थीय इनिप्रत्ययान्त शब्द बहुव्रीहि ठरतो. या उदाहरणांत अन्यपदार्थाचा अवयवाशीं संयोगसंबंध आहे हें खरें. पण जसा अन्यपदार्थ यज्ञोपवीती हा भोजनक्रियेचा कर्ता आहे तसें त्याचें यज्ञोपवीतरुप अवयव नाहीं. तरी पण दोहोंमध्यें संयोगसंबन्ध असल्यामुळें हा तद्गुणसंविज्ञानबहुव्रीहि ठरतो.) 'तदन्तविधिनैव तत्सिद्धेः' असें जें मनोरमेंतील शंकाग्रन्थात शंकाकारानें म्हटलें आहे त्याच्या म्हणण्याचा भावार्थ हा आहे कीं, ('परमसर्वस्मै' या स्थला 'परमसर्व' हा समुदाय सर्वनामसंज्ञक न मानल्यास 'स्मै' हा) प्रत्यय सर्वनामाहून झाला आहे असें जरी मानतां येत नाहीं (तरी कांहीं हरकत नाहीं; कारण) सर्वनामान्त समुदायाला

सर्वनामसंज्ञा होत नाही असे मानले असता, 'द्वन्द्वे च' इत्यादि निषेधक सूत्रें समासातील सर्वनामरूप अवयवांना प्राप्त होणाऱ्या सर्वनामसंज्ञेचे निषेधक ठरतील व त्यामुळें विहितविशेषणपक्ष मानल्यानें कोणतेंहि (अधिक) फल सिद्ध होऊं शकत नाही ('परमसर्व ङे' या स्थली 'परमसर्व' या सर्वनामान्त समुदायाला सर्वनामसंज्ञा न केल्यास, 'ङे' हा प्रत्यय समुदायातील अवयव जो सर्वनामसंज्ञक 'सर्व' शब्द त्याहून झाला नसून 'परमसर्व' या समुदायाहून झाला असल्यामुळें व त्या समुदायाला शंकाकाराच्या पक्षामध्यें सर्वनामसंज्ञा नसल्यामुळें, 'सर्वनाम्नः स्मै' सू २१५ या सूत्रानें सर्वनामाहून होणाऱ्या 'ङे' प्रत्ययाचे जागी होणारा 'स्मै' हा आदेश कसा होऊं शकणार; कारण 'सर्वनाम्नः स्मै' या सूत्राचा 'सर्वनाम्नो विहितस्य ङे इत्यस्य स्थाने स्मै इत्यादेशः स्यात्' असा अर्थ आहे प्रकृत स्थली 'सर्व' हें जें सर्वनाम आहे त्याहून 'ङे' प्रत्यय झाला नाही व जो समुदाय शंकाकाराच्या मतें सर्वनामसंज्ञक नाही त्याहून 'ङे' प्रत्यय झाला आहे अशा स्थितीत 'ङे' चे जागी 'स्मै' आदेश कसा होऊं शकणार व 'परमसर्वस्मै' इत्यादि इष्ट रूपाची सिद्धि कशी होऊं शकणार ? यावर शंकाकार असें उत्तर देतो की, आम्ही विहित विशेषणपक्ष मानत नाही, कारण तो पक्ष न मानला तरी सर्व इष्ट रूपांची सिद्धि होण्यांत कांही अडचण येत नाही 'परमसर्व ङे' या स्थली जरी 'ङे' हा प्रत्यय सर्वनामाहून झाला नाही तरी तो प्रत्यय 'सर्व' या सर्वनामाहून पर आहे आणि 'सर्वनाम्नः स्मै' या सूत्राचा 'सर्वनाम्नो विहितस्य' असा अर्थ न करितां 'सर्वनाम्नः परस्य ङे इत्यस्य स्थाने स्मै आदेशः स्यात्' असा अर्थ केल्यानें 'परमसर्वस्मै' हें रूप सिद्ध होऊं शकतें 'द्वन्द्वे च' इत्यादि निषेधक सूत्रें सर्वनामान्त समुदायाला होणाऱ्या सर्वनामसंज्ञेची निषेधक सूत्रें आहेत असें न मानतां त्या समुदायातील सर्वनामरूप अवयवांना प्राप्त होणाऱ्या सर्वनामसंज्ञेची निषेधक सूत्रें आहेत असें मानलें

असतां, 'वर्णाश्रमेतर' या द्वन्द्वसमासांतील 'इतर' या सर्वनामरूप चरमावयवाला सर्वनामसंज्ञेचा निषेध झाल्यानें त्याहून पर जो 'आम्' प्रत्यय त्याला 'आमि सर्वनाम्नः सुट्' सू. २१७ या सूत्रानें सुडागम न होतां 'ह्रस्वनद्यापो नुट्' या सूत्रानें नुडागम होऊन 'वर्णाश्रमेतराणाम्' हें रूप सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. परंतु हें शंकाकाराचें म्हणणें बरोबर मानल्यास 'येन विधिस्तदन्तस्य' १-१-७२ या सूत्राचीं प्रयोजनें सांगतांना त्या सूत्रावरील भाष्यांत 'प्रयोजनं सर्वनामाव्ययसंज्ञायाम्' हें वार्तिक पठित करून त्या वार्तिकाचें व्याख्यान करितांना 'सर्वनामाव्ययसंज्ञायां प्रयोजनम् । सर्वे परमसर्वे । विश्वे परमविश्वे । उच्चैः परमोच्चैः । नीचैः परमनीचैः' असें जें भाष्यकारांनीं म्हटलें आहे त्याचीं विरोध येतो. या शिवाय 'परमसर्वतः, परमसर्वत्र, परमभवकान्' इत्यादि रूपें मनोरमेंत सांगितल्याप्रमाणें सिद्ध होऊं शकणार नाहींत. म्हणून शंकाकाराचें म्हणणें बरोबर मानतां येत नाहीं.) 'परमसर्वत्र इत्यत्र तसिल्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, 'परमसर्व' या समुदायांतील अन्त्य अवयव 'सर्व' हा शब्द जरी सर्वनामसंज्ञक आहे तरी ('परमसर्व' या समुदायाला सर्वनामसंज्ञक मानल्याशिवाय) या स्थळीं 'तसिल्' प्रत्यय होऊं शकत नाहीं; कारण येथें सप्तम्यादि-विभक्त्यन्त सर्वनामप्रकृतीचा अभाव आहे. ('पञ्चम्यास्तसिल्' सू. १९५३ या सूत्रानें पञ्चम्यन्त सर्वनामप्रकृतीहून 'तसिल्' प्रत्यय होणें सांगितलें आहे. तसेंच 'सप्तम्यास्त्रल्' सू. १९५७ या सूत्रानें सप्तम्यन्त सर्वनामप्रकृतीहून 'त्रल्' प्रत्यय होणें सांगितलें आहे. 'परमसर्व' या सर्वनामान्त समुदायाला सर्वनामसंज्ञा न केल्यास त्याहून होणाऱ्या 'तसिल्, त्रल्' इत्यादि प्रत्ययांची सर्वनामसंज्ञक प्रकृति कारण नसल्यामुळें, 'परमसर्व' या शब्दाहून ते प्रत्यय होऊं शकणार नाहींत. म्हणून 'परमसर्व' इत्यादि सर्वनामान्त समुदायाला सर्वादिगणानें सर्वनामसंज्ञा प्राप्त होणें आवश्यक आहे.)

मनोरमा- "जसः शी" अनेकाल्त्वादिति । न तु शित्वादिति भावः ।

'जस· शी' सू. २१४ या सूत्रावरील कौमुदीत 'अनेकाल्त्वात् सर्वादेशः' असे जें म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, शित्वामुळें 'शी' हा सर्वादेश होत नाही ('अनेकाल्शित्सर्वस्य' सू. ४५ या सूत्रानें जसा अनेकाल् आदेश सर्वादेश होणे सांगितले आहे त्याचप्रमाणे शित् आदेश देखील सर्वादेश होणे सांगितले आहे. प्रकृत सूत्रानें होणाऱ्या 'शी' या आदेशात शकार इत् आहे मग 'शित्वात्सर्वादेश' असे दीक्षितानी का म्हटले नाही ? या प्रश्नाचे उत्तर हे आहे की, 'शी' या आदेशातील शकार इत्संज्ञक होण्याकरिता त्याला प्रथम प्रत्ययसंज्ञा झाली पाहिजे व तो आदेश 'जस्' प्रत्ययाचे जागी झाल्यानंतरच त्याला स्थानिवद्भावानें प्रत्ययसंज्ञा प्राप्त होते व ती संज्ञा त्याला प्राप्त झाल्यानंतरच, प्रत्ययातील आद्य शकार इत्संज्ञक होतो हे विधान करणाऱ्या 'लशक्वतद्धिते' सू. १९५ या सूत्राची प्रवृत्ति होऊ शकते. सारांश 'शी' या आदेशाला प्रत्ययसंज्ञा झाल्याशिवाय तो शित् ठरत नसल्यामुळें व तो आदेशरुपानें होतेवेळी प्रत्ययसंज्ञक नसल्यामुळें, 'अनेकाल्त्वात्सर्वादेशः' असे दीक्षितानी कौमुदीत म्हटले आहे.)

मनोरमा- अवर्णान्तादिति । अवर्णान्तादङ्गात्परस्येत्यर्थः । अतो येषां सेषां तेषामित्यादौ नाव्याप्तिः ।। सर्वनाम्नो विहितस्याम इति । सर्वनाम्नः परस्येति तुनोक्तम् दक्षिणोत्तरपूर्वाणामित्यत्र सुट्प्रसङ्गात् । "द्वन्द्वे च" इति निषेधो हि समुदायस्य न त्ववयवस्य । न च तस्मादयमाम् विहित., किं तु समुदायादेवेति न सुट् । विहितविशेषणत्वस्याश्रयणे प्रमाणं तु "दक्षिणोत्तरपूर्वाणाम्" इति भाष्यप्रयोग एव ।

'आमि सर्वनाम्नः सुट्' सू. २१७ या सूत्रावरील कौमुदीत 'अवर्णान्तात्परस्य' असे जें म्हटले आहे त्याचा 'अवर्णान्तादङ्गात्प-

रस्य' असा अर्थ आहे. (प्रकृत सूत्र अङ्गाधिकारांत पठित असल्यामुळें या सूत्रांत 'अङ्गस्य' या पदाची अनुवृत्ति होते व त्या अनुवृत्त पदाचा 'अङ्गात्' असा पञ्चमीविभक्तींत विपरिणाम केल्यानें आणि 'आत् जसेरसुक्' या पूर्व सूत्रांतून 'आत् = अवर्णान्तात्' हें जें पद प्रकृत सूत्रांत अनुवृत्त होतें तें 'अङ्गात्' याचें विशेषण मानल्यानें, 'अवर्णान्ता-दङ्गात्परस्य सर्वनाम्नो विहितस्य' असा अर्थ होतो.) तसा अर्थ होत असल्यामुळें 'येषाम्, केषाम्, तेषाम्' इत्यादि स्थलीं अव्याप्तिरूप दोष येत नाहीं, म्हणजे प्रकृत सूत्र त्यांना देखील लागू पडतें. ('अवर्णान्ता-त्सर्वनाम्नः विहितस्य' असें जर व्याख्यान केलें असतें तर, 'यद्, तद्, किम्' इत्यादि सर्वनामें अकारान्त नसल्यामुळें त्यांहून होणाऱ्या 'आम्' प्रत्ययाला सुडागम होऊं शकला नसता. पण 'अकारान्ता-दङ्गात्परस्य सर्वनाम्नोविहितस्य' असें म्हटलें असल्यामुळें व 'त्यदादीनामः' सू. २६५, 'किमः कः' सू. ३४२ या सूत्रान्वयें अकारान्त आदेश होऊन अङ्ग अकारान्त होत असल्यामुळें, 'आम्' प्रत्ययाला सुडागम होतो.) कौमुदींतील वरील पंक्तींत ('सर्वनाम्नः परस्यामः' असें न म्हणतां) 'सर्वम्नो विहितस्यामः' असें जें म्हटलें आहे त्याचें कारण हें कीं, 'सर्वनाम्नः परस्यामः' असें म्हटलें असतें तर, 'दक्षिणोत्तरपूर्वाणाम्' या उदाहरणांत सुडागम होण्याची आपत्ति आली असती. 'द्वन्द्वे च' सू. २२४ या सूत्रानें होणारा सर्वनामसंज्ञानिषेध द्वन्द्वसमासरूप समुदायाला लागू पडतो व तो निषेध त्या समासांतील सर्वनामरूप अवयवांना लागू पडत नाहीं. 'दक्षिणोत्तरपूर्वाणाम्' या द्वन्द्वसमासस्थलीं जो 'आम्' प्रत्यय झाला आहे तो 'पूर्व' या अन्त्य सर्वनामरूप अवयवाहून झाला नसून 'दक्षिणोत्तरपूर्व' या समुदायाहून झाला आहे (व हा समुदाय 'द्वन्द्वे च' या निषेधान्वयें सर्वनामसंज्ञक ठरत नसल्या-मुळें, त्याहून झालेल्या 'आम्' प्रत्ययाला) सुडागम झाला नाहीं. 'सर्वनाम्नः विहितः आम्' असें विहितविशेषणरूपानें उच्चारण करून जें कौमुदींत व्याख्यान केलें आहे त्याच्या 'दक्षिणोत्तरपूर्वाणाम्'

हा भाष्यप्रयोगच प्रमाण आहे ('सर्वनाम्न परस्य' असे जर व्याख्यान केले असतें तर 'पूर्वापरावर' या गणसूत्रान्वयें 'पूर्व' हा शब्द सर्वनामसञ्ज्ञक असल्यामुळें व वरील उदाहरणात 'पूर्व' शब्दाच्या लगेंच पुढें 'आम्' प्रत्यय आला असल्यामुळें, त्या प्रत्ययाला सुडागम होण्याची व वरील भाष्यप्रयोग चूक ठरण्याची आपत्ति आली असती परंतु तो प्रत्यय 'पूर्व' या सर्वनामरूप अवयवाहून झाला नसून 'दक्षिणोत्तरपूर्व' या द्वन्द्वसमासरूप समुदायाहून झाला असल्यामुळें व 'द्वन्द्वे च' या निषेधान्वयें त्या समुदायाला सर्वनाम-सञ्ज्ञा होत नसल्यामुळें, 'आम्' प्रत्ययाला सुडागम झाला नाही )

शब्दरत्न–भाष्यप्रयोग इति। "दिङ्नामान्यन्तराले" "दक्षि-णोत्तराभ्याम्" इति सूत्रस्थ इति शेष ।

'दक्षिणोत्तरपूर्वाणाम् इति भाष्यप्रयोग' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्यापूर्वी 'दिङ् नामान्यन्तराले, दक्षिणोत्तराभ्याम् इति सूत्रस्थ' ही पदें अध्याहृत आहेत, म्हणजे या दोन सूत्रावरील भाष्यात हा प्रयोग आढळतो ('दिङ्नामान्यन्तराले' सू २–२–२६ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी 'सर्वनाम्नो वृत्तिमात्रे पुंवद्भावो वक्तव्यो दक्षिणोत्तरपूर्वाणामित्येवमर्थम्' असे म्हटले असून 'दक्षिणोत्तराभ्यामतसुच्' सू ५–३–२८ या सूत्रावरील भाष्यात देखील तसेच म्हटले आहे या भाष्यप्रयोगावरून हे स्पष्ट होते की, 'सर्वनाम्न परस्य आम सुट्' असा प्रकृत सूत्राचा अर्थ होऊ शकत नाही तसा त्या सूत्राचा अर्थ अभिप्रेत असता तर भाष्यकारानी 'दक्षिणोत्तरपूर्वेषाम्' असा वरील भाष्यात प्रयोग केला असता )

मनोरमा–पञ्चत्रिंशदिति । पञ्च च त्रिंशच्चेति द्वन्द्व. । पञ्चाधिकात्रिंशदिति तत्पुरुषो वा । यत्तु प्रत्याहारा एकचत्वारिं-शदिति प्राचो ग्रन्थ व्याचक्षाणैरुक्तम् । नाय मध्यमपदलोपो तत्पुरुष'। तथा सति "राजन्यबहुवचनद्वन्द्वेऽन्धकवृष्णिषु" "सख्या" इति

विधीयमानः पूर्वपदप्रकृतिस्वरो न स्यात् । तस्मात्समाहारद्वन्द्व एवायम् । एकविंशतिरित्यादौ नपुंसकत्वं तु न भवति । लोकाश्रयत्वाल्लिङ्गस्येति । तच्चिन्त्यम् । समासभेदेन स्वरभेदे इष्टापत्तेः । तथा च "बहुव्रीहौ संख्येये" इति सूत्रे "संख्यायास्तत्पुरुषस्योपसंख्यानं निस्त्रिंशाद्यर्थमन्यत्राधिकलोपात्" इति वार्तिकं व्याचक्षाणो भाष्यकार आह एकाधिका विंशतिरेकविंशतिः द्वाविंशतिरिति ।

"आमि सर्वनाम्नः सुट्' सू. २१७ या सूत्रावरील कौमुदींत 'सर्वादयश्च पञ्चत्रिंशत्' असें जें म्हटलें आहे त्यांतील 'पञ्चत्रिंशत्' हा शब्द 'पञ्च च त्रिंशच्चेति' असा द्वन्द्वसमास किंवा 'पञ्चाधिका त्रिंशदिति' असा मध्यमपदलोपितत्पुरुषसमास आहे. प्रक्रियाकौमुदीकारांनी 'प्रत्याहारा एकचत्वारिंशत्' असें जें म्हटलें आहे त्यातील 'एकचत्वारिंशत्' या पदाचें व्याख्यान करितांना प्रकाशकारांनीं असें म्हटलें आहे कीं, 'एकचत्वारिंशत्' हा मध्यमपदलोपितत्पुरुषसमास नव्हे. तो मध्यमपदलोपी समास मानल्यास, 'राजन्यबहुवचनद्वन्द्वे ऽन्धकवृष्णिषु', 'सङ्ख्या' सू. ३७६८, ३७६९ या सूत्रांनीं होणारा पूर्वपदप्रकृतिस्वर होणार नाहीं आणि म्हणून हा समास समाहारद्वन्द्वच मानला पाहिजे. 'एकविंशतिः' इत्यादि स्थलीं (समाहारद्वन्द्व असून देखील 'स नपुंसकम्' सू. ८२१ या सूत्रानें प्राप्त होणारें) नपुंसकलिङ्ग होत नाहीं याचें कारण हें कीं, लिङ्ग हें लौकिकप्रयोगावर अवलंबून असतें. ('राजन्यबहुवचनद्वन्द्वे' या पूर्व सूत्रांतून 'सङ्ख्या' या उत्तरसूत्रांत 'द्वन्द्वे' या पदाची अनुवृत्ति होत असून या उत्तर सूत्राचा 'द्वन्द्वसमासे सङ्ख्यावाचि पूर्वपदं प्रकृत्या स्यात्', म्हणजे द्वन्द्वसमासांतील संख्यावाचक पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो, असा अर्थ होतो. 'एकाधिका चत्वारिंशत् एकचत्वारिंशत्' असा मध्यमपदलोपितत्पुरुषसमास केल्यास, 'एकचत्वारिंशत्' हा शब्द 'समासस्य' सू. ३७३४ या सूत्रानें अन्तोदात्त होतो. परंतु समाहारद्वन्द्व केल्यास, 'एक' या संख्यावाचक पूर्वपदाचा, 'सङ्ख्या' या सूत्रान्वयें, प्रकृतिस्वर कायम राहतो. अशा रीतीनें

तत्पुरुष समास केला असतां एक प्रकारचा स्वर होत असून समाहारद्वन्द्व केल्यानें भिन्न प्रकारचा स्वर होत असल्यामुळें, 'सख्या' या विशेष सूत्रानें पूर्वपदाचा प्रकृतिस्वर कायम राखण्याकरिता येथें समाहारद्वन्द्व करणेच इष्ट आहे असा प्रकाशकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. यावर दीक्षित असें उत्तर देतात की,) प्रकाशकाराचें हें म्हणणे बरोबर नाही. भिन्न प्रकारे समास केला असता स्वरात फरक होणे ही इष्टापत्तीच आहे, म्हणजे भिन्न प्रकारे समास केला असता भिन्न स्वरयुक्त रूपें सिद्ध झाली तरी काही बिघडत नाही. 'बहुव्रीहौ सङ्ख्येये' सू. ५–४–७३ या सूत्रावरील भाष्यात 'सङ्ख्यायास्तत्पुरुषस्योपसङ्ख्यानं निस्त्रिंशाद्यर्थमन्यत्राधिकलोपात्' हें वार्तिक पठित करून त्या वार्तिकाचे व्याख्यान करिताना भाष्यकार म्हणतात–'एकाधिका विंशतिः एकविंशतिः, द्व्यधिका विंशतिः द्वाविंशतिः' (व 'पञ्चत्रिंशत्' या स्थलीं जो मध्यमपदलोपितत्पुरुषसमास केला आहे त्याला हें भाष्य प्रमाण आहे या भाष्यात भाष्यकारानी 'एकविंशतिः द्वाविंशतिः' इत्यादि शब्दांचा समाहारद्वन्द्व केला नसून मध्यमपदलोपीसमासच केला आहे. म्हणून प्रकाशकाराचे व्याख्यान बरोबर आहे असे मानतां येत नाही.)

मनोरमा–अत एवेति । द्वयोर्द्विवचनस्यैव न्याय्यत्वादिति भावः । नन्वेवं सर्वादिषु पाठो व्यर्थः । सर्वनामकार्याणां स्मायादीनां द्विवचनेऽभावात् । न च उभाभ्यां हेतुभ्यामुभयोर्हेत्वोरित्यत्र "सर्वनाम्नस्तृतीया च" इति पाक्षिकतृतीया तत्फलमितियुक्तम्, "निमित्तकारणहेतुषु सर्वासां प्रायदर्शनम्" इति वार्तिकेन गतार्थत्वात् । न च वृत्तिकृता "सर्वनाम्नस्तृतीया च" इति सूत्रे पठितत्वादिदं वार्तिकं सर्वनामसंज्ञासापेक्षमिति वाच्यम्, भाष्ये "हेतौ" इति सूत्रे तस्य पठितत्वात् । अत एवान्नेन कारणेन वसति, अन्नस्य कारणस्येत्युदाहृतं हरदत्तेनेत्याशङ्क्याह–तस्येह पाठस्त्विति । अयच्प्रसङ्गादिति । अयं भावः । "उभादुदात्तो नित्यम्" इत्यत्र "उभादुदात्त" इति योगो विभज्यते । अवयवयुक्तेः संख्यावाचिन

उभशब्दादवयविन्यर्थेऽयच् स्यात् । उभयो मणिः । ततो "नित्यम्" । उभशब्दाद्वृत्तिविषये नित्यमयच् स्यात् स्वार्थे । तेनोभयपक्षविनीतनिद्रा इत्यादौ अयज् यथा नित्य एवं कप्रत्ययेऽपि स्यादिति । नन्वेवं अकचि कृतेऽपि अयज् दुर्वार इति चेन्मैवम् । योगविभागस्येष्टसिद्ध्यर्थतया "उभौ साभ्यासस्य" इति निर्देशेन च यत्र द्विवचनं न श्रूयते तत्रैवायमिति व्याख्यानात् । तथा च वार्तिकम् । "अन्याभावो द्विवचनटाब्विषयत्वात्" इति । अकचि हि सति "तन्मध्यपतितस्तद्ग्रहणेन गृह्यते" इति न्यायेनोभशब्दस्य द्विवचनविषयत्वं न विहन्यते कप्रत्यये तु विहन्यतैव । तदुक्तमिति । वार्तिककृतेति शेषः । यद्यपि पूर्ववार्तिके टाबप्युक्तस्तथाऽपि नासौ विवक्षितः । टाब्विषयत्वमपि द्विवचनपरत्व एव बोद्धव्यमिति कैयटादिभिर्व्याख्यातत्वादित्याशयेन व्याचष्टे—द्विवचनपरत्वाभावे इति । टावेकादेशस्यापि पूर्वान्तत्वेन ग्रहणाद् द्विवचनपरत्वमस्तीति भावः । यद्यप्युभावित्यादौ द्विवचनपरत्वं दुरुपपादमुभयत्र आश्रयणे ऽन्ताविधक्ष्वाविरहात् तथाप्युभशब्दादुत्पन्नं द्विवचनं लुका नापहृतं यत्र ततोऽन्यत्रायच् इतीह विवक्षितोऽर्थः । यद्यपि भाष्ये कप्रत्ययस्यापि स्वार्थिकत्वेनोभशब्दात् परस्य द्विवचनत्वमस्तीत्याश्रित्योभशब्दपाठः प्रत्याख्यातः । तथाऽपि प्रौढिवादमात्रं तत् । कृत्रिमस्यैव द्विवचनस्येह ग्रहीतुमुचिततत्वात् । अन्यथा त्रतसिलादावतिप्रसक्तत्वात् । ननु कारकविभक्त्यन्ताद्विहितौ त्रतसिलौ स्वार्थिकत्वेऽपि द्वित्वमात्रं नाभिदत्त इति चेत् न । कप्रत्ययस्याप्यज्ञाताद्यर्थबोधकत्वात्, पञ्चकपक्षोऽधिकबोधकत्वध्रौव्याच्चेति दिक् ।

('आमि सर्वनाम्नः सुट्' सू. २१७ या सूत्रावरील कौमुदीत 'तत्र उभशब्दो द्वित्वविशिष्टस्य वाचकः । अत एव नित्यं द्विवचनान्तः', म्हणजे सर्वादिगणांत पठित असलेला 'उभ' हा शब्द द्वित्वसंख्याविशिष्ट—दोघे—या अर्थाचा वाचक असल्यामुळे तो नित्य द्विवचनान्त असतो, असें म्हटलें आहे. या पंक्तींत) 'अत एव' असें जें म्हटलें आहे त्याचा

भावार्थ हा आहे की, (द्व्येकयोर्द्विवचनैकवचने' सू. १८६ या सूत्रान्वयें) दोन या सख्येनें युक्त 'दोघे' या अर्थाचा वाचक 'उभ' हा शब्द नित्य द्विवचनान्त असणे हेच न्याय्य–योग्य–आहे. (यावर शकाकार असे म्हणतो की, सर्वादिगणात पठित असलेल्या 'उभ' या शब्दाचा नित्य द्विवचनान्त प्रयोग होतो असे मानल्यास) 'उभ' या शब्दाचा सर्वादिगणात जो पाठ केला आहे तो व्यर्थ ठरतो, कारण 'स्मै' इत्यादि सर्वनामकार्यें (एकवचनात किंवा बहुवचनातच होत असून) द्विवचनात मुळींच होत नाहीत. 'सर्वनाम्नस्तृतीया च' सू ६०८ या सूत्रानें विकल्पेंकरून तृतीया होऊन 'उभाभ्या हेतुभ्याम्, उभयोर्हेत्वोः' असे पाक्षिक प्रयोग व्हावे याकरिता 'उभ' या शब्दाचा सर्वादिगणात पाठ केला आहे असे कोणी म्हटल्यास, त्यावर शकाकार असे उत्तर देतो की, हें म्हणणे बरोबर नाही; कारण 'निमित्तकारणहेतुषु सर्वासा प्रायदर्शनम्'–सू. ६०८ वरील वार्तिक–या वार्तिकान्वयें तसे वैकल्पिक प्रयोग सिद्ध होऊ शकतात काशिकाकाराने वरील वार्तिक 'सर्वनाम्नस्तृतीया च' या सूत्रात पठित केले असल्यामुळें ते वार्तिक सर्वनामसज्ञासापेक्ष आहे, म्हणजे ज्या शब्दाना सर्वनामसज्ञा आहे तशाच शब्दाना लागू पडणारे ते वार्तिक आहे, हे सिद्ध होते असे कोणी म्हटल्यास, त्यावर शकाकार असे उत्तर देतो की, हें म्हणणे देखील बरोबर नाही; कारण वरील वार्तिक 'हेतौ' २–३–२३ या सूत्रावरील भाष्यात पठित केले आहे आणि म्हणूनच 'अन्नेन कारणेन वसति, अन्नस्य कारणस्य वसति' अशी त्या वार्तिकाची हरदत्तानें उदाहरणे दिलीं आहेत. (सारांश तें वार्तिक केवळ सर्वनामाना लागू पडणारे नसून नामाना देखील लागू पडणारे वार्तिक आहे आणि त्या वार्तिकामधानें कैयटानें 'हेतौ' या सूत्रावरील भाष्याच्या टीकेंत 'असर्वनाम्नोऽपि विधानार्थमत्र सूत्रे इद पठितम्, न तु सर्वनाम्नस्तृतीया च इत्यत्र' असे स्पष्ट म्हटलें आहे) यर जी शका केली आहे ती मनात धरूनच तिचे उत्तर देण्याकरिता

प्रकृत सूत्रावरील कौमुदींत 'तस्येह पाठस्तु उभकौ इत्यकजर्थः', म्हणजे 'उभ' शब्दाचा जो सर्वादिगणांत पाठ केला आहे तो 'अव्ययसर्वनाम्नामकच् सू. २०२६ या सूत्रानें 'उभ' शब्दाला 'अकच्' प्रत्यय होऊन 'उभकौ' हें रूप सिद्ध व्हावें याकरितां केला आहे, असें म्हटलें आहे. प्रकृत सूत्रावरील कौमुदींत 'अयच्प्रसङ्गात' असें जें म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, 'उभादुदात्तो नित्यम्' सू. १८४५ या सूत्राचा 'उभादुदात्तः' व 'नित्यम्' असा योगविभाग केला असतां, प्रथम भागाचा असा अर्थ होतो कीं, संख्यावाचक 'उभ' हा शब्द अवयवाचा वाचक असतांना, त्या शब्दानें अवयवीचा बोध करणें असल्यास, तथा 'उभ' शब्दाहून (अवयवार्थक) 'अयच्' प्रत्यय होतो; उदाहरणार्थ 'उभयो मणिः' ('उभौ अवयवौ यस्य सः उभयो मणिः' या उदाहरणांत 'उभ' हा शब्द संख्यावाचक असून अवयवाचाहि वाचक आहे व 'उभय' हा शब्द 'मणि' या अवयवीचा विशेषणरूपानें बोध करून देणारा आहे. म्हणून या स्थलीं 'उभ' शब्दाहून अवयवार्थक 'अयच्' प्रत्यय होऊन 'उभयः' असें अयच् प्रत्ययान्त रूप झालें आहे.) 'नित्यम्' या द्वितीय भागाचा असा अर्थ होतो कीं, 'उभ' या शब्दाहून तद्धितादि वृत्ति करतेवेळीं नित्य स्वार्थे 'अयच्' प्रत्यय होतो. त्यामुळें 'उभयपक्षविनीतनिद्राः' (रघुवंश पञ्चमसर्ग श्लोक ७२) इत्यादि उदाहरणांत ज्याप्रमाणे नित्य 'अयच्' प्रत्यय होतो त्याचप्रमाणें 'उभ' शब्दाहून तद्धित 'क' प्रत्यय करतेवेळीं देखील प्रथम स्वार्थे 'अयच्' प्रत्यय होईल. (सारांश 'उभ' शब्दाहून 'अकच्' प्रत्यय केल्यानें जसें 'उभकौ' हें रूप सिद्ध होतें तसें तद्धित 'क' प्रत्यय केल्यानें 'उभकौ' असें रूप सिद्ध न होतां, प्रथम 'अयच्' प्रत्यय होऊन व नंतर 'क' प्रत्यय होऊन 'उभयकौ' हें रूप होईल. आतां 'उभ' शब्दाहून कोणताहि तद्धित प्रत्यय करणें झाल्यास प्रथम स्वार्थे 'अयच्' प्रत्यय करावा लागतो असें मानल्यास.) 'उभ' शब्दाहून 'अकच्' हा तद्धितप्रत्यय करणे झाल्यास

देखील प्रथम स्वार्थे 'अयच्' प्रत्यय करणे भाग पडेल असे कोणी म्हटल्यास, ते म्हणणे बरोबर नाही, कारण इष्ट रूपाची सिद्धि होण्याकरिता योगविभाग केला जात असल्यामुळें व 'उभौ साम्या-सस्य' सू २६०६ या सूत्रात 'उभौ' असा निर्देश असल्यामुळें, जेथें 'उभ' शब्दापुढें द्विवचनाचा प्रत्यय विद्यमान नाही तशाच ठिकाणी 'उभ' शब्दाहून स्वार्थे 'अयच्' प्रत्यय होत असतो असें ('सर्वादीनि सर्वनामानि' १ १ २७ या सूत्रावरील भाष्यात) जें व्याख्यान केले आहे त्यावरून सिद्ध होते, आणि हाच अर्थ सागणारे 'अन्या-भावो द्विवचनटाब्विषयत्वात्' हे वार्तिक आहे (या वार्तिकाचा असा अर्थ आहे की, 'उभ' या शब्दाहून केवळ द्विवचनाचा प्रत्यय होत असतो व स्त्रीत्वाचा बोध करणे झाल्यास 'टाप्' प्रत्यय होत असतो व त्या शब्दाहून इतर कोणतीहि सर्वनामकार्ये होत नाहीत ) 'उभ' शब्दाहून 'अकच्' प्रत्यय केल्यास, 'तन्मध्यपतितस्तद्ग्रहणेन गृह्यते'—परि १०—या परिभाषान्वयें (अकच्प्रत्ययसहित 'उभक' हा शब्द 'उभ' च आहे असे मानता येत असल्यामुळें) 'उभक' या शब्दाहून द्विवचनाचा प्रत्यय होण्यात काही अडचण येत नाही परतु 'उभ' शब्दाहून तद्धित 'क' प्रत्यय केल्यास, ('उभ' व 'औ' प्रत्यय या दोहोंच्यामध्यें 'क' प्रत्ययाचे व्यवधान होत अस-ल्यामुळें) 'उभ' शब्दापुढें द्विवचनाचा प्रत्यय आहे असें मुळीच म्हणता येत नाही (त्यामुळें 'उभ' शब्दाहून तद्धित 'क' प्रत्यय करण्यापूर्वी 'अयच्' प्रत्ययाची प्राप्ति होतेच आणि वर सांगितल्या-प्रमाणे 'उभयको' असें रूप होईल ) प्रकृत सूत्रावरील कौमुदीत 'तदुक्तमुभयोऽन्यत्र' असें जे म्हटले आहे त्यातील 'तदुक्तम्' या पदापुढें 'वार्तिककृता' हे पद अध्याहृत आहे (सारांश 'उभयोऽन्यत्र' हे वार्तिककारानें पठित केलेलें वार्तिक होय ) या वार्तिकापूर्वी पठित केलेल्या पूर्ववार्तिकात, म्हणजे 'अन्याभावो द्विवचनटाब्विषयत्वात्' या पूर्ववार्तिकात, जरी 'टाप्' प्रत्ययाचे देखील ग्रहण केले आहे तरी ते 'टाप्' ग्रहण विवक्षित नाहीं, म्हणजे त्या पूर्ववार्तिकांत 'टाप्'

ग्रहण करण्याची कांहीं आवश्यकता नव्हती व तें ग्रहण निरर्थक आहे. कैयटादिकांनीं स्पष्ट म्हटलें आहे कीं, द्विवचनाचा प्रत्यय पुढें असतांनाच 'उभ' शब्दाहून 'टाप्' प्रत्यय देखील होत असतो. ('टाब्विषयत्वमपि न द्विवचनादन्यत्र बोद्धव्यम्' असें कैयटानें आपल्या टीकेंत म्हटलें आहे. सारांश 'उभ' शब्दाचा जसा द्विवचनांतच प्रयोग होत असतो त्याचप्रमाणें 'उभा' या टाबन्त स्त्रीलिङ्गी शब्दाचा देखील द्विवचनांतच प्रयोग होतो.) हा वरील आशय मनांत धरूनच प्रकृत - सूत्रावरील कौमुदींत 'उभयोऽन्यत्र' या वार्तिकांतील 'अन्यत्र' या पदाचा ('द्विवचनटाप्परत्वाभावे' असा अर्थ न करितां) 'द्विवचनपरत्वाभावे' असा अर्थ केला आहे. ('उभ टाप् = उभ आ = उभा' या स्थलीं 'अकः सवर्णे दीर्घः' सू. ८५ या सूत्रानें 'उभ' यांतील अन्त्य 'अ' व त्यापुढील 'आ' यांचे जागीं 'आ' असा) जो एकादेश होतो तो ('अन्तादिवच्च' सू. ७५ या सूत्रान्वयें) पूर्वान्तवद्भावानें 'उभ' या प्रकृतीचा अन्त आहे असें मानतां येत असल्यामुळें ('उभा' या टाप्प्रत्ययान्त शब्दापुढें जरी द्विवचनाचा प्रत्यय आला असला तरी) तो द्विवचनाचा प्रत्यय 'उभ' याच शब्दापुढें आहे असें मानतां येतें. ('उभ टाप् औ = उभ आ औ = उभा औ' या स्थलीं 'अ' व 'आ' यांचे जागीं झालेला 'आ' हा एकादेश 'उभ' या प्रकृतीचा अन्त आहे असें पूर्वान्तवद्भावानें मानतां येत असल्यामुळें, 'उभा' ही प्रकृति 'उभ'च आहे असें मानतां येतें व या शब्दापुढें 'औ' हा द्विवचनाचा प्रत्यय असल्यामुळें या स्थलीं 'अयच्' प्रत्यय होऊं शकत नाहीं.) 'उभयत्र आश्रयणे नान्तादिवत्' हा सिद्धान्त असल्यामुळें, 'उभौ' इत्यादि स्थलीं 'उभ' या शब्दापुढें द्विवचनाचा 'औ' प्रत्यय आहे असें मानतां येत नाहीं तरी, 'उभ' शब्दाहून झालेल्या द्विवचनाच्या प्रत्ययाचा जेथें लुक्‌नें अपहार—नाश—झाला नाहीं तें स्थळ सोडून इतर सर्व स्थलीं 'उभ' शब्दाहून 'अयच्' प्रत्यय होतो असा 'उभयोऽन्यत्र' या वार्तिकाचा अर्थ विवक्षित—अभिप्रेत—आहे. ('उभ औ = उभौ' या स्थलीं 'वृद्धि-

रेचि' सू ७२ या सूत्रान्वयें वृद्धिरूप एकादेश होऊन 'उभौ' असे रूप झाले असता 'औ' या प्रत्ययाचा एकादेशानें अपहार होत असल्यामुळें 'उभ' शब्दापुढें 'औ' हा द्विवचनाचा प्रत्यय आहे असें मानता येत नाही. 'औ' या वृद्धिरूप एकादेशाला परादिवद्भावानें तो 'औ' प्रत्ययच आहे असे मानल्यास, 'उभ' अशी सर्वनामसंज्ञक प्रकृति न राहता 'उभ्' अशी प्रकृति होते ही प्रकृति जरी एकदेश-विकृतन्यायानें 'उभ च आहे असे मानता येते तरी, अशास्त्रीय विकाराच्या विषयात अतिदेश करता येत नाहीं असे गृहीत धरून वरप्रमाणे म्हटले आहे पूर्वान्तवद्भावानें 'औ' या एकादेशाला 'उभ' या प्रकृतीचा अन्त मानल्यास, 'उभ' या प्रकृतीपुढें द्विवचनाचा 'औ' प्रत्यय आहे असे मानता येत नाही 'उभयत आश्रयणे नान्तादिवत्' हा सिद्धान्त असल्यामुळें, 'औ' या वृद्धिरूप एका-देशाला एकेच वेळी प्रकृतीचा अन्त व प्रत्ययाचा आदि आहे असे मानतां येत नाही व अशा रीतीनें 'उभौ' हा शब्द द्विवचनप्रत्ययपरक 'उभ' शब्द आहे असे म्हणता येत नसल्यामुळें, येथें 'उभयोऽन्यत्र' या वार्तिकान्वयें 'उभ' शब्दाहून 'अयच्' प्रत्यय का होऊ नये अशी शंकाकाराची शंका आहे या शंकेवर दीक्षित असे उत्तर देतात की, जेथें 'उभ' शब्दाहून झालेल्या द्विवचनाच्या प्रत्ययाचा लुक् झाला नाही तसे स्थल सोडून इतर सर्व स्थलीं 'उभ' शब्दाहून 'अयच्' प्रत्यय होतो असा 'उभयोऽन्यत्र' या वार्तिकाचा अर्थ असल्यामुळें व 'उभौ' या स्थली जो द्विवचनाचा 'औ' प्रत्यय झाला आहे त्याचा लुक् झाला नसल्यामुळें, या स्थलीं वरील वार्तिक लागू पडत नाही व 'उभ' शब्दाहून 'अयच्' प्रत्यय होऊ शकत नाही परंतु 'उभ' शब्दाहून पञ्चमीच्या किंवा सप्तमीच्या द्विवचनाचा प्रत्यय करून तसा द्विवचनप्रत्ययपरक 'उभ' शब्दाहून 'तसिल्' किंवा 'त्रल्' प्रत्यय केल्यास तो तद्धितान्त समुदाय 'कृत्तद्धितसमासाश्च' सू १७९ या सूत्रानें प्रातिपदिकसंज्ञक ठरून 'सुपो धातुप्रातिपदिकयो' सू ६५० या सूत्रानें 'उभ' शब्दा-

पुढील अन्तर्वर्ति द्विवचनप्रत्ययाचा लुक् होत असल्यामुळें, अशा ठिकाणी 'उभ' शब्दाहून 'अयच्' प्रत्यय होतोच व 'उभयतः, उभयत्र' अशीं इष्ट रूपें सिद्ध होतात. हा सर्व विषय 'सर्वादीनि' १-१-२७ या सूत्रावरील भाष्यांत दिला आहे. या भाष्यांत 'अथोभस्य सर्वनामत्वे कोऽर्थः', म्हणजे 'उभ' या शब्दाचा सर्वादिगणांत पाठ करून त्या शब्दाला सर्वनामसंज्ञा करण्याचें प्रयोजन काय आहे, असा प्रश्न करून त्या प्रश्नाचें उत्तर देतांना भाष्यकारांनी 'उभस्य सर्वनामत्वेऽकजर्थः' हें वार्तिक पठित केलें आहे व त्या वार्तिकाचें व्याख्यान करितांना भाष्यकार म्हणतात– 'उभस्य सर्वनामत्वेऽकजर्थः पाठः क्रियते । उभकौ । किमुच्यतेऽकजर्थं इति, न पुनरन्यान्यपि सर्वनामकार्याणि ।' या भाष्याचा अर्थ असा आहे कीं, सर्वनामाहून 'अकच्' प्रत्यय होणें सांगितलें असल्यामुळें, 'उभ' या शब्दाला सर्वनामसंज्ञा होऊन त्याहून 'अव्ययसर्वनाम्नामकच्' सू. २०२६ या सूत्रानें 'अकच्' प्रत्यय व्हावा व 'उभकौ' असें रूप सिद्ध व्हावें याकरितां 'उभ' या शब्दाचा सर्वादिगणांत पाठ केला आहे पण 'अकच्' प्रत्यय व्हावा एवढेंच कां म्हटलें आहे व सर्वनामाहून होणारीं इतर कार्यें देखील व्हावीं असें वरील वार्तिकांत कां म्हटलें नाहीं? या प्रश्नाचें उत्तर देतांना भाष्यकार 'अन्याभावो द्विवचनटाब्विषयत्वात्' हें वार्तिक पठित करून त्याचें व्याख्यान करितांना म्हणतात– 'अन्येषां सर्वनामकार्याणामभावः । किं कारणम्? । द्विवचनटाब्विषयत्वात् । उभशब्दोऽयं द्विवचनटाब्विषयोऽन्यानि च सर्वनामकार्याण्येकवचनबहुवचनेषूच्यन्ते । यदा पुनरयमुभशब्दो द्विवचनटाब्विषयः क इदानीमस्यान्यत्र भवति ।' या वरील भाष्याचा अर्थ हा आहे कीं, 'उभ' शब्दाहून केवळ द्विवचनाचा व 'टाप्' प्रत्यय होत असल्यामुळें व पाणिनीय सूत्रांत जीं सर्वनामकार्यें होणें सांगितलीं आहेत तीं सर्व एकवचनाच्या व बहुवचनाच्या प्रत्ययांचे ठिकाणींच होणें सांगितलीं असल्यामुळें, द्विवचनपरक 'उभ' शब्दाच्या विषयांत इतर सर्वनामकार्यांची

प्राप्ति होत नाही पण जेथें 'उभ' शब्दापुढें द्विवचनाचा प्रत्यय किंवा 'टाप्' प्रत्यय दिसत नाही तेथें काय होते असा प्रश्न केला असता, भाष्यकार त्या प्रश्नाचे उत्तर देताना 'उभयोऽन्यत्र' हे वार्तिक पठित करून त्या वार्तिकाचे व्याख्यान करिताना म्हणतात--'उभयशब्दोऽस्यान्यत्र भवति । उभये देवमनुष्या । उभयो मणिरिति । किं च स्यात्यद्यत्राकज्न स्यात् । क प्रसज्येत । कश्चेदानीं काकचाविशेष । उभशब्दोऽय द्विवचनटाब्विषय इत्युक्तम । तत्राकचि सत्यकचस्तन्मध्यपतितत्वाच्छक्यत एतद्वक्तु द्विवचनपरोऽयमिति । के पुन सति नाय द्विवचनपर स्यात् । तत्र द्विवचनपरता वक्तव्या । यथैव तर्हि के सति नाय द्विवचनपर एवमाप्यपि सति नाय द्विवचनपर स्यात् । तत्रापि द्विवचनपरता वक्तव्या । अवचनादापि तत्परविज्ञानम् । अन्तरेणापि वचनमापि द्विवचनपरोऽय भविष्यति । किं वक्तव्यमेतत्? । न हि । कथमनुच्यमान गम्यते? । एकादेशे कृते द्विवचनपराऽयमन्तादिवद्भावेन ।' या भाष्याचा भावार्थ हा आहे कीं, जेथें 'उभ' शब्दाहून द्विवचनाचा प्रत्यय किंवा 'टाप्' होत नाही तेथें 'उभ' शब्दाहून 'अयच्' प्रत्यय होऊन 'उभय' असे रूप होते उदाहरणार्थ 'उभये देवमनुष्या, उभयो मणि ।' पण 'उभ' शब्दाहून 'अकच' प्रत्यय न झाला तर काय होईल? 'क' प्रत्यय होईल पण 'क' प्रत्यय झाला काय किंवा 'अकच' प्रत्यय झाला काय रूप तर एकच प्रकारचे होणार मग फरक तो कोणता? 'उभ' शब्दाहून 'अकच्' प्रत्यय केल्यास, 'तन्मध्यपतित' या न्यायानें 'अकच्' प्रत्यययुक्त 'उभ' शब्द 'उभ'च आहे असे म्हणता येत, कारण 'अकच्' प्रत्यय 'टि' च्या पूर्वी शब्दस्वरूपाच्या आंत होत असतो आणि त्याहून द्विवचनाचा प्रत्यय केला असता, तो प्रत्यय 'उभ' शब्दापुढेंच आहे असे मानता येतें पण 'उभ' शब्दाहून 'क' प्रत्यय केल्यानंतर द्विवचनाचा प्रत्यय केल्यास, 'उभ' शब्दापुढें द्विवचनाचा प्रत्यय आहे असें म्हणता येत

नाहीं; कारण 'उभ' शब्द व द्विवचनाचा प्रत्यय या दोहोंमध्यें 'क' प्रत्ययाचें व्यवधान होतें. तेव्हां 'क' प्रत्ययाचें व्यवधान होत असून देखील 'उभ' शब्दापुढें द्विवचनाचा प्रत्यय आहे असें समजण्याकरितां स्वतंत्र वचन पठित करावें लागेल. पण 'क' प्रत्यय केला असतां, ज्याप्रमाणें 'उभ' शब्दापुढें द्विवचनाचा प्रत्यय आहे असें म्हणतां येत नाहीं त्याचप्रमाणें 'उभ' शब्दाहून 'टाप्' प्रत्यय केला असतां व नंतर द्विवचनाचा प्रत्यय केला असतां, 'उभ' व द्विवचनाचा प्रत्यय या दोहोंमध्यें 'टाप्' प्रत्ययाचें व्यवधान होत असल्यामुळें, 'उभ' शब्दापुढें द्विवचनाचा प्रत्यय आहे असें म्हणतां येऊं शकत नाहीं. तेव्हां त्या स्थलींहि 'उभ' शब्दापुढें द्विवचनाचा प्रत्यय आहे असें समजण्याकरितां स्वतंत्र वचन पठित करावें लागेलच. पण भाष्यकार म्हणतात कीं, या द्वितीय स्थलीं स्वतंत्र वचन पठित करण्याची कांहीं गरज नाहीं; कारण 'उभ' या अदन्त शब्दाहून 'टाप् = आ' प्रत्यय केल्यावर एकादेश केला असतां 'उभा' असा जो शब्द होतो तो पूर्वान्तवद्भावानें 'उभ' शब्दच आहे असें मानतां येऊं शकत असल्यामुळें, 'उभ' शब्दापुढें द्विवचनाचा प्रत्यय आहे असें म्हणतां येतें. असें व्याख्यान करून भाष्यकार पुढें 'अवचनादपि तत्परविज्ञानमपि चेत्केऽपि तुल्यम्' असें वार्तिक पठित करतात व त्या वार्तिकाचें व्याख्यान करितांना भाष्यकार म्हणतात— 'अवचनादपि तत्परविज्ञानमिति चेत्केऽप्यन्तरेण वचनं द्विवचनपरो भविष्यति । कथम् ? । स्वार्थिकाः प्रत्ययाः प्रकृतितोऽविशिष्टा भवन्तीति प्रकृतिग्रहणेन स्वार्थिकानामपिग्रहणं भवति ।' या भाष्याचा भावार्थ हा आहे कीं, 'उभ' शब्दाहून 'टाप्' प्रत्यय केला असतां स्वतंत्र वचन पठित न करितां 'उभ' शब्दापुढें द्विवचनाचा प्रत्यय आहे असें वर सांगितल्याप्रमाणें जर मानतां येऊं शकतें तर, त्याचप्रमाणें 'उभ' शब्दाहून 'क' प्रत्यय केला असतां देखील, स्वतंत्र वचन पठित न करितां, 'उभ' शब्दापुढें द्विवचन आहे असें मानतां येऊं शकतें; कारण 'क' हा प्रत्यय स्वार्थिक असल्यामुळें व 'स्वार्थिकाः प्रत्ययाः प्रकृ-

नितः अविशिष्टा भवन्ति' असा न्याय असल्यामुळें, प्रकृतिबोधक 'द्विवचन' या शब्दानें त्या प्रकृतीहून झालेल्या स्वार्थिक प्रत्ययाचे देखील ग्रहण करतां येते. सारांश 'द्विवचन' शब्दानें द्विवचनाचा प्रत्ययच घ्यावयाचा असे नसून त्या सख्येला दाखविणारा शब्दहि घेतां येतो. म्हणून 'क' प्रत्ययाची प्रकृति जो द्वित्वसख्याबोधक 'उभ' शब्द त्याला 'द्विवचन' म्हणतां येते व त्याच अर्थामध्यें झालेल्या 'क' प्रत्ययाला देखील 'द्विवचन' म्हणता येते. त्यामुळें 'उभयोऽन्यत्र' म्हणजे येथें 'उभय' हा शब्द घालावा लागेल, हा दोष येत नाही. अशा रीतीनें 'क' प्रत्यय झाला तरी काही दोष येत नसल्यामुळें 'उभ' शब्दाचा सर्वादिगणात पाठ करण्याची काही आवश्यकता नाहीं हे सिद्ध होते. असे सागून भाष्यकारानी सर्वादिगणातून 'उभ' शब्दाचे प्रत्याख्यान केले आहे या भाष्यावर टीका करिताना कैयटानें 'द्विवचनविषयत्वा-दित्यत्र द्विवचनशब्देन प्रत्ययो न गृह्यते। किं तर्हि। द्व्यर्थाभिधानसमर्थ इत्यर्थः। उभयत उभयत्रेति त्रतसोरव्ययत्वाद् द्वित्वाभिधानसामर्थ्यं नास्तीति अभेदविषय:–वृत्तिविषयः–उभयशब्द एव प्रयुज्यते, न तूभशब्दः। एवं प्रत्याख्यातोऽकजर्थ उभशब्दस्य पाठः। सर्वनाम्नस्तृतीया चेति षष्ठीतृतीयार्थः पाठ इति केचित्। निमित्तकारणहेतुषु सर्वासा प्रायदर्शनमिति वचनात्तदर्थोऽपि पाठो न कर्तव्य इत्यन्ये।' असे म्हटले आहे. त्याचप्रमाणे 'प्रकृतिग्रहणेन स्वार्थिकानामपि ग्रहण भवति' या भाष्यवचनावर टीका करिताना उद्योतकारानी 'यतः स्वार्थिकाः प्रकृतितोऽविशिष्टा अन्यार्थविशेष्यकबोधाजनका, अतः प्रकृतिग्रहणेन, प्रकृतिर्गृह्यते अनेनेति प्रकृतिग्रहण तेन, प्रकृतिभूतोभशब्द-ग्राहकेण द्विवचनशब्देन तत्प्रकृतिकाना स्वार्थिकाना कादीनामपि ग्रहणमित्यर्थः।' असे म्हटले आहे. या व्याख्यानावरून हे स्पष्ट होते की, 'द्विवचन' या शब्दाची 'द्वौ उच्येते अनेनेति' अशा प्रकारे व्युत्पत्ति करून भाष्यकारानी त्या शब्दाचा 'द्व्यर्थाभिधानसमर्थः' असा अर्थ केला आहे व 'द्विवचनप्रत्यय.' असा अर्थ केला नाही.

'उभ' ही प्रकृति 'दोन' या अर्थाची वाचक असल्यामुळें तीहून होणारा स्वार्थिक 'क' प्रत्यय त्याच अर्थाचा वाचक होतो. त्यामुळें, 'उभ' शब्दाहून 'क' प्रत्यय केला असतां, 'उभ' हा शब्द 'द्विवचन'–परक आहे असें म्हणतां येतें व त्यामुळें 'उभ' शब्दाहून 'अयच्' प्रत्यय, 'क' प्रत्यय होण्यापूर्वी करतां येत नाहीं आणि अशा रीतीनें 'उभकौ' असें 'क' प्रत्ययान्त रूप सिद्ध होऊं शकत असल्यामुळें, 'उभ' शब्दाचा सर्वादिगणांत पाठ असण्याची कांहीं आवश्यकता नाहीं असा भाष्यकारांच्या म्हणण्याचा आशय आहे. 'उभ' शब्दाचें सर्वादिगणांतून भाष्यकारांनीं अशा रीतीनें जें प्रत्याख्यान केलें आहे त्या संबंधानें दीक्षित पुढील पंक्तींत असें म्हणतात कीं,) 'क' हा प्रत्यय देखील स्वार्थिक असल्यामुळें, 'उभ' शब्दाहून तो प्रत्यय केला असतां, 'उभ' हा शब्द द्विवचनपरक आहे असें मानतां येऊं शकतें या मताचा आश्रय करून भाष्यकारांनीं सर्वादिगणांतून 'उभ' शब्दाच्या पाठाचें जरी प्रत्याख्यान केलें आहे तरी, तें प्रत्याख्यान केवळ प्रौढिवाद असून सिद्धान्तभाष्य नव्हें; कारण ('अन्याभावो द्विवचनटाब्विषयत्वात्' या वार्तिकांतील) 'द्विवचन' या शब्दानें ('द्व्यर्थाभिधानसमर्थ' असा जो त्या शब्दाचा अकृत्रिम अर्थ होतो त्या अर्थाचें ग्रहण करणें योग्य नसून, 'कृत्रिमाकृत्रिमयोः कृत्रिमस्यैव ग्रहणम्' या वचनान्वयें) 'द्विवचनप्रत्यय' असा जो त्याचा कृत्रिम अर्थ होतो त्याच अर्थाचें ग्रहण करणें योग्य आहे. (सारांश जरी 'उभ' या प्रकृतीचा 'दोन' असा अर्थ होतो व त्याहून स्वार्थे 'क' प्रत्यय केला असतां तो प्रत्यय देखील 'दोन' असा जो प्रकृतीचा अर्थ आहे त्या अर्थाचा वाचक होतो आणि अशा रीतीनें 'उभ' शब्दाहून स्वार्थे 'क' प्रत्यय केला असतां, 'उभ' हा शब्द 'द्विवचन'परक आहे असें मानतां येतें तरी, वार्तिकांतील 'द्विवचन' या शब्दाचा 'द्विवचनाचा प्रत्यय' असा वास्तविक अर्थ असल्यामुळें, 'क' प्रत्ययान्त 'उभक' शब्दांतील 'उभ' हा शब्द 'द्विवचन'परक आहे असें जें भाष्यकारांनीं मानलें आहे तो केवळ

प्रौढिवाद होय, व 'उभस्य सर्वनामत्वे अकजर्थः' हेच वास्तविक सिद्धान्तभाष्य आहे असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे. वरील वार्तिकातील 'द्विवचन' या शब्दाचा 'द्विवचनाचा प्रत्यय' असा जो कृत्रिम अर्थ आहे तसा अर्थ न करिता द्व्यर्थाभिधानसमर्थ असा अकृत्रिम अर्थ केल्यास दीक्षित म्हणतात की) 'उभ' शब्दाहून 'त्र, तसिल्' इत्यादि स्वार्थिक प्रत्यय केले असता ते प्रत्यय देखील ('क' प्रत्ययासारखेच) 'द्विवचन' या अर्थाचे बोधक आहेत असे मानावे लागेल (व त्यामुळें 'उभ' शब्दापुढें 'त्र, तसिल्' हे स्वार्थिक प्रत्यय आले असताना देखील 'उभ' हा शब्द 'द्विवचन' परक आहे असे मान. ण्याची आपत्ति येईल व तसे मानल्यास, 'उभ' या शब्दाचे 'उभयोऽन्यत्र' या वार्तिकान्वयें होणारे 'उभय' हे रूप होणार नाही आणि 'उभयतः उभयत्र' ही इष्ट रूपें सिद्ध होऊ शकणार नाहीत. दीक्षितांनी ही जी वर आपत्ति दाखविली आहे तिच्यासबधानें शंकाकार असे म्हणतो की, 'पञ्चम्यास्तसिल्' सू. १९५३ या सूत्रानें पञ्चम्यन्ताहून 'तसिल्' प्रत्यय होणे सांगितले असल्यामुळें व 'सप्तम्यास्त्रल्' सू १९५७ या सूत्रानें सप्तम्यन्ताहून 'त्रल्' प्रत्यय होणे सांगितले असल्यामुळे आणि अशा रीतीनें) 'त्र,तसिल्' हे दोन्ही प्रत्यय कारकविभक्तीहूनच होणारे असल्यामुळे, जरी हे प्रत्यय स्वार्थिक आहेत तरी 'उभ' शब्दाहून हे प्रत्यय होतेवेळी 'उभ' हा शब्द केवळ द्वित्व एवढ्याच अर्थाचा वाचक नसतो. (कारकविभक्तीच्या अर्थाचा देखील 'उभ' हा शब्द त्यावेळी बोधक असतो आणि अशा रीतीने 'त्र,तसिल्' हे प्रत्यय करतेवेळी 'उभ' हा शब्द केवळ द्वित्वाचा वाचक राहत नसल्यामुळे, 'उभयोऽन्यत्र' या वार्तिकान्वये 'उभ' शब्दाहून 'अयच्' प्रत्यय होईलच आणि 'उभयत्र, उभयत' अशी इष्ट रूपें सिद्ध होऊ शकतीलच. म्हणून 'उभ' शब्दाहून 'त्र, तसिल्' प्रत्यय करतेवेळी 'अयच्' प्रत्यय न होण्याची आपत्ति येईल असे जे दीक्षितांनी म्हटले आहे ते योग्य ठरत नाही. या शंकेवर दीक्षित असे उत्तर देतात की,) ही शंका बरोबर नाही.

कारण 'क' हा प्रत्यय देखील 'अज्ञात' इत्यादि अर्थाचा बोधक आहे आणि 'पञ्चकं प्रातिपदिकार्थः' हा पक्ष मानल्यास, 'उभ' शब्दाहून 'क' प्रत्यय करतेवेळीं 'उभ' या प्रकृतीहून अधिक अर्थाचा निश्चयेंकरून बोध होतो. (शंकाकाराचें म्हणणें असें आहे कीं, जेथें 'उभ' हा शब्द केवळ द्वित्वाचा वाचक असतो तशाच ठिकाणीं त्याहून 'अयच्' प्रत्यय होत नाहीं. पण जेथें तो शब्द 'द्वित्व' या अर्थाखेरीज इतर अर्थाचा देखील बोधक असतो तशा ठिकाणीं 'उभ' शब्दाहून 'उभयोऽन्यत्र' या वार्तिकान्वयें 'अयच्' प्रत्यय होतोच. 'उभ' या शब्दाहून 'त्रल्, तसिल्' हे स्वार्थिक प्रत्यय करतेवेळीं तो शब्द वर सांगितल्याप्रमाणें केवळ द्वित्वाचा बोधक नसून पञ्चमी, सप्तमी या कारक विभक्तीच्या अर्थाचा देखील वाचक असतो व त्यामुळें त्याहून 'अयच्' प्रत्यय होऊं शकतोच आणि दीक्षितांनीं दाखविलेली आपत्ति येत नाहीं. या शंकेवर दीक्षित असें उत्तर देतात कीं, 'अज्ञाते' सू. २०२८, 'कुत्सिते' सू. २०२९, 'अनुकम्पायाम्' सू. २०३१ इत्यादि सूत्रांन्वयें होणारा स्वार्थिक 'क' प्रत्यय 'कुत्सित' इत्यादि अर्थविशिष्ट प्रकृतीहून होणारा असल्यामुळें, जेव्हा 'उभ' शब्दाहून 'क' प्रत्यय होतो तेव्हां देखील 'उभ' ही प्रकृति केवळ द्वित्वाची-'द्विवचन' या अर्थाची-वाचक राहत नसून, 'कुत्सित' इत्यादि अधिक अर्थाची बोधक होते आणि जाति, व्यक्ति, लिङ्ग, संख्या, कारक हे पांच प्रातिपदिकाचे अर्थ आहेत असा पक्ष मानला असतां, 'उभ' शब्दाहून 'क' प्रत्यय करतेवेळीं 'उभ' ही प्रकृति 'कुत्सित' वगैरे अधिक अर्थाची बोधक होतेच. असें असून देखील 'उभ' शब्दाहून 'क' प्रत्यय केला असतां तो प्रत्यय स्वार्थिक असल्यामुळें त्याच्या 'उभ' या प्रकृतीचा 'द्विवचन' असा जो अर्थ आहे त्या अर्थाचा तो 'क' प्रत्यय देखील वाचक होतो व अशा रीतीनें 'उभ' हा शब्द 'द्विवचन'परक ठरत असल्यामुळें त्याहून 'अयच्' प्रत्यय करतां येत नाहीं असें भाष्यकारांनीं ज्याअर्थी म्हटलें आहे त्या अर्थी हें स्पष्ट होतें कीं, 'उभ'

हा शब्द 'द्वित्व' याखेरीज अधिक अर्थाचा वाचक असला तरी त्याहून स्वार्थिक प्रत्यय केला असता 'उभ' हा शब्द 'द्विवचन' परक आहे असे मानता येते व त्यामुळें 'उभ' शब्दाहून 'अयच्' प्रत्यय करता येऊ शकत नाही 'त्र, तसिल्' हे प्रत्यय स्वार्थिक आहेत हे वर सांगितलेच आहे आणि 'उभ' या प्रकृतीहून हे प्रत्यय केले असता, जरी 'उभ' या प्रकृतीचा 'द्विवचन' या अर्थाखेरीज अधिक अर्थ असतो तरी, 'क' प्रत्ययासंबधानें भाष्यकारानी जें वर म्हटले आहे त्याप्रमाणे, 'त्र, तसिल्' हे स्वार्थिक प्रत्यय देखील 'द्विवचन' या अर्थाचे बोधक ठरतील व त्यामुळें 'उभ' हा शब्द 'द्विवचन' परक आहे असे मानणे भाग पडेल आणि त्यामुळें 'उभ' शब्दाहून 'अयच्' प्रत्यय न होण्याची व 'उभयत्र,उभयतः' ही इष्ट रूपें सिद्ध न होण्याची आपत्ति येईल, म्हणून ही आपत्ति टाळण्याकरिता वार्तिकातील 'द्विवचन' या शब्दाचा 'द्विवचनप्रत्यय' असा कृत्रिम अर्थ करणेच योग्य आहे तसा अर्थ केल्यानें, म्हणजे 'उभ' हा शब्द द्विवचनप्रत्ययपरक असल्यास त्याहून 'अयच्' प्रत्यय होत नसून त्या 'उभ' शब्दापुढें इतर कोणताहि प्रत्यय असल्यास त्याहून प्रथम नित्यमेंकरून 'अयच्' प्रत्यय होतो असा अर्थ केल्यानें, वरील आपत्ति टाळता येते असा दीक्षिताच्या म्हणण्याचा भावार्थ आहे सारांश भाष्यकारानी वार्तिकातील 'द्विवचन' शब्दाचा 'द्व्यर्थाभिधानसमर्थ' असा जो अर्थ केला आहे तो केवळ प्रौढिवाद असून त्या शब्दाचा 'द्विवचनाचा प्रत्यय' असाच सिद्धान्तमतान्वये अर्थ आहे असें दीक्षिताचे म्हणणे आहे )

मनोरमा– नास्तीति । अनभिधानादिति भाव. । तथा चोभयशब्दस्य द्विवचनानुत्पादादसर्वविभक्तिकत्वेनाव्ययत्वे प्राप्ते "तद्धितश्चासर्वविभक्तिः" इति सूत्रे "कृत्तद्धिताना ग्रहण च पाठे" इति भाष्य कैयटेनावतारितम् । अस्तीति। पचतिकल्पं पचतिरूपमित्यादिवारणेन पाठस्योपक्षीणत्वादनभिधाने प्रमाण नास्तीति भाव । तयप्प्रत्ययान्तस्येति । उभयशब्दस्येति भावः । नित्यमेवेति । परे

ऽवरउभया अमित्रा इति तु च्छान्दसत्वाद् बोद्धव्यम् । अव्युत्पन्नाविति । एतच्च पस्पशायां कैयटे स्पष्टम् ।

'आमि सर्वनाम्न: सुट्' सू. २१७ या सूत्रावरील कौमुदींत 'उभयशब्दस्य द्विवचनं नास्तीति कैयट:' असें जें म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, 'उभय' या शब्दाच्या द्विवचनाचा प्रयोग भाषेंत आढळत नसल्यामुळें, त्या शब्दाहून द्विवचनाचे प्रत्यय करतां येत नाहींत. (कैयटाच्या म्हणण्याचा आशय हा आहे कीं, 'अन्याभावो द्विवचनटाब्विषयत्वात्' व 'उभयोऽन्यत्र' या वार्तिकांवरून हें स्पष्ट होतें कीं, 'उभ' शब्दापुढें द्विवचनाचा प्रत्यय आला असतां, त्याहून 'अयच्' प्रत्यय होत नसून, त्या शब्दापुढें इतर कोणताहि प्रत्यय आला असतां त्याहून प्रथम 'अयच्' प्रत्यय होतो आणि यावरून हें सिद्ध होतें कीं, 'उभ' शब्दाचीं केवळ द्विवचनाचींच रूपें होतात व 'उभय' या अयच्-प्रत्ययान्त शब्दाचीं द्विवचनीं रूपें न होतां एकवचनाचीं व बहुवचनाचींच रूपें होतात.) अशा रीतीनें 'उभय' या शब्दाहून द्विवचनाचा प्रत्यय होत नसल्यामुळें व तो शब्द असर्वविभक्ति, म्हणजे ज्याहून सर्व विभक्तिप्रत्यय होत नाहींत असा, ठरत असल्यामुळें ('तद्धितश्चासर्वविभक्ति:' सू. ४४८ या सूत्रान्वयें) 'उभय' या शब्दाला अव्ययसंज्ञेची प्राप्ति झाली असतां, 'तद्धितश्चासर्वविभक्ति:' सू. १-१-३८ या सूत्रावरील भाष्यांत 'कृत्तद्धितानां ग्रहणं च पाठे' असें जें श्लोकवार्तिक पठित केलें आहे त्या वार्तिकाचें अवतरण देऊन कैयटानें 'उभय' शब्दाला अव्ययसंज्ञा होत नाहीं असें म्हटलें आहे. (त्या सूत्रावरील भाष्याच्या टीकेंत कैयटानें 'ननूभयशब्दस्य द्विवचनाभावादसर्वविभक्तित्वं, तथा गोदौ, वरणा इति, तत्र एषामपि तद्धितश्चासर्वविभक्तिरित्यव्ययसंज्ञाप्रसङ्ग इत्याह—कृत्तद्धितानामिति । प्रतिपदं तद्धिताः पठितव्याः येषामव्ययसंज्ञेष्यते इत्यर्थः । तस्माद्-गणपाठ एवाश्रयितव्यः । प्रपञ्चार्थस्तु सूत्रारम्भः' असें म्हटलें आहे. कैयटाच्या म्हणण्याचा आशय हा आहे कीं, ज्या तद्धितप्रत्ययान्त शब्दांना अव्ययसंज्ञा होणे मान्य तद्धित प्रत्ययांचें भाष्यकारांनीं त्या

भाष्यात 'तसिलादयः प्राक् पाशप.' इत्यादि जें परिगणन केलें आहे त्यात 'अयच्' या तद्धित प्रत्ययाचा अन्तर्भाव होत नसल्यामुळें, 'उभय' हा अयच्प्रत्ययान्त शब्द असर्वविभक्ति असून देखील त्याला अव्ययसंज्ञा होत नाही.) 'अस्तीति हरदत्तः' म्हणजे 'उभय' शब्दाचे द्विवचनाचे देखील प्रयोग होतात, असे जे हरदत्तानें म्हटले आहे त्या म्हणण्याचा भावार्थ हा आहे की, 'पचतिकल्पम्, पचतिरूपम्' इत्यादि तद्धितप्रत्ययान्त रूपाना जी अव्ययसंज्ञेची प्राप्ति होत होती तिचे निवारण करण्यामध्ये परिगणन उपक्षीण–चरितार्थ–झाले असल्यामुळें, 'उभय' शब्दाचा द्विवचनात प्रयोग होत नाही हे मानण्यास कांही प्रमाण नाही. (वर जी दोन वार्तिके दिली आहेत त्या वार्तिकाविरुद्ध व भाष्याविरुद्ध हरदत्ताचे म्हणणे असल्यामुळें ते स्वीकारार्ह नसून कैयटाचेंच म्हणणे स्वीकारार्ह आहे असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे.) 'तयप्प्रत्ययान्ततया' असे जें प्रकृत सूत्रावरील कौमुदीत म्हटले आहे त्याचा 'उभयशब्दस्य तयप्प्रत्ययान्ततया' असा अर्थ आहे. (प्रकृत सूत्रावरील कौमुदीच्या ज्या पक्तीत हे पद आहे ती पंक्ति 'तस्माज्जस्ययजादेशस्थानिवद्भावेन तयप्प्रत्ययान्ततया प्रथमचरम इति विकल्पे प्राप्ते विभक्तिनिरपेक्षत्वेनान्तरङ्गत्वान्नित्यैव संज्ञा भवति । उभये ।' अशी आहे. या पक्तीचा भावार्थ हा आहे की, 'उभय' या शब्दाहून 'जस्' प्रत्यय केला असता, 'उभय' हा शब्द तयप्प्रत्ययान्त असल्यामुळें व 'प्रथमचरम' सू २२६ या सूत्रात 'तय = तयप्प्रत्ययान्त' याचे ग्रहण केले असल्यामुळें, 'जस्' प्रत्ययाचे जागी 'जसःशी' सू. २१४ या सूत्राने होणाऱ्या 'शी = ई' या आदेशाची विकल्पेंकरून प्राप्ति होते व त्यामुळें 'उभये उभया.' अशी पाक्षिक रूपें होऊं पाहतात, कारण 'उभय' हा शब्द सर्वादिगणात पठित असल्यामुळें जरी त्याला 'सर्वादीनि सर्वनामानि' या पूर्व सूत्रानें नित्य सर्वनामसंज्ञा प्राप्त होते तरी त्या पूर्व सूत्रानें प्राप्त होणाऱ्या नित्य सर्वनामसंज्ञेचा 'प्रथमचरम' या विकल्पविधायक

पर सूत्रानें, 'पूर्वात्परं बलवत्' या न्यायानें बाध होतो. या वरील विवेचनांत 'उभय' शब्द तयप्प्रत्ययान्त आहे असें जें दीक्षितांनी म्हटलें आहे त्या म्हणण्याचा भावार्थ हा आहे कीं, 'सङ्ख्याया: अवयवे तयप्' सू. १८४३ या सूत्रानें संख्यावाचक 'उभ' या शब्दाहून 'तयप्' केला असतां, 'उभादुदात्तो नित्यम्' सू. १८४५ या सूत्रानें त्या 'तयप्' प्रत्ययाचे जागीं 'अयच्' असा जो आदेश होतो तो 'स्थानिवदादेश:' सू. ४९ या सूत्रान्वयें 'तयप्' प्रत्ययच आहे असें स्थानिवद्भावानें मानतां येत असल्यामुळें, 'उभय' हा शब्द तयप्प्रत्ययान्त ठरतो व त्यामुळें त्याहून केलेल्या 'जस्' प्रत्ययाचे जागीं, 'प्रथमचरम' या सूत्रानें विकल्पेंकरून 'शी' आदेश होऊं पाहतो. पण दीक्षित म्हणतात कीं 'प्रथमचरम' या परसूत्रानें विकल्पेंकरून सर्वनामसंज्ञा होणें हें कार्य पुढें असणाऱ्या 'जस्' प्रत्ययाच्या अपेक्षेनें होणारें असल्यामुळें, म्हणजे तें कार्य होण्याकरितां पुढें 'जस्' प्रत्यय असणें या निमित्ताची अपेक्षा असल्यामुळें, तें कार्य बहिरङ्ग ठरत असून, त्याच्या मानानें 'सर्वादीनि सर्वनामानि' सू. २१३ या पूर्व सूत्रानें होणारी नित्य सर्वनामसंज्ञा, पुढें असणाऱ्या कोणत्याहि निमित्तानें होणारी नसून विभक्तिनिरपेक्ष असल्यामुळें, अन्तरङ्ग ठरते आणि 'परनित्यान्तरङ्गापवादानामुत्तरोत्तरं बलीय:'–परि. ३८–या परिभाषान्वयें अन्तरङ्गशास्त्र परशास्त्रापेक्षां बलवत्तर ठरत असल्यामुळें, 'जस्' प्रत्ययाचे जागीं विकल्पेंकरून 'शी' आदेश न होतां 'जस:शी' सू. २१४ या सूत्रानें होणारा नित्य 'शी' आदेश होतो व 'उभये' असेंच जस्प्रत्ययान्त रूप सिद्ध होतें आणि 'उभया:' असें पाक्षिक रूप होत नाहीं.) 'उभय' या शब्दाला जरी नित्यसर्वनामसंज्ञा आहे तरी 'परेऽवरउभया अमित्रा:' या श्रुतींतील 'उभया:' हें रूप छान्दस–वैदिक–असल्यामुळें ('दृष्टानुविधिश्छन्दसि' या न्यायान्वयें) तो प्रयोग साधु मानला पाहिजे. प्रकृत सूत्रावरील कौमुदींत 'अन्यतर, अन्यतम' हीं अव्युत्पन्न प्रातिपदिकें आहेत असें जें म्हटलें आहे तें पस्पशाह्निकांतील कैयटवृत्तीवरून स्पष्ट होतें.

('अन्यतरोपदेशेन घृत स्यात्' या पस्पशाह्निकातील भाष्याचे व्याख्यान करितांना कैयटानें 'अन्यतरान्यतमशब्दावव्युत्पन्नौ स्वभावाद् द्विबहुविषये निर्धारणे वर्तेते' असे म्हटले आहे. तसे म्हणण्याचे कारण हे की, 'कियत्तदो निर्धारणे' सू. २०४७ व 'वा बहूना जातिपरिप्रश्ने' सू. २०४८ या सूत्रानी 'किम्, यद्, तद्' या तीन सर्वनामाहूनच 'डतर, डतम' हे प्रत्यय होणे सांगितले आहे 'अन्य' या सर्वनामाहून ते प्रत्यय होणे सांगितले नाही म्हणून 'अन्यतर, अन्यतम' हे शब्द 'अन्य' या शब्दाहून 'डतर, डतम' प्रत्यय होऊन सिद्ध झालेले शब्द नसून प्रकृतिप्रत्ययविभागशून्य अव्युत्पन्न प्रातिपदिकें आहेत असे मानणे भाग आहे असा कैयटाच्या म्हणण्याचा भावार्थ आहे. )

शब्दरत्न– एवं–नित्यद्विवचनान्तत्वे । "स्वाङ्गशिटाम्" इत्याद्युदात्तत्वं च न फलम् । उभे भद्रे इत्यावावन्तोदात्तपाठेन गणे ऽन्तोदात्तनिपातनात् । वृथादित्वेन तत्सिद्धेश्चेति भावः ।

प्रायदर्शनमिति प्रायग्रहणादुभातिरिक्तासर्वनाम्नः प्रथमा द्वितीये न स्त इत्यर्थकल्पनसम्भवान्नासर्वनामत्वे स दोषः । अयच् स्यादिति । अत्रापि स्थानियत्सूत्रस्थभाष्यरीत्या प्रत्ययान्तरत्वमिति भावः । निर्देशेन चेति । वृत्तिविषये इत्यनुक्त्वा इदमेव वक्तव्यमिति भाव । अन्याभाव इति । अन्येषां सर्वनामकार्याणामभाव इत्यर्थः । पूर्वपक्षिणान्तवद्भावविरहादिति वदतैकदेशविकृतन्यायो ऽशास्त्रीयविकारविषयोऽपीति नाभ्युपेतमिति तदनुसारेणैव समाधि वक्तुमुपक्रमते–तथापीत्यादि ।

'नन्वेव सर्वादिषु पाठो व्यर्थ.' या मनोरमेच्या पक्तीतील 'एवम्' या पदाचा 'नित्यद्विवचनान्तत्वे', म्हणजे 'उभ' हा शब्द नित्य द्विवचनान्त असल्यामुळें, असा अर्थ आहे 'स्वाङ्गशिटामदन्तानाम्' फिट् सू. २९ या सूत्रान्वयें 'उभ' हा शब्द आद्युदात्त व्हावा हे तो शब्द सर्वादिगणात पठित केल्याचे फल आहे असे कोणी

म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं. 'उभे भद्रे' इत्यादि श्रुतींत 'उभे' हा शब्द अन्तोदात्त पठित असल्यामुळें, सर्वादिगणांत 'उभ' हा शब्द निपातनानें अन्तोदात्त पठित आहे असें मानलें पाहिजे व 'वृषादीनां च' सू. ३६९१ या सूत्रान्वयें 'उभ' हा शब्द आद्युदात्त देखील सिद्ध होतो. ( तसें मानल्यानें 'उभ' शब्दाची दोन्ही स्वरांची रूपें सिद्ध होतात. वृषादिगणांत पठित असलेले शब्द आद्युदात्त आहेत असा 'वृषादीनां च' या सूत्राचा अर्थ आहे. वृषादिगणांत 'उभ' हा शब्द साक्षात् पठित नाहीं. तरी पण तो आकृतिगण असल्यामुळें, आद्युदात्त 'उभ' शब्दाचा त्यांत अन्तर्भाव करतां येतो. ) 'निमित्तकारणहेतुषु सर्वासां प्रायदर्शनम्' या वार्तिकांत 'प्राय' या शब्दाचें ग्रहण केलें असल्यामुळें त्या वार्तिकाचा असा अर्थ करतां येऊं शकतो कीं, 'उभ' हा शब्द खेरीज करून इतर असर्वनामशब्दांचा, 'निमित्त' व त्याचे पर्याय-वाचक शब्द पुढें असल्यास, प्रथमा व द्वितीया या विभक्तींत प्रयोग होत नाहीं व त्या वार्तिकाचा असा अर्थ केल्यानें, 'उभ' हा शब्द सर्वनाम न मानला, म्हणजे सर्वादिगणांत पठित न केला, तरी कांहीं दोष येत नाहीं. ('उभ' शब्दाहून 'अकच्' प्रत्यय व्हावा एवढ्याकरितांच 'उभ' या शब्दाचा सर्वादिगणांत पाठ केला आहे असें जें सिद्धान्तीचें म्हणणें आहे त्यावर शंकाकार अशी शंका करतो कीं, 'प्रायग्रहणादसर्वनाम्नः प्रथमाद्वितीये न भवतः, अन्यास्तु यथादर्शनं भवन्ति' असें 'हेतौ' सू. २–३–२३ या सूत्रावरील भाष्याच्या वृत्तींत कैयटानें म्हटलें असल्यामुळें, 'उभ' शब्दाचा सर्वादिगणांत पाठ नसल्यास 'उभ' शब्दापुढें निमित्तपर्यायवाचक शब्द आला असतां 'उभ' शब्दाचा प्रथमा व द्वितीया या विभक्तींत प्रयोग होऊं शकणार नाहीं व तसा प्रयोग होण्याकरितां 'उभ' शब्दाचा सर्वादिगणांत पाठ केला आहे आणि म्हणून 'उभ' शब्दाहून 'अकच्' प्रत्यय व्हावा एवढ्याकरितांच तो पाठ केला आहे असें जें सिद्धान्तीचें म्हणणें आहे तें बरोबर मानतां येत नाहीं. या शंकेवर

शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, 'उभ' शब्दाचा सर्वादिगणात पाठ करण्याचें जें फल दाकाकारानें वर सांगितले आहे ते फल, 'उभ' शब्दाचा सर्वादिगणात पाठ नसला व तो शब्द सर्वनामसंज्ञक नाही असे मानले तरी, सिद्ध होऊं शकते; कारण वरील वार्तिकात 'प्राय' शब्दाचे ग्रहण केले असल्यामुळें त्या वार्तिकाचा असा अर्थ करता येतो की, 'उभ' हा असर्वनामशब्द खेरीज करून इतर असर्वनामशब्दाहून प्रथमा व द्वितीया विभक्ति होत नाहीत, म्हणजे 'उभ' या असर्वनामशब्दाहून सर्व विभक्ति होतात, आणि असा अर्थ केल्यानें, दाकाकारानें वर सांगितलेले फल अन्यथासिद्ध होत असल्यामुळें, त्या फलाच्या सिद्धीकरिता 'उभ' शब्दाचा सर्वादिगणात पाठ केला आहे असे मानता येत नाही व तो पाठ 'उभ' शब्दाहून 'अकच्' प्रत्यय व्हावा एवढ्याकरिताच केला आहे असे सिद्धान्तीचे म्हणणेच योग्य ठरते. आता 'उभादुदात्तो नित्यम्' या सूत्राचा योगविभाग करून दीक्षितांनी 'उभादुदात्त.' या भागाला 'अवयववृत्ते: सङ्ख्यावाचिनः उभशब्दादवयविन्यर्थेऽयच् स्यात्' असा अर्थ करितांना) 'अयच् स्यात्' असें जें म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, 'स्थानिवदादेश.' १–१–५६ या सूत्रावरील भाष्यात सांगितल्याप्रमाणे या योगविभागानें देखील 'उभ' शब्दाहून स्वतंत्र 'अयच्' प्रत्यय होतो (व 'उभ' शब्दाहून प्रथम 'तयप्' प्रत्यय होऊन त्या प्रत्ययाचे जागी 'अयच्' आदेश होतो असा त्या प्रथम भागाचा अर्थ करू नये. 'स्थानिवदादेशः' या सूत्रावरील भाष्यात 'तस्य दोषस्तयादेशे उभयप्रतिषेध.' हें वार्तिक पठित करून त्या वार्तिकाचे व्याख्यान करितांना भाष्यकार म्हणतात— 'तस्यैतस्य लक्षणस्य दोषः। तयादेशे उभयप्रतिषेधो वक्तव्यः। उभये देवमनुष्याः। तयपो ग्रहणेन ग्रहणाज्जसि विभाषा प्राप्नोति। नैष दोषः। अयच् प्रत्ययान्तरम्।' या भाष्याचा अर्थ हा आहे की, स्थानिवद्भावाचे 'स्थानिवदादेशः' हे सूत्र मानल्यास दोष येत असल्यामुळें, 'उभय' या शब्दामध्यें 'तयप्' प्रत्ययाचे जागीं झालेला जो

'अयच्' आदेश त्याला स्थानिवद्भाव होत नाहीं, म्हणजे तो आदेश स्थानिवद्भावानें 'तयप्' प्रत्ययच आहे असें मानतां येत नाहीं, असें वचन पठित केलें पाहिजे. 'उभये देवमनुष्याः' या उदाहरणांत 'उभये' या स्थलीं 'तयप्' प्रत्ययाचे जागीं झालेला 'अयच्' आदेश स्थानिवद्भावानें 'तयप्' प्रत्ययच आहे असें मानलें तर, 'उभय' या शब्दाहून 'जस्' प्रत्यय केला असतां, 'प्रथमचरम' या सूत्रानें सर्वनामसंज्ञा विकल्पानें होऊं लागेल व 'उभयाः' असें अनिष्ट पाक्षिक रूप होण्याची आपत्ति येईल. पण भाष्यकार म्हणतात कीं, ही आपत्ति येत नाहीं. 'उभादुदात्तो नित्यम्' या सूत्रानें 'उभ' शब्दाहून स्वतंत्र 'अयच्' प्रत्यय होतो व 'तयप्' प्रत्ययाचे जागीं त्या सूत्रानें 'अयच्' आदेश होत नाहीं असें मानलें असतां, वर दाखविलेल्या दोषाचा परिहार करतां येतो. शब्दरत्नकार म्हणतात कीं, या भाष्यान्वयें 'अयच्' हा स्वतंत्र प्रत्यय आहे असें मानणें इष्ट आहे व 'उभादुदात्तो नित्यम्' या सूत्राचा योगविभाग केला किंवा न केला तरी, 'अयच्' हा स्वतंत्र प्रत्यय आहे असेंच मानणें योग्य आहे. 'नित्यम्' या द्वितीय भागाचा 'उभशब्दाद्वृत्तिविषये नित्यमयच् स्यात् स्वार्थे' असा मनोरमेंत अर्थ करितांना) 'वृत्तिविषये' असें जें म्हटलें आहे तसें न म्हणतां, 'उभौ साभ्यासस्य' सू. २६०६ या पाणिनीय सूत्रांत 'उभौ' असा निर्देश असल्यामुळें, त्या निर्देशाच्या आधारें 'यत्र द्विवचनं न श्रूयते तत्रैव अयच् स्यात्स्वार्थे' असें जें पुढें मनोरमेंत म्हटलें आहे तेंच म्हणणें योग्य आहे. (द्वितीय भागाचा असा अर्थ करितांना 'न श्रूयते' या पदाचें ग्रहण केलें असल्यामुळें व 'उभयपक्षविनीतनिद्राः' (रघुवंश सर्ग ५, श्लोक ७२) या उदाहरणांतील 'उभयपक्ष' हा सामासिक शब्द तयार करतेवेळीं 'उभ' या शब्दापुढील द्विवचनाच्या अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्ययाचा 'सुपोधातुप्रातिपदिकयोः' सू. ६५० या सूत्रानें लुक् होऊन त्या द्विवचनाच्या प्रत्ययाचें श्रवण होत नसल्यामुळें, 'उभ' शब्दाहून 'अयच्' प्रत्यय होऊन 'उभयपक्ष' असें इष्ट रूप सिद्ध होतें-परंतु 'उभयोर्वासः' या

अलुक्समासातील 'ओस्' या द्विवचनाच्या प्रत्ययाचा 'शयवासवासिष्व-कालात्' सू ९७६ या सूत्रान्वयें लुक् होत नसून त्या प्रत्ययाचे 'उभ' शब्दापुढें श्रवण होत असल्यामुळें, 'उभ' शब्दाहून 'अयच्' प्रत्यय होत नाही व 'उभययो' असे अनिष्ट रूप न होता, 'ओसि च' सू २०७ या सूत्रानें 'उभ' यातील अन्त्य अकाराचे एत्व होऊन व नतर एकाराचे जागी अयादेश होऊन 'उभयो' असे इष्ट रूप सिद्ध होते तसेच 'उभ औ = उभौ' या स्थली वृद्धिरूप एकादेशानें जरी 'औ' या द्विवचनाच्या प्रत्ययाचा अपहार होतो तरी, पूर्वी सांगितल्याप्रमाणे 'औ' हा एकादेश 'औ' प्रत्ययच आहे व त्याचे श्रवण होतें असे परादिवद्भावानें मानता येत असल्यामुळें, वरील वचनान्वयें 'उभ' शब्दाहून 'अयच्' प्रत्यय होत नाही व 'उभौ' असे इष्ट रूप सिद्ध होते सारांश 'यत्र द्विवचन न श्रूयते तत्रैव अयच् स्यात्स्वार्थे' असा अर्थ केल्यानें सर्व इष्ट रूपांची सिद्धि होत असल्यामुळें, 'उभशब्दाद्वृत्तिविषये नित्यमयच् स्यात्' असे वेगळे व्याख्यान करण्याची काही गरज राहत नाही व तसे व्याख्यान करणे योग्यहि नाही असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे ) 'अन्याभावो द्विवचनटाब्विषयत्वात्' या वार्तिकातील 'अन्याभाव' या पदाचा 'अन्येषा सर्वनामकार्याणामभाव' असा अर्थ आहे (याचे विवरण पूर्वी मनोरमेंत केलेच आहे 'यद्यप्यु-भावित्यादौ द्विवचनपरत्व दुरुपपादमुभयत आश्रयणेऽन्तादिवद्भाव-विरहात्' अशी मनोरमेंत शका उपस्थित करितांना) पूर्वपक्षीनें 'अन्तादिवद्भावविरहात्' असे म्हटले असल्यामुळें, एकदेशविकृत-न्याय अशास्त्रीय विकाराना देखील लागू पडतो हा पक्ष त्याने स्वीकारला नाही आणि म्हणून दीक्षितानी देखील (वादाकरिता) त्याच्याच मताचा स्वीकार करून त्यानें केलेल्या दाव्यावर 'तथा-प्युभशब्दादुत्पन्नम्' इत्यादि पुढील पक्तीत उत्तर दिले आहे ('उभ औ = उभौ' या स्थली 'वृद्धिरेचि' सू ७२ या सूत्रानें 'औ' असा वृद्धिरूप एकादेश केल्यावर तो एकादेश परादिवद्भावानें

'औ' प्रत्ययच आहे असें मानलें असतां, 'उभ्' अशी जी एकदेशविकृत प्रकृति होते ती 'एकदेशविकृतमनन्यवत्'–परि. ३७–या परिभाषान्वयें 'उभ' अशी मूळची प्रकृति आहे असें मानतां येत असल्यामुळें, शंकाकारानें केलेली शंका अयोग्य ठरते अशा प्रकारें दीक्षितांना त्या शंकेचें निरसन करतां आलें असतें. पण शंकाकारानें कोणत्याहि पाणिनीय सूत्रानें न होणाऱ्या 'उभ्' अशा अशास्त्रीय एकदेशविकाराला एकदेशविकृतन्याय लागू पडत नाहीं असें मानून शंका उपस्थित केली असल्यामुळें दीक्षितांनीं वादाकरितां त्याचेंच मत स्वीकारून त्याच्या शंकेवर उत्तर दिलें आहे. वास्तविक 'एकदेशविकृतमनन्यवत्' हा न्याय लौकिक आधारावर रचला असल्यामुळें, तो शास्त्रीय व अशास्त्रीय या दोन्ही विकारांना सारखाच लागू पडतो आणि म्हणून शंकाकारानें केलेली शंका अनुपपन्न ठरते असा शब्दरत्नकारांचा म्हणण्याचा आशय आहे.)

शब्दरत्न—उभशब्दादिति । अत्यन्तस्वार्थिकानां सुबुत्पत्तेः पूर्वमेवान्तरङ्गत्वादुत्पत्तेरुभघटिताच्छब्दादुभयशब्दादित्यर्थः । यत्र लुकाऽपहृतं तत्रायजिति तु नोक्तं प्रातिपदिकप्रकृतिकाचारक्विबन्ते प्रत्ययजिज्ञप्यते तदा तस्यानापत्तेस्तत्रोत्पत्तेरभावेन विशिष्टाभावाक्षतेः । लुका नापहृतमिति । लुक्कृतापहारसम्भावनाऽभाववदित्यर्थः । एतेनोभशब्दस्य पाठाभावेऽसर्वनामत्वेन ततस्तसिलादिविवक्षायाः कर्तुमशक्यत्वेन द्विवचनस्य लुका ऽनपहारस्यैव सत्त्वेन ततो ऽयजनापत्तावुभयत्रेत्यसिद्धिरित्यपास्तम् । यद्ययच् स्यात्तदा त्रलादि स्यात्तस्मिंश्च लुगपि स्यादिति लुकाऽपहारसम्भावनासत्त्वेन लुक्कृतापहारसम्भावनाभावतोऽन्यत्वात् ।

अत्यन्त स्वार्थिक प्रत्यय–अयच्–अन्तरङ्ग असल्याकारणानें सुबुत्पत्ति होण्यापूर्वी तो प्रत्यय होत असल्यामुळें, 'उभशब्दादुत्पन्नम्' या मनोरमेच्या पंक्तींतील 'उभशब्दात्' या पदाचा 'उभघटितात् शब्दात् उभयशब्दात्' असा अर्थ करणें योग्य आहे. (सारांश

'उभशब्दात्' हा अन्यपदार्थप्रधान बहुव्रीहि असून त्यांत 'उभय' हा शब्द अन्यपदार्थ असल्यामुळें, त्याचा 'उभः शब्दो यस्मिन् उभशब्दघटिते उभयशब्दरूपसमुदाये' असा विग्रह आहे. असा अर्थ करण्याचें कारण हें की, 'उभादुदात्तो नित्यम्' सू. १८४५ या सूत्रानें होणारा 'अयच्' प्रत्यय अत्यन्तस्वार्थिक असल्यामुळें तो अन्तरङ्ग ठरतो व विभक्तिप्रत्यय होण्यापूर्वीच 'अयच्' प्रत्यय होतो. तो प्रत्यय प्रथम झाल्यावर नंतर जो पञ्चमीच्या किंवा सप्तमीच्या द्विवचनाचा प्रत्यय, 'त्र, तसिल्' हे प्रत्यय करण्यापूर्वी, केला जातो त्या द्विवचनाच्या प्रत्ययाचा 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' सू. ६५० या सूत्रानें लुक् होऊन द्विवचनाच्या प्रत्ययाचें श्रवण होत नसल्यामुळें, 'अयच्' प्रत्यय कायम राहून 'उभयतः उभयत्र' ही इष्ट रूपें सिद्ध होतात. 'उभयतः, उभयत्र' इत्यादि स्थली द्विवचनाच्या प्रत्ययाचा लुक् होणार अशी संभावना असल्यामुळें, 'अयच्' हा अन्तरङ्ग प्रत्यय, विभक्तिप्रत्यय उत्पन्न होण्यापूर्वी, होतो हे लक्षात ठेवावे.) 'यत्र लुका अपहृतं तत्र अयच्' असें न म्हणतां दीक्षितांनी मनोरमेंत 'लुका नापहृतं यत्र ततोऽन्यत्रायच्' असा जो नञ्द्वयार्थघटित वाक्याचा उपयोग केला आहे त्याचे कारण हें की, ('सर्वप्रातिपदिकेभ्यः क्विब्वा वक्तव्यः' सू. २६६५ वरील वार्तिक—या वार्तिकान्वयें) 'उभ' या प्रातिपदिकरूप प्रकृतीहून आचार क्विप् प्रत्यय केल्यास, जर तशा ठिकाणी 'अयच्' प्रत्यय होणें इष्ट असेल तर, 'उभ' शब्दाहून 'अयच्' प्रत्यय न होण्याची आपत्ति येईल; कारण या स्थली द्विवचनाच्या प्रत्ययाची उत्पत्तीच झाली नसल्यामुळें, येथें 'उभ' या शब्दाचे ठिकाणी द्विवचनाच्या प्रत्ययाचा अभाव आहे व तो शब्द द्विवचनप्रत्यययुक्त नाही (व त्यामुळें येथें द्विवचनाच्या प्रत्ययाचा लुकानें अपहार झाला आहे असे म्हणतां येत नाही. 'उभो इव आचरति उभयति = उभ क्विप् शप् ति' या स्थली झालेला आचार क्विप् प्रत्यय सुबन्ताहून उत्पन्न झालेला नसून वरील वार्तिकान्वयें 'उभ' या प्रातिपदिकाहूनच उत्पन्न झाला असल्यामुळें

आणि अशा रीतीनें येथें द्विवचनाच्या प्रत्ययाचा अभाव असल्यामुळें, द्विवचनाच्या प्रत्ययाचा लुक् होण्याचा मुळींच संभव नाहीं. म्हणून 'यत्र लुका अपहृतं तत्र अयच्' असें जर म्हटलें असतें तर, या ठिकाणीं द्विवचनप्रत्ययाचा लुक् झाला नसल्यामुळें, 'उभ' शब्दाहून 'अयच्' प्रत्यय न होण्याची व 'उभयति' असें रूप सिद्ध न होण्याची आपत्ति आली असती. ती आपत्ति टाळण्याकरितांच दीक्षितांनीं मनोरमेंत नञ्द्वयघटित वाक्याचा उपयोग केला आहे, आणि जेथें द्विवचनाच्या प्रत्ययाचा लुक् झाला नाहीं अशा स्थलाहून भिन्न हें स्थल असल्यामुळें, या स्थलीं 'अयच्' प्रत्यय होऊन 'उभयति' असें रूप सिद्ध होतें. या पंक्तींत 'यद्ययजिष्यते' असें म्हटलें असल्यामुळें शब्दरत्नकार हें ध्वनित करितात कीं, 'उभयति' असा आचार-क्विबन्त शब्द भाषेंत मुळींच आढळत नाहीं व एवढ्याच रूपाच्या सिद्धिकरितां जर नञ्द्वयघटित वाक्याचा मनोरमेंत उपयोग केला असेल तर तसें करण्याची काहीं आवश्यकता नव्हती असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा भावार्थ आहे.) 'लुका नापहृतम्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा 'लुक्कृतापहारसम्भावनाभाववत्', म्हणजे सरलेंत म्हटल्याप्रमाणें 'यत्र्युभशब्दादयच् स्यात्तर्ह्युभयशब्दस्य द्विवचनपरत्वं स्यादिति यत्र सम्भाव्यते ततोऽन्यत्रायच् भागः' = लुकानें अपहार होण्याचा ज्या स्थलीं संभव नाहीं तें स्थल; असा अर्थ आहे. असा अर्थ होत असल्यामुळें, जे कोणी म्हणतात कीं, 'उभ' शब्दाचा सर्वादिगणांत पाठ केला नसता तर त्याला सर्वनामसंज्ञा झाली नसती व त्यामुळें सर्वनामाहून होणारे 'तमिल्' इत्यादि प्रत्यय त्या शब्दाहून उत्पन्न होऊं शकले नसते आणि त्यामुळें द्विवचनाच्या प्रत्ययाचा लुक् होण्याचा प्रसंगच आला नसता व 'अयच्' प्रत्यय न होण्याची आपत्ति आली असती आणि 'उभयम्' हें रूप सिद्ध होऊं शकलें नसतें, तें त्याचें म्हणणें चूक ठरतें. जर 'उभ' शब्दाहून 'अयच्' प्रत्यय झाला तर ('उभय' हा शब्द सर्वादिगणांत पठित असल्यामुळें. अयच्प्रत्ययान्त 'उभय' या

शब्दाहून ) 'त्रल्' इत्यादि प्रत्यय होऊं शकतील व ते प्रत्यय झाले असता ( द्विवचनाच्या अन्तर्वर्तिविभक्तिप्रत्ययाचा ) लुक् देखील होईल आणि अशा रीतीनें लुक्नें ( द्विवचनाच्या प्रत्ययाचा ) अपहार होण्याचा येथें संभव असल्यामुळें, जेथें लुक्नें द्विवचनाच्या प्रत्ययाचा अपहार होण्याचा संभव नाही त्याहून हें स्थल भिन्न आहे हे स्पष्ट होते ( आणि म्हणून 'उभ' शब्दाहून 'अयच्' प्रत्यय होऊ शकतो 'उभ' शब्दाचा सर्वादिगणात पाठ न केला तर 'उभशब्दादुत्पन्न द्विवचन लुका नापहृत यत्र' या मनोरमेंतील पंक्तीचा जो अक्षरार्थ होतो त्या अर्थान्वयें 'उभयत:, उभयत्र' ही रूपें सिद्ध होऊं शकणार नाहीत असे शकाकाराचे म्हणणे आहे; कारण 'त्र, तसिल्' हे प्रत्यय सर्वनामाहूनच होणारे प्रत्यय असल्यामुळें, 'उभ' हा शब्द सर्वनामसंज्ञक न मानल्यास, त्या शब्दाहून ते प्रत्यय होऊंच शकणार नाहीत व ते प्रत्यय न झाल्यास, 'उभ' हा शब्द तद्धितान्त न ठरल्याकारणानें प्रातिपदिकसंज्ञक होणार नाही व त्यामुळें 'उभ' शब्दापुढील द्विवचनाच्या प्रत्ययाचा 'सुपो धातु' सू. ६५० या सूत्रानें होणारा लुक् होऊ शकणार नाही आणि 'अयच्' प्रत्यय न होण्याची आपत्ति येईल. या शंकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, शंकाकारानें जी आपत्ति वर दर्शविली आहे ती त्यानें मनोरमेंतील पंक्तीचा अक्षरश: अर्थ केल्यामुळे उत्पन्न होते पण जेथें द्विवचनाच्या प्रत्ययाचा लुकानें अपहार होण्याचा संभव नसेल त्याहून भिन्न स्थली 'अयच्' प्रत्यय होतो असा त्या पंक्तीचा अर्थ केल्यानें ती आपत्ति सहज टाळता येते, कारण 'उभ' शब्द जरी सर्वादिगणात पठित नसला व सर्वनामसंज्ञक नसला तरी, 'उभादुदात्तो नित्यम्' या सूत्रानें 'उभ' शब्दाहून अत्यन्त स्वार्थिक 'अयच्' प्रत्यय झाला असता, 'उभय' असे जें रूप होते त्याचा सर्वादिगणात पाठ असल्यामुळें व तो सर्वनामसंज्ञक होत असल्यामुळें, 'उभय' या सर्वनामाहून 'तसिल्, त्रल्' हे प्रत्यय होऊ शकतातच व हे स्थल असे आहे की, ते प्रत्यय लावते-

वेळीं 'उभ' शब्दाहून उत्पन्न झालेल्या द्विवचनाच्या प्रत्ययाचा अवश्य लुक् होणारच आणि अशा रीतीनें तसा लुक् होण्याची जेथें संभावना नाहीं त्याहून हें स्थल भिन्न ठरत असल्यामुळें, येथें 'अयच्' प्रत्यय कायम राहतो व 'उभयतः, उभयत्र' हीं इष्ट रूपें सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं.)

शब्दरत्न—यद्यपि भाष्ये इति । स्वार्थिकत्वेनोभशब्दात्परस्य कप्रत्ययस्यापि द्विवचनत्वमस्तीत्यन्वयः । अधिकेति । संख्यापेक्षया ऽधिकलिङ्गकारकेत्यर्थः । दिगिति । दिगर्थस्तु भाष्यस्याप्रौढिवादत्वमपि समर्थयितुं शक्यमिति । तथा हि । कप्रत्ययस्य स्वार्थिकत्वेन द्व्यर्थाभिधानसमर्थत्वेन वार्तिके द्विवचनशब्देन तस्यापि ग्रहणम् । द्विवचनत्वं द्वित्वसंख्याप्रकारकसङ्ख्येयविशेष्यकबोधविषयार्थानुवादकत्वम् । तसिलौ तु विभक्त्यन्तस्य स्वार्थे विहितौ इति तत्तत्कारकशक्तिप्रधानाविवातो न तयोरुक्तं द्विवचनत्वम् । कस्य तु आज्ञाताद्यर्थविशिष्टोभार्थे विधानेन तत्त्वमक्षतमेवेति भाष्याशयः । कल्पाद्यस्ते ऽप्यत्रैव भवति । तत्रोभयो मणिरित्यादौ अप्रवृत्तये अस्य "लिटच्यासंस्योभयेषाम्" इति निर्देशेनानित्यत्वावश्यकत्वात् । कल्पवादेस्तस्मादनभिधानमेवेत्यलम् ।

कैयटेनावतारितमिति । "उभयोऽन्यत्र" इति वार्तिके उभयो मणिरुभये देवमनुष्या इति भाष्यकृतोदाहरणात् स्वार्थिकोपक्रमेण तत्प्रवृत्तेश्चोभयोरपि ग्रहणमिति तस्य द्विवचनाभावोऽनभिधानादावश्यक इति तद्भावः । इति भाव इति । इत्यभिमान इत्यर्थः । तद्बीजं तूक्तम् ।

'यद्यपि भाष्ये कप्रत्ययस्यापि स्वार्थिकत्वेनोभशब्दात्परस्य द्विवचनत्वमस्ति' या मनोरमेंतील पंक्तीचा 'स्वार्थिकत्वेनोभशब्दात्परस्य कप्रत्ययस्यापि द्विवचनत्वमस्ति' असा अन्वय आहे. 'अधिकबोधकत्वप्रयोज्यत्व' या मनोरमेंतील पदांत असलेल्या 'अधिक' या शब्दाचा, 'उभ' हा शब्द संख्या या अर्थाखेरीज लिङ्ग व कारक

या अधिक अर्थाचा बोधक होतो, असा अर्थ आहे. (याचे विवरण पूर्वी मनोरमेंत केलेच आहे.) 'इति दिक्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा अर्थ हा आहे की, ('अवचनादपि तत्परविज्ञानमिति चेत्केऽपि तुल्यम्' हे वार्तिक पठित करून व त्या वार्तिकाचे व्याख्यान करून भाष्यकारांनी त्या वार्तिकाच्या आधारे सर्वादिगणातून 'उभ' या शब्दाच्या पाठाचे जें प्रत्याख्यान केले आहे) ते प्रत्याख्यान केवळ प्रौढिवाद नाही, म्हणजे तें एकदेशिभाष्य नसून सिद्धान्तभाष्य आहे, असे देखील समर्थन करता येणे शक्य आहे, कारण 'क' हा प्रत्यय स्वार्थिक असल्यामुळें, द्वित्वविशिष्टवाचक 'उभ' शब्दाहून तो प्रत्यय झाला असता, 'क' प्रत्यय देखील 'उभ' या शब्दाप्रमाणे व्यर्थाभिधानसमर्थ ठरतो व ('अन्याभावो द्विवचनटाब्विषयत्वात्' या वार्तिकातील 'द्विवचन' या शब्दाचा 'द्विवचनाचा प्रत्यय' असा कृत्रिम अर्थ न करिता 'व्यर्थाभिधानसमर्थ' असा अकृत्रिम अर्थ केल्यानें, त्या वार्तिकातील) 'द्विवचन' या शब्दानें 'क' प्रत्ययाचे देखील ग्रहण होते (व अशा रीतीनें 'उभ' शब्दाहून स्वार्थिक 'क' प्रत्यय केला असता, व्यर्थाभिधानसमर्थ 'उभ' या शब्दापुढें 'क' हे व्यर्थाभिधानसमर्थ, म्हणजेच 'द्विवचन,' आहे असे मानल्यानें, 'क' प्रत्ययान्त 'उभ' शब्दाहून, म्हणजे 'उभक' शब्दाहून, 'अयच्' प्रत्यय होत नाही व त्या 'उभक' शब्दाहून 'औ' हा द्विवचनाचा प्रत्यय केल्यानें, 'उभकौ' असे द्विवचनाचे रूप सिद्ध होऊ शकते. म्हणून 'उभ' शब्दाहून 'अकच्' प्रत्यय होऊन 'उभकौ' असे रूप सिद्ध व्हावे याकरिता 'उभ' शब्दाचा सर्वादिगणात पाठ करण्याची काही आवश्यकता राहत नाही आणि अशा रीतीने त्या पाठाचे प्रत्याख्यान करता येते आणि ते प्रत्याख्यान केवळ प्रौढिवाद आहे असे म्हणता येऊ शकत नाही असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे. वरील वार्तिकातील) 'द्विवचन' हा शब्द, ज्यात 'दोन' ही संख्या विशेषणरूपानें भासत असून द्वित्वविशिष्ट पदार्थ विशेष्यरूपानें भासतो, या अर्थाचा अनुवाद करणारा-बोधक-आहे.

'त्र, तसिल्' हे प्रत्यय विभक्त्यन्ताहून स्वार्थामध्यें होणारे असल्यामुळें, ज्या कारकविभक्तीहून ते प्रत्यय होतात त्या कारकविभक्तीच्या अर्थाचा ते प्राधान्यें करून बोध करितात आणि म्हणून ते प्रत्यय द्वित्वविशिष्टाचे वाचक ठरत नाहींत, म्हणजे त्यांना 'द्विवचन' असें म्हणतां येत नाहीं. परंतु 'क' हा प्रत्यय 'अज्ञात' इत्यादि अर्थांनीं विशिष्ट-युक्त-अशी जी द्वित्वविशिष्टवोधक 'उभ' ही प्रकृति तीहून स्वार्थामध्यें होणारा प्रत्यय असल्यामुळें, (ज्याप्रमाणें 'उभ' ही प्रकृति द्वित्वविशिष्टाची-द्विवचनाची-वाचक आहे त्याचप्रमाणें त्या प्रकृतीहून होणारा स्वार्थिक 'क' प्रत्यय देखील द्वित्वविशिष्टाचा-'द्विवचन' या अर्थाचा-वाचक ठरत असल्यामुळें) 'क' या प्रत्ययाला 'द्विवचन' असें म्हणतां येतेंच असा त्या वार्तिकावरील भाष्याचा आशय आहे. 'उभ' शब्दाहून 'कल्पप्' इत्यादि प्रत्यय केल्यास 'अयच्' प्रत्यय मुळींच होत नाहीं. (वरील वार्तिकांतील 'द्विवचन' या शब्दाचा 'द्विवचनाचा प्रत्यय' असा अर्थ न करितां 'द्वित्वविशिष्टबोधक' असा अर्थ केल्यास) 'उभयो मणिः' इत्यादि स्थलीं वरील वार्तिकाची प्रवृत्ति न व्हावी याकरितां, 'लिटयभ्यासस्योभयेषाम्' सू. २४०८ या सूत्रांतील 'उभयेषाम्' या निर्देशाच्या सामर्थ्यानें तें वार्तिक अनित्य आहे हें मानणें आवश्यक आहे. म्हणून 'उभ' शब्दाहून 'कल्पप्' इत्यादि प्रत्यय होण्याचें अनभिधानच आहे, म्हणजे तसा प्रयोग भाषेंत कोठेंहि होत नाहीं. या विषयासंबंधानें एवढें पुरें. (जसा 'क' प्रत्यय स्वार्थिक आहे त्याचप्रमाणें 'ईषदसमाप्तौ' सू. २०२२ या सूत्रानें होणारे 'कल्पप्' इत्यादि प्रत्यय स्वार्थिकच आहेत. म्हणून कुत्सितादि अर्थानें युक्त व द्वित्वसंख्याविशिष्टबोधक 'उभ' या प्रकृतीहून कुत्सिताद्यर्थक 'क' प्रत्यय केला असतां. जसा तो प्रत्यय द्वित्वाभिधानसमर्थ ठरतो त्याचप्रमाणें 'ईषदसमाप्त' या अर्थानें युक्त व द्वित्वसंख्याविशिष्टबोधक 'उभ' या शब्दाहून स्वार्थिक 'कल्पप्' प्रत्यय केला असतां, तो प्रत्यय देखील द्वित्वाभिधानसमर्थ ठरत.

असल्यामुळें, तो प्रत्यय करतेवेळी द्विवचनाचा अभाव नसल्यामुळे, 'द्विवचनपरत्वाभावे उभशब्दादयच् प्रत्ययो भवति' या अर्थाच्या वाचक 'उभयोऽन्यत्र' या वार्तिकान्वयें 'उभ' शब्दाहून 'अयच्' प्रत्ययाची प्राप्तीच होत नाही. पण हे वरील म्हणणे, वार्तिकातील 'द्विवचन' या पदाचा 'द्व्यर्थाभिधानसमर्थ' असा जो भाष्यकारानी यौगिक अर्थ केला आहे तो मानला असताच, योग्य ठरते. परतु 'द्विवचन' या शब्दाचा 'द्विवचनाचा प्रत्यय' असा पारिभाषिक अर्थ मानला तर, 'तयप्' हा तद्धित प्रत्यय असून द्विवचनाचा प्रत्यय नसल्यामुळें, 'उभ' शब्दाहून तो प्रत्यय केला असता, 'अयच्' प्रत्ययाची प्राप्ति होते आणि अशा रीतीनें वरील दोन पक्षात दोन भिन्न रूपें होण्याची आपत्ति येते. 'उभयोऽन्यत्र' हे वार्तिक अनित्य मानल्यानेंच ती आपत्ति टाळता येते आणि 'उभयो मणि.' हा भाष्यप्रयोग सिद्ध होण्याकरिता ते वार्तिक अनित्य मानणे आवश्यक आहे, कारण 'उभ' शब्दाहून 'सङ्ख्याया अवयवे तयप्' सू १८४३ या सूत्रानें अवयवार्थक 'तयप्' प्रत्यय करून 'उभादुदात्तो नित्यम्' सू. १८४५ या सूत्रानें 'तयप्' प्रत्ययाचे जागी 'अयच्' आदेश केला असता, 'अयच्' हा द्व्यर्थाभिधानसमर्थ ठरत नसून अवयवार्थक ठरत असल्यामुळें व तो द्विवचनाचा, देखील प्रत्यय नसल्यामुळें, तो प्रत्यय करतेवेळी 'उभयोऽन्यत्र' या वार्तिकान्वयें 'उभ' शब्दाहून 'अयच्' प्रत्ययाची प्राप्ति होते व अशा रीतीनें 'उभ' शब्दाहून दोन 'अयच्' प्रत्यय केल्यास 'उभययः' असे अनिष्ट रूप होण्याची व 'उभयो मणि' हा भाष्यप्रयोग अशुद्ध ठरण्याची आपत्ति येते त्या आपत्तीचे निवारण करण्याकरिता 'उभयोऽन्यत्र' हे वार्तिक अनित्य मानणे आवश्यक आहे व 'लिटयभ्यासस्योभयेषाम्' सू. २४०८ या सूत्रातील 'उभयेषाम्' हा निर्देश त्या वार्तिकाच्या अनित्यत्वाचा ज्ञापक आहे. ते वार्तिक अनित्य न मानल्यास, वर सागितल्याप्रमाणें दोन 'अयच्' प्रत्यय होऊन 'उभययेषाम्' असा प्रयोग होऊ पाहतो. पण पाणिनीनें तसा प्रयोग न करिता

'उभयेषाम्' असा प्रयोग केला असल्यामुळें, त्या वार्तिकाचें अनित्यत्व ज्ञापित होतें आणि तें वार्तिक अनित्य मानल्यानें जसें 'उभयो मणिः' या भाष्यप्रयोगाचें समर्थन करतां येतें तसेंच 'उभ' शब्दाहून 'कलपप्' प्रत्यय केला असतां 'अयच्' प्रत्यय होण्याची आपत्ति टाळतां येते. वास्तविक गोष्ट ही आहे कीं, 'उभ' शब्दाहून 'कलपप्' प्रत्यय होण्याचें अनभिधान आहे, म्हणजे 'उभ' शब्दाहून 'कलपप्' प्रत्यय करून सिद्ध होणारें रूप भाषेंत मुळींच आढळत नाहीं व तसें मानल्यानें 'उभ' शब्दाहून 'कलपप्' प्रत्यय केला असतां दोन भिन्न प्रकारचीं रूपें सिद्ध होऊं पाहतात ही जी आपत्ति वर दर्शविली आहे ती मुळींच उद्भवत नाहीं असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे.) 'उभयोऽन्यत्र' या वार्तिकाचें व्याख्यान करितांना भाष्यकारांनीं 'उभयो मणिः, उभये देवमनुष्याः' अशीं उदाहरणें दिलीं असल्यामुळें व स्वार्थिक 'अयच्' प्रत्यय होतो असें सांगून त्या वार्तिकाची प्रवृत्ति केली असल्यामुळें, 'उभ' शब्दाहून अवयवीचा वाचक 'अयच्' प्रत्यय होऊन झालेला 'उभय' हा शब्द व तसेंच 'उभ' शब्दाहून अत्यन्त स्वार्थिक 'अयच्' प्रत्यय होऊन झालेला 'उभय' हा शब्द या दोन्ही प्रकारच्या 'उभय' या शब्दांचे 'उभयोऽन्यत्र' या वार्तिकांतील 'उभय' या शब्दानें ग्रहण होतें. त्यामुळें 'उभय' या शब्दाचा सार्वत्र द्विवचनांत प्रयोग आढळत नाहीं हें सांगणें आवश्यक आहे असा 'उभयशब्दस्य द्विवचनं नास्ति' या ग्रंथाच्या म्हणण्याचा आशय आहे. (भाष्यकारांनीं 'उभयो' असें द्विवचनाचें उदाहरण दिलें नाहीं व त्यांनीं जीं दोन उदाहरणें दिलीं आहेत त्यांपैकी प्रथम उदाहरण एकवचनाचें असून द्वितीय उदाहरण बहुवचनाचें आहे. 'उभयो मणिः' या प्रथम उदाहरणांत 'उभ' शब्दाहून जो 'अयच्' प्रत्यय झाला आहे तो अवयवीचा वाचक असून, 'उभये देवमनुष्याः' या द्वितीय उदाहरणांत 'उभ' या शब्दाहून झालेला 'अयच्' प्रत्यय अत्यन्त स्वार्थिक आहे. यावरून हें सिद्ध होतें कीं, अवयवीचा वाचक 'अयच्' प्रत्यय असो किंवा अत्यन्त

स्वार्थिक 'अयच्' प्रत्यय असो, तसा प्रत्यय 'उभ' शब्दाहून झाल्यास, अयच्प्रत्ययान्त 'उभ' या शब्दाची एकवचनाची किंवा बहुवचनाचीच रूपें होतात, द्विवचनाची रूपें मुळीच होत नाहीत. जेव्हा 'उभ' शब्दाच्या लगेंच पुढें द्विवचनाचा प्रत्यय असतो व त्या प्रत्ययाचा लुक् होण्याचा संभव नाही तशाच ठिकाणी 'उभ' शब्दाची द्विवचनाची रूपें होतात व तशा ठिकाणी 'उभ' शब्दाहून 'अयच्' प्रत्यय होत नाही.) 'अनभिधाने प्रमाण नास्तीति भाव.' या मनोरमेच्या पक्तीतील 'इति भावः' या पदाचा 'इत्यभिमानः' असा अर्थ आहे दीक्षितांनी हरदत्ताच्या मतासंबधानें जो अरुचि प्रदर्शित केली आहे तिचे कारण त्यांनी मनोरमेंत सांगितलेंच आहे. ('उभयोऽन्यत्र' या वार्तिकांतील 'उभय' या शब्दानें, वर सांगितल्याप्रमाणे अत्यन्त स्वार्थिक 'अयच्' प्रत्यय होऊन बनलेला 'उभय' हा शब्द व तसेंच 'उभ' या शब्दाहून अवयवार्थक 'तयप्' प्रत्यय झाला असता त्याचे जागी 'अयच्' हा आदेश होऊन बनलेला 'उभय' हा शब्द या दोहोंचेहि, ग्रहण होत असल्यामुळें व 'उभ' हा शब्द द्विवचन-प्रत्ययपरक नसला तरच त्याहून 'अयच्' होत असल्यामुळें हे सिद्ध होतें की, अयच्प्रत्ययान्त 'उभ' शब्दाहून द्विवचनाचे प्रत्यय होत नाहीत. म्हणून 'उभय' या शब्दाहून द्विवचनाचे प्रत्यय होतात असें जें हरदत्ताचे म्हणणे आहे ते भाष्यविरुद्ध असल्यामुळें बरोबर मानतां येत नाही व कैयटाचेंच म्हणणे योग्य ठरतें असा दीक्षितांच्या म्हणण्याचा भावार्थ आहे असें शब्दरत्नकाराचें म्हणणे आहे)

मनोरमा—एके–काशिकाकाराः। "एतत्त्वं मन्ये" इत्युदात्तस्य, "उत त्वः पश्यन्" इत्यनुदात्तस्य च दर्शनादिति भावः। एकः–प्रथमः। संहितया पाठे तान्तत्वस्यास्फुटत्वेऽपि तान्तश्छेत्तव्योऽन्यथा एकश्रुत्या सकृदेव पठेत्। न च तान्ते विप्रतिपत्तव्यम्। "त्वत्-त्वसमसिमेत्यनुच्चानि" इति फिट्सूत्रात्। तथा च ऋङ्मन्त्रः। "स्तरीरुत्वद्भवति, सूत उत्वत्" इति। वेदभाष्यकारास्त्वेवं व्याचख्युः—त्वदिति सर्वनामसु पठितोऽनुदात्तोऽयमन्यपर्याय इति।

जयदेवोऽपि प्रायुङ्क्त । "त्वदधरमधुरमधूनि पिबन्तम्" इति । त्वत्तोऽन्यस्या अधर इति विग्रहः । न तु तवा धर इति, "पश्यति दिशि दिशि रहसि भवन्तम्" इति पूर्ववाक्येन सहानन्वयापत्तेः । नेम इति । श्रूयते च-"प्र नेमस्मिन् ददृशे सोम" इति । सम इति । तथा च श्रूयते "नभन्तामन्यके समे" । "मानो वृकाय वृक्ये समस्मै" । "उरुष्याणो अघायतः समस्मात्" । "उतो समस्मिन्ना" इत्यादि । "सिमः कृत्स्ने च शक्ते च स्यान्मर्यादावबद्धयोः" ।। श्रूयते च-"आद्रात्री वासस्तनुतेसिमस्मै" । "उच्छ्रुक्रमत्कमजते सिमस्मात्" । उभयत्रापि सिमशब्दः सर्वपर्याय इति वेदभाष्यम् ।।

('आमि सर्वनाम्नः सुट्' सू. २१७ या सूत्रावरील कौमुदींत 'त्व त्व इति द्वावप्यदन्तावन्यपर्यायौ, एक उदात्तोऽ परोऽनुदात्त इत्येके' असें जें म्हटलें आहे त्या पंक्तींतील) 'एके' या पदाचा 'काशिकाकाराः' असा अर्थ आहे. ('सर्वादीनि सर्वनामानि' १-१-२७ या सूत्रावरील वृत्तींत 'त्वशब्दोऽन्यवाची स्वरभेदाद् द्विः पठितः । एक उदात्तो द्वितीयोऽनुदात्तः । केचित् तकारान्तमेकं पठन्ति । त्वत्वदिति, द्वावपि चानुदात्ताविति स्मरन्ति' असें काशिकाकारांनीं म्हटलें आहे, व तसें म्हणण्याचें कारण हें कीं,) 'एतन्त्वं मन्ये' हें उदात्ताचें उदाहरण वेदांत आढळत असून 'उत त्वः पश्यन्' हें अनुदात्ताचें देखील उदाहरण आढळतें. कौमुदीच्या वरील पंक्तींत 'एक उदात्तः' असें जें म्हटलें आहे त्यांतील 'एकः' या पदाचा 'प्रथमः' असा अर्थ आहे. (वास्तविक सर्वादिगणामध्यें 'त्वत्, त्व' असे, प्रथम तकारान्त व द्वितीय अकारान्त, शब्द पठित आहेत. गणपाठाच्या कित्येक प्रतींत 'त्व, त्व' असें दोन्ही अकारान्त शब्द पठित असावे असें दिसतें आणि म्हणूनच 'एकस्तान्तः इत्यपरे' असें कौमुदींत म्हटलें आहे.) 'त्वत्, त्व' या दोन शब्दांचा मिळून एकत्र संहितापाठ-दण्डपाठ-केल्यास जरी प्रथम शब्द तकारान्त आहे हें स्पष्ट होत नाहीं तरी, 'त्वत्' असाच पदच्छेद केला पाहिजे. तसा पदच्छेद होतो असें न मानल्यास, पाणिनीनें स्वररहित

'त्व' हा शब्द एकदांच गणपाठात पठित केला असता (व तसा पाठ केला असता तर उदात्त 'त्व' आणि अनुदात्त 'त्व' या दोन्ही शब्दाचे त्या एकश्रुति 'त्व' शब्दानें ग्रहण झालेच असते. असे असून पाणिनीनें दोन 'त्व' शब्द उच्चारले असल्यामुळें, दोहोंचा दण्डपाठ करून प्रथम शब्द तकारान्त आहे हे मानणे उचित ठरते.) प्रथम 'त्व' शब्द तकारान्त नाही याबद्दल मनात संदेह उत्पन्न होऊं देऊ नये; कारण 'त्वत्त्वसमसिमेत्यनुच्चानि' फिट्. सू. ७८ या फिट्सूत्रात 'त्वत्' या तान्त शब्दाचा व तसेच 'त्व' या अदन्त शब्दाचा निर्देश केला आहे. त्याचप्रमाणे 'त्वरीत त्वद्भवति, सूत उ त्वत्' या ऋग्वेदातील मन्त्रात 'त्वत्' या तकारान्त सर्वनामाचा प्रयोग आढळतो व त्या मन्त्राचे व्याख्यान करिताना वेदभाष्यकार असे म्हणतात की, सर्वादिगणात पठित असलेले 'त्वत्' हे सर्वनाम अनुदात्त असून ते 'अन्य' या अर्थाचे वाचक आहे. जयदेवानें देखील 'त्वदधरमधुरमधूनि पिबन्तम्' या श्लोकात 'त्वत्' या सर्वनामाचा प्रयोग केला आहे व या श्लोकातील 'त्वदधर' या शब्दाचा 'त्वत्' अन्यस्या. अधरः' असा विग्रह आहे. 'तव अधरः' असा विग्रह करता येत नाही, कारण तसा विग्रह केल्यास, पश्यति दिशि दिशि रहसि भवन्तम्' या पूर्व वाक्याशी अन्वय न होण्याची आपत्ति येते ('त्वदधरमधुरमधूनि पिबन्तम्' हे कृष्णाचे विशेषण आहे. 'तव अधर.' असा विग्रह केल्यास, कृष्ण स्वत च्या अधराचे पान करीत आहे असा अनिष्ट अर्थ होण्याची आपत्ति येईल व स्वकर्तृक स्वीयाधर-पान हे शृङ्गाराचे पोषक नसल्यामुळें, 'त्वदधर' या पदाचा 'त्वत्', अन्यस्या' गोप्या, अधर' ' असाच अर्थ करणे योग्य आहे ) 'नेम' या सर्वनामाचा प्रयोग 'प्र नेमस्मिन् ददृशे सोमः' या श्रुतीत आढळतो. (या श्रुतीत 'नेम' या शब्दाचे 'नेमे' असे सप्तमीचे एकवचन न करिता 'नेमस्मिन्' असे सप्तमीचे एकवचन केले आहे ) 'सम' या सर्वनामाचा प्रयोग 'नभन्तामन्यके समे, मानो वृकाय वृकये समस्मै, उरुष्याणो अघायत' समस्मात्, उतो समस्मिन्ना'

इत्यादि श्रुतींत आढळतो. 'सिमः कृत्स्ने च शक्ते च स्यान्मर्यादाव-वद्धयोः' असा कोश आहे आणि 'आद्रात्री वासस्तनुते सिमस्मै, उच्छृत्रमस्कमजते सिमस्मात्' या श्रुतींत 'सिम' या सर्वनामाचा प्रयोग आढळतो. या दोन्ही श्रुतींतील 'सिम' हा शब्द 'सर्व' या अर्थाचा वाचक आहे असें वेदभाष्यांत म्हटलें आहे.

शब्दरत्न–अनन्वयापत्तेरिति । तेन हि वाक्यशेषेण कृष्णस्य संबोद्धचस्यावगतया संबोद्धचस्य च युष्मदर्थत्वेनानन्वयः । पिबन्तं भवन्तमिति स्यान्वितमिति बोद्धचम् । अत्र पक्षे त्वं इत्येकश्रुत्योदात्तानुदात्तयोर्निर्देश इति बोद्धचम् ।

'अनन्वयापत्तेः' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचें कारण हें कीं, 'पश्यति दिशि दिशि रहसि भवन्तम्' या अवशिष्ट वाक्यावरून 'कृष्ण' संबोध्य आहे हें ज्ञात होत असल्यामुळें ('त्वदधर' यांतील 'त्वत्' हा शब्द 'युष्मद्' या अर्थाचा, म्हणजे 'तूं' या अर्थाचा, वाचक मानल्यास,) संबोध्य कृष्णाचा 'त्वदधर' याशीं अन्वय होऊं शकत नाहीं, म्हणजे 'पिबन्तं भवन्तम्' यांचा परस्परांशीं अन्वय होऊं शकत नाहीं. (याचें विवरण मनोरमेंत केलेंच आहे.) 'त्वत् त्व' असा सर्वादिगणांत पाठ आहे असें मानल्यास, या पक्षांत स्वररहित उच्चारलेला 'त्व' हा शब्द उदात्त व अनुदात्त असणाऱ्या दोन्ही प्रकारच्या 'त्व' या शब्दांचा निर्देश करणारा शब्द आहे हें जाणावें. (वेदांत 'त्व' हा शब्द कोठें कोठें उदात्त व कोठें कोठें अनुदात्त आढळतो. दोन्ही प्रकारच्या 'त्व' शब्दांचें ग्रहण व्हावें याकरितां, सर्वादिगणांत पठित असलेला 'त्व' हा शब्द स्वररहित पठित आहे असें मानल्यानें, त्या शब्दानें उदात्त व अनुदात्त अशा दोन्ही प्रकारच्या 'त्व' शब्दाचें ग्रहण करतां येतें.)

मनोरमा–गणसूत्र इति । यद्यपि भाष्ये अष्टाध्यायीस्थे सूत्रे "अपुरि इति वक्तव्यम्" इति वार्तिकं पठितं तथापि तद्गणसूत्रस्य शेषः, नतु जसि विभाषाविधायकस्य । "अत" इत्यधिकृत्य जसः

ङीविधानात् टाबन्तात्प्राप्त्यभावात् । अन्तरायामिति । प्राकाराद्वा-ह्यायां तदन्तर्वर्तिन्यां चेत्यर्थः । लिङ्गविशिष्टपरिभाषया एकादेशस्य पूर्वान्तत्वेन ग्रहणाद्वा प्राप्तिर्बोध्या । त्यद्, तद्, एतौ उक्तपराम-र्शको । तयाद्यश्छान्दस इति गणरत्नकारः । तन्न । "त्यदश्छन्दसि बहुलम्" इति सूत्रे छन्दोग्रहणवैयर्थ्यापत्तेः ।

> एकोऽन्यार्थे प्रधाने च प्रथमे केवले तथा ।
> साधारणे समानेऽल्पे संख्यायां च प्रयुज्यते ॥

( 'आमि सर्वनाम्नः सुट्' सू. २१७ या सूत्रावरील कौमुदीत 'अपुरीति वक्तव्यम्' हे जें वार्तिक पठित केले आहे त्या संबधानें दीक्षित असे म्हणतात की ) जरी 'अपुरि इति वक्तव्यम्' हे वार्तिक 'अन्तरं बहिर्योगोपसंव्यानयोः' १-१-३६ या अष्टाध्यायीत पठित असलेल्या सूत्रावरील भाष्यात पठित केले आहे तरी, 'अन्तरं बहिर्योगोपसंव्यानयोः' असा जो सर्वादिगणात पाठ आहे त्या गण-पाठाचा शेष या रूपानें ते वार्तिक पठित केले आहे. 'जस्' प्रत्यय पुढें असतांना सर्वनामसंज्ञा विकल्पेंकरून होते हे विधान करणाऱ्या 'अन्तरं बहिर्योगोपसंव्यानयोः' सू २२० या अष्टाध्यायीतील सूत्राचा तें वार्तिक शेष नव्हे, म्हणजे त्या सूत्रावर ते वार्तिक आहे असे मानू नये, कारण ( 'अतो भिस ऐस्' या पूर्वसूत्रातून 'जसः शी' या उत्तरसूत्रांत 'अतः' या पदाची अनुवृत्ति होत असल्यामुळें व ) अदन्त सर्वनामप्रकृतीपुढें 'जस्' प्रत्यय आल्यास त्या प्रत्ययाचे जागी 'शी = ई' हा आदेश होतो असे ते सूत्र विधान करणारे असल्यामुळें, टाबन्त-आकारान्त स्त्रीलिङ्ग-सर्वनामप्रकृती-पुढें 'जस्' प्रत्यय आला असतां, त्या प्रत्ययाचे जागी 'शी' हा आदेश होण्याची प्राप्तीच नाही. ('पूः' हा शब्द स्त्रीलिङ्ग असल्या-मुळें 'अन्तरा' हा टाबन्त शब्दच त्याचे विशेषण होऊ शकतो व 'अन्तरा' या टाबन्त शब्दापुढें 'जस्' प्रत्यय आल्यास, तो शब्द सर्वनामसंज्ञक असो किंवा नसो, त्याचे 'अन्तराः' असेच जस्प्रत्य-

यान्त रूप होऊं शकतें आणि अष्टाध्यायींतील सूत्रावर 'अपुरि' हें वार्तिक पठित आहे असें मानल्यानें कांहींच फलनिष्पत्ति होत नाहीं; कारण वर सांगितल्याप्रमाणें 'अन्तर' या अदन्त शब्दाचीं जशीं 'अन्तराः अन्तरे' अशीं जस्प्रत्ययान्त पाक्षिक रूपें होऊं शकतात तशीं 'अन्तरा' या टावन्त शब्दाचीं जस्प्रत्ययान्त पाक्षिक रूपें न होतां 'अन्तराः' असें एकच रूप सिद्ध होऊं शकणार. परंतु तें गणसूत्रावर वार्तिक आहे असें मानल्यानें, जेव्हां 'अन्तरा' हा शब्द 'पुरि' या सप्तम्यन्त शब्दाचें विशेषण होतो तेव्हां त्याला त्या वार्तिकानें सर्वनामसंज्ञेचा निषेध केला असल्यामुळें, 'सर्वनाम्नः स्याड् ह्रस्वश्च' सू. २९१ हें सूत्र प्रवृत्त न होतां व 'अन्तरस्याम्' असें सप्तमीच्या एकवचनाचें रूप न होतां 'अन्तरायाम्' असेंच रूप होतें.) 'अन्तरायां पुरि' याचा 'प्राकाराच्या बाहेर किंवा आंत असलेली वस्ती' असा अर्थ आहे. लिङ्गविशिष्टपरिभाषेनें, किंवा पूर्वान्तवद्भावानें एकादेश हा अदन्त प्रकृतीचा अन्त्य अवयव आहे असें मानल्यानें, 'अन्तरा' या शब्दाला सर्वनामसंज्ञेची प्राप्ति होते हें जाणावें. (सर्वादिगणांत 'अन्तर' हा शब्द 'अन्तरं बहिर्योगोपसंव्यानयोः' या गणसूत्रांत पठित आहे व प्रातिपदिकग्रहणे लिङ्गविशिष्टस्यापि ग्रहणम्'–परि. ७२– या परिभाषान्वयें 'अन्तर' या शब्दानें स्त्रीत्वबोधक टावन्त 'अन्तरा' या शब्दाचें ग्रहण करतां येतें. तसेंच 'अन्तर' या शब्दाहून 'टाप् = आ' हा प्रत्यय केला असतां, 'अन्तर आ = अन्तरा' या स्थलीं 'अकः सवर्णे दीर्घः' सू. ८५ या सूत्रानें 'अ' व 'आ' या दोहोंचे जागीं 'आ' असा जो एकादेश होतो त्याला पूर्वान्तवद्भावानें 'अन्तर' या अदन्त प्रकृतीचा अन्त्यावयव–'अ'–आहे असें मानल्यास किंवा 'एकदेशविकृतमनन्यवत्'–परि. ३७– या परिभाषान्वयें 'अन्तरा' हा एकदेशविकृत शब्द 'अन्तर' शब्दच आहे असें मानल्यास, 'अन्तरा' या शब्दाला 'सर्वादीनि सर्वनामानि' या सूत्रान्वयें सर्वनामसंज्ञा प्राप्त होते व त्या सर्वनामसंज्ञेचा निषेध करणारें 'अपुरि' हें वार्तिक असल्यामुळें,

398804१

'अन्तरस्याम्' असे सप्तमीच्या एकवचनाचे रूप न होतां 'अन्तरायाम्' असे रूप होऊन 'अन्तरायां पुरि' असा प्रयोग सिद्ध होतो.) 'त्यद्, तद्' हीं जी दोन सर्वनामें सर्वादिगणात पठित आहेत तीं जें पूर्वी उक्त–सांगितलें–आहे त्याचा परामर्श करणारी, म्हणजे बोध करून देणारी, सर्वनामें होत. गणरत्नकाराचे असे म्हणणे आहे की, या दोन सर्वनामांपैकी 'त्यद्' या प्रथम सर्वनामाचा वेदातच प्रयोग होतो. पण हे म्हणणे बरोबर नाहीं; कारण ते म्हणणे बरोबर मानल्यास, ('स्य इत्यस्य सोर्लोपः स्याद् हलि बहुले छन्दसि' या अर्थाचा वाचक) 'स्यश्छन्दसि बहुलम्' सू. ३५२६ या सूत्रातील 'छन्दसि' या पदाचे ग्रहण व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते. ('त्यद्' या सर्वनामाचा वेदातच प्रयोग होत असता तर, वरील सूत्रात 'छन्दसि' हें पद घालण्याची काहीच गरज नव्हती व पाणिनीने 'स्यो बहुलम्' एवढेंच सूत्र केले असते. पण त्या सूत्रात 'छन्दसि' हे पद घातले असल्यामुळें त्यावरून हें स्पष्ट होते की, 'त्यद्' या सर्वनामाचा जसा वेदात प्रयोग होतो तसा भाषेंत देखील प्रयोग होतो, व सूत्रार्थ असा निष्पन्न होतो की, वेदात 'त्यद् सु = स्य' याहून झालेल्या 'सु' प्रत्ययापुढें हल् आला असता, 'स्य' पुढील 'सु' प्रत्ययाचा बाहुल्यानें लोप होतो, पण भाषेंत तसे बहुलत्वानें होणारे 'सु'लोपकार्य होत नाही.) सर्वादिगणात पठित असलेले 'एक' हे सर्वनाम 'एकोऽन्यार्थे प्रधाने च प्रथमे केवले तथा। साधारणे समानेऽल्पे सङ्ख्यायां च प्रयुज्यते ॥' या श्लोकान्वयें 'अन्य, प्रधान, प्रथम, केवल, साधारण, समान, अल्प' व 'एकसङ्ख्या' या अर्थांचे वाचक आहे.

शब्दरत्न—प्राप्त्यभावादिति । पु.शब्देन स्त्रीत्वविशिष्टस्यैव बोधनेन तादृशार्थस्य विशेष्यत्वे एव तत्प्रवृत्तेः । अत एव भाष्ये "अन्तरायाम्" इति स्त्रियां सप्तम्यामेवोदाहृतमिति भावः । केवल ति । असहाय इत्यर्थः ॥

'टाबन्तात् प्राप्त्यभावात्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, 'पुः' हा शब्द नित्य स्त्रीलिङ्गाचाच बोधक असल्यामुळें, तसा स्त्रीत्वविशिष्ट 'पुरि' हा सप्तम्यन्त शब्द विशेष्य असतांनाच 'अपुरि' हें वार्तिक प्रवृत्त होतें; आणि म्हणूनच भाष्यांत 'अन्तरायां पुरि' असें केवळ सप्तमीचें स्त्रीलिङ्गाचें उदाहरण दिलें आहे. ('अपुरः' असें वार्तिक पठित न करितां 'अपुरि' असें वार्तिक पठित केलें असल्यामुळें व त्या वार्तिकाचें भाष्यकारांनीं जस्प्रत्ययान्ताचें उदाहरण दिलें नसल्यामुळें, त्यावरूनच हें सिद्ध होतें कीं, तें वार्तिक अष्टाध्यायींत पठित केलेल्या सूत्रावर वार्तिक नसून गणपाठांत पठित केलेल्या त्या सूत्रावर वार्तिक आहे आणि म्हणूनच 'यद्यष्टाध्यायीस्थसूत्रस्य शेषः स्यात्तदा जस्प्रत्ययपरकप्रयोगमेव कुर्यात्' असें भैरवीकारांनीं म्हटलें आहे आणि त्या वार्तिकाचा असा अर्थ होतो कीं, 'पुरि' या स्त्रीलिङ्ग सप्तम्यन्त रूपाचें 'अन्तरा' हें विशेषण असल्यास, 'अन्तरा' याला सर्वनामसंज्ञा होत नाहीं, परंतु इतर विभक्तींत 'अन्तरा' याला सर्वनामसंज्ञा होतेच आणि त्यामुळें 'अन्तरस्याः पुरः आगतः' असाच प्रयोग होऊं शकतो.) 'एकोऽन्यार्थे प्रधाने च' या श्लोकांतील 'केवल' या शब्दाचा असहाय–एकाकी– असा अर्थ आहे.

मनोरमा–स्वाभिधेयेति । स्वस्य पूर्वादिशब्दस्याभिधेयेनापेक्ष्यमाणस्यावधेर्नियम इत्यर्थः । 'दिशः सपत्नी भव दक्षिणस्या' इत्यादावपि व्यवस्थाऽस्त्येव प्रसिद्धत्वात्तु नावधिवाची शब्दः प्रयुज्यते । न च संज्ञात्वान्निषेधः । आधुनिकसङ्केतो हि संज्ञा । न च दिक्षु साऽस्ति इति अस्तातिप्रकरणे कैयटहरदत्तादयः । अत्र दिक्षु चिरंतनः, कुरवः तु आधुनिकः सङ्केत इत्यत्र व्याख्यातृवचनमेव प्रमाणम् । एतेन "विश्वेषां देवानाम्" इति व्याख्यातम् । वेदप्रसिद्धत्वात् । देवगणविशेषे विश्वशब्दस्याधुनिकसङ्केताभावात् । दक्षिणा गायका इति । इहामुकस्मात् कुशला इति अवध्यन्वयसम्भवेऽपि तन्नियमो

नास्तीति भावः । अधरे ताम्बूलरागः । उत्तरे प्रत्युत्तरे च शक्त इत्यपि प्रत्युदाहर्तव्यम् । कथं तर्हि "तथा परेषां युधि च" इति कालिदासः, "अपरे प्रत्यवतिष्ठन्ते" इत्यादि च । अत्राहुः–देशवाचितया व्यवस्थाविषययोरेव परापरशब्दयोरुपचाराच्छत्रौ प्रतिवादिनि च प्रयोगः । न चैवमुपसर्जनता । न हि लाक्षणिकत्वमुपसर्जनत्वम् । किं तु स्वार्थविशिष्टार्थान्तरसंक्रमः । स च समासादिवृत्तावेव । अत एव भूवादिसूत्रे "एतान्यपीति–एतत्प्रतिपाद्यानि वस्तूनीत्यर्थः" इति कैयटोक्तिः सङ्गच्छते । वस्तुतस्तु परापरशब्दयोर्देशान्तरनिष्ठत्वादिकमेवार्थः । शत्रुत्वादिकं तु आर्थिकोऽर्थः । असंज्ञायां किम् । उत्तराः कुरवः । सुमेरुमवधिमपेक्ष्य कुरुषूत्तरशब्दो वर्तते इत्यस्तीह व्यवस्था । किं तु आधुनिकसङ्केतोऽयमित्याहुः ।

('पूर्वपरावर' सू. २१८ या सूत्रावरील कौमुदीत) 'स्वाभिधेयापेक्षावधिनियमो व्यवस्था' असे जें म्हटले आहे त्याचा 'स्वस्य पूर्वादिशब्दस्य अभिधेयेन अपेक्ष्यमाणस्य अवधेर्नियमः', म्हणजे 'पूर्वपर' या सूत्रात पठित असलेले 'पूर्व, पर अवर' इत्यादि जे शब्द त्या शब्दाचा जो अभिधेय–वाच्यार्थ–त्या वाच्यार्थाला ज्या अवधीची–मर्यादेची–नियमेंकरून अपेक्षा असते तो अवधि दर्शविणारी व्यवस्था, असा अर्थ आहे 'दिश. सपत्नी भव दक्षिणस्याः' इत्यादि स्थली देखील व्यवस्था आहेच. येथें प्रसिद्धत्वामुळें अवधिवाचक शब्दाचा उपयोग केला नाही. (या वरील उदाहरणात ज्या स्थली विद्यमान असणाऱ्या पुरुषानें वरील आशिर्वादरूप श्लोक उच्चारला आहे ते स्थल जरी त्या श्लोकात निर्दिष्ट केले नाही तरी, ते अध्याहृत स्थल दक्षिणदिशेचा अवधि सांगणारे स्थल आहे असे मानता येते आणि अशा रीतीनें वरील उदाहरणात अवधि दर्शविणारी व्यवस्था आहे असे म्हणतां येते. 'पूर्व, पर' इत्यादि शब्द त्या त्या दिशेला असणाऱ्या देशविशेषाचे वाचक असल्यामुळें, ते शब्द संज्ञावाचक ठरतात आणि प्रकृत सूत्रात 'असंज्ञायाम्' असा निषेध असल्यामुळें) त्या संज्ञावाचक शब्दाना सर्वनामसंज्ञा

होऊं शकत नाहीं असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण आधुनिक पुरुषकृत संकेत याला संज्ञा म्हणतात. दिशांचे ठिकाणीं 'संज्ञा' हा शब्द लागू पडत नाहीं, म्हणजे 'पूर्व, अपर' इत्यादि दिग्वाचक शब्द संज्ञावाचक ठरत नाहींत, असें 'अस्ताति'-प्रकरणांत कैयट, हरदत्त इत्यादिकांनीं म्हटलें आहे. ('पूर्व, उत्तर, दक्षिण' इत्यादि जे शब्द दिशांचे वाचक आहेत ते अनादिसंकेतसिद्ध असून त्यांना आधुनिक पुरुषकृत संकेतान्वयें ती संज्ञा प्राप्त झालेली नसल्यामुळें, प्रकृत सूत्रांतील 'असंज्ञायाम्' या निषेधानें तशा अनादिसंकेतसिद्ध शब्दांचें ग्रहण होत नाहीं. 'दक्षिणोत्तराभ्यामतसुच्' सू. ५–३–२८ या सूत्रावरील भाष्याच्या वृत्तींत कैयटानें 'यद्येवं दिशः पूर्वादीनि नामधेयानीत्यसंज्ञायामिति सर्वनामसंज्ञानिषेधात् पूर्वस्यां दिशि वसतीत्यादि न सिध्यति । पौरुषेयसंज्ञाश्रयणादिह च तदभावाददोषः ।' असें म्हटलें आहे.) 'पूर्व, पर' इत्यादि शब्द अनादिसिद्धसंकेतानें दिशांचे वाचक असून, आधुनिकपुरुषसंकेतानें ते शब्द 'कुरु' इत्यादि देशांचे वाचक आहेत याला (कैयटादि) व्याख्यात्यांचें वचन प्रमाण आहे. या वरील व्याख्यानान्वयें 'विश्वेषां देवानाम्' या प्रयोगाची उपपत्ति लावतां येते. 'विश्व' हा शब्द देवगणविशेषाचा वाचक आहे हें वेदांत प्रसिद्ध आहे व आधुनिक संकेतानें तो शब्द तशा अर्थाचा वाचक नाहीं. (तो शब्द अनादिसिद्ध-संकेतानें तशा अर्थाचा वाचक असल्यामुळें, त्याला प्रकृत सूत्रांतील 'असंज्ञायाम्' हा निषेध लागू पडत नाहीं व त्याला सर्वनाम-संज्ञा होण्यांत कांहीं बाध येत नाहीं आणि म्हणून 'विश्वेषां देवानाम्' या प्रयोगांतील 'विश्वेषाम्' याची सहज उपपत्ति लागू शकते.) 'दक्षिणाः गाथकाः' या उदाहरणांत ('दक्षिण' हा शब्द 'कुशल' या अर्थाचा वाचक आहे आणि) हे गाथक अमुकापेक्षां अधिक कुशल आहेत असा जरी या स्थळीं अवधिरूप अन्वय संभवतो तरी, अशा स्थलीं नियमेंकरून अवधीची आकांक्षा राहत नसल्यामुळें, येथें 'दक्षिण' या शब्दाला सर्वनामसंज्ञा होत नाहीं. (व त्यामुळें

'दक्षिणे गायकाः' असा प्रयोग करता येत नाही.) 'अधरे ताम्बूलरागः,उत्तरे प्रत्युत्तरे च शक्तः' हे प्रयोग देखील प्रत्युदाहरणरूपानें देता येऊ शकतात ('अधर' हा शब्द आधुनिक संकेतान्वयें खालच्या ओठाचा वाचक असल्यामुळें व अशा रीतीनें तो शब्द संज्ञावाचक ठरत असल्यामुळें, 'असंज्ञायाम्' या निषेधान्वयें त्याला सर्वनामसंज्ञा होत नाही व 'अधरस्मिन् ताम्बूलराग' असा प्रयोग करता येत नाही 'उत्तरे प्रत्युत्तरे च शक्त', म्हणजे उत्तर व प्रत्युत्तर देण्यात समर्थ–हुशार–, या उदाहरणात 'उत्तर' हा शब्द आधुनिक संकेतानें, काही प्रश्न केले असता जें उत्तर दिले जाते, त्या अर्थाचा वाचक असल्यामुळें, त्याला 'असंज्ञायाम्' या निषेधान्वयें सर्वनामसंज्ञा होत नाही व या शब्दाला अवधीची आकांक्षा नाही हेंहि उघड आहे.) मग 'तथा परेषां युधि च' यातील 'परेषाम्' या कालिदासानें केलेल्या प्रयोगाचे व तसेच 'अपरे प्रत्यवतिष्ठन्ते' यातील 'अपरे' या प्रयोगाचे समर्थन कसे करावे ? प्रकाशकार या प्रयोगाचे अशा रीतीनें समर्थन करतात की, 'पर, अपर' हे शब्द देशवाचक असल्यामुळें व अशा रीतीनें ते शब्द व्यवस्थेचा विषय, म्हणजे नियमेंकरून अवधिसाकांक्ष, ठरत असल्यामुळें, त्या शब्दाचा 'शत्रु' व 'प्रतिवादी' या अर्थामध्यें अनुक्रमें लक्षणेनें प्रयोग होतो (व त्यामुळें त्याना सर्वनामसंज्ञा होते अशा रीतीनें 'पर, अपर' या शब्दाचा जरी लाक्षणिक अर्थामध्यें प्रयोग केला जातो तरी, 'उपसर्जनीभूता सर्वादयः सर्वनामसंज्ञका न भवन्ति' हा निषेध लागू पडण्याकरिता ज्या प्रकारचे उपसर्जनत्व आवश्यक आहे तें ) उपसर्जनत्व त्या शब्दात नाही, कारण लाक्षणिक अर्थ केल्यानें उपसर्जनत्व प्राप्त होत नाही आपला अर्थ भिन्न अर्थामध्यें विशेषणरूपानें संक्रमित करून आपल्या अर्थानें युक्त अशा भिन्न अर्थाचा बोध करणे याला 'उपसर्जन' असे म्हणतात. हें उपसर्जनत्व समास इत्यादि वृत्तीमध्यें च असते ( 'पर, अपर' हे शब्द जेव्हा लक्षणेनें 'शत्रु, प्रतिवादी' या अर्थाचे वाचक होतात तेव्हा त्यांचा

मूळ अर्थ अर्थान्तरामध्यें संक्रमित होत नसल्यामुळें व त्यांच्या मूळ अर्थापासूनच त्यांचा वरील लाक्षणिक अर्थ निष्पन्न होत असल्यामुळें, त्यांना 'उपसर्जन' ही संज्ञा होत नाहीं आणि अशा रीतीनें ते शब्द वरील निषेधाच्या कक्षेंत येत नसल्यामुळें, त्यांना सर्वनामसंज्ञा होण्यांत कांहीं बाध येत नाहीं. ) सर्वादिगणांतील शब्द लाक्षणिक अर्थाचा बोधक असला तरी त्याची सर्वनामसंज्ञा नष्ट होत नसल्यामुळेंच, 'भूवादयो धातवः' सू. १–३–१ या सूत्रावरील भाष्यांतील 'एतान्यपि भवन्ति' या वाक्यांतील 'एतानि' या पदाचा 'एतत्-प्रतिपाद्यवस्तूनि' असा जो कैयटानें लक्षणेनें अर्थ केला आहे तो योग्य ठरतो. ( त्या भाष्यांत 'भावसाधनो धातुः' असें धातूचें लक्षण केलें असतां व त्यांतील 'भाव' या शब्दाची 'भवतीति भावः' अशी व्युत्पत्ति केली असतां, 'किं कृतं भवति', म्हणजे काय साधलें जातें, असा प्रश्न करून त्या प्रश्नाचें उत्तर देतांना भाष्यकार म्हणतातः– 'विप्रतिषिद्धानां धातुसंज्ञा सिद्धा भवति । भवेद् विप्रतिषिद्धानां धातुसंज्ञा सिद्धा स्यात् प्रातिपदिकानामपि प्राप्नोति । वृक्षः प्लक्ष इति । किं कारणम् ? । एतान्यपि हि भवन्ति । ' या भाष्याचा अर्थ असा आहे कीं, 'भवतीति भावः' अशी कर्तृप्रत्ययान्त व्युत्पत्ति केली असतां, भावाच्या विरुद्ध असणाऱ्या अशा अभावार्थाला दाखविणाऱ्या 'भिद्' वगैरेंना धातुसंज्ञा सिद्ध होते. पण असें करण्यांत जरी 'भिद्' वगैरेंना धातुसंज्ञा सिद्ध होते तरी, 'वृक्ष, प्लक्ष' इत्यादि प्रातिपदिकांना देखील धातुसंज्ञा प्राप्त होते; कारण या प्रातिपदिकांचा अर्थ झाड वगैरे हे देखील उत्पन्न होणारेच पदार्थ आहेत. या भाष्यांत 'वृक्ष, प्लक्ष' हे पुल्लिङ्गी असून 'एतानि' असा जो नपुंसक सर्वनामाचा निर्देश केला आहे तो दिसण्यांत अयोग्य ठरत असल्यामुळें, कैयटानें 'एतानि' या पदाचें 'एतत्प्रतिपाद्यानि वस्तूनि' असें व्याख्यान केलें आहे. येथें 'एतानि' हा शब्द 'हीं' या मूळ अर्थाचा बोधक नसून जरी लक्षणेनें प्रतिपाद्य वस्तूंचा बोधक आहे तरी, त्याची सर्वनामसंज्ञा नष्ट होत नाहीं. यावरून हें स्पष्ट होतें कीं, सर्व-

नामाचा लाक्षणिक अर्थामध्ये उपयोग केला असला तरी, त्याची सर्वनामसंज्ञा नाहीशी होत नसून कायम राहते. जेव्हा सर्वनामाचा अर्थ इतर पदाच्या अर्थामध्ये विशेषणरूपानें संक्रमित होऊन ते सर्वनाम स्वार्थाला धरून विशेष्यरूप अन्य पदार्थाचे बोधक होते तेव्हाच त्याची सर्वनामसंज्ञा नष्ट होत असते. उदाहरणार्थ 'अतिसर्वाय देहि' या उदाहरणात 'सर्व' या शब्दाचा अर्थ 'अति' या पदाच्या अर्थामध्यें विशेषणरूपानें संक्रमित होऊन 'सर्वांचें अतिक्रमण करणारा विशेष्यरूप पुरुष' या अन्य पदार्थाचा बोधक होत असल्यामुळें, म्हणजेच 'सर्व' हा शब्द उपसर्जनीभूत होत असल्यामुळें, त्याची सर्वनामसंज्ञा नष्ट होते व त्यामुळें 'अतिसर्वस्मै' असे चतुर्थीच्या एकवचनाचे रूप न होता 'अतिसर्वाय' असेच रूप होते.) वास्तविक 'पर, अपर' हे शब्द देशान्तर—अन्य देश—या अर्थाचेच वाचक आहेत. शत्रु इत्यादि जो त्याचा अर्थ होतो तो आर्थिक—मूळ अर्थातूनच निघणारा—अर्थ होय. (तसा अर्थ करण्याकरिता लक्षणावृत्ति मानण्याची काही गरज नाही त्या शब्दाचे दोन्ही प्रकारचे अर्थ, म्हणजे देशान्तर व शत्रु प्रतिवादी हे अर्थ, अभिधाशक्तीनेंच बोधित होतात.) 'उत्तरा: कुरव:' हे असंज्ञेचे कौमुदीत प्रत्युदाहरण दिले आहे या उदाहरणात सुमेरु पर्वत अवधि मानून कुरूंचे ठिकाणी 'उत्तर' हा शब्द लावला आहे व अशा रीतीनें येथें व्यवस्था मानता येते. परंतु कुरूंचे ठिकाणी जो 'उत्तर' शब्द लावला जातो तो आधुनिक पुरुषकृत संकेतामुळें लावला जातो. (त्यामुळें 'उत्तर' हा शब्द संज्ञावाचक ठरून 'असंज्ञायाम्' या निषेधामुळें त्याला सर्वनामसंज्ञा होत नाही व 'उत्तरे कुरव:' असा प्रयोग होऊ शकत नाही) असे प्रकाशकाराचे म्हणणें आहे

शब्दरत्न— स्वाभिधेयापेक्षावधीति समस्तपाठं व्याचष्टे—स्वस्येत्यादि । अपेक्षेति कर्मणि घञ् । व्यवस्थाऽस्त्येवेति । पूर्वादिशब्दैरेकस्या एव दिश उपाधिकृतभेदस्य प्रतिपादनम् । (१) उपाधिश्च पृथ्वीमध्य, तत्प्रान्तवर्तिनश्चत्वार: पर्वताश्च । रामायणे किष्किन्धायां

सुग्रीवेण मध्यदेशावधिकस्यैव दिग्विभागस्योक्तेः । पृथ्वीमध्यं च मध्याह्नसूर्यसंयोगिदेशः । एवं च तन्मध्यभागावधिकोदयाचलादिपर्यन्तदेशरूपोपाधिविशिष्टदिशि पूर्वादिशब्दानां तत्तच्छब्दं प्रवृत्तिनिमित्तीकृत्य प्रवृत्तिरित्युपाध्यन्तर्गततया व्यवस्थाऽस्त्येव । उदयाचलपर्यन्तरूपोपाधेस्तदभिधेयस्य तदाकाङ्क्षत्वं चास्त्येव । मध्याह्नसूर्यसंयोगिदेशात्तत्सम्मुखदेश उदक् । तत्पृष्ठस्थदेशश्च दक्षिणा । मध्याह्ने सूर्यस्योदङ्मुखत्वात् । स्पष्टं चेदं हेलाराजीये । व्यवस्थायामिति च विषयसप्तमीति भावस्तदाह–प्रसिद्धत्वादिति । देशवृत्तीनां तत्तदवधिकोदयाचलसंनिहितत्वादि प्रवृत्तिनिमित्तमित्यादि बोद्धयम् आधुनिकसङ्केतो हीति । असंज्ञापदसामर्थ्यादन्यथा सर्वादीनां केवलरूढत्वेनेन्द्रादिपदानामिव रूढत्वरूपसंज्ञात्वस्य सर्वत्र सत्त्वात्तदसङ्गतिः स्पष्टैवेति भावः । व्याख्यात्रिति । कैयटादीत्यर्थः आधुनिकसङ्केताभावादिति । किं स्वैस्वर एवेति भावः । यदि तत्रोत्कर्षस्यावधिसापेक्षत्वाद्व्यवस्थास्तीत्याग्रहस्तदा प्रत्युदाहरणान्तरमाह–अधरे इत्यादि । अत्रापि संज्ञात्वं मत्वाऽऽह–उत्तरे इत्यादि । उपचारादिति । तत्त्वारोपादिति भावः । अर्थान्तरसंक्रम इति । (१) स्वार्थविशिष्टार्थान्तरबोधकत्वमित्यर्थः । इदं च " ज्ञितश्च तत्प्रत्ययाद् " इति सूत्रे भाष्ये ध्वनितम् । मेवार्थ इति । देशवदयमपि तच्छब्दइत्यर्थः । तुल्यन्यायादेतच्छब्दस्यापि कैयटोक्तार्थ शक्य इति ध्वनितम् । सुमेरुमिति । हिमवानवधिरिति तु " ये केचन परेण हिमवन्तं जनपदा उत्तरकुरव उत्तरमद्रा " इति ऐतरेयब्राह्मणे श्रूयते । उत्तरा इत्यस्य तन्नामान इत्यर्थस्तदा ऽऽह–आधुनिकेति । " उत्तराः कुरवो दक्षिणान् कुरूनपेक्ष्योत्तरा उच्यन्ते " इति तु कपिञ्जलाधिकरणे शाबरभाष्ये उक्तम् ।

'स्वस्य पूर्वादिशब्दस्य ··· इत्यर्थः' या मनोरमेंतील पंक्तींत 'स्वाभिधेयापेक्षावधिनियमः' या ( प्रकृत सूत्रावरील कौमुदींतील ) सामासिक शब्दाचें व्याख्यान केलें आहे. या सामासिक शब्दांतील 'अपेक्ष' हा शब्द ( 'अपेक्ष्यते इति अपेक्षः = अपेक्ष्यमाणः' असा )

कर्मणि घञ्प्रत्ययान्त शब्द आहे. 'व्यवस्थाऽस्त्येव' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, जरी वास्तविक दिक् ( आकाशाप्रमाणे ) एकच आहे तरी, उपाधिकृत भेदामुळें ( ज्या-प्रमाणे घटाकाश मठाकाश इत्यादि व्यवहार होतात त्याचप्रमाणे ) एकाच दिशेचे ठिकाणी पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर हे व्यवहार केले जातात. पृथ्वीचा मध्यभाग व पृथ्वीच्या चार टोकास असलेले चार पर्वत हे उपाधि होत. रामायणामध्यें किष्किंधाकांडात सुग्रीवानें मध्यदेशाला अवधि मानूनच दिग्विभागाचे वर्णन केले आहे मध्यान्ह-कालीन सूर्याचा पृथ्वीच्या ज्या देशाशी संयोग होतो त्याला पृथ्वीचा मध्यभाग म्हणतात. अशा रीतीनें पृथ्वीचा मध्यभाग अवधि मानून उदयाचल, अस्ताचल इत्यादि पर्वतापर्यंत असणाऱ्या त्या त्या पृथ्वीप्रदेशरूप उपाधीनें युक्त अशा दिशाचे ठिकाणी पूर्व, पश्चिम इत्यादि शब्दाची प्रवृत्ति करून उपाधिगत भेदामुळें दिशाची व्यवस्था लावली जाऊ शकतेच. उदयाचलापर्यंत असणारा प्रदेश हा 'पूर्व' शब्दाचा अर्थ केला असता येथें देखील त्या अवधीची आकांक्षा आहेच. मध्यान्हकाली सूर्याचे तोंड उत्तरेकडे राहत असल्यामुळें मध्यान्हकालीन सूर्याचा ज्या पृथ्वीच्या भागाशी संयोग होतो तो देश अवधि मानून सूर्याच्या तोंडासमोर असलेल्या पृथ्वीच्या भागाला उत्तरदिशा म्हणतात व सूर्याच्या पाठीमागें असलेल्या भागाला दक्षिणदिशा म्हणतात हेलाराजाच्या ग्रन्थात हें सर्व स्पष्टपणे सांगितले आहे. 'पूर्वापर' सू. २१८ या प्रकृत सूत्रातील 'व्यवस्थायाम्' ही विषयसप्तमी आहे असा दीक्षिताच्या म्हणण्याचा भावार्थ आहे आणि म्हणून त्यांनी मनोरमेंत 'प्रसिद्धत्वात्' असे म्हटले आहे. 'पूर्व' इत्यादि शब्द जेव्हा देशाचे वाचक असतात तेव्हा त्या त्या दिशेकडे असणाऱ्या देशाचे ठिकाणी त्या 'पूर्व' इत्यादि शब्दाचा व्यवहार होण्याकरिता ते ते देश उदयाचलादि पर्वताचे जवळ असणे इत्यादि त्यांचे प्रवृत्तिनिमित्त होणे, म्हणजे 'पूर्व' इत्यादि शब्दांची त्यांचे ठिकाणी प्रवृत्ति होण्यास कारणीभूत होणें, असें समजावें.

'आधुनिकसङ्केतो हि संज्ञा' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे तें प्रकृत सूत्रांत 'असंज्ञायाम्' हें जें पद घातलें आहे त्याच्या सामर्थ्यामुळें म्हटलें आहे, म्हणजे 'असंज्ञायाम्' हें पद प्रकृत सूत्रांत घातलें असल्यामुळें 'संज्ञा' या शब्दाचा 'आधुनिक संकेत' असाच अर्थ होऊं शकतो. 'संज्ञा' या शब्दाचा तसा अर्थ न केल्यास, सर्वादिगणांत पठित असलेले सर्व शब्द आपापल्या अर्थामध्यें केवळ रूढ असल्यामुळें, ज्याप्रमाणें 'इन्द्र' इत्यादि आपापल्या अर्थामध्यें रूढ असलेले शब्द रूढत्वरूपसंज्ञावाचक म्हणविले जातात त्याचप्रमाणें सर्वादिगणांत पठित असलेले सर्व शब्द देखील रूढसंज्ञावाचक ठरतील व त्यामुळें प्रकृत सूत्रांतील 'असंज्ञायाम्' हें पद विसङ्गत ठरण्याची आपत्ति येईल (व 'असंज्ञायाम्' या शब्दानें आपापल्या अर्थांत रूढ असणाऱ्या 'पूर्व' इत्यादि शब्दांची व्यावृत्ति होईल व अशा रीतीनें त्या शब्दांना केव्हांहि सर्वनामसंज्ञा होऊं शकणार नाहीं.) 'व्याख्यानतोविशेषप्रतिपत्तिरिति' ... 'व्याख्यानवचनमेव प्रमाणम्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्यांतील 'व्याख्यान' या पदाचा 'कैयटादि' असा अर्थ आहे. 'देवगणविशेषे विश्वशब्दस्याधुनिकसङ्केताभावात्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, ईश्वरकृतसंकेतामुळेंच 'विश्व' हा शब्द देवगणविशेषाचा वाचक आहे. 'दक्षिणा गाथकाः' या उदाहरणांत हे गायक अमुकापेक्षां अधिक प्रवीण आहेत अशा अर्थामध्यें उत्कर्षाला अवधीची आकांक्षा असल्यामुळें, येथें देखील व्यवस्थारूप नियम आहे (व त्यामुळें हें योग्य प्रत्युदाहरण ठरत नाहीं) असा कोणी आग्रह धरल्यास, 'अधरे ताम्बूलरागः' हें मनोरमेंत दुसरें प्रत्युदाहरण दिलें आहे. या प्रत्युदाहरणांत देखील ('अधर' हा शब्द आधुनिक संकेतान्वयें खालचा ओठ या अर्थाचा वाचक आहे आणि म्हणून या स्थलीं) संज्ञात्व आहेच (व 'असंज्ञायाम्' हा निषेध असल्यामुळें 'अधर', या शब्दाला सर्वनामसंज्ञा होऊं शकत नाहीं) असें कोणी म्हटल्यास, 'उत्तरे प्रत्युत्तरे च वक्तः' असें मनोरमेंत तिसरें प्रत्युदाहरण दिलें आहे.* 'परापरशब्दयोः

ज्या प्रथम प्रत्ययान्त शब्दाहून पुन्हा प्रत्यय केला जातो तो शब्द उपसर्जन होईल व 'टिड्ढाणञ्' सू. ४७० या सूत्रांत 'अनुपसर्जनात्' सू. ४६९ या अधिकारसूत्राची अनुवृत्ति असल्यामुळें, उपसर्जनीभूत झालेल्या जित्प्रत्ययान्त शब्दाहून 'ङीप्' प्रत्यय होऊं शकणार नाहीं. म्हणून लुक्पक्ष न मानतां अनभिधानपक्षच मानणें योग्य आहे असें भाष्यकारांनीं म्हटलें आहे. या भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं, एखाद्या प्रकृतीहून प्रथम अवयवार्थक प्रत्यय केल्यावर तशा प्रत्ययान्त शब्दाहून पुन्हा अवयवार्थक प्रत्यय केल्यास, प्रथमप्रत्ययान्त शब्द आपला अर्थ द्वितीय प्रत्ययाच्या अर्थामध्यें संक्रमित करीत असल्यामुळें व अशा रीतीनें स्वार्थानें युक्त अशा परार्थाचा बोधक होत असल्यामुळें, तो उपसर्जन होतो, आणि हें भाष्य 'उपसर्जन' या शब्दाचा 'स्वार्थविशिष्टार्थान्तरसङ्क्रमः' असा अर्थ आहे याला प्रमाण आहे.) 'वस्तुतस्तु परापरशब्दयोर्देशान्तर...आर्थिकोऽर्थः' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, 'पर, अपर' या शब्दांचा जसा अभिधाशक्तीनें देशरूप अर्थ होतो त्याचप्रमाणें त्या शब्दांचा 'शत्रु, प्रतिवादी' असा देखील अर्थ अभिधाशक्तीनेंच होतो आणि याच न्यायानें भाष्यांतील 'एतानि' या पदाचा कैयटानें जो अर्थ केला आहे तो अर्थ देखील शक्यार्थच होय, म्हणजे अभिधाशक्तीनें बोधित होणारा अर्थ होय, असें दीक्षितांनीं ध्वनित केलें आहे. दीक्षितांनीं सुमेरु पर्वत अवधि मानून 'उत्तराः कुरवः' या स्थलीं व्यवस्था मानली जाते असें म्हटलें आहे. परंतु ऐतरेयब्राम्हणांत 'ये केचन परेण हिमवन्तं जनपदा उत्तरकुरव उत्तरमद्राः' ही जी श्रुति आहे त्या श्रुतींत हिमालय पर्वत अवधि मानून 'उत्तरः कुरवः' या स्थलीं व्यवस्था दर्शविली आहे. या उदाहरणांतील 'उत्तराः' या शब्दाचा 'उत्तरनामानः' असा अर्थ आहे. 'उत्तराः कुरवः' हा आधुनिक पुरुषकृत संकेत आहे असें मनोरमेंत म्हटलें आहे; व शाबरभाष्यांत कपिञ्जलाधिकरणांत 'उत्तरः कुरवो दक्षिणान् कुरूनपेक्ष्योत्तरा उच्यन्ते' असें जें म्हटलें

आहे त्यावरून 'उत्तराः कुरवः' हा आधुनिक संकेत आहे हे सिद्ध होते.

मनोरमा—"स्वमज्ञातिधनाख्यायाम्"। आत्मात्मीयज्ञातिधनवाची स्वशब्दः, तत्र ज्ञातिधनयोः पर्युदासात् आत्मात्मीयौ परिशिष्टावित्याशयेन व्याचष्टे–आत्मीया इत्यर्थः, आत्मान इति वेति। यत्त्वाहुः–आत्मनि स्वशब्दो नपुंसकः। तेन स्वे, स्वा इत्युदाहरणं तत्र न सम्भवतीति। तच्चिन्त्यम्। आत्मन्यपि स्वशब्दस्य पुंस्त्वात्। "विभाषा जसि" इति प्रकरणे "स्वमात्मीये" इत्येव वक्तव्ये गुरुनिर्देशं कुर्वतः सूत्रकारस्यैवात्र प्रमाणत्वात्।

यदपि स्वोक्तेऽर्थे उपष्टम्भार्थं—

स्वो ज्ञातावात्मनि स्वं त्रिष्वात्मीये स्वोऽस्त्रियां धने ॥

इति अमरसिंहोक्तिमाहुः। तदपि चिन्त्यम्। कोशे हि आत्मनीति पूर्वान्वयि। स्वमिति तु उत्तरान्वयि। तथा च हेमचन्द्रः –

द्यौः स्वर्गनभसोः स्वो ज्ञात्यात्मनोः स्वं निजे धने ॥ इति।

मेदिनीकारोऽपि–

स्वः स्यात्पुंस्यात्मनि ज्ञातौ त्रिष्वात्मीये ऽस्त्रियां धने ॥ इति।

तस्मात् स्वे स्वा इत्यस्यात्मान इति विवरणं सम्यगेवेति स्थितम्।

ज्ञातिधनवाचिनस्त्विति। ताच्छील्ये णिनिना ज्ञातिधनयोरपि आत्मीयत्वं पुरस्कृत्य प्रवृत्तौ सर्वनामताऽस्त्येवेति ध्वनयति। एतदर्थमेव हि सूत्रे आख्याग्रहणं कृतम् ॥

'स्वमज्ञातिधनाख्यायाम्' सू. २१९ या सूत्रातील 'स्व' हा शब्द आत्मा, आत्मीय, ज्ञाति व धन या चार अर्थांचा वाचक आहे व या सूत्रात ज्ञाति व धन या दोन अर्थांचा पर्युदास केला असल्यामुळें आणि आत्मा, आत्मीय हे दोन अर्थ अवशिष्ट राहत असल्यामुळें, प्रकृत सूत्रावरील कौमुदीत 'स्वे–स्वाः। आत्मीया इत्यर्थः। आत्मान इति वा' असे म्हटले आहे. ('स्व' या शब्दाचा धन किंवा ज्ञाति असा अर्थ असल्यास, 'स्वे' असे प्रथमेच्या बहुवचनाचे

पाक्षिक रूप न होतां 'स्वाः' असेंच जस्प्रत्ययान्त रूप होतें.) प्रकाश-कारांचें असें म्हणणें आहे कीं, 'आत्मा' या अर्थाचा वाचक 'स्व' हा शब्द नपुंसक असल्यामुळें त्या अर्थामध्यें असणाऱ्या 'स्व' या शब्दाचीं 'स्वे स्वाः' अशीं पुल्लिङ्गाचीं रूपें होऊंच शकत नाहींत. ('स्व' या शब्दाचा 'आत्मीय' असा अर्थ असल्यास, त्या अर्थामध्यें 'स्व' हा शब्द पुल्लिङ्गी असल्यामुळें त्या अर्थामध्येंच 'स्व' शब्दाचीं 'स्वे-स्वाः' अशीं रूपें होऊं शकतात असें प्रकाशकारांचें म्हणणें आहे.) पण हें त्यांचें म्हणणें बरोबर नाहीं; कारण 'आत्मा' या अर्थाचा देखील वाचक 'स्व' हा शब्द पुल्लिङ्गी आहे. 'विभाषा जसि' या प्रकरणामध्यें 'स्वमात्मीये' असें लहानसें सूत्र पाणिनीनें पठित न करितां एवढें मोठें जें प्रकृत सूत्र पठित केलें आहे तें सूत्रच, 'आत्मा' या अर्थाचा देखील वाचक 'स्व' हा शब्द पुल्लिङ्गी आहे हें मानण्यास प्रमाण आहे. ('स्व' या शब्दाचे चार अर्थ वर सांगितलेच आहेत. त्यांपैकीं ज्ञाति व धन या दोन अर्थामध्यें असणाऱ्या 'स्व' या शब्दाला 'अज्ञातिधनाख्यायाम्' या निषेधा-न्वयें प्रकृत सूत्र लागूच पडत नाहीं. बाकी राहिले दोन अर्थ—आत्मा व आत्मीय. या दोन अर्थापैकीं 'आत्मा' या अर्थामध्यें असणारा 'स्व' हा शब्द नित्य नपुंसकलिङ्गी असता तर, त्याला प्रकृत सूत्र लागूच पडलें नसतें व केवळ आत्मीयवाचक 'स्व' या शब्दाला तें सूत्र लागू पडण्याकरितां पाणिनीनें 'स्वमात्मीये' असें लहानसें सूत्र केल्यानें काम भागूं शकलें असतें. पण तसें लहानसें सूत्र न करितां पाणिनीनें एवढें मोठें प्रकृत सूत्र केल्यामुळें, 'आत्मा' या अर्थाचा देखील वाचक 'स्व' हा शब्द पुल्लिङ्गी आहे हें त्यावरून स्पष्ट होतें.) 'आत्मा' या अर्थाचा वाचक 'स्व' हा शब्द नित्य नपुंसकलिङ्गी आहे याला प्रकाश-कार 'स्वो ज्ञातावात्मनि स्वं त्रिष्वात्मीये स्वोऽस्त्रियां धने' हा अमरांतील श्लोक प्रमाण देतात. पण हें त्यांचें म्हणणें देखील बरो-बर नाहीं; कारण अमरांतील वरील श्लोकांत 'आत्मनि' या

शब्दाचा 'स्वो ज्ञातौ' या पूर्व पदाशी अन्वय असून, 'स्वम्' याचा 'त्रिष्वात्मीये' या उत्तर पदाशी अन्वय आहे व असे मानण्याला हेमचन्द्रकोशातील 'द्यौः स्वर्गनभसो स्वो ज्ञात्यात्मनो स्व निजे धने' हा श्लोक व तसेच मेदिनीकोशातील 'स्व. स्यात्पुंस्यात्मनि ज्ञातौ त्रिष्वात्मीयेऽस्त्रियां धने' हा श्लोक प्रमाण आहे म्हणून 'आत्मा' या अर्थाच्या वाचक 'स्व' या शब्दाची 'स्वे-स्वा' अशी प्रथमेच्या बहुवचनाची पाक्षिक रूपें होतात हें जें प्रकृत सूत्रावरील कौमुदीत विवरण केले आहे तें अगदी योग्य ठरतें (प्रकाशकारांनी अमरातील वरील श्लोकाच्या प्रथम चरणाची 'स्वो ज्ञातौ, आत्मनि स्वम्' अशी दोन भिन्न वाक्यें मानली आहेत आणि म्हणून 'आत्मा' या अर्थाचा वाचक 'स्व' हा शब्द नित्य नपुंसकलिङ्गी आहे असे ते म्हणतात परंतु दीक्षित म्हणतात की, अमरातील वरील श्लोकाची 'स्वो ज्ञात्यात्मनि, स्वं त्रिष्वात्मीये, स्वोऽस्त्रियां धने' अशी वास्तविक तीन वाक्यें होतात व तशी तीन वाक्यें केली असता, 'आत्मा' या अर्थाचा वाचक 'स्व' हा शब्द पुल्लिङ्गी आहे हें प्रकाशकारांनी प्रमाणभूत मानलेल्या अमरातील श्लोकावरूनच सिद्ध होतें. अमरातील श्लोकाचा जसा दीक्षितांनी अन्वय केला आहे त्याच्या समर्थनार्थ त्यांनी इतर दोन कोशांचे प्रमाण दिले आहे व त्या दोन्ही कोशांवरून हें स्पष्ट होतें की, 'आत्मा' या अर्थाचा वाचक 'स्व' हा शब्द पुल्लिङ्गी आहे) 'ज्ञातिधनवाचिनस्तु स्वाः' या प्रकृत सूत्रावरील कौमुदीच्या पंक्तीत 'ज्ञातिधनवाचिन' या स्थलीं ('सुप्यजातौ णिनिस्ताच्छील्ये' सू २९८८ या सूत्रानें होणारा) तच्छीलार्थक 'णिनि' प्रत्यय जो केला आहे त्यानें हे ध्वनित केले आहे की, जेथें 'स्व' या शब्दानें धन किंवा ज्ञाति यांचा 'आत्मीयत्व' या रूपानें बोध करणे आहे तशा स्थलीं देखील, 'स्व' हा शब्द ज्ञातिधनवाचक असूनहि त्याला सर्वनामसंज्ञा होणेच आणि हा अर्थ स्पष्ट होण्याकरिताच प्रकृत सूत्रांत 'आख्या' या पदाचें ग्रहण केले आहे. (जेव्हां 'स्व' या शब्दानें ज्ञाति किंवा धन यांचा बोध करणे असून

त्यांचे ठिकाणीं आत्मीयत्वरूप धर्माचा बोध करणें नाहीं तेव्हांच ज्ञातिवाचक किंवा धनवाचक 'स्व' या शब्दाला सर्वनामसंज्ञा होत नाहीं. परंतु जेव्हां त्यांचा आत्मीयत्वरूपानें बोध करणें आहे तेव्हां 'स्व' या शब्दाला सर्वनामसंज्ञा होतेच व हें प्रकृत सूत्रांतील 'आख्या' या पदाच्या ग्रहणसामर्थ्यानें सिद्ध होतें असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे, आणि हा आशय 'न च ज्ञातिधनयोरप्यात्मीयत्वपुरस्कारे सर्वनामत्वं न स्यादिति वाच्यम्, आख्याग्रहणबलेन ज्ञातित्वधनत्वपुरस्कारे एव पर्युदासप्रवृत्तेः' या शब्दांनीं बालमनोरमेंत स्पष्ट केला आहे.)

शब्दरत्न–हेमचन्द्र इति । कोशयोरविरोधे सम्भवति विरोधो न स्वाप्य इति भावः । यदि तु एवमन्वये–

स्वो ज्ञातावात्मनि धने स्वस्त्री आत्मीयके त्रिषु ।
इति पाठेनैव सिद्धे त्रिः स्वग्रहणवैयर्थ्यापत्तेः ।
बन्धूकबन्धूभवदेतदस्या मुखेन्दुनानेन सहोज्जिहाना ।
रागश्रिया शैशवयौवनीयां स्वमाह सन्ध्यामधरोष्ठलेखा ।। १ ।।
(नै० स० ७ श्लो० ३७) इति ।

श्रीहर्षश्लोके आत्मानमित्यर्थकस्वमित्यस्य बन्धूकबन्धूभवदिति विशेषणेन च नपुंसकत्वमस्तीत्युच्यते तर्ह्यस्तु, मेदिन्यादिप्रामाण्यात्पुंल्लिङ्गो ऽप्यस्त्येवेति स्वे, स्वा इत्युदाहरणं न सम्भवतीति प्राचीनोक्तिरसङ्गतैवेति ध्वनयन्नाह–विवरणं सम्यगेवेति । एतदर्थमेवेति । एतदर्थमपीत्यर्थः । धनत्वेनात्मीयस्य बोधो माभूदित्यर्थं चेत्यपि बोध्यम् । आत्मात्मीयाख्यायामिति तु नोक्तं लाघवाभावात् ।

दोन कोशांमध्यें विरोध न येतां जर त्यांचा अर्थ लावतां येऊं शकतो तर त्यांच्यामध्यें विरोध येईल अशाप्रकारें त्यांचा अर्थ करणें न्याय्य–योग्य–नाहीं असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे. (नानार्थ मेदिनीकोशांत व हेमचन्द्रकोशांत 'आत्मा' या अर्थाचा वाचक 'स्व' हा शब्द पुल्लिङ्गी असतो असें स्पष्ट म्हटलें असल्या-

मुळें व त्या अर्थाला धरून अमरकोशातील श्लोकाचा अन्वय करता येऊ शकत असल्यामुळें, प्रकाशकारानी अमरकोशातील त्या श्लोकाचा जसा विरुद्धार्थप्रतिपादक अन्वय केला आहे तसा अन्वय करणे अन्याय्य आहे असे शब्दरत्नकाराचे म्हणणे आहे ) प्रकाशकारानी अमरकोशातील श्लोकाचा जसा अन्वय केला आहे तसा अन्वय होणे जर अमरकारांना अभिप्रेत असते तर, त्यानी 'स्वो ज्ञातावात्मनि धने स्वस्त्री आत्मीयके त्रिषु' असा श्लोक पठित केल्यानें काम भागू शकलें असते व त्यानी यथापठित श्लोकात 'स्व' हा शब्द जो तीनदा उच्चारला आहे तसा तीनदा तो शब्द उच्चारणे व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते. 'बन्धूकबन्धूभवदेतस्या मुखेन्दुनानेन सहोज्जिहाना । रागश्रिया शैशवयौवनीया स्वमाह सन्ध्यामधरोष्ठलेखा ॥ ( नैषधकाव्य सर्ग ७ श्लोक ३७ ) या श्रीहर्षकृत श्लोकात 'आत्मानम्' या अर्थाच्या वाचक 'स्व' या शब्दाचे 'बन्धूकबन्धूभवत्' हें नपुंसक पद विशेषण केले असल्यामुळें, आत्मार्थक 'स्व' हा शब्द नपुंसकलिङ्गी आहे हें सिद्ध होते असे कोणी म्हटल्यास, तो शब्द नपुंसकलिङ्गी आहे असे मानले तरी, मेदिनी इत्यादि कोशाच्या आधारे तो आत्मार्थक 'स्व' हा शब्द पुल्लिङ्गी देखील आहे हे स्पष्ट होत असल्यामुळें, त्या आत्मवाचक 'स्व' शब्दाची 'स्वे–स्वाः' अशी पाक्षिक रूपें होऊं शकत नाहीत हे जें प्रकाशकाराचे म्हणणे आहे ते चूक ठरते हा आशय ध्वनित करण्याकरिता दीक्षितांनी 'तस्मात् स्वे स्वा इत्यस्यात्मान इति विवरण सम्यगेवेति स्थितम्' असे मनोरमेंत म्हटले आहे. ( नैषधातील वरील श्लोकाचा अर्थ पुढें दिल्याप्रमाणे आहे – 'अनेन प्रत्यक्षदृश्येन अस्याः दमयन्त्याः मुखेन्दुना मुखचन्द्रेण सहैव उज्जिहाना उदयं प्राप्ता अधरोष्ठलेखा लेखाकारोऽधरोष्ठ. रागश्रिया रक्तिमशोभया बन्धूक मध्यान्हविकासिपुष्प भाषायां दुपारीति प्रसिद्ध तस्य बन्धुः बन्धुरभवत् समानमभवत् एतत् प्रत्यक्षदृश्य स्वमात्मानं शैशवयौवनीयां बाल्यतारुण्यसम्बन्धिनी सन्ध्या आह ब्रूते, अहमेव सन्ध्येति बोधयति । बाल्यतारुण्ययोर्मध्ये तारुण्यदशादौ

अधरोष्ठे अधिको रक्तिमा भवतीति प्रसिद्धम् ।') 'एतदर्थमेव हि सूत्रे आख्याग्रहणं कृतम्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्यांतील 'एतदर्थमेव' या पदांचा 'एतदर्थमपि' असा अर्थ आहे. प्रकृत सूत्रांत 'आख्या' या पदाचें ग्रहण असाकरितां देखील केले आहे की, जेथें 'स्व' या शब्दानें प्राधान्येंकरून धनाचा बोध होतो तेथें त्या शब्दानें 'आत्मीय' या अर्थाचा बोध न व्हावा हें देखील जाणावें (आणि म्हणूनच 'एतदर्थमेव' यांतील 'एव' या पदाचा 'अपि' असा अर्थ केला आहे. प्रकृत सूत्रांत 'आख्या' या पदाचें ग्रहण का केलें आहे याचें प्रयोजन सांगतांना भाष्यकार म्हणतात–'आख्याग्रहणं किमर्थम्? । ज्ञातिधनपर्यायवाची यः स्वशब्दस्तस्य यथा स्यादिह मा भूत् । स्वे पुत्राः स्वाः पुत्राः । स्वे गावः स्वा गावः ।') प्रकृत सूत्राऐवजीं पाणिनीनें 'स्वमात्मात्मीयाख्यायाम्' असें सूत्र केलें नाहीं; कारण तसें सूत्र केल्यानें (अधिक मात्रा झाल्या असत्या व) लाघव झालें नसतें.

मनोरमा– "अन्तरं बहिर्योगोपसंव्यानयोः" । बहिरित्यनावृतो देशो बाह्यं चोच्यते । तत्राद्यमर्थं गृहीत्वाऽऽह–बाह्या इत्यर्थ इति । द्वितीये तु आभ्यन्तरा इत्यर्थो बोध्यः । बाह्येन हि आभ्यन्तरस्य योगोऽस्ति । अर्थद्वयमप्याकरे स्थितम् । उपसंव्यानशब्दो ऽधिकरणव्युत्पत्त्योत्तरीयपरः । कर्मव्युत्पत्त्या त्वन्तरीयपरः ।

'अन्तरं बहिर्योगोपसंव्यानयोः' सू. २२० या सूत्रांतील 'बहिः' या शब्दाचे 'अनावृत प्रदेश' व 'बाह्य' असे दोन अर्थ आहेत. पहिला अर्थ घेऊन 'अन्तरे गृहाः' या पदांचा 'बाह्या गृहाः' असा कौमुदींत अर्थ केला आहे. (नगराच्या बाहेर असणारी चांडालादिकांचीं घरें असा 'अन्तरे गृहाः' या पदांचा अर्थ आहे.) द्वितीय अर्थाला धरून 'बहिः' याचा 'आभ्यन्तराः' असा अर्थ होतो हें लक्षांत ठेवावें. आभ्यन्तर प्रदेशाचा बाह्य प्रदेशाशीं संयोगसंबंध असतो. 'बहिः' या शब्दाचे वर सांगितलेले दोन्ही अर्थ भाष्यांत दिलें

आहेत. (प्रकृत सूत्रावरील भाष्यात हे अर्थ दिले नसून या सूत्रावरील कैयटवृत्तीत हे अर्थ दिले आहेत. कैयटानें आपल्या वृत्तीत 'बहिरित्यनावृतदेश उच्यते, तेन योगो बहिर्योगः। स च बाह्यस्य भवति। अन्तरे गृहा इति नगरबाह्याश्चाण्डालादिगृहा उच्यन्ते। यदा तु बहिश्शब्देन बाह्य उच्यते, बाह्येन योगो बहिर्योग इति, तदा नगराभ्यन्तरे ये गृहास्ते उच्यन्ते। उभयथापि स्मर्यते' असे म्हटले आहे.) 'उपसंवीयते अनेन इति उपसंव्यानम्' अशी 'उपसंव्यान' या शब्दाची करणव्युत्पत्ति केल्यास, त्या शब्दाचा 'उत्तरीय वस्त्र' असा अर्थ होतो. 'उपसंवीयते इति उपसंव्यानम्' अशी कर्मव्युत्पत्ति केल्यास, त्या शब्दाचा 'अन्तरीय वस्त्र' असा अर्थ होतो ('व्येञ् संवरणे' या धातूहून 'करणाधिकरणयोश्च' सू. ३२९३ या सूत्रानें 'करणे ल्युट् = अन' प्रत्यय केल्यास किंवा 'कृत्यल्युटो बहुलम्' सू. २८४१ या सूत्रानें कर्मणि ल्युट् केल्यास, 'आदेच उपदेशे' सू. २३७० या सूत्रानें 'व्ये' या धातूतील एकाराचे जागी 'आ' असा आदेश होऊन 'उपसंव्यानम्' असे रूप होते.)

शब्दरत्न– बाह्यं चेति। उक्तबहिर्देशस्थमित्यर्थः। उपसंव्यानशब्दोऽपीति। एवं च तद्ग्रहणं बहिर्योगस्य गृहेष्वेव प्रसिद्धिमाश्रित्य सूत्रे कृतमिति भावः।

'बाह्यं चोच्यते' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्यांतील 'बाह्यम्' या शब्दाचा 'बहिर्देशस्थम्' असा अर्थ आहे. 'उपसंव्यानशब्दोऽपि' इत्यादि जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, (प्रकृत सूत्रात 'बहिर्योग' हा शब्द घातला असून देखील पुन्हा त्या सूत्रात) 'उपसंव्यान' या शब्दाचें जें ग्रहण केले आहे त्याचे कारण हें आहे की, 'बहिर्योग' हा शब्द रूढीनें घरांनाच लागू पडतो. (प्रकृत सूत्रात 'उपसंव्यान' या शब्दाचे ग्रहण न करितां 'बहिर्योग' या शब्दाचेच ग्रहण केले असते तर, 'बहिर्योग'

हा शब्द रूढीनें घरांनाच लागू पडत असल्यामुळें, 'घर' या अर्थाच्या वाचक 'अन्तर' शब्दाचेंच ग्रहण झालें असतें व उत्तरीय वस्त्र किंवा अन्तरीय वस्त्र या अर्थाच्या वाचक 'अन्तर' शब्दाचें ग्रहण झालें नसतें असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे. प्रकृत सूत्रावरील भाष्यांत 'उपसंव्यानग्रहणमनर्थकं बहिर्योगेन कृतत्वात्' असें वार्तिक प्रथम पठित करून लगेंच त्याच्या उलट 'न वा शाटकयुगाद्यर्थम्' असें द्वितीय वार्तिक भाष्यकारांनीं पठित केलें आहे व अशा रीतीनें प्रकृत सूत्रांत 'बहिर्योग' व 'उपसंव्यान' या दोन्ही शब्दांची आवश्यकता दाखविली आहे.)

मनोरमा–"पूर्वादिभ्यो नवभ्यो वा"। अत्रेदमवधेयम्। एतत्सूत्रं "जसः शी" इत्यत्रानुवर्त्य वाक्यभेदेन व्याख्येयम्। "वा च्छन्दसि" इत्येतत् "अमि पूर्वः" इत्यत्र यथा। एवं चाष्टाध्याय्यां "पूर्वपर–" इत्यादित्रिसूत्री गतार्थेति महल्लाघवम्। एकशब्दस्याष्टावयवाः उक्तास्तत्र विशेषमाह–संख्यायामिति। अन्येषु सप्तसु तु वचनान्तरमपि स्यादेव। एके, एकेषामिति यथेति भावः।

'पूर्वादिभ्यो नवभ्यो वा' सू. २२१ या सूत्रासंबंधानें हें लक्षांत घ्यावें कीं, या सूत्राची 'जसः शी' या उत्तर सूत्रांत अनुवृत्ति करून वाक्यभेदानें–भिन्न वाक्यें करून–व्याख्यान करावें. जसें 'अमि पूर्वः' या सूत्रांत 'वा छन्दसि' हें पूर्व सूत्र अनुवृत्त करून वाक्यभेदानें व्याख्यान केलें जातें तसेंच प्रकृत स्थळीं करावें. असें केलें असतां, अष्टाध्यायींत पठित असलेलीं 'पूर्वपर' इत्यादि तीन सूत्रें गतार्थ होतात (व त्यामुळें तीं गाळतां येऊं शकतात आणि) असें करण्यांत मोठें लाघव आहे. ('जसः शी' सू. २१४ या सूत्रांत प्रकृत पूर्व सूत्राची अनुवृत्ति केली असतां जें एक वाक्य तयार होतें त्याचीं 'पूर्वादिभ्यो नवभ्यो वा' व 'पूर्वादिभ्यो नवभ्यो वा जसः शी' अशीं दोन भिन्न वाक्यें करून, प्रकृत सूत्राचें 'पूर्वादिभ्यो नवभ्यो ङसिङ्योः स्मात्स्मिनौ वा स्तः' हें असें कौमुदीत व्याख्यान केलें आहे तसें

'बहुव्रीहि कर्तव्य असता', म्हणजेच 'बहुव्रीहौ चिकीर्षिते', असा अर्थ होतो 'बहुव्रीहौ' ही अधिकरणसप्तमी मानल्यास, 'सर्वादीनि सर्वनामानि' हे पूर्वं सूत्र प्रकृत सूत्रात अनुवृत्त होत असल्यामुळे, या सूत्राचा 'बहुव्रीहौ' सर्वादीनि सर्वनामानि–सर्वनामसंज्ञकानि–न स्यु.' असा अर्थ होणार, म्हणजे 'बहुव्रीहिसमासात् प्राक् सर्वादीना या सर्वनामसंज्ञा आसीत्सा बहुव्रीहिसमासे कृते सति नष्टा भवति' असा प्रकृत सूत्राचा अर्थ होणार, व तसा अर्थ केल्यास, प्रकृत सूत्र व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते, कारण 'संज्ञोपसर्जनीभूतास्तु न सर्वादय' असे वार्तिक असल्यामुळें व अन्यपदार्थप्रधान बहुव्रीहि-समासाचे अवयव उपसर्जन होत असल्यामुळें, बहुव्रीहिसमासातील सर्वनामरूप अवयवाची सर्वनामसंज्ञा बहुव्रीहिसमास केल्यानें वरील वार्तिकान्वयें नाहीशी होणारच, मग ती सर्वनामसंज्ञा नाहीशी करण्या-करिता प्रकृत सूत्र असण्याची गरज काय ? अशा रीतीनें प्रकृत सूत्र 'बहुव्रीहौ कृते' असे व्याख्यान केल्यानें व्यर्थ ठरू पाहते ते सूत्र व्यर्थ न ठरावे याकरिता त्या सूत्राचा 'बहुव्रीहौ चिकीर्षिते सर्वनामसंज्ञा न स्यात्' असा कौमुदीत अर्थ केला आहे व प्रकृत सूत्रावरील कौमुदीत) 'इह समासात् प्रागेव प्रक्रिया-वाक्ये सर्वनामसंज्ञा निषिध्यते' असे म्हटले आहे, व या कौमुदीच्या पङ्क्तीतील 'प्रक्रियावाक्ये' या पदाचा 'अलौकिके विग्रह-वाक्ये' असा अर्थ आहे अलौकिक प्रक्रियावाक्यात 'अकच्' प्रत्यय केला तरी काही हरकत नाहीं असे कोणी म्हटल्यास, त्यावर कौमु-दीत 'स च समासेऽपि श्रूयेत' असे उत्तर दिले आहे. ('बहुव्रीहौ कृते' असे व्याख्यान न करिता 'बहुव्रीहौ चिकीर्षिते' असे व्याख्यान केल्यानें प्रकृत सूत्रवरील वार्तिकानें गतार्थ होत नाही, कारण बहुव्रीहि-समास केल्यावर त्या समासातील सर्वनामरूप अवयव उपसर्जन होत असल्यामुळें त्याची सर्वनामसंज्ञा वरील वार्तिकानें नाहींशी होत असून, बहुव्रीहिसमास होण्यापूर्वी जें अलौकिक प्रक्रियावाक्य तयार केले जाते त्यातच ती सर्वनामसंज्ञा प्रकृत सूत्रानें नष्ट होणे आणि

पुढें 'जस्' प्रत्यय आला असतां, त्या शब्दांना विकल्पेंकरून सर्वनामसंज्ञा होते तरी, त्या विधानाचा वास्तविक अर्थ हाच होतो कीं, गणसूत्रांन्वयें नित्य सर्वनामसंज्ञक ठरणाऱ्या त्या नव शब्दांपुढें 'जस्' प्रत्यय आल्यास त्या प्रत्ययाचे जागीं विकल्पेंकरून 'शी' हा आदेश होतो. अष्टाध्यायींत पठित असलेल्या वरील तीन सूत्रांत) 'व्यवस्थायामसंज्ञायाम्' इत्यादि जीं व्यावर्तक विशेषणें निर्दिष्ट केलीं आहेत तीं गणपाठांत पठित असलेल्या या तीन सूत्रांत आहेतच. (म्हणून अष्टाध्यायींत पठित असलेलीं हीं तीन सूत्रें गाळलीं तरी कोणताहि दोष उत्पन्न होण्याचा संभव नाही.)

मनोरमा--"न बहुव्रीहौ" । कृते बहुव्रीहौ निषेधो व्यर्थः । 'उपसर्जनीभूता न सर्वादय' इति वक्ष्यमाणत्वादत आह--चिकीर्षिते इति । समासात्प्रागेवेति च । प्रक्रियेति । अलौकिके विग्रहवाक्ये इत्यर्थः । मन्वस्तु तत्राकज् अत आह--स चेति । न च निमित्तस्यानुपसर्जनत्वस्य विनाशोन्मुखत्वात्प्रागेव संज्ञा न भविष्यतीति वाच्यम् । 'अकृतव्यूहपरिभाषाया' अनित्यत्वात् । तत्र चैतत्सूत्रस्यैव ज्ञापकत्वात् । अतिभवकानिति । एतदेव ज्ञापनफलमिति भावः । इष्टापत्ति कृत्वेति । "च्छ्वोः शूड्" इति सतुकग्रहणं, प्रकृतिप्रत्यापत्तिवचनं वा अनित्यत्वे ज्ञापकम् । लक्ष्यानुरोधाद्व्यवस्थेति भावः । यथोत्तरमिति । तथा चायत्वे भाष्यकारोक्त्यैव व्यवस्थेति भावः ॥

'न बहुव्रीहौ' सू. २२२ या सूत्राचें कौमुदींत व्याख्यान करितांना 'कृते बहुव्रीहौ' असें म्हटलें नाहीं. तसें व्याख्यान केलें असतें तर प्रकृत निषेधक सूत्र व्यर्थ ठरलें असतें; कारण 'उपसर्जनीभूता न सर्वादयः' असें पुढें सांगण्यांत येणार आहे. म्हणूनच 'बहुव्रीही चिकीर्षिते सर्वनामसंज्ञा न स्यात्' असें प्रकृत सूत्राचें 'कौमुदींत' व्याख्यान केलें आहे. (प्रकृत सूत्रांतील 'बहुव्रीहौ' हें पद विषयसप्तमी मानल्यानें, त्या पदाचा 'बहुव्रीहीच्या विषयांत' किंवा

'बहुव्रीहि वर्तव्य असतां', म्हणजेच 'बहुव्रीहौ चिकीर्षिते', असा अर्थ होतो 'बहुव्रीहौ' ही अधिकरणसप्तमी मानल्यास, 'सर्वादीनि सर्वनामानि' हे पूर्व सूत्र प्रकृत सूत्रात अनुवृत्त होत असल्यामुळें, या सूत्राचा 'बहुव्रीहौ' सर्वादीनि सर्वनामानि-सर्वनामसंज्ञकानि-न स्यु.' असा अर्थ होणार, म्हणजे 'बहुव्रीहिसमासात् प्राक् सर्वादीनां या सर्वनामसंज्ञा आसीत्सा बहुव्रीहिसमासे कृते सति नष्टा भवति' असा प्रकृत सूत्राचा अर्थ होणार, व तसा अर्थ केल्यास, प्रकृत सूत्र व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते, कारण 'संज्ञोपसर्जनीभूतास्तु न सर्वादय' असे वार्तिक असल्यामुळें व अन्यपदार्थप्रधान बहुव्रीहि-समासाचे अवयव उपसर्जन होत असल्यामुळें, बहुव्रीहिसमासातील सर्वनामरूप अवयवाची सर्वनामसंज्ञा बहुव्रीहिसमास केल्यानें वरील वार्तिकान्वयें नाहींशी होणारच. मग ती सर्वनामसंज्ञा नाहींशी करण्या-करिता प्रकृत सूत्र असण्याची गरज काय? अशा रीतीनें प्रकृत सूत्र 'बहुव्रीहौ कृते' असे व्याख्यान केल्याने व्यर्थ ठरू पाहते ते सूत्र व्यर्थ न ठरावे याकरिता त्या सूत्राचा 'बहुव्रीहौ चिकीर्षिते सर्वनामसंज्ञा न स्यात्' असा कौमुदीत अर्थ केला आहे व प्रकृत सूत्रावरील कौमुदीत) 'इह समासात् प्रागेव प्रक्रिया-वाक्ये सर्वनामसंज्ञा निषिध्यते' असे म्हटले आहे, व या कौमुदीच्या पंक्तीतील 'प्रक्रियावाक्ये' या पदाचा 'अलौकिके विग्रह-वाक्ये' असा अर्थ आहे अलौकिक प्रक्रियावाक्यात 'अकच्' प्रत्यय केला तरी काही हरकत नाही असे कोणी म्हटल्यास, त्यावर कौमु-दींत 'स च समासेऽपि श्रूयेत' असे उत्तर दिले आहे. ('बहुव्रीहौ कृते' असे व्याख्यान न करिता 'बहुव्रीहौ चिकीर्षिते' असे व्याख्यान केल्यानें प्रकृत सूत्रवरील वार्तिकानें गतार्थ होत नाही, कारण बहुव्रीहि-समास केल्यावर त्या समासातील सर्वनामरूप अवयव उपसर्जन होत असल्यामुळें त्याची सर्वनामसंज्ञा वरील वार्तिकाने नाहींशी होत असून, बहुव्रीहिसमास होण्यापूर्वी जें अलौकिक प्रक्रियावाक्य तयार केले जाते त्यातच ती सर्वनामसंज्ञा प्रकृत सूत्रानें नष्ट होते आणि

अशा रीतीनें वरील वार्तिक व प्रकृत सूत्र भिन्नविषयक ठरून दोन्ही चरितार्थ ठरतात. 'बहुव्रीहौ चिकीर्षिते' असें व्याख्यान करण्याचा परिणाम हा होतो कीं, बहुव्रीहिसमासांतील सर्वनामरूप अवयवाची, तो समास करण्याकरितां तयार केलेल्या अलौकिक प्रक्रियावाक्यांतच, सर्वनामसंज्ञा प्रकृत सूत्रान्वयें नष्ट होते व त्यामुळें, 'अव्ययसर्व-नाम्नामकच् प्राक्टे:' सू. २०२६ या सूत्रानें होणारा 'अकच्' प्रत्यय तशा सर्वनामशब्दाहून करतां येऊं शकत नाहीं व त्या ऐवजीं 'क' प्रत्यय करतां येतो. 'अकच्' प्रत्यय केल्यानें काय बिघडतें असें कोणी म्हटल्यास, त्यावर उत्तर हें आहे कीं, अलौकिक प्रक्रिया-वाक्यांत तशा सर्वनामशब्दाहून 'अकच्' प्रत्यय केल्यास, समास केल्यावर जो सामासिक शब्द तयार होतो त्यांत 'अकच्' प्रत्ययाचें श्रवण होण्याची आपत्ति येते; कारण 'अलौकिकविग्रहवाक्ये श्रुतस्य लौकिकविग्रहवाक्ये समासे च श्रवणनियमात्' असा सिद्धान्त आहे. प्रकृत सूत्रावरील भाष्यांत १'१'२९ भाष्यकारांनीं या सूत्राचीं दोन प्रयोजनें सांगितलीं आहेत. त्यांपैकीं एक प्रयोजन हें कीं, बहुव्रीहिसमासांतील सर्वनामरूप अवयवाहून 'अकच्' प्रत्यय होऊं नये व दुसरें प्रयोजन हें कीं, 'प्रियविश्वाय' इत्यादि रूपांची सिद्धि व्हावी. 'सर्वादीनि सर्वनामानि' या सूत्रानें जी सर्वनामसंज्ञा होते ती निर्निमित्तक असल्यामुळें अन्तरङ्ग ठरते, व या कार्याच्या मानानें बहुव्रीहिसमासाच्या निमित्तामुळें सर्वनामसंज्ञा नष्ट होणें हें कार्य बहिरङ्ग ठरतें व 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे'–परि. ५० या परिभाषान्वयें अन्तरङ्गकार्याच्या दृष्टीनें बहिरङ्गकार्य असिद्ध ठरत असल्यामुळें, बहुव्रीहिसमासांतील सर्वनामरूप अवयवाची सर्वनाम-संज्ञा नष्ट होऊं शकत नाहीं व त्यामुळें त्याहून 'अकच्' प्रत्ययच झाला पाहिजे व 'क' प्रत्यय होऊं शकत नाहीं. पण बहुव्रीहि-समासांतील 'युष्मद्, अस्मद्' या सर्वनामरूप अवयवांहून 'अकच्' प्रत्यय केल्यास, 'त्वकं पिता यस्य सः त्वकत्पितृकः, अहकं पिता यस्य सः मकत्पितृकः' अशीं सामासिक रूपें होतील व पाणिनीच्या मतें

तर 'त्वत्कपितृकः, मत्कपितृकः' अशी रूपें होणे इष्ट आहे व त्याकरिताच पाणिनीनें प्रकृत सूत्र केले आहे. आणि या सूत्राच्या सामर्थ्याने बहिरङ्गकार्य अन्तरङ्गकार्याला बाधते व त्यामुळें बहुव्रीहिसमासातील सर्वनामरूप अवयवाची सर्वनामसंज्ञा नष्ट झाल्याकारणानें, 'अकच्' प्रत्यय न होता 'क' प्रत्यय होऊन 'त्वत्कपितृक, मत्कपितृकः' अशी इष्ट रूपें सिद्ध होतात. 'प्रियविश्वाय' हे रूप सिद्ध व्हावे हें जें प्रकृत सूत्राचे द्वितीय प्रयोजन सांगितले आहे त्या संबधानें भाष्यकार असे म्हणतात की, ते प्रयोजन 'संज्ञोपसर्जनीभूता न सर्वादयः' या वार्तिकानेंच सिद्ध होऊ शकतं व त्या प्रयोजनाच्या सिद्धीकरिता प्रकृत सूत्र असण्याची काही गरज नाही पुढें भाष्यकार म्हणतात – 'अस्ति तादर्थ्यात्ताच्छब्द्यं, बहुव्रीह्यर्थानि पदानि बहुव्रीहिरिति । तद्यत्तादर्थ्यात्ताच्छब्द्यं तस्येद ग्रहणम् ।' या भाष्याचा भावार्थ हा आहे की, एखादी वस्तु तयार करण्याकरिता जी एक विशेष प्रकारची अवस्था मांडण्यात येते तिला देखील त्या वस्तूला दाखविणारा शब्द लावण्याची लोकात प्रथा आहे त्या न्यायान्वयें बहुव्रीहिसमासाकरिता तयार केलेले जें अलौकिक प्रक्रियावाक्य त्याला देखील 'बहुव्रीहि' असे म्हणता येते आणि बहुव्रीहिसमास करण्याकरिता कल्पिलेल्या अलौकिक प्रक्रियावाक्याला लागणारा जो 'बहुव्रीहि' शब्द त्याचे प्रकृत सूत्रात ग्रहण केले आहे त्यामुळे बहुव्रीहिसमास करण्याकरिता कल्पिलेल्या अलौकिक प्रक्रियावाक्यामध्येंच 'सर्व' इत्यादि सर्वनामरूप अवयवाना सर्वनामसंज्ञा होत नाही असा प्रकृत सूत्राचा अर्थ निष्पन्न होतो अशा रीतीनें बहुव्रीहिसमासातील सर्वनामरूप अवयवाची सर्वनामसंज्ञा प्रकृत सूत्राने अलौकिक प्रक्रियावाक्यातच नष्ट झाल्याकारणानें, तशा सर्वनामरूप अवयवाहून 'अकच' प्रत्यय न होता 'क' प्रत्ययच होतो व 'त्वत्कपितृक, मत्कपितृक' इत्यादि रूपें सिद्ध होण्यात काही अडचण येत नाही यावर शकाकार अशी शंका करतो की, प्रकृत सूत्रातील 'बहुव्रीहि' या शब्दाचा 'बहुव्रीहिसमासाकरिता तयार केलेले अलौकिक

'च्छ्' चे जागीं शकार होऊन 'प्रश्नः' असें रूप होतें. या स्थलीं छकाराच्या निमित्तामुळें होणारें तुगागमकार्य अन्तरङ्ग असून पलीकडे असणाऱ्या 'नङ् = न' या प्रत्ययाच्या निमित्तामुळें होणारें शकारादेशरूप कार्य बहिरङ्ग आहे. परंतु हें बहिरङ्गकार्य असें आहे कीं, तें केल्यानें तुगागमाचें निमित्त जो छकार त्याचे जागीं शकारादेश होऊन त्या छकाराचा अवश्य नाश होणार. म्हणून 'निमित्तं विनाशोन्मुखं दृष्ट्वा तत्प्रयुक्तं कार्यं न कुर्वन्ति' या अर्थाची वाचक 'अकृतव्यूहाः पाणिनीयाः' ही परिभाषा नित्य मानल्यास, तुगागमरूप कार्य पावतच नाहीं. म्हणून 'छ्वोःशूठ्' असें जरी सूत्र केलें असतें तरी काम भागूं शकलें असतें; कारण ज्या छकाराच्या निमित्तामुळें तुगागमाची प्राप्ति होते त्या छकाराचे जागीं शकारादेश होऊन त्या छकाराचा अवश्य नाश होणारा असल्यामुळें त्याच्या निमित्तामुळें होणारा तुगागम झालाच नसता व छकाराचे जागीं शकारादेश होऊन 'प्रश्नः' इत्यादि इष्ट रूपांची सिद्धि होऊं शकलीच असती. असें असून देखील पाणिनीनें 'च्छ्वोः शूठ्' या सूत्रात तुगागमसहित छकाराचें ग्रहण मुद्दाम केलें असल्यामुळें हें ज्ञापित होतें कीं, 'अकृतव्यूहाः' ही परिभाषा अनित्य आहे व तिच्या अनित्यत्वामुळें ती 'प्रश्नः' इत्यादि स्थलीं प्रवृत्त न केल्यानें जो छकाराच्या निमित्तामुळें तुगागम झाला असता त्याचें, 'छ्वोः शूठ्' असें सूत्र केलें असतें तर, केवळ छकाराचे जागीं शकारादेश होऊन, वरील उदाहरणांत श्रवण होण्याची आपत्ति आली असती. ती आपत्ति टाळण्याकरिताच 'च्छ्वोः शूठ्' असें सूत्र पाणिनीनें मुद्दाम केलें आहे व अशा रीतीनें त्या सूत्रांतील सतुक् छकाराचें ग्रहण 'अकृतव्यूहाः' या परिभाषेच्या अनित्यत्वाचें ज्ञापक ठरतें. तसेंच 'हनश्च वधः' सू. ३२५३ या सूत्रानें 'हन्' धातूहून 'अप्' प्रत्यय होऊन व 'हन्' चे जागीं वधादेश होऊन 'वध' असें रूप झालें असतां 'कंसस्य वधः कंसवधः' या 'कंसवध' शब्दाहून 'तदाचष्टे' या अर्थामध्यें 'आख्यानात्कृतस्तदाचष्टे' या

वार्तिकान्वये 'णिच्' प्रत्यय केल्यास, त्या वार्तिकातिल 'कृल्लुक्' या वचनान्वयें 'हन्' धातूहून झालेल्या 'अप्' या कृत् प्रत्ययाचा लुक् होतो व 'हन' धातूचे जागी जो वधादेश झाला आहे तो, 'प्रकृतिप्रत्यापत्तिः = प्रकृतेः आदेशादिविकारपरित्यागेन स्वरूपेण अवस्थानं भवति' या त्या वार्तिकातील वचनान्वयें, नाहीसा होऊन पुन्हा 'हन्' अशी प्रकृति होते. 'अकृतव्यूहाः' ही परिभाषा नित्य मानल्यास, वरील उदाहरणात 'णिच्' प्रत्यय केल्यावर 'कृल्लुक्' या वचनान्वयें 'अप्' या कृत् प्रत्ययाचा अवश्य लुक्, म्हणजे नाश, होणारच. म्हणून येथें 'हन्' चे जागी 'अप्'प्रत्ययाच्या निमित्तामुळें होणारा वधादेश होण्याची प्राप्तीच नव्हती. असे असून देखील वार्तिककारानें वरील वार्तिकात 'प्रकृतिप्रत्यापत्तिः', म्हणजे पुन्हा पूर्व प्रकृति आपले जागी प्राप्त होणे, हे पद मुद्दाम पठित केले असल्यामुळें, त्या पदाच्या ग्रहणानें देखील हे ज्ञापित होते की, 'निमित्तापाये नैमित्तिकस्याप्यपायः' या अर्थाची वाचक 'अकृतव्यूहाः' ही परिभाषा अनित्य आहे, व तिच्या अनित्यत्वामुळें तिची वरील उदाहरणात प्रवृत्ति न केल्यानें जो 'अप्'-प्रत्ययाच्या निमित्तामुळें वधादेश होतो त्याची 'अप्' प्रत्ययाचा लुक् झाल्यावर निवृत्ति झाली नसती व त्यामुळें 'कंस घातयति' असें इष्ट रूप सिद्ध होऊ शकले नसते. ही आपत्ति टाळण्याकरिताच वार्तिककारानें वरील वार्तिकात 'प्रकृतिप्रत्यापत्तिः' हें पद मुद्दाम घातले आहे व अशा रीतीनें तें पद 'अकृतव्यूहाः' या परिभाषेच्या अनित्यत्वाचें ज्ञापक ठरते असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे.) ती परिभाषा अनित्य असल्यामुळें, जेणेकरून इष्ट रूपाची सिद्धि होईल तशा रीतीनें त्या परिभाषेची व्यवस्था लावावी, म्हणजे जेथें ती परिभाषा प्रवृत्त केल्यानें इष्ट रूपाची सिद्धि होत असेल तेथेंच ती प्रवृत्त करावी व अनिष्ट रूपें सिद्ध होत असल्यास ती प्रवृत्त करू नये. 'यथोत्तरं मुनीनां प्रामाण्यम्' असें जें प्रकृत सूत्रावरील कौमुदीत म्हटले आहे त्याचा

प्रक्रियावाक्य' असा लाक्षणिक अर्थ न करितां 'बहुव्रीहिसमास' असाच साधा व सरळ अर्थ केला व तसेंच 'बहुव्रीहौ चिकीर्षिते' असें प्रकृत सूत्राचें व्याख्यान न करितां 'बहुव्रीहौ कृते' असें व्याख्यान केलें आणि तसेंच प्रकृत सूत्र गाळलें तरी, बहुव्रीहिसमासांतील सर्वनामरूप अवयवाहून 'अकच्' प्रत्यय होऊंच शकत नाहीं; कारण सर्वनामरूप संज्ञा होण्यास कारणीभूत जें) अनुपसर्जनत्व, म्हणजे उपसर्जनीभूत न होणें, हें जें निमित्त आवश्यक आहे त्याचा (बहुव्रीहिसमास झाल्यावर त्यांतील सर्वनामरूप अवयव उपसर्जन झाल्याकारणानें) नाश होणार असल्यामुळें, बहुव्रीहिसमास होण्या-पूर्वीच (त्या समासांतील सर्वनामरूप अवयवाला, 'अकृतव्यूहाः पाणिनीयाः' परि. ५६ ही परिभाषा असल्यामुळें, आपोआपच) सर्वनाम-संज्ञा होणार नाहीं. (या शंकेवर दीक्षित असें उत्तर देतात कीं,) ही शंका बरोबर नाहीं; कारण 'अकृतव्यूहाः' ही परिभाषा अनित्य आहे व ती अनित्य आहे याचें प्रकृत सूत्रच ज्ञापक आहे आणि 'अतिभवकान्' असें रूप होणें हें त्या ज्ञापकाचेंच फल आहे. ('भवकन्तमतिक्रान्तः अतिभवकान्' हा द्वितीयातत्पुरुष असून 'अत्यादयः क्रान्ताद्यर्थे द्वितीयया'—पृ. ७८० वरील वार्तिक—या वार्तिकान्वयें झाला आहे व हा बहुव्रीहिसमास नाहीं. म्हणून 'न बहुव्रीहौ' हें प्रकृत निषेधक सूत्र त्याला लागू पडत नाहीं. तरी पण या स्थळीं समास झाल्यावर 'भवत्' हा शब्द उपसर्जन होत असल्यामुळें त्याची सर्वनामसंज्ञा नष्ट होणार हें निश्चित असून देखील, 'भवत्' शब्दाहून 'अकच्' प्रत्यय होतोच व 'अतिभवकान्' असें प्रथमेच्या एकवचनाचें रूप होतें. यावरून हें स्पष्ट होतें कीं, 'अकृतव्यूहाः'—परि. ५६—ही परिभाषा अनित्य आहे. प्रकृत सूत्र तिच्या अनित्यत्वाचें ज्ञापक आहे असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचें कारण हें कीं, ती परिभाषा नित्य असती तर, प्रकृत सूत्र करण्याची मुळींच गरज नव्हती व हें सूत्र नसून देखील, बहुव्रीहि-समासांतील सर्वनामरूप अवयव उपसर्जन होणार व त्याची सर्वनाम-

संज्ञा निरवयेकरून नष्ट होणार या कारणामुळें, त्या परिभाषेमुळें सर्वनामाहून होणारा 'अकच्' प्रत्यय 'युष्मद्, अस्मद्' या बहुव्रीहिसमासातील अवयवाहून न होता व 'त्वत्पितृक, मत्-पितृक' अशी रूपें न होता, 'त्वत्कपितृक, मत्कपितृक' अशी रूपें झालीच असती पण ती परिभाषा अनित्य असल्यामुळें तिची प्रवृत्ति न केल्यास, 'त्वकत्पितृक, मकत्पितृक', अशी जी रूपें होऊं पाहत होती ती न व्हावी याकरिता पाणिनीला प्रकृत निषेधक सूत्र मुद्दाम करावें लागलें अशा रीतीनें हें सूत्र व 'अतिमयकान्' हें उदाहरण त्या परिभाषेच्या अनित्यत्वाचें ज्ञापक ठरतें भाष्यकाराच्या मतें 'त्वकत्पितृक, मकत्पितृक' अशीच रूपें होणे इष्ट असल्यामुळें, त्यांनी प्रकृत सूत्राचें प्रत्याख्यान केलें आहे आणि म्हणून प्रकृत सूत्रावरील कौमुदीत) 'भाष्यकारस्तु त्वकत्पितृक मकत्पितृक इति रूपे इष्टापत्ति कृत्वेतरसूत्र प्रत्याचख्यौ' असें म्हटलें आहे (प्रकृत सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार म्हणतात–'नैतदस्ति प्रयोजनम्। अकच्स्वरौ तु कर्तव्यौ प्रत्यङ्गं मुक्तसंशयौ। त्वकत्पितृक मकत्पितृक इत्येव भवितव्य-मिति।' भाष्यकारांनी असें सांगून प्रकृत सूत्राचें प्रत्याख्यान केलें असल्यामुळें प्रकृत सूत्र नाहींच असें मानल्यास, 'अकृतव्यूहा पाणि-नीया' या परिभाषेच्या अनित्यत्वाचें ज्ञापक कोणतें मानावें असा कोणी प्रश्न केल्यास, त्या प्रश्नाचें दीक्षित असें उत्तर देतात की,) 'च्छ्वोः शूठ्' सू २५६१ या सूत्रांतील 'तुक्' या आगमासहित केलेल्या छकाराचें उच्चारण किंवा 'आङ्यवारकृतस्तदाचष्टे, कृल्लुक्, प्रकृतिप्रत्यापत्ति'–सू २५७३ वरील वार्तिक–या वार्तिकांतील 'प्रकृतिप्रत्यापत्ति' हें पद 'अकृतव्यूहा' या परिभाषेच्या अनित्य-त्वाचें ज्ञापक मानता येतें ('छे च' सू १४६ या सूत्रानें 'प्रछ्' यांतील छकारास 'तुक्' आगम होऊन 'प्रच्छ्' असें रूप होतें या 'प्रच्छ्' धातूहून 'यजयाज' सू ३२६८ या सूत्रानें 'नङ्' प्रत्यय केला असता, 'च्छ्वोः शूठ्' या सूत्रानें 'प्रच्छ्' यांतील

भावार्थ हा आहे कीं, (भाष्यकारांचें वचन प्रमाण मानून आपणास 'त्वकत्पितृकः, मकत्पितृकः' अशींच रूपें होणें इष्ट आहे असें मानणें भाग असल्यामुळें) आतां भाष्यकारांनीं सांगितल्याप्रमाणेंच व्यवस्था लावली पाहिजे. (वास्तविक 'न बहुव्रीहौ' या निषेधक सूत्रान्वयें तशीं रूपें होऊं शकत नाहींत. परंतु भाष्यकारांनीं तशीच रूपें होणें इष्ट आहे असें सांगून प्रकृत सूत्राचें प्रत्याख्यान केलें असल्यामुळें, आपणास प्रकृत सूत्राकडे दुर्लक्ष करून तशीच रूपें इष्ट रूपें आहेत असें मानणें भाग आहे.)

शब्दरत्न—वक्ष्यमाणत्वादिति । एकद्वा इति बहुव्रीहेरभिधानेऽपि तत्रैकद्व्यन्यतरा इत्यर्थादुपसर्जनत्वमेव । समासान्ते कृते विशिष्टस्य सर्वाद्यन्तत्वाभावाच्च । समासान्तानामुत्तरपदावयवत्वं तु नेत्युक्तम् । चिकीर्षित इतीति । अध्याहारलभ्यमेतत् । एतदर्थमेव न बहुव्रीहिरिति वक्तव्ये "बहुव्रीहौ" इति गुरुनिर्देश इति भावः । विनाशोन्मुखत्वादिति । यद्यप्यलौकिके एवैकार्थीभावस्यारोपोऽस्ति तथापि तत्र स्वार्थविशिष्टार्थान्तरबोधकत्वरूपोपसर्जनत्वाभावादेवमुक्तम् । अनित्यत्वादितो । अत एवातिभवकानित्यादिसिद्धिः । वस्तुतः सा भाष्यानुक्तत्वात्रास्त्येवेति बोध्यम् । सतुक्ग्रहणमिति । "च्छ्वोः शूड्" इति सूत्रे प्रष्टेत्यादावन्तरङ्गत्वाज्जातस्य तुको निवृत्तये सत्क्रियते । सतुक्निर्देशसामर्थ्याच्च नान्त्यस्य शः । वाञ्छादिप्रकृतिकक्विबन्तादेस्तु अप्रयुक्तत्वेन लक्षणविषयतैव नेत्यादि भाष्ये स्पष्टम् । तत्परिभाषासत्त्वे हि आदेशो निमित्तविनाशेन पूर्वं तदप्रवृत्तिरेवेति स स्वयं एव स्यादितिभावः ॥

'एकद्वाः' असा बहुव्रीहिसमास होण्याचें जरी अभिधान केलें आहे तरी, या उदाहरणाचा एक व दोन यांतील अन्यतर, म्हणजे एक किंवा दोन असा अर्थ होत असल्यामुळें, येथें ('अन्यतर' प्रधान असून) 'एक' व 'द्वि' हे उपसर्जनच आहेत. या स्थलीं समासान्त 'टच्' प्रत्यय ('बहुव्रीहौ सङ्ख्येये डच्' सू. ८५१ या सूत्रानें)

केला असता, डच्प्रत्ययान्त 'द्व' हा शब्द सर्वादिगणात पठित नसल्यामुळे, समासाच्या अन्ती सर्वादिगणात अन्तर्भूत असलेला शब्द आहे असे मानता येत नाही (व त्यामुळें समासाच्या अन्ती असलेल्या 'द्व' या शब्दाला सर्वनामसंज्ञेची प्राप्तीच होत नाही) समासान्त प्रत्यय उत्तर पदाचा अवयव मानता येत नाही हे पूर्वी (अर्थवद-धातु' या सूत्रावरील मनोरमेत) सांगितलेच आहे. (ग्रन्थकाराचे असे म्हणणे आहे की, 'कृते बहुव्रीहौ सर्वनामसंज्ञा न स्यात्' असा प्रकृत सूत्राचा अर्थ केल्याचे 'एकद्वा' हे रूप सिद्ध होणे हे फल आहे 'सङ्ख्ययाव्ययासन्न' सू ८४३ या विशेष सूत्रानें, 'एको वा द्वौ वा एकद्वाः' असा जो समास होतो तो, बहुव्रीहिसंज्ञक ठरतो 'अनेकमन्यपदार्थे' सू ८३० या सूत्रानें होणाऱ्या बहुव्रीहिसमासातील अवयव जसे उपसर्जन होतात तसे 'सङ्ख्ययाव्ययासन्न' या सूत्रानें होणाऱ्या बहुव्रीहि-समासातील अवयव उपसर्जन होत नाहीत 'एको वा द्वौ वा एकद्वाः' या बहुव्रीहिसमासातील 'एक' व 'द्वि' हे सर्वादिगणात पठित असलेले सर्वनामरूप अवयव प्रधान असून उपसर्जन नाहीत. त्यामुळें 'संज्ञोपसर्जनीभूता न सर्वादय' हे वार्तिक त्याना लागू पडत नाही व त्याची सर्वनामसंज्ञा त्या वार्तिकानें नष्ट होऊ शकत नाही ती संज्ञा बहुव्रीहिसमास केल्यावर प्रकृत सूत्रानें नष्ट होते. त्यामुळें 'एकद्व' हा सामासिक शब्द सर्वनामशब्दान्त आहे असे मानता येत नाही आणि म्हणून त्या सामासिक शब्दाहून प्रथमेच्या बहुवचनाचा 'जस्' प्रत्यय केला असता, त्या प्रत्ययाचे जागी 'जस. शी' सू २१४ या सूत्रानें होणारा 'शी = ई' हा आदेश होत नाही व 'एकद्वे' असे प्रथमेच्या बहुवचनाचे रूप न होता 'एकद्वाः' असेच रूप होते. या ठिकाणी 'अनिर्ज्ञातेऽर्थे बहुवचनं प्रयोक्तव्यम्' या भाष्यवचनान्वयें बहुवचनाचा प्रत्यय होतो हें लक्षात ठेवावे. 'कृते बहुव्रीहौ सर्वनामसंज्ञा न स्यात्' या अर्थाचे बाधक प्रकृत सूत्र जर नसते तर, 'एकद्वे' असे अनिष्ट रूप

होण्याची आपत्ति आली असती असा शंकाकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात की, 'एको वा द्वौ वा एकद्वाः' या बहुव्रीहिसमासांत 'अन्यतर' हा पदार्थ प्रधान असून या समासांतील 'एक' व 'द्वि' हे दोन्ही सर्वनामरूप अवयव उपसर्जन असल्यामुळें, 'उपसर्जनीभूता न सर्वादयः' या वार्तिकानेंच समासांतील चरमावयव जो 'द्वि' शब्द त्याला सर्वनामसंज्ञा होऊं शकत नाहीं व त्यामुळें या उदाहरणांत 'एकद्वे' असें प्रथमेच्या बहुवचनाचें रूप होण्याची प्राप्तीच नाहीं. दुसरें असें कीं, या उदाहरणांत 'बहुव्रीहौ सङ्ख्येये डच्' सू. ८५१ या सूत्रानें समासान्त 'डच्' प्रत्यय होऊन तो प्रत्यय डित् असल्यामुळें 'टेः' सू. ३१६ या सूत्रानें 'द्वि' यांतील 'टि'चा, म्हणजे अन्त्य इकाराचा, लोप झाला असतां, जो डच्प्रत्ययान्त 'द्व' असा शब्द होतो तसा शब्द सर्वादिगणांत पठित नसल्यामुळें, त्याला सर्वनामसंज्ञा होऊंच शकत नाहीं आणि म्हणून देखील 'एकद्वे' असें रूप होण्याची प्राप्तीच नाहीं. तिसरें असें कीं, शंकाकार जर कदाचित् असें म्हणेल कीं, समासान्त 'डच्' प्रत्यय हा 'द्वि' या शब्दाचा अवयव होत असल्यामुळें, सर्वादिगणांत पठित असलेल्या 'द्वि' या शब्दानें डच्प्रत्ययविशिष्ट 'द्व' या शब्दाचें ग्रहण करतां येतें, तर त्याला उत्तर हें आहे कीं, समासान्त प्रत्यय समासांतील उत्तर पदाचा अवयव होत नसून पूर्ण सामासिक शब्दाचा अवयव होत असतो हें मागेंच सांगितलें आहे. त्यामुळें वरील उदाहरणांत 'द्व' हें जें उत्तर पद आहे तें 'द्वि'च आहे असें मानतां येत नाही व म्हणून देखील 'एकद्वे' असें रूप होण्याची प्राप्तीच नाहीं. सारांश 'कृते बहुव्रीहौ सर्वनामसंज्ञा न स्यात्' असा प्रकृत सूत्राचा अर्थ केल्यानें 'एकद्वाः' असें रूप सिद्ध होतें हें जें फल शंकाकारानें दिलें आहे तें अन्यरीतीनें सिद्ध होत असल्यामुळें, शंकाकारानें म्हणणें बरोबर मानतां येत नाहीं.) प्रकृत सूत्रानें व्याख्यान करितांना कौमुदींत 'चिकीर्षिते' हें

जें पद घातले आहे ते अध्याहार करून घातले आहे. असा अध्याहार करता यावा या हेतूनेंच पाणिनीनें 'न बहुव्रीहि.' असे (कमी मात्राचे) सूत्र न करिता 'न बहुव्रीहौ' असे अधिक मात्राचे सूत्र केले आहे असा दीक्षिताच्या म्हणण्याचा भावार्थ आहे (प्रकृत सूत्रात 'बहुव्रीहौ' अशी विषयसप्तमी निर्दिष्ट नसती तर, त्या सूत्रात 'चिकीर्षिते' या पदाचा जो अध्याहार केला आहे तो करता आला नसता.) 'निमित्तस्य अनुपसर्जनत्वस्य विनाशोन्मुखत्वात्' असे जें मनोरमेंत शब्दकारानें म्हटले आहे ते असा आशय मनात धरून म्हटले आहे की, जरी अलौकिक प्रक्रियावाक्यातच एकार्थीभावाचा आरोप केला जात असतो तरी, स्वतःचा अर्थ अन्यपदार्थात संक्रमित करून स्वार्थविशिष्ट अन्यपदार्थाचा बोध करणे अशा प्रकारचे उपसर्जनत्व अलौकिक प्रक्रियावाक्यात येत नाही. (तसे उपसर्जनत्व समासातच येते, कारण भाषेत अलौकिक प्रक्रियावाक्याचा प्रयोग होत नसून सामासिक शब्दाचाच प्रयोग होत असल्यामुळें, बहुव्रीहिसमास केल्यावर त्या सामासिक शब्दातील सर्वनामरूप अवयव उपसर्जन होतो असा शब्दकाराच्या वरील म्हणण्याचा भावार्थ आहे.) 'अकृतव्यूहाः' ही परिभाषा अनित्य असल्यामुळेंच, 'अतिभवकान्' इत्यादि रूपें सिद्ध होतात. (ती परिभाषा नित्य असती तर 'अतिभवकान्' या सामासिक शब्दात उपसर्जन होणाऱ्या 'भवत्' या सर्वनामाहून 'अकच्' प्रत्यय होऊ शकला नसता व 'क' प्रत्यय केल्यानें 'अतिभवत्कः' असे रूप झाले असतें.) 'अकृतव्यूहाः' ही परिभाषा भाष्यात कोठेंहि पठित नसल्यामुळें, वास्तविक तशी परिभाषाच नाही असेच मानले पाहिजे हें जाणावे. 'प्रष्टा' इत्यादि स्थली अन्तरङ्गत्वामुळें जो तुगागम होतो त्याची निवृत्ति व्हावी याकरिता 'च्छ्वोः शूठ्' सू २५६१ या सूत्रात तुगागमसहित छकाराचे ग्रहण केले आहे. ('प्रच्छ् + तृच्' या स्थली 'प्रच्छ्' या प्रकृतीत विद्यमान असणाऱ्या छकाराच्या निमित्तामुळें 'छे च' सू. १४६ या सूत्रानें जें तुगागमकार्य पावतें तें अन्तरङ्ग असून, त्याच्या मानानें

त्या छकारापलीकडे असणाऱ्या झलादि 'तृच्' प्रत्ययाच्या निमित्तानें 'च्छ्वो शूठ्' या सूत्रानें शकारादेश होणें हें कार्य बहिरङ्ग ठरतें. म्हणून बहिरङ्गकार्याचा बाध करून प्रथम अन्तरङ्गकार्य केल्याने जो 'तुक्=त्' आगम होतो त्या पुढें छकार असल्यामुळें 'स्तोः श्चुना श्चुः' सू. १११ या सूत्रानें त्या तकाराचें जागीं जो चकार होतो त्या चकाराची, म्हणजेच तुगागमाची, निवृत्ति व्हावी याकरितां प्रकृत सूत्रांत सतुक् छकार हा शकारादेशाचा स्थानी निर्दिष्ट केला आहे. त्यामुळें सतुक् छकाराचे जागीं शकारादेश होऊन छकारासह तुगागमाची निवृत्ति होते. 'च्छ्वोः शूठ्' ६-४-१९ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार म्हणतातः-'अवश्यमत्र तुगभावार्थो यत्नः कर्तव्यः । अन्तरङ्गत्वाद्धि तुक् प्राप्नोति । च्छ्वोरिति तुकासह सन्निपातग्रहणं विज्ञायते ।') 'च्छ्वोः शूठ्' या सूत्रांत सतुक् छकाराचें ग्रहण केलें असल्यामुळें त्या ग्रहणाच्या सामर्थ्यानें 'प्रच्छ्' यांतील अन्त्य छकाराचे जागीं शकार होत नाहीं. (शंकाकाराची अशी शंका आहे कीं, 'अलोऽन्त्यस्य' सू. ४२ ही परिभाषा असल्यामुळें, 'च्छ्वोः शूठ्' या सूत्रानें होणारा शकारादेश 'प्रच्छ' यांतील अन्त्य छकाराचे जागींच होऊं शकतो, सतुक् छकाराचे जागीं तो आदेश होऊं शकत नाहीं. या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं, 'च्छ्वोः शूठ्' या सूत्रांत सतुक् छकाराचा स्थानिरूपानें निर्देश केला असल्यामुळें, जर केवळ अन्त्य छकाराचे जागीं 'अलोऽन्त्यस्य' सू. ४२ या परिभाषान्वयें शकार केला तर, त्या सूत्रांत केलेलें सतुक् छकाराचें ग्रहण व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते. तें सतुक् ग्रहण व्यर्थ न ठरावें याकरितां हें मानणें आवश्यक आहे कीं, सतुक्ग्रहणाच्या सामर्थ्यामुळें 'अलोऽन्त्यस्य' या परिभाषेचा बाध होऊन 'निर्दिश्यमानस्यादेशा भवन्ति' प. १२ या परिभाषान्वयें सतुक् छकाराचे जागीं शकारादेश होतो. त्या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं देखील हेंच म्हटलें आहे. भाष्यकार म्हणतात-'ननु चैवमप्यन्त्यस्य प्राप्नोति । सन्निपातग्रहणसामर्थ्या-

त्सर्वस्य भविष्यति । एवमप्यङ्गस्य प्राप्नोति । निर्दिश्यमानस्याऽऽदेशा भवन्तीत्येवमङ्गस्य न भविष्यति ।' 'वाछि इच्छायाम्' या भ्वादिगणातील इदित् धातूहून 'क्विप्' प्रत्यय केल्यास, 'इदितो नुम्धातोः' सू २२६२ या सूत्रानें नुमागम होऊन व 'वेरपृक्तस्य' सू ३७५ या सूत्रानें 'क्विप् = व' या अपृक्त प्रत्ययाचा लोप होऊन व 'नुम् = न्' चे जागी 'स्तोः श्चुना श्चुः' सू १११ या सूत्राने ञकार होऊन 'वाञ्छ्' अशी तुगागमरहित प्रकृति झाली असता अशा) 'वाञ्छ्' इत्यादि क्विबन्त प्रकृतीच्या रूपाचा भाष्येंत कोठेंहि प्रयोग आढळत नसल्यामुळें, तशी प्रकृति 'च्छ्वोः शूठ्' या पाणिनीय सूत्राचा विषयच होऊं शकत नाही असें 'च्छ्वोः शूठ्' सू ६-४-१९ या सूत्रावरील भाष्यांत स्पष्ट सांगितलें आहे जर 'अकृतव्यूहा'–परि ५६–ही परिभाषा वास्तविक असती तर, शकारादेश केल्यावर तुगागमाचें निमित्त जो छकार त्याचा अवश्य नाश होणार असल्यामुळें, तुगागम (अन्तरङ्ग असून देखील 'निमित्त विनाशोन्मुखं दृष्ट्वा तत्प्रयुक्तं कार्यं न कुर्वन्ति' या अर्थाच्या वाचनरूपा परिभाषान्वयें) होऊंच शकला नसता आणि त्यामुळें 'च्छ्वोः शूठ्' या सूत्रांत केलेलें सतुक् छकाराचें ग्रहण व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते (असे असून देखील 'च्छ्वोः शूठ्' सू २५६१ या सूत्रांत सतुक् छकाराचं स्थानिरूपानें ग्रहण केलें असल्यामुळें त्यावरून हें स्पष्ट होतें की, पाणिनीला 'अकृतव्यूहा' ही परिभाषा मुळींच मान्य नव्हती जर ती परिभाषा असती किंवा पाणिनीला मान्य असती तर, त्या परिभाषान्वयें तुगागम अन्तरङ्ग असून देखील त्याचा अवश्य नाश शकारादेशानें होणारा असल्यामुळें त्या तुगागमाची प्रथम प्रवृत्ति होऊं शकलीच नसती आणि त्यामुळें पाणिनीनें त्या सूत्रांत सतुक् छकाराचा स्थानिरूपानें निर्देश न करितां, केवळ छकाराचा स्थानिरूपानें निर्देश केला असता सारांश त्या सूत्रांत स्थानिरूपानें केलेलें सतुक् छकाराचें ग्रहण 'अकृतव्यूहा' या परिभाषेच्या अनित्यत्वाचें जें दीक्षितांना ज्ञापक मानलें आहे तसे

न मानतां, तशी परिभाषाच नाहीं यावें ते ज्ञापक मानणें योग्य आहे असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे. यावर शंकाकार असें म्हणतो कीं, 'च्छ्वोः शूठ्' या सूत्रांत जें सतुक् छकाराचें स्थानिरूपानें ग्रहण केलें आहे तें अशाकरितां केलें आहे कीं, 'वाछि इच्छायाम्' या भ्वादिगणांत पठित असलेल्या धातूहून 'क्विप्' प्रत्यय केला असतां, 'वाञ्छ् क्विप्' या स्थलीं 'क्विप्' हा कित् प्रत्यय पुढें असल्यामुळें तुग्रहित छकाराचे जागीं जो शकारादेश झाला असतां तो न व्हावा, आणि अशा रीतीनें त्या सूत्रांत स्थानिरूपानें केलेलें सतुक् छकाराचें ग्रहण चरितार्थ ठरत असल्यामुळें, हें ग्रहण 'अकृतव्यूहाः' ही परिभाषा मुळींच नाहीं किंवा असल्यास ती अनित्य आहे याचें ज्ञापक मानतां येत नाहीं. या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं, 'वाञ्छ्' अशा क्विबन्त तुग्रहित प्रातिपदिकाचीं भाषेंत कोठेंहि रूपें आढळत नसल्यामुळें, तशा रूपांच्या सिद्धीकरितां 'च्छ्वोः शूठ्' या सूत्रांत पाणिनीनें सतुक् छकाराचें स्थानिरूपानें ग्रहण केलें आहे हें शंकाकाराचें म्हणणें चूक ठरतें. भाषेंत जीं रूपें प्रचलित आहेत तीं कशीं सिद्ध होतात यावरितां पाणिनीनें अष्टाध्यायी रचली असल्यामुळें, जीं रूपें भाषेंत मुळींच होत नाहींत तशा काल्पनिक रूपांचा आधार घेऊन सतुक् छकाराचें स्थानिरूपानें केलेलें ग्रहण चरितार्थ ठरविण्याचा प्रयत्न करणें अयोग्य आहे. 'वाञ्छ्' या क्विबन्त प्रातिपदिकाचीं रूपें भाषेंत मुळींच होत नाहींत म्हणून शब्दरत्नकार 'च्छ्वोः शूठ्' ६-४-१९ या सूत्रावरील भाष्याचें प्रमाण देतात. त्या भाष्यांत भाष्यकार म्हणतात–'यद्येवमनुक्रुध्यतेरप्रत्ययः उत्पुच्छिनि प्राप्नोति, उत्पुच्छिन सेत्स्यति तथा वाञ्छतेरप्रत्ययः वान् वांशौ वांशः इति न सिध्यति । यथालक्षणमप्रयुक्ते ।' या सर्वीच भाष्यांत 'यथालक्षणम-प्रयुक्ते = अप्रयुक्तेषु लक्षणप्रवर्तनं न', म्हणजे अशा प्रकारचे प्रयोग भाषेंत होत नसल्यामुळें ते पाणिनीय शास्त्राला सिद्ध करावयाचे नाहींत, असें म्हटलें असल्यामुळें त्यावरून हें

स्पष्ट होते की, 'वाञ्छ्' या विवक्षित प्रातिपदिकाची भाष्येत रूपें मुळीच होत नाहीत. म्हणून तशा काल्पनिक रूपाच्या सिद्धीकरिता पाणिनीनें प्रकृत सूत्रात सतुक् छकाराचे स्थानिरूपानें ग्रहण केले आहे असे जें शकाकाराचे म्हणणे आहे ते वरील भाष्याच्या विरुद्ध असल्यामुळें, बरोबर मानता येत नाहीं आणि म्हणून ते ग्रहण 'अकृतव्यूहाः' ही परिभाषा नाहीच याचेच ज्ञापक मानणे योग्य आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे.)

शब्दरत्न– प्रकृतिप्रत्यापत्तीति । कसं घातयतीत्यादौ कृल्लुकि तन्निमित्तकादेशनिवृत्तये क्रियमाणं "आख्यानात्कृतस्तदाचष्टे कृल्लुक् प्रकृतिप्रत्यापत्तिश्च" इति वचनमित्यर्थः ।

अत्रेदं चिन्त्यम् । लुग्यपि प्रत्ययलक्षणसत्त्वाद्राजा, ऐनेय इत्यादाविवाकृतपरिभाषाया अत्राप्राप्तिः । "न लुमता" इति निषेधस्तु प्रत्यये परतो जायमानपूर्वकार्य एवेति स्पष्टमेव । तस्मात्पुष्ययोगं जानाति पुष्येण योजयतीत्येतत्साधके "पुष्ययोगे ज्ञि" इति वचने भाष्यकृत्कृतप्रत्यापत्त्यनुवृत्तिर्नापिका । तत्र हि "घञो" इति घिति परतः कुत्वमिति ।

'प्रकृतिप्रत्यापत्तिवचनम्' या मनोरमेच्या पङ्क्तीत 'वचनम्' असे जें म्हटले आहे ते 'कसं घातयति' इत्यादि उदाहरणात कृत् प्रत्ययाचा लुक् झाल्यावर त्या कृत् प्रत्ययाच्या निमित्तामुळें होणाऱ्या आदेशाची निवृत्ति व्हावी याकरिता पठित केलेले 'आख्यानात्कृतस्तदाचष्टे कृल्लुक् प्रकृतिप्रत्यापत्तिश्च' हे वचन–वार्तिक–होय. या वार्तिकाचे मनोरमेंत पूर्वी विवरण केलेच आहे. ) 'कसं घातयति' या उदाहरणासंबधानें ही गोष्ट विचार करण्याजोगी आहे की, 'राजा, ऐनेयः' इत्यादि उदाहरणात प्रत्ययाचा लोप झाल्यावर देखील तो प्रत्यय प्रत्ययलक्षणानें विद्यमान आहे असे मानल्यानें ज्याप्रमाणे 'अकृतव्यूहाः' या परिभाषेची प्राप्ति होत नाही त्याचप्रमाणे 'कंस घातयति' या उदाहरणात देखील 'अच्' या कृत् प्रत्ययाचा

मानल्यानें 'अकृतव्यूहा:' ही परिभाषा या उदाहरणात देखील प्रवृत्त होऊं शकत नाही; कारण येथें देखील निमित्त नष्ट झाले नसून प्रत्ययलक्षणानें विद्यमान आहे असे मानता येतें वर दिलेल्या दोन्ही उदाहरणात प्रत्ययलक्षण न मानल्यास, 'अकृतव्यूहा:' ही परिभाषा त्या दोन्ही स्थली प्रवृत्त होईल व त्यामुळें प्रथम उदाहरणात उपधादीर्घकार्य होणार नाही व द्वितीय उदाहरणात अपत्यार्थक 'ढक्' प्रत्यय होणार नाही म्हणून शब्दरत्नकार म्हणतात कीं, वरील दोन उदाहरणात प्रत्ययलक्षण मानून जशी 'अकृतव्यूहा' या परिभाषेची प्रवृत्ति रोकली जाते त्याचप्रमाणे 'कंस घातमति' या उदाहरणात देखील तिची प्रवृत्ति रोकता येऊं शकते, कारण या उदाहरणात 'हनश्च वध-' सू ३२५३ या सूत्रानें 'हन्' धातूहून जो 'अप्' हा कृत् प्रत्यय होतो त्या प्रत्ययाचा 'आख्यानात्कृत' या वार्तिकान्वयें जरी लुक् होतो तरी, तो 'अप्' प्रत्यय प्रत्ययलक्षणानें विद्यमानच आहे व त्याचा नाश झाला नाही असे मानल्यानें, त्या उदाहरणात देखील 'अकृतव्यूहा' या परिभाषेची प्रवृत्ति बंद करता येते. हें खरे की, या उदाहरणात 'अप्' प्रत्ययाचा लोप झाला नसून लुक् झाला आहे व 'न लुमताङ्गस्य' हे प्रत्ययलक्षणाचे निषेधक सूत्र आहे पण ते निषेधक सूत्र अशाच ठिकाणी लागू पडते की, जेथें लुक् झालेल्या प्रत्ययाच्या निमित्तानें त्याच्या अङ्गाला काही कार्य करणे आहे. परंतु 'हनश्च वध.' या सूत्रानें जो 'हन्' धातूहून 'अप्' प्रत्यय होतो त्या प्रत्ययाच्या निमित्तामुळें 'हन्' या प्रकृतीचे जागी वधादेश करणे नसून तो आदेश सन्नियोगशिष्ट आहे, म्हणजे 'अप्' प्रत्यय व वधादेश हे दोन्ही 'हनश्च वध' या सूत्रानें एकेच वेळी होणे सांगितले असून त्या दोहोमध्यें निमित्तनैमित्तिकभाव नाही म्हणून या उदाहरणास 'न लुमताङ्गस्य' हा निषेध लागू पडत नाही व त्यामुळें 'अप्' या प्रत्ययाचा जरी लुक् झाला आहे तरी तो प्रत्ययलक्षणानें विद्यमान आहे असे मानता येत असल्यामुळें, त्या

म्हणून सूत्रप्रत्याख्यान करणारे भाष्यकार यांना ज्या प्रकारचीं रूपें संमत आहेत त्या प्रकारचीं रूपें पाणिनीय सूत्रान्वयें देखील कशीं तरी सिद्ध होणें शक्य असल्यास, तशींच रूपें सिद्ध करावीं व विपरीत रूपांची, म्हणजे भाष्यविरुद्ध रूपांची, सिद्धि करूं नये. तसें करणें शक्य नसल्यास, पाणिनीय सूत्र अप्रमाणच आहे व भाष्यकारांनीं त्या सूत्राचें केलेलें प्रत्याख्यान सूत्रकारास–पाणिनीस–देखील संमत आहे असें मानलें पाहिजे असें त्या भाष्यांत ध्वनित केले आहे. ('धिन्विकृण्व्योर च' या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार म्हणतात:– 'क्वायमकारः श्रूयते ? । न क्वचिच्छ्रूयते । लोपोऽस्य भवत्यतो लोप आर्द्धधातुक इति । यदि न क्वचिच्छ्रूयते किमर्थमत्वमुच्यते, न लोप एवोच्येत । नैवं शक्यं, लोपे हि सति गुणः प्रसज्येत । अत्वे पुनः सति अकारलोपस्य स्थानिवद्भावाद्गुणो न भवति । ननु च लोपेऽपि सति न धातुलोप आर्द्धधातुक इति प्रतिषेधो भविष्यति । आर्द्धधातुकनिमित्ते लोपे स प्रतिषेधो, न चैष आर्द्धधातुकनिमित्तो लोपः । अपि च प्रत्याख्यायते स योगः । तस्मिन्प्रत्याख्याते गुणः स्यादेव । तस्मादत्वं वक्तव्यम् ॥' या भाष्याचा भावार्थ हा आहे की, 'धिन्विकृण्व्योर च' या सूत्रानें 'धिन्व्, कृण्व्' या धातूंतील अन्त्य वकाराचे जागीं जो अकारादेश होणें सांगितलें आहे त्याचें कोठेंहि श्रवण होत नाहीं; कारण त्या अकारापुढें 'उ' हा आर्द्धधातुक प्रत्यय येत असल्यामुळें, 'अतो लोपः' सू. २३०८ या सूत्रानें त्या अकाराचा लोप होतो. म्हणून ज्याअर्थी त्या अकाराचें कोठेंहि श्रवण होत नाहीं त्याअर्थी तसा आदेश होण्याचें विधान न करितां पाणिनीनें वकारलोप होण्याचें विधान करावयास पाहिजे होतें. पण तसें विधान करणें शक्य नव्हतें. वकारलोप होण्याचें विधान केलें असतें तर, 'धिवि, कृवि' या इदित् धातूंना 'इदितो नुम्धातोः' सू. २२६२ या सूत्रानें नुमागम होऊन 'धिन्व्, कृण्व्' अशी स्थिति झाल्यावर वकारलोप केल्यानें 'धिन् उ ति, कृण् उ ति' अशा 'उ' हा आर्द्धधातुकप्रत्यय पुढें असल्यामुळें, 'पुगन्तलघूपध-

स्य च' सू २१८९ या सूत्रानें उपर्येतील 'इ, ऋ' याचा गुण होण्याची आपत्ति येते पण वकाराचे जागीं अकारादेश केला असता, जरी त्या अकाराचा 'अतो लोप' या सूत्रानें लोप होतो तरी, त्या अकारापूर्वी असलेल्या 'इक्' चा गुण करतेवेळी तो अकार 'अच परस्मिन् पूर्वविधौ' सू ५० या सूत्रान्वयें विद्यमान आहे असे स्थानिवद्भावानें मानता येते त्यामुळें 'उ' प्रत्यय व 'इक्' या दोहोंमध्यें अकाराचे व्यवधान होत असल्यामुळें व अशा रीतीनें 'इक' उपधाभूत ठरत नसल्यामुळें, त्या 'इक्'चा गुण होण्याची आपत्ति टळते पण वकारलोप होण्याचे विधान केले असते तरी, तो लोप 'उ' या आर्धधातुक प्रत्ययाच्या निमित्तामुळें होणारा असल्यामुळें व अशा रीतीनें तो आर्धधातुक प्रत्यय धात्वयव जो वकार त्याचा लोप करणारा प्रत्यय आहे असे मानता येऊ शकत असल्यामुळें, 'न धातुलोपे आर्धधातुके' सू २६५६ या निषेधक सूत्रान्वयें उपधागुण होऊ शकलाच नसता अशी कोणी शंका केल्यास, त्या शंकेवर भाष्यकार असे उत्तर देतात की, 'न धातुलोपे' हा निषेध अशाच ठिकाणी लागू पडतो की, जेथें आर्ध-धातुक प्रत्ययाच्या निमित्तामुळें धात्वयवाचा लोप होतो पण प्रकृत स्थली वकारलोपाचे विधान केल्यास तो वकारलोप आर्धधातुकप्रत्यय-निमित्तक न ठरता सन्नियोगशिष्ट ठरेल, म्हणजे वकारलोप व 'उ' प्रत्यय हे दोन्ही एकेचवेळी होण्याचे सांगितले असून त्या दोहोंमध्यें निमित्तनिमित्तिभाव नाही अशा प्रकारचे ते विधान ठरेल, व त्यामुळे 'न धातुलोपे' हा निषेध लागू पडणार नाही आणि उपर्येतील 'इक्' चा गुण होण्याची आपत्ति कायम राहीलच दुसरे असे की, वकारलोप आर्धधातुकप्रत्ययनिमित्तक मानला तरी, 'न धातुलोपे' या सूत्राचे प्रत्याख्यान केले असल्यामुळें, तशा प्रत्याख्यात सूत्राचे सहाय घेऊन गुण होण्याची आपत्ति टाळता येऊ शकत नाही म्हणून पाणिनीनें वकारलोपाचे विधान न करिता वकाराचे जागीं अकारा-देश होण्याचे जें विधान केले आहे तेच योग्य ठरते असा भाष्य-

अनित्यत्वामुळें तिची वरील उदाहरणांत प्रवृत्ति न केल्यास कुत्व इत्यादि कार्य कायम राहून 'धुज्' ही पूर्व प्रकृति आविर्भूत न होण्याची जी आपत्ति येत होती ती टाळण्याकरितां तशी अनुवृत्ति केली आहे व अशा रीतीनें ती अनुवृत्ति 'अकृतव्यूहाः' या परिभाषेच्या अनित्यत्वाची ज्ञापक ठरते असें शब्दरत्नकारांचें म्हणणें आहे.)

शब्दरत्न–भाष्यकारोक्त्येति ।

"अकच्स्वरौ तु कर्तव्यौ प्रत्यङ्गं मुक्तसंशयौ" ।

इति च तदुक्तिः । एतदेवाभिप्रेत्य "धिन्विकृण्व्योर च" इति सूत्रे किमर्थमत्वं विधीयते वलोप एवास्त्वित्याशङ्क्यात्वेऽल्लोपे तस्य स्थानिवत्त्वेन गुणाभावाय तत् । न च वलोपेऽपि "न धातु–" इति गुणनिषेधः सिद्ध इति वाच्यम् । तत्प्रत्याख्यानपक्षे गुणप्राप्तेरित्युक्तम् । अनेन सूत्रमतात् प्रत्याख्यानवादिमतं प्रबलमिति प्रत्याख्यानवादिसंमतलक्ष्यमेव कथंचित्सूत्रमतेऽपि साध्यं न तु विपरीतं सति सम्भवे । अन्यथा सूत्रमप्रमाणमेवेति च, प्रत्याख्यानं सूत्रसंमतमिति च ध्वनितम् । सूत्रकृत्खण्डितप्राचीनव्याख्यानामप्रामाण्यवत्सूत्रकारवचः खण्डनप्रवृत्तभाष्यवार्तिकवचनैस्तदंशे सूत्रकारवचसो ऽप्यप्रामाण्यकल्पनं बोचितेति दिक् ।

'तथा चाद्यत्वे भाष्यकारोक्त्यैव व्यवस्था' या मनोरमेंतील पंक्तीत ज्या भाष्यकारोक्तीला अनुलक्षून म्हटलें आहे ती 'अकच्स्वरौ तु कर्तव्यौ प्रत्यङ्गं मुक्तसंशयौ' म्हणजे 'अकच्' प्रत्यय व 'स्वाङ्गशिटामदन्तानाम्' फिट् सू. २९ या सूत्रानें सर्वनामाला होणारा स्वर हे दोन्ही समाससामर्थ्यें कोणत्याहि भागांत असलेल्या 'सर्व' इत्यादि सर्वनामांना निःसंशय करावे, ही भाष्यकारोक्ति होय. ('न बहुव्रीहौ' १–१–२९ या सूत्रावरील भाष्यांत हें म्हटलें आहे व हें भाष्य मनोरमेच्या विवरणांत पूर्वीं दिलेंच आहे आणि त्या भाष्यावरील टीकेंत कैयटानें 'गोनर्दीयस्त्वाहेति सूत्रप्रत्याख्यानमेतत् । यथोत्तरं मुनित्रयस्य प्रामाण्यमिति' असें म्हटलें आहे. सारांश

'त्वकत्पितृक', मत्पितृक' या उदाहरणात कोणताहि संशय मनात न आणता 'युष्मद्, अस्मद्' या सर्वनामरूप अवयवाहून 'अक्च्' प्रत्यय करावा व 'बहुव्रीहौ प्रकृत्या पूर्वपदम्' सू. ३७३५ या सूत्रान्वयें बहुव्रीहिसमासात जो पूर्वपदप्रकृतिस्वर प्राप्त आहे तो 'स्वाङ्गशिटामदन्तानाम्' फिट् सू. २९ या सूत्रानें होणारा आद्युदात्त स्वर पूर्व पदाला निःसंशय करावा असे भाष्यकाराचे म्हणणे आहे व 'यथोत्तर मुनीनां प्रामाण्यम' या न्यायान्वयें भाष्यकाराचेच म्हणणे मान्य करणे भाग आहे, आणि 'न बहुव्रीहौ' हे सूत्र 'सञ्ज्ञोपसर्जनीभूता न सर्वादयः' हे वार्तिक असल्यामुळें गतार्थ होते असे मानून त्या सूत्राचे प्रत्याख्यान करणे, म्हणजे त्या सूत्राकडे दुर्लक्ष करणे, उचित आहे) 'यथोत्तरं मुनीनां प्रामाण्यम्' हा न्याय मनात धरूनच भाष्यकारांनी 'धिन्विकृण्व्योर च' सू. ३-१-८० या सूत्रावरील भाष्यात अशी शंका केली आहे की, त्या सूत्रात वकाराचे जागी अकारादेश होण्याचे विधान का केले आहे? वकाराचा लोप व्हावा एवढेंच विधान केले असते तरी काम भागले असते, व त्या शंकेवर भाष्यकारांनी असे उत्तर दिले आहे की, वकाराचे जागी अकारादेश होण्याचे जें विधान केले आहे ते अशाकरिता की, त्या अकाराचा ('उ' हा आर्धधातुक प्रत्यय पुढें असल्यामुळे 'अतो लोपः' सू. २३०८ या सूत्रानें) लोप झाला असता, तो लुप्त अकार ('अचः परस्मिन्पूर्वविधौ' सू. ५० या सूत्रान्वयें) स्थानिवद्भावानें विद्यमान आहे अशी बुद्धि केल्यानें गुण न व्हावा. पाणिनीने वकाराचा लोप होण्याचे जरी विधान केले असते तरी 'न धातुलोपे आर्धधातुके' सू. २६५६ या सूत्रान्वयें गुण झालाच नसता तरी शंकाकारानें शंका केली असता, त्या शंकेवर भाष्यकारांनी असे उत्तर दिले आहे की, 'न धातुलोपे' या सूत्राचे प्रत्याख्यान केले असल्यामुळें त्या प्रत्याख्यानपक्षात गुण होण्याची प्राप्ति आहे. या भाष्यावरून हे स्पष्ट होते की, सूत्रकाराच्या मतापेक्षा सूत्रप्रत्याख्यान करणारे भाष्यकार यांचे मत बलवत्तर ठरते

प्रत्ययाबरोबर झालेला वधादेश कायम राहण्याची आपत्ति येते आणि तो वधादेश कायम राहिल्यास, 'कंसं घातयति' असा इष्ट प्रयोग सिद्ध होऊं शकत नाहीं. तसा प्रयोग सिद्ध व्हावा म्हणजे 'हन् णिच्' अशी स्थिति झाल्यानें 'हनस्तः' सू. २५७४ या सूत्रानें 'हन्' यांतील नकाराचे जागीं तकार होऊन व 'हो हन्तेः' सू. ३५८ या सूत्रानें हकाराचे जागीं कुत्वानें घकार होऊन आणि 'अत उपधायाः' सू. २२८२ या सूत्रानें उपधादीर्घ होऊन 'घातयति' हा इष्ट प्रयोग सिद्ध व्हावा, याकरितांच वरील वार्तिकांत 'प्रकृतिप्रत्यापत्तिः' या पदाचें वार्तिककारानें मुद्दाम ग्रहण केलें आहे व अशा रीतीनें वधादेश नाहींसा होऊन 'हन्' ही पूर्व प्रकृति पुन्हा प्रादुर्भूत व्हावी या-करितां केलेलें त्या पदाचें ग्रहण चरितार्थ ठरत असल्यामुळें, तें पद 'अकृतव्यूहाः' या परिभाषेच्या अनित्यत्वाचें ज्ञापक मानतां येत नाहीं. सारांश दीक्षितांनीं मनोरमेंत 'अकृतव्यूहाः' या परिभाषेच्या अनित्यत्वाचीं जीं दोन ज्ञापकें दिलीं आहेत तीं, वर सांगितल्याप्रमाणें, त्या परिभाषेच्या अनित्यत्वाचीं ज्ञापकें मानतां येऊं शकत नसल्यामुळें, जर ती परिभाषा मानणेंच असेल तर तिच्या अनित्यत्वाचें वेगळें ज्ञापक देणें आवश्यक आहे व तें ज्ञापक कोणतें मानावें हें शब्दरत्न-कार पुढील पंक्तींत सांगतात.) म्हणून 'पुष्ययोगं जानाति' या अर्थामध्यें 'पुष्येण योजयति' हा प्रयोग सिद्ध होण्याकरितां 'पुष्य-योगे ज्ञि' या वार्तिकांत भाष्यकारांनीं 'प्रकृतिप्रत्यापत्तिः' या पदाची जी अनुवृत्ति केली आहे ती अनुवृत्ति 'अकृतव्यूहाः' या परिभाषेच्य अनित्यत्वाची ज्ञापक मानतां येते. या उदाहरणांत षित् प्रत्यय पुढं असल्यानें 'चजोः कु घिण्ण्यतोः' सू. २८६३ या सूत्रानें कुत्वाची प्राप्ति आहे. ('हेतुमति च' सू. ३-१-२६ या सूत्रावरील भाष्यांत भाष्य कारांनीं 'नक्षत्रयोगे ज्ञि' हें वार्तिक पठित करून त्या वार्तिकांत पूर्व वार्तिकांतून 'कुल्लुक्, प्रकृतिप्रत्यापत्तिः, प्रकृतिवच्च कारकम्' हीं पदं अनुवृत्त केलीं आहेत व या वार्तिकाचीं 'पुष्ययोगं जानाति = पुष्येण योजयति, मघाभिर्योजयति' हीं उदाहरणें दिलीं आहेत. त्या भाष्यांत

भाष्यकार म्हणतात ,' नक्षत्रयोगे ज्ञि । नक्षत्रयोगे जानात्यर्थे कृदन्ताण्णिज्वक्तव्यः । कृल्लुक् प्रकृतिप्रत्यापत्तिः प्रकृतिवच्च कारक भवतीति वक्तव्यम् । पुष्ययोगं जानाति पुष्येण योजयति । मघाभिर्योजयतीति ।.' 'पुष्येण योगः पुष्ययोगः' या उदाहरणांत 'युज्' धातूहून 'घञ्' हा कृत् प्रत्यय केल्यानें 'योग' हा शब्द सिद्ध होत असल्यामुळें, 'पुष्ययोग' हा शब्द कृदन्त ठरतो. या शब्दाहून 'जानाति' या अर्थामध्यें 'णिच्' प्रत्यय 'नक्षत्रयोगे ज्ञि' या वार्तिकान्वयें केला असतां, 'युज्' धातूहून झालेल्या 'घञ्' या कृत् प्रत्ययाचा लुक् होतो व ज्या 'युज्' धातूहून तो 'घञ्' प्रत्यय झाला आहे ती 'युज्' प्रकृति पुन्हा आविर्भूत होते. या उदाहरणात 'न लुमताङ्गस्य' हा निषेध लागू पडतो; कारण ज्या 'घञ्' प्रत्ययाचा लुक् झाला आहे तो विद्यमान आहे असे मानल्यास, 'चजोः' सू. २८६३ या सूत्रानें 'युज्' यातील जकारास कुत्व पावते व ते कुत्वकार्य 'घञ्' या घित् प्रत्ययाच्या निमित्तानें होणारे कार्य असून 'घञ्'च्या पूर्वी असणाऱ्या प्रकृतीला होणारे ते कार्य असल्यामुळें, 'न लुमताङ्गस्य' या निषेधान्वयें येथें प्रत्ययलक्षण मानता येत नाही, म्हणजे ज्या 'घञ्' प्रत्ययाचा लुक् झाला आहे तो 'घञ्' प्रत्यय प्रत्ययलक्षणानें विद्यमान आहे असें मानता येत नाही. 'अकृतव्यूहाः' ही परिभाषा नित्य मानल्यास, ज्या 'घञ्' प्रत्ययाच्या निमित्तामुळें 'युज्' यातील जकाराचे कुत्व होणे प्राप्त आहे त्या 'घञ्' प्रत्ययाचा वरील वार्तिकान्वयें लुक् होऊन अवश्य नाश होणारा असल्यामुळें, 'युज्' धातूला घञ्प्रत्ययनिमित्तक कुत्व इत्यादि कार्यें त्या परिभाषान्वयें होणारच नाहीत व 'युज्' अधीन कुत्वकार्यरहित प्रकृति विद्यमान राहीलच म्हणून भाष्यकारांना 'नक्षत्रयोगे ज्ञि' या वार्तिकांत पूर्व वार्तिकातून 'प्रकृतिप्रत्यापत्तिः' या पदाची अनुवृत्ति करण्याची वास्तविक कांहीच गरज नव्हती. पण त्यांनी तशी अनुवृत्ति मुद्दाम केली असल्यामुळें हें ज्ञापित होते की, 'अकृतव्यूहाः' ही परिभाषा अनित्य आहे व तिच्या

म्हणून सूत्रप्रत्याख्यान करणारे भाष्यकार यांना ज्या प्रकारचीं रूपें संमत आहेत त्या प्रकारचीं रूपें पाणिनीय सूत्रान्वयें देखील कशीं तरी सिद्ध होणें शक्य असल्यास, तशींच रूपें सिद्ध करावीं व विपरीत रूपांची, म्हणजे भाष्यविरुद्ध रूपांची, सिद्धि करूं नये. तसें करणें शक्य नसल्यास, पाणिनीय सूत्र अप्रमाणच आहे व भाष्यकारांनीं त्या सूत्राचें केलेलें प्रत्याख्यान सूत्रकारास—पाणिनीस—देखील संमत आहे असें मानलें पाहिजे असें त्या भाष्यांत ध्वनित केलें आहे. ('धिन्विकृण्व्योर च' या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार म्हणतात:— 'क्वायमकारः श्रूयते ? । न क्वचिच्छ्रूयते । लोपोऽस्य भवत्यतो लोप आर्द्धधातुक इति । यदि न क्वचिच्छ्रूयते किमर्थमत्वमुच्यते, न लोप एवोच्येत । नैवं शक्यं, लोपे हि सति गुणः प्रसज्येत । अत्वे पुनः सति अकारलोपस्य स्थानिवद्भावाद्गुणो न भवति । ननु च लोपेऽपि सति न धातुलोप आर्द्धधातुक इति प्रतिषेधो भविष्यति । आर्द्धधातुकनिमित्ते लोपे स प्रतिषेधो, न चैष आर्द्धधातुकनिमित्तो लोपः । अपि च प्रत्याख्यायते स योगः । तस्मिन्प्रत्याख्याते गुणः स्यादेव । तस्मादत्वं वक्तव्यम् ॥' या भाष्याचा भावार्थ हा आहे कीं, 'धिन्विकृण्व्योर च' या सूत्रानें 'धिन्व्, कृण्व्' या धातूंतील अन्त्य वकाराचे जागीं जो अकारादेश होणें सांगितलें आहे त्याचें कोठेंहि श्रवण होत नाहीं; कारण त्या अकारापुढें 'उ' हा आर्द्धधातुक प्रत्यय येत असल्यामुळें, 'अतो लोपः' सू. २३०८ या सूत्रानें त्या अकाराचा लोप होतो. म्हणून ज्याअर्थी त्या अकाराचें कोठेंहि श्रवण होत नाहीं त्याअर्थी तसा आदेश होण्याचें विधान न करितां पाणिनीनें वकारलोप होण्याचें विधान करावयास पाहिजे होतें. पण तसें विधान करणें शक्य नव्हतें. वकारलोप होण्याचें विधान केलें असतें तर, 'धिवि, कृवि' या इदित् धातूंना 'इदितो नुम्धातोः' सू. २२६२ या सूत्रानें नुमागम होऊन 'धिन्व्, कृण्व्' अशी स्थिति झाल्यावर वकारलोप केल्यानें 'धिन् उ ति, कृण् उ ति' अशा स्थितींत 'उ' हा आर्द्धधातुकप्रत्यय पुढें असल्यामुळें, 'पुगन्तलघूपध-

स्य च' सू. २१८९ या सूत्रानें उपधेंतील 'इ, ऋ' याचा गुण होण्याची आपत्ति येते. पण वकाराचे जागीं अकारादेश केला असता, जरी त्या अकाराचा 'अतो लोप.' या सूत्रानें लोप होतो तरी, त्या अकारापूर्वी असलेल्या 'इक्' चा गुण करतेवेळी तो अकार 'अच. परस्मिन् पूर्वविधौ' सू. ५० या सूत्रान्वयें विद्यमान आहे असे स्थानिवद्भावानें मानता येते. त्यामुळें 'उ' प्रत्यय व 'इक्' या दोहोमध्यें अकाराचे व्यवधान होत असल्यामुळें व अशा रीतीनें 'इक' उपधाभूत ठरत नसल्यामुळें, त्या 'इक्'चा गुण होण्याची आपत्ति टळते. पण वकारलोप होण्याचे विधान केले असते तरी, तो लोप 'उ' या आर्धधातुक प्रत्ययाच्या निमित्तामुळें होणारा असल्यामुळें व अशा रीतीनें तो आर्धधातुक प्रत्यय धात्वयव जो वकार त्याचा लोप करणारा प्रत्यय आहे असे मानता यऊ शकत असल्यामुळें, 'न धातुलोपे आर्द्धधातुके' सू. २६५६ या निषेधक सूत्रान्वयें उपधागुण होऊ शकलाच नसता अशी कोणी शंका केल्यास, त्या शंकेवर भाष्यकार असें उत्तर देतात की, 'न धातुलोपे' हा निषेध अशाच ठिकाणी लागू पडतो की, जेथें आर्ध-धातुक प्रत्ययाच्या निमित्तामुळें धात्वयवाचा लोप होतो पण प्रकृत स्थली वकारलोपाचे विधान केल्यास तो वकारलोप आर्धधातुकप्रत्यय-निमित्तक न ठरता सन्नियोगशिष्ट ठरेल, म्हणजे वकारलोप व 'उ' प्रत्यय हे दोन्हीं एकेचवेळी होण्याचें सांगितलें असून त्या दोहोमध्यें निमित्तनिमित्तिभाव नाही अशा प्रकारचें ते विधान ठरेल, व त्यामुळें 'न धातुलोपे' हा निषेध लागू पडणार नाही आणि उपधेंतील 'इक्' चा गुण होण्याची आपत्ति कायम राहीलच. दुसरें असें की, वकारलोप आर्धधातुकप्रत्ययनिमित्तक मानला तरी, 'न धातुलोपे' या सूत्राचे प्रत्याख्यान केले असल्यामुळें, त्या प्रत्याख्यात सूत्राचें सहाय घेऊन गुण होण्याची आपत्ति टाळता येऊ शकत नाहीं. म्हणून पाणिनीनें वकारलोपाचें विधान न करिता वकाराचे जागीं अकारा-देश होण्याचें जें विधान केले आहे तेच योग्य ठरतें असा भाष्य-

म्हणून सूत्रप्रत्याख्यान करणारे भाष्यकार यांना ज्या प्रकारचीं रूपें संमत आहेत त्या प्रकारचीं रूपें पाणिनीय सूत्रान्वयें देखील कशी तरी सिद्ध होणें शक्य असल्यास, तशींच रूपें सिद्ध करावीं व विपरीत रूपांची, म्हणजे भाष्यविरुद्ध रूपांची, सिद्धि करूं नये. तसें करणें शक्य नसल्यास, पाणिनीय सूत्र अप्रमाणच आहे व भाष्यकारांनीं त्या सूत्राचें केलेलें प्रत्याख्यान सूत्रकारास--पाणिनीस--देखील संमत आहे असें मानलें पाहिजे असें त्या भाष्यांत ध्वनित केलें आहे. ('धिन्विकृण्व्योर च' या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार म्हणतात:--'क्वायमकारः श्रूयते ? । न क्वचिच्छ्रूयते । लोपोऽस्य भवत्यतो लोप आर्द्धधातुक इति । यदि न क्वचिच्छ्रूयते किमर्थमत्वमुच्यते, न लोप एवोच्येत । नैवं शक्यं, लोपे हि सति गुणः प्रसज्येत । अत्वे पुनः सति अकारलोपस्य स्थानिवद्भावाद्गुणो न भवति । ननु च लोपेऽपि सति न धातुलोप आर्द्धधातुक इति प्रतिषेधो भविष्यति । आर्द्धधातुकनिमित्ते लोपे स प्रतिषेधो, न चैष आर्द्धधातुकनिमित्तो लोपः । अपि च प्रत्याख्यायते स योगः । तस्मिन्प्रत्याख्याते गुणः स्यादेव । तस्मादत्वं वक्तव्यम् ॥' या भाष्याचा भावार्थ हा आहे कीं, 'धिन्विकृण्व्योर च' या सूत्रानें 'धिन्व्, कृण्व्' या धातूंतील अन्त्य वकाराचे जागीं जो अकारादेश होणें सांगितलें आहे त्याचें कोठेंहि श्रवण होत नाहीं; कारण त्या अकारापुढें 'उ' हा आर्द्धधातुक प्रत्यय येत असल्यामुळें, 'अतो लोपः' सू. २३०८ या सूत्रानें त्या अकाराचा लोप होतो. म्हणून ज्याअर्थी त्या अकाराचें कोठेंहि श्रवण होत नाहीं त्याअर्थी तसा आदेश होण्याचें विधान न करितां पाणिनीनें वकारलोप होण्याचें विधान करावयास पाहिजे होतें. पण तसें विधान करणें शक्य नव्हतें. वकारलोप होण्याचें विधान केलें असतें तर, 'धिवि, कृवि' या इदित् धातूंना 'इदितो नुम्धातोः' सू. २२६२ या सूत्रानें नुमागम होऊन 'धिन्व्, कृण्व्' अशी स्थिति झाल्यावर वकारलोप केल्यानें 'धिन् उ ति, कृण् उ ति' अशा स्थितींत 'उ' हा आर्द्धधातुकप्रत्यय पुढें असल्यामुळें, 'पुगन्तलघूपध-

कार किंवा भाष्यकार यानी एखाद्या पाणिनीय सूत्राचे किंवा त्यातील अंशाचे खण्डन–प्रत्याख्यान–केले असल्यास तेवढया अंशापुरते ते सूत्र अप्रमाण आहे असेच मानणे उचित आहे.

मनोरमा–यत्तु प्राचोक्तम्–बहुव्रीहौ सर्वदेः सर्वनामता न स्यात् । प्रियसर्वाय । सूत्रकारमते बहुव्रीहौ न सर्वनामता । भाष्यकारमते गौणत्वमात्रे । 'त्वत्कपितृको' 'मत्कपितृक' इत्यत्र समासावयवयोर्युष्मदस्मदोः सर्वनामत्वादनङ्गकार्यत्वेनाकच् स्यात् स मा भूत्, कप्रत्यय एव स्यादित्येतदर्थमिदं सूत्रमिति न्यासकृन्मतमिति । अत्रेदं वक्तव्यम् । किं बहुव्रीहौ संज्ञा नेति विवक्षितम्? उत तदवयवानां सर्वादीनामिति । नाद्यः । समासावयवयोर्युष्मदस्मदोरित्युत्तरग्रन्थविरोधात्, समुदाये प्राप्तिविरहाच्च । न च तदन्तविधिना प्राप्तिः, बहुव्रीह्यवयवानां उपसर्जनतया सर्वादिबहिर्भावेन तदन्ते प्राप्तेर्दूरापास्तत्वात् । अत एव न द्वितीयोऽपि । न चोपसर्जनानां पाठात् पर्युदासो वार्तिककृतोक्तो न तु सूत्रारूढ इति वाच्यम् । अन्वर्थसंज्ञाबलेन सूत्राक्षरैरेव तल्लाभात् । एतेन सूत्रकारमते बहुव्रीहौ न सर्वनामतेत्यपि परास्तम् । बहुव्रीहावेवेति तस्यार्थः । भाष्यकारमते इत्याद्यपि न । विशेषोपादानेन हि सूत्रकारवार्तिककारयोर्मतमन्यादृशमिति प्रतीयते । देवदत्तो वामेनाक्ष्णा पश्यतीत्युक्ते दक्षिणेन न पश्यतीतिवत् । तच्च न, सूत्रवार्तिकमतेऽपि गौणपर्युदासस्येष्टत्वात् । यत्तु त्वत्कपितृक इत्यादि तदित्थं प्राचा व्याख्यातम् । त्वं पिता यस्य, अहं पिता यस्येति विगृह्य बहुव्रीहिसमासे कृते समासावयवयोः समासान्त पातिनोर्युष्मदस्मदोः सर्वार्थवाचकत्वेन सर्वनामसंज्ञकत्वादज्ञाताद्यर्थविवक्षायां "अव्ययसर्वनाम्नाम्" इत्यकच् प्रसज्येत । तस्य त्वंप्रभृतीनामिवाङ्गाधिकारविहितत्वाभावेनाङ्गसंज्ञानपेक्षत्वात् । ततश्च त्वकत्पितृक इत्याद्यनिष्टं प्रसज्येतेति । न्यासकृताऽपि अन्वर्थसंज्ञाबलादेव संज्ञानिरासे कृतेऽकज् न भविष्यतीत्याशङ्क्य समुदायो हि विशेषे वर्तते पूर्वपदन्तु सर्वार्थतया अनपेतमेवेत्युक्तम् । तदेतन्सर्वं प्रामादिकमेव । तथा हि महत्स्वार्थायां

कारांच्या म्हणण्याचा आशय आहे. या वरील भाष्यांत ' अपि च प्रत्याख्यायते स योगः ' असें जें भाष्यकारांनीं म्हटलें आहे त्यावर उद्योतकार म्हणतात – ' अनेन सूत्रमतापेक्षया प्रत्याख्यानवादिमतं प्रबलमिति ध्वनितम् । एतन्मूलकमेव पठ्यते यथोत्तरं मुनीनां प्रामाण्यमिति ।' आणि हेंच शब्दरत्नांत सांगितलें आहे. सारांश भाष्यकारांनीं केलेलें सूत्रप्रत्याख्यान योग्य मानून व प्रत्याख्यात सूत्राकडे दुर्लक्ष करून जीं रूपें होणें भाष्यकारांना संमत आहे तीं रूपें प्रत्याख्यात सूत्रानें सिद्ध होऊं शकत असल्यास तशीं रूपें सिद्ध करावीं. प्रत्याख्यात सूत्रान्वयें सिद्ध होणारीं रूपें भाष्यकारांच्या मताविरुद्ध असल्यास तशीं रूपें सिद्ध न करितां, भाष्यकारांना संमत असलेलीं रूपेंच स्वीकारलीं पाहिजेत. म्हणून ' न बहुव्रीहौ ' या सूत्राचें भाष्यकारांनीं प्रत्याख्यान केलें असल्यामुळें, जरी त्या सूत्रान्वयें ' त्वकत्पितृकः, मकत्पितृकः ' इत्यादि रूपें सिद्ध होऊं शकत नाहींत तरी तशींच रूपें होणें भाष्यकारांना इष्ट वाटत असल्यामुळें, ' यथोत्तरं मुनीनां प्रामाण्यम् ' या न्यायान्वयें तींच रूपें शुद्ध मानलीं पाहिजेत हें वरील भाष्यावरून ध्वनित होतें असें शब्दरत्नकारांचें म्हणणें आहे. यावरून हें स्पष्ट होतें कीं, ' उदिते जुहोति ', ' अनुदिते जुहोति ' इत्यादि श्रुतींत जेथें परस्पर विरोध असतो तेथें जसा विकल्प मानला जातो तसा विकल्प व्याकरणशास्त्रांत, मुनित्रयांत विरोध असल्यास, मानतां येऊं शकत नाहीं; कारण तसें मानल्यास, वैकल्पिक अनिष्ट रूपें सिद्ध होण्याचा प्रसङ्ग येईल. वार्तिककाराचें मत सूत्रकाराच्या मताविरुद्ध असल्यास, वार्तिकान्वयें जीं रूपें सिद्ध होतात तींच रूपें इष्ट मानलीं पाहिजेत. तसेंच भाष्यकारांचें मत सूत्रकाराच्या किंवा वार्तिककाराच्या मताविरुद्ध असल्यास, भाष्यकारांना जीं रूपें सिद्ध होणें इष्ट आहे तींच शुद्ध रूपें मानलीं पाहिजेत असा ' यथोत्तरं मुनीनां प्रामाण्यम् ' या न्यायाचा भावार्थ आहे.) सूत्रकारानें– पाणिनीनें–खण्डन केलेलीं प्राचीन ऋषींचीं–वैयाकरणांचीं–वचनें, म्हणजे सूत्रें, ज्याप्रमाणें अप्रमाण मानलीं जातात त्याचप्रमाणें वार्तिक-

कार किंवा भाष्यकार यानी एखाद्या पाणिनीय सूत्राचे किंवा त्यातील अंशाचे खण्डन–प्रत्याख्यान–केले असल्यास तेवढ्या अंशापुरते ते सूत्र अप्रमाण आहे असेच मानणे उचित आहे.

मनोरमा– यत्तु प्राचोक्तम्–बहुव्रीहौ सर्वदेः सर्वनामता न स्यात् । प्रियसर्वाय । सूत्रकारमते बहुव्रीहौ न सर्वनामता । भाष्यकारमते गौणत्वमात्रे । 'त्वत्कपितृको' 'मत्कपितृक' इत्यत्र समासावयवयोर्युष्मदस्मदोः सर्वनामत्वादनङ्कार्यत्वेनाकच् स्यात् स मा भूत, कप्रत्यय एव स्यादित्येतदर्थमिदं सूत्रमिति न्यासकृन्मतमिति । अत्रेद वक्तव्यम् । किं बहुव्रीहौ संज्ञा नेति विवक्षितम्? उत तदवयवानां सर्वादीनामिति । नाद्यः । समासावयवयोर्युष्मदस्मदोरित्युत्तरग्रन्थविरोधात्, समुदाये प्राप्तिविरहाच्च । न च तदन्तविधिना प्राप्तिः, बहुव्रीह्यवयवानां उपसर्जनतया सर्वादित्वहिर्भावेन तदन्ते प्राप्तेर्दूरापास्तत्वात् । अत एव न द्वितीयोऽपि । न चोपसर्जनानां पाठात् पर्युदासो वार्तिककृतोक्तो न तु सूत्रारूढ इति वाच्यम् । अन्वर्थसंज्ञाबलेन सूत्राक्षरैरेव तल्लाभात् । एतेन सूत्रकारमते बहुव्रीहौ न सर्वनामतेत्यपि परास्तम् । बहुव्रीहावेवेति तस्यार्थः । भाष्यकारमते इत्याद्यपि न । विशेषोपादानेन हि सूत्रकारवार्तिककारयोर्मतमन्यादृशमिति प्रतीयते । देवदत्तो वामेनाक्ष्णा पश्यतीत्युक्ते दक्षिणेन न पश्यतीतिवत् । तच्च न, सूत्रवार्त्तिकमतेऽपि गौणपर्युदासस्येष्टत्वात् । यत्तु त्वत्कपितृक इत्यादि तदित्थं प्राचा व्याख्यातम् । त्वं पिता यस्य, अहं पिता यस्येति विगृह्य बहुव्रीहिसमासे कृते समासावयवयोः समासान्त पातिनोर्युष्मदस्मदोः सर्वार्थवाचकत्वेन सर्वनामसंज्ञकत्वादज्ञाताद्यर्थविवक्षायां "अव्ययसर्वनाम्नाम्" इत्यकच् प्रसज्येत । तस्य स्मैप्रभृतीनामिवाङ्गाधिकारविहितत्वाभावेनाङ्गसंज्ञानपेक्षत्वात् । ततश्च त्वकत्पितृक इत्याद्यनिष्टं प्रसज्येतेति । न्यासकृताऽपि अन्वर्थसंज्ञाबलादेव संज्ञानिरासे कृतेऽकज् न भविष्यतीत्याशङ्क्य समुदायो हि विशेषे वर्तते पूर्वपदन्तु सर्वार्थतायां अनपेतमेवेत्युक्तम् । तदेनत्सर्व प्रामादिकमेव । तथा हि त्वत्सर्वार्यायां

वृत्तौ समासावयवयोरर्थ एव नास्ति । अजहत्स्वार्थायामपि स्वार्थविशिष्टान्यपदार्थवृत्तित्वेनोपसर्जनत्वं स्पष्टमेव । एवं च समासान्तःपातिनोर्युष्मदस्मदोः सर्वार्थवाचकत्वेनेत्यादिग्रन्थः, समुदायो ह्रीत्यादिन्यासग्रन्थश्च पक्षद्वयेऽपि व्याहतः । किं चैवं अतिसर्वायेत्यत्र स्मायादेशो दुर्वारः । अङ्गाधिकारे तदन्तग्रहणात् । त्वदुक्तरीत्या सर्वशब्दस्य सर्वार्थतानपायात् । न हि पूर्वपदे सर्वार्थता उत्तरपदे तु नेति युक्तिमत् । अपि चैवं गौणत्वे सर्वादीनां सर्वार्थवाचकत्वं नास्तीति स्वोक्त्या सह विरोधः स्यादिति यत्किंचिदेतत् ।

'न बहुव्रीहौ' सू. २२२ या सूत्रावर टीका करितांना प्रक्रियाकौमुदीकारांनीं असें म्हटलें आहे:– "सर्वादिगणांत पठित असलेले शब्द बहुव्रीहिसमासांत असल्यास, म्हणजे बहुव्रीहिसमासाचे अवयव असल्यास, त्यांना सर्वनामसंज्ञा होत नाहीं. उदाहरणार्थ 'प्रियसर्वाय.' सूत्रकार पाणिनीच्या मतें बहुव्रीहिसमासांतील सर्वनामरूप अवयवाला सर्वनामसंज्ञा होत नाहीं. परंतु भाष्यकारांच्या मतें सर्वादिगणांत पठित असलेला शब्द गुणीभूत किंवा उपसर्जन झाला असल्यास, (मग तो बहुव्रीहिसमासांत उपसर्जनीभूत झालेला असो किंवा इतरत्र तसा झाला असो) त्याला सर्वनामसंज्ञा होत नाहीं. 'त्वकत्पितृकः, मकत्पितृकः' या स्थलीं बहुव्रीहिसमासांतील अवयव 'युष्मद्, अस्मद्' हे सर्वनामसंज्ञक असल्यामुळें व त्यांहून 'अकच्' प्रत्यय होणें हें आङ्गकार्य नसल्यामुळें, त्यांहून 'अकच्' प्रत्यय होण्याची आपत्ति येते. त्यांहून 'अकच्' प्रत्यय न होतां 'क' प्रत्ययच व्हावा याकरितां 'न बहुव्रीहौ' हें सूत्र पाणिनीनें केलें आहे असें न्यासकाराचें मत आहे." ('अव्ययसर्वनाम्नामकच्' सू. २०२६ हें सूत्र अङ्गाधिकारांत पठित नसल्यामुळें त्या सूत्रांत 'अङ्गस्य' या पदाची अनुवृत्ति होत नाहीं. त्यामुळें 'सर्वनाम्नः स्मै' इत्यादि अङ्गाधिकारांत पठित असलेल्या सूत्रांनीं कार्यें होण्याकरितां जशी अङ्गसंज्ञा प्राप्त होण्याची व त्याकरितां प्रत्यय पुढें असण्याची गरज असते तशा प्रकारची 'अकच्' प्रत्यय होण्याकरितां गरज नसल्यामुळें,

अङ्गसंज्ञानिरपेक्ष 'अकच्' प्रत्यय होणे हे कार्य, अङ्गसंज्ञासापेक्ष कार्याच्या मानानें, अन्तरङ्ग ठरते व त्यामुळें वरील उदाहरणात 'युष्मद् अस्मद्' शब्दाना 'अकच्' प्रत्यय होण्याची जी आपत्ति येते ती टाळण्याकरिता 'न बहुव्रीहौ' हें सूत्र पाणिनीनें केले आहे असे न्यासकाराचे म्हणणे आहे असे वरील प्रक्रियाकौमुदीचा भावार्थ सागताना प्रसादटीकेत म्हटले आहे. ती टीका दीक्षितानीं स्वत च पुढें मनोरमेंत दिली असल्यामुळें तिचा उतारा येथें देण्याची आवश्यकता नाही. पण न्यासकाराच्या ग्रन्थाचा उतारा जो प्रसादकारानी आपल्या टीकेत दिला आहे तो येथें देणे इष्ट वाटते व त्यावरून न्यासकाराचे काय म्हणणे आहे हे नीट ध्यानात येईल. 'तथा च काशिकाविवरणपञ्जिकायामुक्तम्' असे सागून प्रसादकार न्यासग्रन्थातील उतारा देतात–'त्वं पिता अस्य, अहं पिता अस्येति विगृह्य बहुव्रीहौ कृते अज्ञाताद्यर्थविवक्षायाम्, असति प्रतिषेधे, अव्ययसर्वनाम्नामकच् प्राक्टे: इत्यकच् प्रसज्येत । ततश्च त्वकत्पितृको मकत्पितृक इत्यनिष्टं स्यात् । तस्मादकच् मा भूदिति प्रतिषेध आरभ्यते । तेन प्रागिवात्कः इति क एव भवति । तत्र परतः प्रत्ययोत्तरपदयोश्चेति मपर्यन्तयोर्युष्मदस्मदोस्त्वमादेशयोः नद्यृतश्च इति समासान्ते कपि च त्वत्कपितृको मत्कपितृक इति सिध्यति । ननु चान्वर्थसंज्ञाकरणादेवात्र संज्ञानिरासे कृते अकच् न भविष्यति । न ह्यत्र सर्वार्थता सम्भवति । विशेषविषयत्वात् । नैतदस्ति । स समुदायो हि विशेषे वर्तते । पूर्वपद तु सर्वार्थताया अनपेतमेव ।' या उतान्यात न्यासकारानें जें म्हटले आहे त्याची चर्चा पुढें मनोरमेंत करण्यात येणार आहेच.) वर जें प्रक्रियाकौमुदीकारांनी म्हटले आहे त्या सबधानें असा प्रश्न करिता येतो की, वरील म्हणण्याचा असा आशय आहे काय की (१) बहुव्रीहिसमास केला असता समुदायाला सर्वनामसंज्ञा होत नाहीं, किंवा (२) त्या समासांतील सर्वनामरूप 'सर्वादि' अवयवांना सर्वनामसंज्ञा होत नाही? प्रथम पक्ष स्वीकारतां येत नाहीं; कारण तो पक्ष, म्हणजे समुदायाला सर्वनामसंज्ञा होत

नाहीं हा पक्ष, स्वीकारल्यास, 'समासावयवयोर्युगपदसमदो:' असें जें प्रक्रियाकौमुदीकारांनीं पुढें म्हटलें आहे त्या उत्तरग्रन्थाशीं विरोध येतो व दुसरें असें कीं, समुदायाला सर्वनामसंज्ञा होण्याची प्राप्तीच नाहीं. (समुदायाला, म्हणजे सर्वादिशब्दान्त बहुव्रीहिसामासिक-शब्दाला, सर्वनामसंज्ञा होत नाहीं असा जर 'न बहुव्रीहौ' या सूत्राचा अर्थ मानला तर, बहुव्रीहिसमासांतील सर्वनामरूप अवयवाला सर्वनामसंज्ञा होऊं नये व त्या अवयवाहून 'अकच्' प्रत्यय होऊं नये याकरितां 'न बहुव्रीहौ' हें सूत्र केलें आहे असें जें प्रक्रिया-कौमुदीकारांनीं पुढें म्हटलें आहे त्याशीं विरोध येतो; कारण त्या पुढील म्हणण्याचा असा अर्थ होतो कीं, बहुव्रीहिसमासांतील सर्व-नामरूप अवयवालाच प्रकृत सूत्रानें सर्वनामसंज्ञेचा निषेध केला आहे. सारांश तो उत्तर ग्रन्थ अवयवनिषेधपरक असल्यामुळें, समुदायाला सर्वनामसंज्ञेचा निषेध होतो असा प्रकृत सूत्राचा अर्थ करणें त्या म्हणण्याशीं विरुद्ध ठरतें. दुसरें असें कीं, 'प्राप्तस्यैव निषेध:' हा न्याय असल्यामुळें व सर्वनामान्त बहुव्रीहिसमासरूप समुदायाला सर्वनामसंज्ञा होण्याची प्राप्तीच नसल्यामुळें, समुदायाला सर्वनामसंज्ञेचा निषेध केला आहे असा प्रकृत सूत्राचा अर्थ करणें अयोग्य ठरतें.) तदन्तविधीनें सर्वनामान्त बहुव्रीहिसमासरूप समु-दायाला सर्वनामसंज्ञेची प्राप्ति आहे (व त्या प्राप्त होणाऱ्या संज्ञेचा निषेध करण्याकरितां 'न बहुव्रीहौ' हें प्रकृत सूत्र केलें आहे) असें म्हणणें असल्यास, तें म्हणणें देखील बरोबर नाहीं; कारण बहुव्रीहि-समासांत (अन्यपदार्थ नेहमी प्रधान असून त्या समासांतील) अवयव उपसर्जन होत असल्यामुळें, ('उपसर्जनीभूता न सर्वादय:' या वार्तिकान्वयें) बहुव्रीहिसमासांतील चरमावयव 'सर्वादि' शब्द हे सर्वादिगणांत अन्तर्भूत नसलेले शब्द आहेत असें मानावें लागतें व त्यामुळें समुदायाला तदन्तविधीनें सर्वनामसंज्ञेची प्राप्ति होणें हें दुरापास्त–असंभव–आहे. ('न बहुव्रीहौ' १–१–२९ या सूत्रावरील वार्तिक 'सर्वनामसंज्ञायां तदन्तविधेरभ्युपगमाद् बहुव्रीहेरपि सर्वा-

यन्तस्य सज्ञा स्यादिति प्रतिषेध आरम्यते' असे म्हटले आहे. 'प्रियसर्वाय' या बहुव्रीहिसमासातील 'सर्व' हा शब्द जरी समास-रूप समुदायाचा अन्तावयव आहे तरी तो उपसर्जन झाला असल्या-मुळें, 'उपसर्जनीभूता न सर्वादय.' या वार्तिकान्वये तो सर्वनाम-सज्ञक ठरत नाही व त्यामुळें सर्वाद्यन्त बहुव्रीहिसमास सर्वनामान्त आहे असे मुळीच मानता येत नाही आणि म्हणून तशा बहुव्रीहि-समासाला तदन्तविधीनें सर्वनामसज्ञेची प्राप्तीच होत नाही. म्हणून 'तदन्तविधिना प्राप्ति.' असे जें म्हटले आहे ते चूक ठरते असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे. बहुव्रीहिसमासातील सर्वनाम-रूप अवयव उपसर्जन होत असल्यामुळें आणि अशा रीतीनें त्या अवयवाला सर्वनामसज्ञा होऊच शकत नसल्यामुळें) द्वितीय पक्ष देखील बरोबर आहे असे मानता येत नाही, म्हणजे बहुव्रीहिसमा-सातील सर्वनामरूप अवयवाला सर्वनामसज्ञा न व्हावी याकरिता प्रकृत सूत्र केले आहे असा जो द्वितीय पक्ष तो देखील चूक ठरतो. उपसर्जन झालेल्या सर्वादि शब्दाचा सर्वादिगणातून वार्तिककारानें पर्युदास केला आहे तरी तसा पर्युदास पाणिनीय सूत्रातून निष्पन्न होत नाही असे कोणी म्हटल्यास, ते म्हणणे बरोबर नाही, कारण 'सर्वनाम' ही अन्वर्थक सज्ञा केली असल्यामुळें त्या सज्ञेच्या सामर्थ्यानेंच ('सर्वादीनि सर्वनामानि' या) सूत्राच्या अक्षरातूनच तो अर्थ, म्हणजे वार्तिककारानें केलेला अर्थ निष्पन्न होतो. (शका-काराचें असे म्हणणे आहे की, 'सज्ञोपसर्जनीभूता न सर्वादय:' असे जें वार्तिककारानें वार्तिक केले आहे त्या अर्थाचे पाणिनीनें अष्टा-ध्यायीत कोणतेहि सूत्र केले नसल्यामुळें, त्याला बहुव्रीहिसमासात उपसर्जन होणाऱ्या सर्वनामरूप अवयवाला सर्वनामसज्ञा न व्हावी याकरिता प्रकृत सूत्र मुद्दाम करावे लागले. या शकेवर दीक्षित असे उत्तर देतात की, ही शका बरोबर नाही, कारण 'सर्वादीनि सर्व-नामानि = सर्वेषा नामानि यानि सर्वादीनि तानि सर्वनामसज्ञकानि स्यु:' या सूत्रातूनच वार्तिककारानें केलेल्या वार्तिकाचा अर्थ निष्पन्न

होतो. 'सर्वादीनि सर्वनामानि' १-१-२७ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं 'सर्वादीनि सर्वनामानि' या सूत्राचा एकशेष करून उल्लेख केला आहे असें प्रथम सांगून पुढें भाष्यकार म्हणतातः— 'अथवा महतीयं संज्ञा क्रियते । संज्ञा च नाम यतो न लघीयः । कुत एतत् ? । लघ्वर्थं हि संज्ञाकारणम् । तत्र महत्याः संज्ञायाः करणे एतत् प्रयोजनमन्वर्थसंज्ञा यथा विज्ञायेत । सर्वादीनि सर्वनामसंज्ञानि भवन्ति, सर्वेषां नामानीति चातः सर्वनामानि । संज्ञोपसर्जने च विशेषेऽवतिष्ठेते ।' या भाष्याचा भावार्थ हा आहे कीं, येथें 'सर्वनाम' अशी मोठी संज्ञा केली आहे आणि संज्ञा जी केली जात असते ती अगदीं लहान असावी लागते; कारण पुष्कळसे अर्थ एका अगदीं लहानशा शब्दांत अन्तर्भूत व्हावे याकरितां संज्ञा केली जात असते. म्हणून येथें 'सर्वनाम' अशी मोठी संज्ञा करण्याचा हा उद्देश असला पाहिजे कीं, ती अन्वर्थक संज्ञा समजली जावी. याचा अर्थ असा कीं 'सर्वादि' शब्द सर्वनामसंज्ञक होतात आणि ज्या-अर्थी ते शब्द सर्वांचे वाचक आहेत त्याअर्थी त्यांना सर्वनामसंज्ञा प्राप्त होते. संज्ञार्थक व वृत्तिमध्यें उपसर्जनीभूत झालेले 'सर्व' इत्यादि शब्द सर्वांचे वाचक न होतां विशेष अर्थाचे दर्शक होत असल्यामुळें, त्यांना सर्वनामसंज्ञा होत नाहीं या भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं, वार्तिककारानें केलेल्या वार्तिकाचा अर्थ 'सर्वादीनि सर्वनामानि' या सूत्रांतूनच निघत असल्यामुळें, तें वार्तिक गतार्थ होतें, म्हणजे व्यर्थ ठरतें.) वरील व्याख्यानावरून हें स्पष्ट होतें कीं, 'सूत्रकारमते बहुव्रीहौ न सर्वनामता' असें जें प्रक्रियाकौमुदी-कारांनीं म्हटलें आहे तें देखील चूक ठरतें. (बहुव्रीहिसमासातील सर्वनामरूप अवयव अन्यपदार्थाचें विशेषण झाल्याकारणानें तो सर्वार्थाचा दर्शक होत नसून अन्यपदार्थरूप विशेषार्थाचा दर्शक होत असल्यामुळें, 'सर्वेषां यानि नामानि तानि सर्वनामानि' या अर्थान्वियेंच त्याला सूत्रकारमतें सर्वनामसंज्ञा होत नाहीं. म्हणून तशा अवयवाला सर्वनामसंज्ञा न व्हावी याकरितां 'न बहुव्रीहौ' हें

सूत्र केले आहे हें म्हणणे चूक ठरते हे अगदी उघड आहे.) 'बहुव्रीहौ न सर्वनामता' याचा अर्थ असा होतो की, बहुव्रीहि-समासांतच सर्वनामरूप अवयव सूत्रकाराच्या मते सर्वनामसंज्ञक होत नाही. (वास्तविक 'सर्वेषां नामानि सर्वनामानि' अशी जी अन्वर्थक संज्ञा केली आहे तीवरून हे स्पष्ट होते की, सर्वादि शब्द कोठेंहि उपसर्जन असला, मग तो बहुव्रीहि-समासात उपसर्जन झालेला असो किंवा इतरत्र, म्हणजे 'अतिसर्वाय' इत्यादि स्थली, उपसर्जन झालेला असो, तर त्याला सर्वनामसंज्ञा होत नाही.) 'भाष्यकारमते गौणत्वमात्रे' असें जें प्रक्रियाकौमुदी-कारांनी म्हटलें आहे ते देखील बरोबर नाही, कारण असें विशेषार्थ-वाचक वाक्य उच्चारलें असल्यामुळें त्यावरून असे दिसून येतें की, जणू काय सूत्रकार व वार्तिककार यांचे मत भाष्यकाराच्या मताहून भिन्न आहे 'देवदत्तो वामेनाक्ष्णा पश्यति' असे म्हटल्यानें ज्याप्रमाणे तो उजव्या डोळ्यानें पाहत नाही असा अर्थ निष्पन्न होतो त्याचप्रमाणे प्रकृत स्थली ('भाष्यकारमते गौणत्वमात्रे' असें विशेष उपादान केल्यामुळें) झाले आहे, म्हणजे सूत्रकार व वार्तिक-कार यांचे मत भाष्यकाराच्या मताहून भिन्न आहे असा अर्थ निष्पन्न होतो. पण वास्तविक तसें नाही, कारण सूत्रकार पाणिनी व वार्तिककार या दोघांच्याहि मते देखील गौण–उपसर्जनीभूत अस-लेल्या–सर्वादि शब्दांना सर्वनामसंज्ञा न होणेच इष्ट आहे (सारांश 'सर्वादीनि सर्वनामानि' हे जें पाणिनीनें अन्वर्थक संज्ञासूत्र केलें आहे त्याचाच अर्थ वार्तिककारानें वार्तिकरूपानें स्पष्ट केला आहे व त्यावरून हें स्पष्ट होतें की, *त्याच्यामतें देखील उपसर्जनीभूत सर्वादि* शब्दांना सर्वनामसंज्ञा होत नाही.) 'त्वत्कपितृको मत्कपितृक इत्यत्र .. सूत्रमिति न्यासकृन्मतमिति' असे जें प्रक्रियाकौमुदीकारांनी म्हटले आहे त्याचे प्रसादकारांनी असें व्याख्यान केले आहे–" 'त्वं पिता यस्य अहं पिता यस्य' असे विग्रहवाक्य करून बहुव्रीहिसमास केला असतां त्या समासात अन्तर्भूत असलेले व समासाचे अवयव असलेले 'युष्मद्,

अस्मद्' हे शब्द ('सर्वेषां नामानि' अशा प्रकारें) सर्वार्थवाचक असल्यामुळें, ते सर्वनामसंज्ञक ठरतात व 'अज्ञात' इत्यादि अर्थाची विवक्षा असल्यास त्या अर्थामध्यें त्या शब्दांहून 'अव्ययसर्वनाम्नामकच्' सू. २०२६ या सूत्रानें 'अकच्' प्रत्यय होण्याची प्राप्ति होते; कारण ज्याप्रमाणें 'स्मै' इत्यादि आदेश होणें अङ्गाधिकारांत सांगितलें आहे त्याप्रमाणें 'अकच्' प्रत्यय होणें अङ्गाधिकारांत सांगितलें नसल्यामुळें, 'अकच्' प्रत्यय होण्याकरितां अङ्गसंज्ञेची अपेक्षा नाहीं (व अशा रीतीनें 'अकच्' प्रत्यय होणें हें अन्तरङ्गकार्य ठरत असल्यामुळें, तो प्रत्यय प्रथम झाल्यानें) 'त्वकत्पितृकः, मकत्पितृकः' इत्यादि अनिष्ट रूपें होण्याची आपत्ति येते." न्यासकारानें देखील 'सर्वनाम' ही अन्वर्थक संज्ञा असल्यामुळें तिच्या सामर्थ्यानेंच वरील समासांत उपसर्जनीभूत झालेल्या 'युष्मद्, अस्मद्' शब्दांना ती संज्ञा होऊं शकत नाहीं व त्यामुळें त्या शब्दांहून 'अकच्' प्रत्यय होऊं शकत नाहीं अशी शंका उपस्थित करून त्या शंकेचें अशा रीतीनें निवारण केलें आहे कीं, समुदाय हा विशेष अर्थाचा वाचक होत असून, म्हणजे संपूर्ण बहुव्रीहिसामासिकशब्द अन्यपदार्थाचा बोधक होत असून, त्या समासांतील 'युष्मद्, अस्मद्' हीं पूर्व पदें सर्वार्थवाचकत्व राहत असल्यामुळें, त्यांची सर्वनामसंज्ञा नष्ट होऊं शकत नाहीं (व त्यामुळें त्या शब्दांहून जी 'अकच्' प्रत्यय होण्याची प्राप्ति आहे तिचें निवारण करण्याकरितां 'न बहुव्रीहौ' हें सूत्र पाणिनीनें मुद्दाम केलें आहे. तें सूत्र केलें असल्यामुळें बहुव्रीहिसमासांतील सर्वनामरूप अवयवाला सर्वनामसंज्ञेचा निषेध होऊन 'अकच्' प्रत्यय होत नाहीं.) पण प्रसादकारांचें व न्यासकारांचें वरील सर्व म्हणणें अगदीं चूक आहे. त्याचें कारण हें कीं, बहुव्रीहिसमासस्थळीं जहत्स्वार्थावृत्ति मानल्यास (समासांतील दोन्ही अवयव आपल्या अर्थाचा परित्याग करीत असल्यामुळें, त्या समासांतील) अवयव अर्थरहित ठरतात (त्यामुळें बहुव्रीहिसमासांतील सर्वनामरूप अवयव अर्थरहित

ठरत असल्यामुळे, तो सर्वार्थवाचक आहे असे म्हणता येणे *मुळीच शक्य नाही आणि त्यामुळें त्याला* सर्वनामसंज्ञा होऊ शकत नाही व त्याहून 'अकच्' प्रत्यय होण्याची प्राप्तीच होत नाही.) अजहत्स्वार्थावृत्ति मानल्यास देखील, बहुव्रीहिसमासातील प्रत्येक अवयव आपला अर्थ प्रधानरूप अन्यपदार्थात संक्रमित करून अन्यपदार्थाचा बोधक होत असल्यामुळें, त्या अवयवाचे ठिकाणी उपसर्जनत्व येते हे अगदी उघड आहे (व अशा रीतीनें देखील बहुव्रीहिसमासातील 'युष्मद्, अस्मद्' हे अवयव त्या पक्षात उपसर्जन होत असल्यामुळें, 'उपसर्जनीभूता न सर्वादय' या वार्तिकान्वयें त्याना सर्वनामसंज्ञेची प्राप्तीच होत नाही.) म्हणून जहत्स्वार्था व अजहत्स्वार्था या दोन पक्षापैकी कोणताहि पक्ष मानला तरी, 'समासान्त पातिनोर्युष्मदस्मदोः... ... इत्यकच् प्रसज्येत' असे जें प्रसादकारानी म्हटले आहे व तसेच 'समुदायोहि विशेषे वर्तते' इत्यादि जें न्यासकारानी म्हटले आहे ते चूक ठरते. दुसरे असे की, त्याचे म्हणणे बरोबर मानल्यास, 'अतिसर्वाय' या उदाहरणात 'स्मै' आदेश टाळता येणे अशक्य आहे, कारण ('पदाङ्गाधिकारे तस्य च तदन्तस्य' या परिभाषान्वयें) अङ्गाधिकाराच्या विषयात, म्हणजे अङ्गाधिकारस्थ सूत्र प्रवृत्त करणे झाल्यास, तदन्ताचें ग्रहण होत असल्यामुळें व त्याच्या मताप्रमाणे 'अतिसर्वाय' या समासातील 'सर्व' या शब्दाची सर्वार्थवाचकता नष्ट होत नसल्यामुळें, 'स्मै' आदेशाची प्राप्ति होते. सर्वनामरूप अवयव समासात पूर्वपद असल्यास तो सर्वार्थवाचक असतो परंतु तो उत्तरपद असल्यास त्याची सर्वार्थवाचकता नष्ट होते हें म्हणणे युक्तीला धरून नाही. दुसरे असे की, सर्वादि शब्द उपसर्जन असल्यास त्याचे ठिकाणी सर्वार्थवाचकता राहत नाही असे जें त्यानी म्हटले आहे त्याशी विरोध येतो. म्हणून त्याच्या वरील म्हणण्यांत काहींच अर्थ नाही. ('सर्वानतिक्रान्त अतिसर्वः' हा द्वितीयातत्पुरुषसमास 'सर्व' शब्दान्त आहे व समासातील सर्वनामरूप अव-

यवाची सर्वनामसंज्ञा नष्ट होत नाहीं हें जें न्यासकारांचें मत आहे तें बरोबर मानल्यास, 'सर्व' शब्दान्त 'अतिसर्व' या शब्दाहून होणाऱ्या 'ङे' प्रत्ययाचे जागीं 'सर्वनाम्नः स्मै' सू. २१५ या सूत्रानें, 'पदाङ्गाधिकारे' ही परिभाषा असल्यामुळें, 'स्मै' आदेश होण्याची आपत्ति येते. या स्थलीं 'सर्व' हा शब्द 'त्वत्कपितृकः, मत्कपितृकः' इत्यादि समासांतील 'युष्मद्, अस्मद्' शब्दांप्रमाणें पूर्वपद नसून उत्तरपद आहे व समासांतील सर्वनामरूप अवयव पूर्वपद असल्यास त्याची सर्वनामसंज्ञा कायम राहते व तो उत्तरपद असल्यास त्याची सर्वनामसंज्ञा नष्ट होते असें जर न्यासकारांचें म्हणणें असेल तर, तसा फरक करण्याला कोणत्याहि प्रमाणाचा किंवा युक्तीचा आधार देतां येत नसल्यामुळें तसा फरक करणें अगदीं अयोग्य ठरतें. समासांतील सर्वनामरूप अवयवाची सर्वनामसंज्ञा जर कायम राहते तर तो सर्वनामरूप अवयव समासांतील पूर्वपद असो किंवा उत्तरपद असो, दोन्ही स्थलीं त्याची सर्वनामसंज्ञा सारखीच कायम राहिली पाहिजे. सर्वनामरूप अवयव समासांत उपसर्जन झाल्यास 'उपसर्जनीभूता न सर्वादयः' या वार्तिकान्वयें त्याची सर्वनामसंज्ञा नष्ट होते असें मानावें लागत असल्यामुळें, ती संज्ञा जशी उत्तरपदाचे ठिकाणीं नाहींशी होते तशीच पूर्वपदाचे ठिकाणीं देखील नाहींशी होते. म्हणून 'त्वत्कपितृकः, मत्कपितृकः' या उदाहरणांत 'युष्मद्, अस्मद्' या पूर्व पदांची सर्वनामसंज्ञा कायम राहते व त्यामुळें त्यांतून 'अकच्' प्रत्यय होण्याची प्राप्ति होते पण 'अतिसर्व' या समासांत 'सर्व' हें उत्तर पद असल्यामुळें त्याची सर्वनामसंज्ञा नष्ट होते व त्यामुळें 'स्मै' आदेश होण्याची प्राप्तीच होत नाहीं हें म्हणणें सर्वथा निराधार व युक्तिरहित असल्यामुळें स्वीकारार्ह नाहीं. वास्तविक दोन्ही स्थलीं सर्वनामरूप अवयव उपसर्जन झाले असल्याकारणानें त्यांची सर्वनामसंज्ञा नष्ट होते हेंच म्हणणें योग्य ठरतें असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे.)

शब्दरत्न– किमिति । बहुव्रीहौ नेत्यस्य द्वेधा व्याख्यानसम्भवादिति भावः । उत्तरग्रन्थेति । न्यासकारस्यापि सूत्रलभ्यार्थप्रतिपादने एव तात्पर्यादिति भावः । प्राप्तेरिति । प्राप्तेरभावे निषेधो व्यर्थ एवेति भावः । अत एवेति । अवयवानामुपसर्जनत्वेन सर्वादिबहिर्भावादेवेत्यर्थः । अन्वर्थेति । सर्वेषां नामेत्येवंरूपेत्यर्थः । तस्यार्थ इति । सोऽनुचितोऽन्वर्थसंज्ञया गौणमात्रे तदप्रवृत्तेस्तत्संमतत्वादिति शेषः सूत्रेत्यादि । तन्मतेऽन्वर्थत्वेन वार्तिकमते तु वचनेनेत्यर्थः । स्वोक्तार्थे न्यासकृद्ग्रंथसंवादमाह–न्यासकृतापीति । अनपेतमेवेति । समुदाये एकार्थीभावाङ्गीकारेण समुदायस्यान्यपदार्थोपसर्जनत्वेऽप्यवयवस्य तत्त्वे मानाभाव इत्यभिमानः । व्याहत इति । अजहत्स्वार्थायामपि अवयवार्थस्यान्यपदार्थविशेषणतयैवोपस्थित्योपसर्जनत्वाक्षतेरितरार्थविशेषणत्वेनोपस्थितिविषयत्वस्यैवोपसर्जनत्वपदार्थत्वादिति भाव । सर्वशब्दस्येति । उत्तरपदभूतस्यापीत्यर्थः । युक्तमिति । न चोत्तरपदे लक्षणा पूर्वपदं तात्पर्यग्राहकमिति मते तद्युक्तिमदिति वाच्यम् । तत्र मते हि पूर्वपदं निरर्थकं स्वार्थप्रतिपादकं वा । नाद्यः । नैरर्थक्येन सर्वार्थकत्वाभावादेवाप्राप्तेः । नान्त्यः, पूर्वपदार्थे विशेषणान्वयापत्तेः । विनिगमनाविरहेण पदद्वयेऽपि लक्षणौचित्याच्च । एकार्थीभाववादिभिस्तथा वक्तुमशक्यत्वाच्च । एवं च तद्घटकावयवानां सर्वनामत्वाभाव एवोचित इति दिक् । स्वोक्त्येति । एतत्प्रकरणस्येत्यर्थः ।

('न बहुव्रीहौ' या सूत्रात 'सर्वादीनि सर्वनामानि' या पूर्व सूत्राची अनुवृत्ति होत असल्यामुळें त्या सूत्राचा असा अर्थ करता येतो की, 'बहुव्रीहौ यानि सर्वादीनि तेषां सर्वनामसंज्ञा न' व तसेच असाहि अर्थ करतां येतो की, 'सर्वादीनामन्यशब्दानां च यो बहुव्रीहिस्तस्य सर्वनामसंज्ञा न' व अशा रीतीनें) 'न बहुव्रीहौ' या सूत्राचा दोन तऱ्हेनें अर्थ करणे संभवत असल्यामुळें, 'किं बहुव्रीहौ संज्ञा नेति विवक्षितमुत तदवयवानां सर्वादीनामिति' असा मनोरमेंत प्रश्न केला आहे 'उत्तरग्रन्थविरोधात्' असे जें मनोरमेंत म्हटले

आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, प्रकृत सूत्रांतून कोणता अर्थ निघतो हें प्रतिपादन करण्यांतच न्यासकाराचें देखील तात्पर्य आहे, म्हणजे हें प्रतिपादन करण्याकरितांच त्यानें मनोरमेंत उद्धृत केलेली पंक्ति लिहिली आहे. ( शंकाकार असें म्हणतो की, एकाच ग्रन्थ-काराच्या पूर्वापर ग्रन्थांत विरोध दाखविणें योग्य आहे; पण त्याच्या ग्रन्थांत एका विषयाचें एक प्रकारें प्रतिपादन केलें आहे व दुसऱ्या ग्रन्थकाराच्या ग्रन्थांत त्याच विषयाचें भिन्न तऱ्हेनें प्रतिपादन केलें आहे अशा रीतीनें विरोध दाखविणें केव्हांहि न्याय्य ठरत नाहीं; कारण एक ग्रन्थकार दुसऱ्या ग्रन्थकाराच्या मताबद्दल कसा जबाबदार धरतां येऊं शकणार ? या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं, बहुव्रीहिसमासांतील सर्वनामरूप अवयवाला सर्वनामसंज्ञा न व्हावी याकरितां प्रकृत निषेधक सूत्र केलें आहे असें प्रक्रियाकौमुदी-कारांचें मत आहे व त्यांनीं ज्या न्यासग्रन्थाचा पुढें दाखला दिला आहे तो त्यांच्या मताचें समर्थन करणारा आहे असें मानूनच त्यांनीं दिला आहे. म्हणून समुदायाला सर्वनामसंज्ञा न व्हावी याकरितां प्रकृत निषेधक सूत्र केलें आहे हा प्रथम पक्ष स्वीकारल्यास, न्यासग्रन्थाशीं विरोध दाखविण्यांत कोणत्याहि प्रकारें अनौचित्य येत नाहीं असें शब्दरत्नकारांचें म्हणणें आहे.) 'सदन्ते प्राप्तेर्दूरापास्तत्वात्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, बहुव्रीहिसमासरूप समुदायाला सर्वनामसंज्ञेची प्राप्तीच नसल्यामुळें, त्याला सर्वनामसंज्ञा न व्हावी याकरितां प्रकृत निषेधक सूत्र करणे हें ('प्राप्तौ एव निषेधः' या न्यायान्वयें) व्यर्थ ठरतें. (या विषयाचें विवरण मनोरमेंत केलेंच आहे.) 'अत एव न द्वितीयोऽपि' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचें कारण हें कीं, बहुव्रीहिसमासांतील अवयव उपसर्जन होत असल्यामुळें, तसा अवयव सर्वनामरूप शब्द असल्यास तो सर्वादिगणांत अन्तर्भूत असलेला शब्द आहे असें ('उपसर्जनीभूता न सर्वादयः' या वार्तिकान्वयें) मानतां येऊं शकत नाहीं. (त्यामुळें बहुव्रीहिसमासांतील सर्वनामरूप

अवयवाला उपसर्जनत्वामुळें सर्वनामसंज्ञा प्राप्तच होत नसल्यामुळें, द्वितीय अर्थ मानला तरी देखील 'न बहुव्रीहौ' हे निषेधक सूत्र व्यर्थ ठरतेंच.) 'अन्वर्थसंज्ञाबलेन' या मनोरमेंतील पदात 'सर्वनाम' ही अन्वर्थक संज्ञा आहे असे जें म्हटले आहे त्याचे कारण हे की, 'सर्वेषा नाम सर्वनाम' अशा प्रकारे ती अन्वर्थक संज्ञा आहे 'बहुव्रीहाविवेति तस्यार्थ.' या मनोरमेंतील पंक्तीपुढें 'सोऽनुचितोऽन्वर्थसंज्ञया गौणमात्रे तदप्रवृत्तेस्तत्सम्मतत्वात्' ही पदें अध्याहृत आहेत (व त्या अध्याहृत पदाचा असा अर्थ आहे की, बहुव्रीहिसमासातच सर्वनामरूप अवयवाना सर्वनामसंज्ञा होत नाही असा प्रकृत सूत्राचा अर्थ करणे योग्य नाही, कारण 'सर्वनाम' ही संज्ञा अन्वर्थक असल्यामुळें, जेथें जेथें सर्वादिगणात पठित असलेला शब्द उपसर्जन होतो तथा सर्व स्थली तो सर्वनामसंज्ञक होत नाही हे पाणिनीला देखील मान्य आहे.) 'सूत्रवार्तिकमतेऽपि गौणपर्युदासस्येष्टत्वात्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा अर्थ हा आहे की, पाणिनीच्या मते सर्वनामसंज्ञा अन्वर्थक असल्यामुळें, उपसर्जनीभूत सर्वादि शब्दांना त्याच्या मताप्रमाणे सर्वनामसंज्ञा होऊ शकत नाही, आणि वार्तिककारानें ('उपसर्जनीभूता न सर्वादय.' हें) वार्तिक साक्षात् पठित केले असल्यामुळें, वार्तिककाराच्या मते त्या वार्तिकान्वयें उपसर्जनीभूत सर्वादि शब्दाना सर्वनामसंज्ञा होत नाही. प्रसादकारानी स्वत च्या मताचे समर्थन करण्याकरिता 'न्यासकृताऽपि . . .सर्वार्थताया अनपेतम्' या न्यासकाराच्या ग्रन्थाचा आधार दिला आहे. त्या ग्रन्थात 'पूर्वपद तु सर्वार्थताया अनपेतम्' असे जें न्यासकारानें म्हटले आहे ते असा आशय मनात धरून म्हटले आहे की, समासरूप समुदायामध्यें समुदायातील अवयवाच्या अर्थांचा एकार्थीभाव होतो असे मानले असल्यामुळें, जरी सामासिक शब्द अन्य पदार्थाचे उपसर्जन होतो तरी त्या समासातील अवयव अन्य पदार्थाचे उपसर्जन–विशेषण–होतात असे मानण्यास काहीच प्रमाण नाही. ('प्रियः सर्वः यस्य स. प्रियसर्वः' या 'सर्व' शब्दान्त बहुव्रीहि-

समासांत 'प्रियसर्व' हा सामासिक शब्द ज्याला सर्वजण प्रिय आहेत अशा अन्य पदार्थाचें उपसर्जन, म्हणजे विशेषण, होतो तरी, त्या सामासिक पदांतील 'प्रिय' व 'सर्व' हे अवयव देखील अन्य पदार्थाचीं विशेषणें होतात असें मानण्यास कोणतेंहि प्रमाण नाहीं असें न्यासकाराचें मत असल्यामुळें, बहुव्रीहिसमासांतील सर्वनामरूप अवयवाची सर्वनामसंज्ञा नष्ट होत नाहीं असें त्याचें म्हणणें आहे. या पंक्तींत 'अभिमानः' हें अरुचिप्रदर्शक पद घातलें असल्यामुळें शब्दरत्नकार हें सुचवितात कीं, न्यासकाराचें हें मत चूक आहे व त्याचें कारण ते लवकरच सांगणार आहेत. परंतु हें मत बरोबर मानलें तरी, न्यासकारानें बहुव्रीहिसमासांतील सर्वनामरूप चरमावयवाची सर्वनामसंज्ञा नष्ट होत असून, पूर्वपद सर्वनामरूप असल्यास त्याची सर्वनामसंज्ञा कायम राहते असा जो फरक दाखविला आहे त्याचें समर्थन करणें अशक्य आहे. वास्तविक बहुव्रीहिसमासांतील दोन्ही अवयव अन्य पदार्थाचे उपसर्जन होत नाहींत असें मानल्यास, त्या समासांत पूर्वपद सर्वनाम असो किंवा उत्तरपद सर्वनाम असो, दोहोंची सर्वनामसंज्ञा कायम राहिली पाहिजे व ते अन्य पदार्थाचे उपसर्जन होतात असें मानल्यास दोहोंची सर्वनामसंज्ञा नष्ट झाली पाहिजे. म्हणून न्यासकारानें जो फरक दाखविला आहे तो युक्तीला धरून नसल्यामुळें मनास पटत नाहीं. याचेंच विवरण शब्दरत्नकार पुढील पंक्तींत करणार आहेत.) 'पक्षद्वयेऽपि व्याहतः' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, अजहत्स्वार्थावृत्तिपक्षांत देखील समासांतील अवयवांचा अर्थ ('परार्थाभिधानं वृत्तिः' या वचनान्वयें) अन्यपदार्थाचें विशेषण होऊनच उपस्थित होत असल्यामुळें, अवयवांचे ठिकाणीं देखील उपसर्जनत्व येतेंच; कारण ज्या पदाचा अर्थ इतर पदार्थाचें विशेषण होऊन प्रतीत होतो तशा पदाला उपसर्जन असें म्हणत असतात. (सारांश बहुव्रीहिसमासांतील अवयव अजहत्स्वार्थावृत्तिपक्षांत आपला अर्थ अन्य पदार्थामध्यें संक्रमित

करीत असल्यामुळे व अशा रीतीनें ते अन्यपदार्थाचे उपसर्जन होत असल्यामुळें, त्या दोन अवयवांपैकी कोणताहि अवयव, मग तो पूर्व असो की पर असो, सर्वनामसंज्ञक असल्यास, त्याची सर्वनामसंज्ञा 'उपसर्जनीभूता न सर्वादयः' या वार्तिकान्वयें नष्ट होते हे उघड आहे ) 'त्वदुक्तरीत्या सर्वशब्दस्य सर्वार्थतानपायात्' या मनोरमेच्या पंक्तींतील 'सर्वशब्दस्य' या पदापुढें 'उत्तरपदस्यापि' ही पदें अध्याहृत आहेत. (न्यासकाराच्या मते बहुव्रीहिसामासिकशब्द अन्यपदार्थाचे उपसर्जन-विशेषण-होत असून त्या समासातील पूर्वावयव किंवा चरमावयव अन्यपदार्थाचे उपसर्जन होत नाही. म्हणून 'प्रियसर्वः' या स्थली 'सर्व' हे उत्तर पद त्याच्या मते अन्यपदार्थाचे उपसर्जन होत नसल्यामुळें त्याची सर्वनामसंज्ञा नष्ट होत नाही हे उघड होते. त्यामुळें 'पदाङ्गाधिकारे तस्य च तदन्तस्य च' या परिभाषान्वयें 'प्रियसर्व' या शब्दाहून होणाऱ्या 'ङे' प्रत्ययाचे जागी 'स्मै' आदेश होण्याची व 'प्रियसर्वस्मै' असे अनिष्ट रूप होण्याची, न्यासकाराचे मत स्वीकारल्यास, आपत्ति येते असा दीक्षिताच्या म्हणण्याचा भावार्थ आहे असे शब्दरत्नकार म्हणतात.) 'न हि पूर्वपदे सर्वार्थता उत्तरपदे तु नेति युक्तिमत्' असे जें मनोरमेत म्हटले आहे त्यावर अशी शंका करण्यात येते की, उत्तर पदाचे ठिकाणी लक्षणा केली असता व पूर्व पद तात्पर्यग्राहक आहे असे मानले असता, 'पूर्वपदे सर्वार्थता उत्तरपदे तु न' असे जें न्यासकाराचे म्हणणे आहे ते योग्य ठरते; पण ही शंका बरोबर नाही; कारण या मतामध्यें पूर्वपद अर्थरहित आहे किंवा स्वार्थाचे प्रतिपादन करणारे आहे ? ते निरर्थक-अर्थरहित-आहे असे मानल्यास, त्याच्या अर्थराहित्यामुळें ते सर्वार्थक आहे असे मानता येऊ शकत नसल्यामुळेंच त्याचे ठिकाणी सर्वनामसंज्ञेची प्राप्ति होत नाही. पूर्वपद स्वार्थप्रतिपादक आहे हा द्वितीय पक्ष मानल्यास, पूर्व पदाच्या अर्थामध्यें विशेषणाचा अन्वय होण्याची आपत्ति येते. दुसरे असें की, 'उत्तरपदे लक्षणा पूर्वपद तात्पर्यग्राहकम्' असे मानण्यास

कोणत्याहि युक्तीचा आधार नसल्यामुळें, पूर्वपद व उत्तरपद या दोहोंपैकीं कोणत्याहि पदाचे ठिकाणीं लक्षणा करणें उचित ठरतें, म्हणजे 'पूर्वपदे लक्षणा उत्तरपदे तात्पर्यग्राहकम्' असें देखील म्हणतां येणें शक्य आहे. वास्तविक एकार्थीभाव मानणाऱ्यांना अशा प्रकारचें प्रतिपादन करणें अशक्य आहे. म्हणून बहुव्रीहिसमासांतील दोन्ही अवयवांचे ठिकाणीं सर्वनामता येऊं शकत नाहीं असेंच म्हणणें योग्य आहे. ('त्वं पिता यस्य सः त्वत्कपितृकः' व 'प्रियाः सर्वे यस्य सः प्रियसर्वः' या दोन बहुव्रीहिसामासिक शब्दांपैकीं प्रथम शब्दांत 'युष्मद्' हें पूर्व पद सर्वनामसंज्ञक असून द्वितीय शब्दांत 'सर्व' हें उत्तर पद सर्वनामसंज्ञक आहे. 'उत्तरपदे लक्षणा पूर्वपदं तात्पर्यग्राहकम्' हा पक्ष मानला असतां, प्रथम सामासिक शब्दांतील 'पितृ' या उत्तर पदाचा लक्षणेनें 'त्वं पिता यस्य', म्हणजे 'त्वत्पुत्रः', असा अर्थ केल्यानें पूर्व पद 'युष्मद्' हें तात्पर्यग्राहक होतें, म्हणजे त्याच्यापुढील पदाचा लक्षणेनें विवक्षित असलेल्या अर्थाचा बोध करून देण्यांत सहायक होतें, व त्यामुळें त्याची सर्वार्थवाचकता–सर्वनामसंज्ञा–कायम राहते. परंतु 'प्रियसर्वः' या द्वितीय उदाहरणांत 'सर्व' हें उत्तर पद लक्षणेनें 'सर्व आहेत प्रिय ज्याला' अशा अर्थाचें बोधक होत असल्यामुळें, 'सर्व' या पदाची सर्वार्थवाचकता नष्ट होऊन त्याची सर्वनामसंज्ञा नाहींशी होते. म्हणून प्रथम शब्दांतील 'युष्मद्' याहून कुत्सितार्थक 'अकच्' प्रत्ययाची प्राप्ति होते व 'प्रियसर्व' या द्वितीय शब्दाहून सर्वनामकार्याची प्राप्ति होत नाहीं असें प्रसादकारांच्या म्हणण्याचें तात्पर्य आहे. यावर शब्दरत्नकार असा प्रश्न करतात कीं 'उत्तरपदे लक्षणा पूर्वपदं तात्पर्यग्राहकम्' असें जें प्रसादकारांनीं म्हटलें आहे त्यांतील 'तात्पर्यग्राहकम्' या पदाचा 'अर्थरहित' असा अर्थ आहे किंवा 'स्वार्थप्रतिपादक' असा अर्थ आहे ? पहिला अर्थ मानल्यास, 'त्वत्कपितृकः' या उदाहरणांतील 'युष्मद्' हें पूर्व पद अर्थरहित ठरून त्याची सर्वार्थवाचकता–सर्वनामसंज्ञा–नष्ट होते व त्यामुळें

त्याहून ' अकच् ' प्रत्ययाची प्राप्तीच होत नाही द्वितीय अर्थ मानल्यास, ' युष्मद् ' हें पूर्व पद स्वार्थप्रतिपादक ठरते व त्यामुळें त्याचा विशेषणाशी अन्वय होण्याची आपत्ति येते, म्हणजे ' सुन्दरस्य राज्ञः पुरुष ' या उदाहरणात ' राज्ञ- ' ह पद स्वार्थबोधक असल्यामुळें जसा त्याचा ' सुन्दरस्य ' या विशेषणाशी अन्वय होतो त्याचप्रमाणे ' त्वत्कपितृक ' या उदाहरणातील ' युष्मद् ' हे पूर्व पद स्वार्थप्रतिपादक मानल्यास त्याचा देखील ' सुन्दर ' इत्यादि विशेषणाशी अन्वय होण्याची आपत्ति येईल, व तसे होणे प्रसादकाराना देखील इष्ट नाही म्हणून ' पूर्वपदमर्थरहितम् ' किंवा ' पूर्वपद स्वार्थप्रतिपादकम् ' या दोन अर्थांपैकी कोणताहि अर्थ मानला तरी, वर दर्शविलेल्या आपत्ति टाळता येऊ शकत नाहीत. दुसरे असे की, ' उत्तरपदे लक्षणा पूर्वपद तात्पर्यग्राहकम् ' असेच मानण्यास कोणतीहि युक्ति उपलब्ध नसल्यामुळें, ' पूर्वपदे लक्षणा उत्तरपद तात्पर्यग्राहकम् ' असे देखील म्हणता येऊ शकते व तसे मानल्यास, ' त्वत्कपितृक ' या उदाहरणात ' युष्मद् ' या पूर्व पदाची सर्वार्थवाचकता–सर्वनामसंज्ञा–नष्ट होत असल्यामुळें, त्याहून ' अकच् ' प्रत्ययाची प्राप्तीच होत नाही व ' अतिसर्व ' या उदाहरणात ' सर्व ' या उत्तर पदाची सर्वार्थवाचकता–सर्वनामसंज्ञा–कायम राहत असल्याकारणानें, 'अतिसर्व' या सामासिक शब्दाहून ' स्मै, स्मात ' इत्यादि सर्वनामकार्यें होण्याची आपत्ति येते वास्तविक बहुव्रीहिसमास केल्यावर जो सामासिक शब्द तयार होतो त्यात एकार्थीभाव होत असल्यामुळें, त्या समुदायाचे ठिकाणी बहुव्रीहिसमासातील उभय पदाच्या अर्थाला धरून अन्य पदार्थाचा बोध करण्याची अभिधाशक्ति आहे असे जें वैयाकरण मानतात त्याना पूर्व पदाचे किंवा उत्तर पदाचे ठिकाणी लक्षणा मानण्याची काही गरज नाही सारांश बहुव्रीहिसमासातील पूर्व पद व उत्तर पद हे दोन्ही आपल्या अर्थाला धरून अन्य पदार्थाचे बोधक होत असल्यामुळें व अशा रीतीनें त्याचे ठिकाणी उपसर्जनत्व येत असल्यामुळें,

बहुव्रीहिसमासांतील सर्वनामरूप पूर्व पदाला किंवा उत्तर पदाला उपसर्जनत्वामुळें 'उपसर्जनीभूता न सर्वादयः' या वचनान्वयें सर्वनामसंज्ञेची प्राप्तीच होत नाहीं असेंच मानणें योग्य आहे आणि म्हणून 'न बहुव्रीहौ' हें निषेधक सूत्र त्यांना सर्वनामसंज्ञा न व्हावी याकरितां केलें आहे असें मानणें चूक ठरतें हें उघड आहे.) 'स्वोक्त्या सह विरोधः स्यात्' या मनोरमेच्या पंक्तींतील 'स्वोक्त्या' या पदाचा 'एतत्प्रकरणस्थया स्वोक्त्या' असा अर्थ आहे. ('गौणत्वे सर्वादीनां सर्वार्थवाचकत्वं नास्ति' असें प्रसादकारांनीं सर्वनामप्रकरणांत म्हटलें असून पुढें त्यांनीं 'पूर्वपदे सर्वार्थता उत्तरपदे तु न' असें जें त्याच प्रकरणांत म्हटलें आहे त्या दोन उक्ति परस्परविरुद्ध ठरतात. एकाच प्रकरणामध्यें अशा दोन परस्परविरुद्ध उक्ति केल्या असल्यामुळें, विस्मरणामुळें अशी चूक झाली असेल असें त्यांना म्हणतां येत नाहीं असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा भावार्थ आहे.)

मनोरमा—यदपि व्याचख्युः—त्वं पिता यस्येत्यादौ विग्रहवाक्ये प्राप्ता संज्ञा निषिध्यते इति । तदपि न । विग्रहवाक्यं हि लौकिकमलौकिकं वा विवक्षितम् । नाद्यः । प्रक्रियावाक्येऽयं निषेधो न तु लौकिक इति कैयटग्रन्थविरोधात् । प्रकृतसन्दर्भगतपूर्वापरस्वग्रन्थविरोधाच्च । न द्वितीयः । तस्य युष्मद् सु पितृ सु इत्याकारकत्वेन त्वं पितेत्याकारकत्वायोगात् ।

लौकिक विग्रहवाक्य विवक्षित असेल तर, या प्रथम पक्षात 'प्रक्रिया-वाक्येऽस्य निषेधो न तु लौकिके' या कैयटग्रन्थाशी विरोध येतो. ('न बहुव्रीहौ' १-१-२९ या सूत्रावरील भाष्याच्या वृत्तीत 'अप्रयोगसमवायि यत् प्रक्रियावाक्य तत्राय प्रतिषेधो, न लौकिके वाक्ये प्रयोगार्हे' असे कैयटानें स्पष्ट म्हटले आहे म्हणून 'विग्रहवाक्य' या शब्दानें लौकिक विग्रहवाक्य विवक्षित असल्यास, प्रकाशकाराचे म्हणणे कैयटमताविरुद्ध ठरते व त्यामुळें ते बरोबर मानता येत नाही )दुसरे असे की, प्रथम पक्ष मानल्यास, त्याच्या प्रकृत प्रकरणातील पूर्वापर वचनामध्यें विरोध येतो 'विग्रहवाक्य' या शब्दाचा अलौकिक प्रक्रियावाक्य असा द्वितीय अर्थ मानला तरी प्रकाशकाराचे म्हणणे योग्य ठरत नाही, कारण 'युष्मद् सु पितृ सु' अशा प्रकारचे अलौकिक प्रक्रियावाक्य असून 'त्व पिता यस्य' असे अलौकिक प्रक्रियावाक्य नव्हे ('त्व पिता यस्य' हे लौकिक विग्रहवाक्य आहे आणि तशा विग्रहवाक्यात सर्वनामसंज्ञेचा निषेध व्हावा याकरिता 'न बहुव्रीहौ' हे निषेधक सूत्र केले नसून, बहुव्रीहिसमास करण्याकरिता जें अलौकिक प्रक्रियावाक्य तयार केले जाते त्यातील सर्वनामरूप अवयवाला सर्वनामसंज्ञेचा निषेध होण्याकरिता प्रकृत सूत्र केले आहे आणि ते अलौकिक प्रक्रियावाक्य 'युष्मद् सु पितृ सु' अशा प्रकारचे आहे )

शब्दरत्न– स्वग्रन्थेति । तंत्रप्यलौकिक एव निषेधस्योक्तेरिति भाव ।

'पूर्वापरस्वग्रन्थविरोधाच्च' असे जे मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, प्रकाशकारानी देखील आपल्या ग्रन्थात असेंच म्हटले आहे की, अलौकिक प्रक्रियावाक्यात सर्वनामसंज्ञेचा निषेध होण्याकरिता प्रकृत सूत्र केले आहे ( व अशा रीतीनें त्याच्या पूर्वापर म्हणण्यामध्यें विरोध येतो हे स्पष्ट आहे.)

मनोरमा– यदपि व्याचख्युः–नन्वतिसर्वादौ सज्ञा न प्रवर्तते त्वत्कपितृकादौ तु प्रवर्तत इत्यत्र कि विनिगमकमत आह–अनङ्गकार्य-

त्वेनेति । अङ्गशब्दः समुदायपरः । तेनातिसर्वे इत्यत्राङ्गस्य संज्ञापेक्षितां सर्वनाम्नोऽङ्गात् स्मायादिविधानादवयवमात्रस्य सत्यपि सर्वनामत्वे दोषाभावात् । समुदाये च समुदायार्थं प्रति सर्वादेरुपसर्जनत्वात् तदन्तस्य संज्ञा न भवतीति युक्तम् । इह तु अवयवमात्रस्य सा चिकीर्षिता न समुदायस्य, अवयवश्च स्वार्थमात्रप्रधान इति स्यात् प्रसङ्ग इति वैषम्यमस्तीत्याशय इति । तदपि न । अङ्गाधिकारे तदन्तविधेः सर्वसंमतत्वेनावयवमात्रे सत्यपि सर्वनामत्वे दोषो नास्तीत्युक्तेर्व्याहतत्वात् । अङ्गाधिकारपरिभाषया स्मै स्याद् इति स्वग्रन्थविरोधाच्च । अथायमाशयः । प्राक् प्रवृत्तापि संज्ञा अर्थान्तरोपसंक्रमे सति गतेति । तर्हि अकजपि गच्छतु । ननु कार्यकालपक्षे स्मायाद्यर्थं पुनः संज्ञाऽपेक्षिता सा च दुर्लभेत्याशय इति चेत् । अस्त्वेवम् । न त्वसौ प्रकृतग्रन्थार्थः, न्यासग्रन्थविसंवादेन इति न्यासकृन्मतमिति वाक्यशेषविरोधात् । न्यासग्रन्थस्त्वनुपदमेवोदाहरिष्यते ।

प्रकाशकारांचें असें देखील म्हणणें आहे कीं, 'अतिसर्वे' इत्यादि स्थलीं सर्वनामसंज्ञा कां प्राप्त होत नाहीं व 'त्वत्कपितृकः' इत्यादि स्थलीं सर्वनामसंज्ञेची प्राप्ति कां होते याचें कारण काय आहे हें लक्षांत यावें याकरितां प्रक्रियाकौमुदीकारांनीं ( प्रकृत सूत्राचें व्याख्यान करितांना ) 'अनङ्गकार्यत्वेन' असें म्हटलें आहे. 'अनङ्गकार्यत्वेन' यांतील 'अङ्ग' हा शब्द समुदायाचा वाचक आहे, म्हणजे समुदायाला अङ्गसंज्ञा होत असते. त्यामुळें 'अतिसर्वे' या स्थलीं जरी 'सर्व' हा अवयव सर्वनामसंज्ञक आहे तरी, 'स्मै' इत्यादि आदेश सर्वनामाहून होण्याचें विधान केलें असल्यामुळें व अशा रीतीनें ते आदेश होण्याकरितां सर्वनामसंज्ञक अङ्ग असण्याची आवश्यकता असल्यामुळें (व 'अतिसर्व' हें अङ्ग सर्वनामसंज्ञक नसल्यामुळें) या उदाहरणांत कांहीं दोष येत नाहीं, म्हणजे 'स्मै' इत्यादि आदेश होण्याची आपत्ति येत नाहीं. 'अतिसर्व' या समुदायाच्या अर्थामध्यें 'सर्व' या शब्दाचा अर्थ उपसर्जनीभूत झाला असल्यामुळें, 'अति-

सर्व' या 'सर्व' शब्दान्त समुदायाला सर्वनामसंज्ञा होत नाही हे योग्य आहे, पण 'त्वत्कपितृक' या स्थली सपूर्ण समुदायाला सर्वनामसंज्ञा कर्तव्य नसून त्या समुदायातील 'युष्मद्' या पूर्व अवयवालाच सर्वनामसंज्ञा कर्तव्य आहे व हा अवयव स्वत चा अर्थच प्राधान्येंकरून सागणारा असल्यामुळें, त्याला सर्वनामसंज्ञा होण्याची प्राप्ति आहे (आणि त्यामुळें 'युष्मद्' या शब्दाहून 'अकच' प्रत्यय होण्याची व 'त्वकपितृक' असे अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येते) अशा रीतीनें या वरील दोन उदाहरणात फरक आहे असा प्रकाशकाराच्या म्हणण्याचा आशय आहे पण त्याचे हे म्हणणे देखील बरोबर नाही, कारण ('पदाङ्गाधिकारे तस्य च तदन्तस्य च'— परि २९—या परिभाषान्वयें) अङ्गाधिकारात सागितलेले कार्य कर्तव्य असता तदन्तविधि होणे हे सर्वांना संमत असल्यामुळें, 'अतिसर्व' या समुदायातील केवळ 'सर्व' हा अवयव (त्याच्या मत) सर्वनामसंज्ञक असून देखील काही दोष येत नाही हे त्याचे म्हणणे चूक ठरते दुसरे असे की, अङ्गाधिकारपरिभाषान्वयें या उदाहरणात 'स्मै' आदेश होण्याची आपत्ति येते असे जें त्यानी आपल्या ग्रन्थात म्हटले आहे त्याशी विरोध येतो ('अतिसर्व, प्रियसर्व' इत्यादि स्थली 'सर्व' या अवयवाला) जरी प्रथम सर्वनामसंज्ञा प्राप्त झालेली होती तरी, त्या अवयवाचा अर्थ समुदायाच्या अर्थामध्यें संक्रमित झाल्यावर त्याची सर्वनामसंज्ञा नाहीशी झाली असा जर त्याच्या म्हणण्याचा आशय असेल तर ('त्वत्कपितृक' इत्यादि उदाहरणात 'युष्मद्' या अवयवाहून 'अकच्' प्रत्यय होण्याची जी पूर्वी प्राप्ति होती तो देखील 'अकच्' प्रत्ययाचे निमित्त जी सर्वनामसंज्ञा ती, 'युष्मद्' शब्दाचा अर्थ अन्यपदार्थामध्यें, म्हणजे समुदायाच्या अर्थामध्यें, संक्रमित झाल्यावर, नष्ट होते व तिच्या बरोबर) 'अकच्' प्रत्यय होण्याची आपत्ति देखील टळते (असेंहि म्हणता येत. साराश 'अतिसर्वाय, प्रियसर्वाय' इत्यादि उदाहरणात 'सर्व' या

अवयवाला असलेली सर्वनामसंज्ञा, त्या अवयवाचा अर्थ समुदायाच्या अर्थामध्यें संक्रमित झाल्यावर, ज्याप्रमाणें नष्ट होते व त्यामुळें 'स्मै' इत्यादि आदेश होण्याची आपत्ति टळते त्याचप्रमाणें 'त्वत्कपितृकः' इत्यादि उदाहरणांत 'युष्मद्' या अवयवाला असलेली सर्वनामसंज्ञा, त्या अवयवाचा अर्थ समुदायाच्या–अन्य पदार्थाच्या–अर्थामध्यें संक्रमित झाल्यावर, नष्ट होते व त्यामुळें त्याहून 'अकच्' प्रत्यय होण्याची आपत्ति आपोआपच टळते आणि ती आपत्ति टाळण्याकरितां प्रकृत सूत्र असण्याची कांहीं आवश्यकता नाहीं असें देखील म्हणता येतें असा दीक्षितांच्या म्हणण्याचा भावार्थ आहे.) कार्यकालपक्षांत ('अतिसर्वाय, प्रियसर्वाय' इत्यादि उदाहरणांत) 'स्मै' इत्यादि आदेश होण्याकरितां पुन्हा सर्वनामसंज्ञेची अपेक्षा–गरज–आहे, परंतु 'सर्व' हा शब्द समासांत उपसर्जन झाला असल्यामुळें त्याची नष्ट झालेली सर्वनामसंज्ञा त्याला पुन्हा प्राप्त होणें दुर्लभ आहे असा जर प्रकाशकारांच्या म्हणण्याचा आशय असेल तर गोष्ट वेगळी, म्हणजे त्यावर आम्हांस कांहीं म्हणणें नाहीं. परंतु प्रकृत सूत्रावरील प्रक्रियाकौमुदीचा तसा अर्थ होऊं शकत नाहीं; कारण तसा अर्थ केल्यास, 'इति न्यासकृन्मतम्' असें जें प्रक्रियाकौमुदीकारांनीं प्रकृत सूत्रावरील टीकेच्या शेवटीं म्हटलें आहे (व न्यासकाराच्या मताचा त्यांनीं अनुवाद केला आहे असें जें दर्शविलें आहे त्या वाक्याशीं, हें मत न्यासकाराच्या मताविरुद्ध असल्यामुळें, विरोध येतो. न्यासकाराच्या ग्रन्थाचा उतारा लौकरच पुढें देण्यांत येणार आहे.

मनोरमा—यदपि व्याचख्युः–अङ्गमप्रधानं बाध्यं तद्विरुद्धमनङ्गं बाधकमित्यर्थः। तथा च कप्रत्ययापवादत्वादकच् स्यादित्यर्थ इति। तदपि क्लिष्टं व्यर्थं च। न्यासग्रन्थासंमतं च। तथा हि। त्वत्कपितृको मत्कपितृक इति वृत्तिग्रन्थं व्याख्याय न्यासकार उज्जग्राह–ननु च अन्वर्थसंज्ञाकरणादेवात्र संज्ञानिरासे कृतेऽकज् न भविष्यति। नह्यत्र सर्वार्थता सम्भवति विशेषविषयत्वात्। नैतदस्ति।

समुदायो हि विशेषे वर्तते पूर्वपदं तु सर्वार्थतया अनपेतमेव । भवतु तर्हि अनयोरनन्तरयोरेतत्सूत्रविषयता । प्रियविश्वायेत्यादेस्तु नोपपद्यते । न हि प्रियविश्वादयः सर्वेषां नामानि । नापि तदवयवभूताना विश्वादिशब्दाना किंचित्सर्वनामकार्यमुपपद्यते । स्मैप्रभृतीनामङ्गकार्यत्वात् । विश्वादिशब्दानामनङ्गत्वात् । एवं मन्यते–त्वत्कपितृको मत्कपितृक इत्यत्राकज्माभूद् इत्येतदर्थं तावदेतदारब्धव्यम् । प्रियविश्वायेत्यादावपि विस्पष्टार्थं भविष्यतीति । अनेन हि न्यासग्रन्थेनाङ्गसंज्ञानपेक्षत्वमेवार्थो लभ्यते स च त्वोत्प्रेक्षितव्याख्याया दूरोत्सारित एव ।

प्रक्रियाकौमुदीत 'अनङ्गकार्यत्वेनाकच् स्यात्' असे जें म्हटले आहे त्याचे व्याख्यान करिताना प्रकाशकार असे म्हणतात की, 'अङ्गकार्यत्वेन' या पदातील 'अङ्ग' या पदाचा 'अप्रधान, बाध्य' असा अर्थ असून, त्याच्या विरुद्ध 'अनङ्ग' या पदाचा 'बाधक' असा अर्थ आहे आणि म्हणून 'क' प्रत्ययाचा अपवादक–बाधक– 'अकच्' प्रत्यय होण्याची आपत्ति येते असा 'अनङ्गकार्यत्वेनाकच् स्यात्' या पदाचा अर्थ होतो (व त्यामुळें 'त्वत्कपितृकः' इत्यादि उदाहरणात 'युष्मद्' शब्दाहून 'अकच्' प्रत्यय होण्याची आपत्ति येते ) परंतु अशा प्रकारे त्या पदाचा अर्थ करणे हे देखील क्लिष्ट व व्यर्थ आहे आणि तसेंच असा अर्थ करणे न्यासग्रन्थाविरुद्ध आहे. (कारण प्रक्रियाकौमुदीच्या त्या पंक्तीतील 'अङ्ग' या शब्दाचा 'बाध्य' असा सहज रीतीनें अर्थ होऊं शकत नाहीं. प्रकाशकारानी त्या शब्दाचा 'बाध्य' असा जो अर्थ केला आहे तो ओढून ताणून केला असल्यामुळें क्लिष्ट ठरतो व तसा क्लिष्ट अर्थ न करिता 'अनङ्गकार्यत्वेन' या पदाचा 'अकच् प्रत्यय होणे हे अङ्गाधिकारांत सांगितलेलें कार्य नसल्यामुळें' असा सरळ अर्थ केल्यानें प्रक्रियाकौमुदीकाराचा ग्रन्थ नीट लागू पडत असल्यामुळें, तशा प्रकारचे क्लिष्ट व्याख्यान करणे व्यर्थ ठरतें असे दीक्षितांचे म्हणणे आहे. तसा अर्थ करणे न्यासग्रन्थाविरुद्ध ठरतें असे दीक्षितानीं म्हटले

असल्यामुळें, ते आतां पुढील पंक्तींत न्यासग्रन्थाचें व्याख्यान करतात.) 'इह च त्वत्कपितृको मत्कपितृक इत्यकज्न भवति' असें जें प्रकृत सूत्रावरील काशिकावृत्तींत म्हटलें आहे त्याचें व्याख्यान करून न्यासकारानें अशी शंका उपस्थित केली आहे, कीं, 'सर्वनाम' ही अन्वर्थक संज्ञा केली असल्यामुळेंच (व 'त्वत्कपितृकः' या अन्यपदार्थप्रधान बहुव्रीहिसमासांत 'युष्मद्' हा अवयव अन्यपदार्थाचें उपसर्जन झाला असून त्याची सर्वार्थवाचकता नाहींशी झाली असल्यामुळें) त्याची सर्वनामसंज्ञा नष्ट झाल्याकारणानें, 'अकच्' प्रत्यय होण्याची आपत्तीच येत नाहीं. या उदाहरणांत 'युष्मद्' हा अवयव सर्वार्थवाचक असणें संभवत नाहीं; कारण (बहुव्रीहिसमासांत जो अन्यपदार्थप्रधान आहे त्याचा तो अवयव उपसर्जन-विशेषण-होऊन स्वार्थविशिष्ट अन्यपदार्थाचा बोधक झाला असल्यामुळें) तो अवयव विशिष्ट व्यक्तीचा बोध करणारा आहे. (अशा तऱ्हेची शंका उपस्थित करून त्या शंकेवर न्यासकारानें असें उत्तर दिलें आहे कीं,) हीं शंका बरोबर नाहीं; कारण बहुव्रीहिसमासरूप समुदाय हा विशिष्ट व्यक्तीचा, म्हणजे अन्यपदार्थाचा, वाचक असून त्यांतील 'युष्मद्' इत्यादि पूर्वपदाची सर्वार्थवाचकता मुळींच नष्ट झाली नाहीं व कायमच आहे. म्हणून 'त्वत्कपितृकः, मत्कपितृकः' हीं काशिकेंत दिलेलीं दोन उदाहरणें प्रकृत सूत्राचें विषय होऊं शकतात असें म्हणतां येतें, म्हणजे यावरील दोन उदाहरणांत 'युष्मद्, अस्मद्' या सर्वार्थवाचक अवयवांहून जो 'अकच्' प्रत्यय होण्याची प्राप्ति आहे तिचें निवारण व्हावें याकरितां प्रकृत निषेधक सूत्र केलें आहे असें म्हणतां येतें. परंतु 'प्रियविश्वाय' इत्यादि उदाहरणें प्रकृत सूत्राचे विषय होऊं शकत नाहींत; कारण 'प्रियविश्व' इत्यादि शब्द (विशिष्ट व्यक्तीचे बोधक असून) त्यांना 'सर्वेषां नामानि', म्हणजे त्यांचे ठिकाणीं सर्वार्थवाचकता आहे, असें म्हणतां येत नाहीं (व त्यामुळें त्यांना सर्वनामसंज्ञेची प्राप्तीच होत नाहीं व 'स्मै' इत्यादि

आदेश होण्याची आपत्ति मुळीच येत नाही ) त्या समुदायांतील अवयव असलेल्या 'विश्व' इत्यादि शब्दाना देखील कोणतेहि सर्वनामकार्य प्राप्त होऊ शकत नाही, कारण 'स्मै' इत्यादि आदेश होणे ही अङ्गाधिकारात सांगितलेली कार्ये आहेत व 'विश्व' इत्यादि शब्द अङ्ग नव्हत (व ती कार्ये अङ्गाला होणारी कार्ये असल्यामुळें आणि 'विश्व' इत्यादि शब्द अङ्गावयव असून अङ्ग नसल्यामुळें त्याना सर्वनामकार्यांची मुळीच प्राप्ति होत नाही आणि 'प्रियविश्व' हा संपूर्ण शब्द अङ्ग आहे तरी, सर्वनामसंज्ञा नसणाऱ्या त्या शब्दाला देखील सर्वनामकार्यांची प्राप्तीच होत नाही ) सारांश न्यासकाराचें असे मत आहे की, 'त्वत्कपितृक मत्कपितृक' या उदाहरणात 'अकच्' प्रत्यय न व्हावा याकरिता प्रकृत सूत्र करावे लागले आणि तें सूत्र केले असल्यामुळें 'प्रियविश्वाय' इत्यादि रूपें का होतात (व त्या उदाहरणात 'स्मै' इत्यादि आदेश का होत नाहीत) हे स्पष्ट होण्याकरिता देखील ते सूत्र कामास येऊ शकते ('उपसर्जनीभूता न सर्वादय' या अर्थाचे सूत्र पाणिनीनें साक्षात् पठित केले नसल्यामुळें, पाणिनीला 'न बहुव्रीहौ' हे सूत्र मुद्दाम करावे लागले व अन्यपदार्थप्रधान बहुव्रीहिसमासातील सर्वनामरूप अवयवाला सर्वनामसंज्ञा होत नाही असे सांगावे लागले हे सूत्र केले असल्यामुळें व 'प्रियविश्वाय, प्रियसर्वाय' इत्यादि उदाहरणात 'विश्व, सर्व' हे सर्वनामसंज्ञक शब्द बहुव्रीहिसमासाचे अवयव असल्यामुळें, त्याची सर्वनामसंज्ञा नाहीशी होते व सर्वनामसंज्ञा नष्ट झालेले तसे शब्द बहुव्रीहिसमासरूप समुदायाच्या अन्तीं असल्यामुळें, समुदाय सर्वनामान्त आहे असे मानता येऊ शकत नाही व त्यामुळें त्या समुदायरूप शब्दाहून सर्वनामकार्य होऊ शकत नाहीत असे प्रकृत सूत्राच्या आधारें म्हणता येणे शक्य आहे पण 'अतिसर्व' या तत्पुरुषसमासस्थली प्रकृत सूत्राचा उपयोग करता येऊ शकत नाही व त्याकरिता 'उपसर्जनीभूता न सर्वादय' हे वार्तिक मानणे किंवा भाष्यकारानी म्हटल्याप्रमाणे 'सर्वनाम' ही अन्वर्थक संज्ञा

आहे हें मानणें आवश्यक आहे व तसें मानलें असतां, दीक्षितांनीं जसा प्रकृत सूत्राचा अर्थ केला आहे तसा अर्थ न मानल्यास, प्रकृत सूत्र व्यर्थ ठरतें हें उघड आहे.) या वरील न्यासग्रन्थावरून हें स्पष्ट होतें कीं, (न्यासग्रन्थाचा अनुवाद करणाऱ्या प्रक्रियाकौमुदींतील 'अनङ्गकार्यत्व' या पदाचा) 'अङ्गसंज्ञानपेक्षत्व', म्हणजे 'अकच्' प्रत्यय होणें हें अङ्गाधिकारांत सांगितलेलें कार्य नसल्यामुळें तो प्रत्यय होण्याकरितां अङ्गसंज्ञेची गरज नाहीं, असाच अर्थ होऊं शकतो व प्रकाशकारांनीं त्या पदाचें, वर सांगितल्याप्रमाणें, व्याख्यान करितांना तो अर्थ दूर झुगारून दिला आहे, म्हणजे त्या अर्थाकडे पूर्ण दुर्लक्ष केलें आहे. (सारांश ज्या न्यासग्रन्थाचा प्रक्रियाकौमुदीकारांनीं अनुवाद केला आहे त्या न्यासग्रन्थावरून 'अनङ्गकार्य' या पदाचा 'अङ्गाधिकारांत न सांगितलेलें 'अकच्' प्रत्यय होणें हें कार्य' असा अर्थ होत असल्यामुळें, या सरळ अर्थाविरुद्ध प्रकाशकारांनीं त्या पदांतील 'अङ्ग' या शब्दाचा अप्रधान व बाध्य असा क्लिष्ट अर्थ करून 'अनङ्गकार्य' या पदाचा 'क' प्रत्ययाचें अपवादक जें 'अकच्' प्रत्यय होणें हें कार्य असा जो अर्थ केला आहे तो न्यासग्रन्थाकडे पूर्ण दुर्लक्ष करून केला असल्यामुळें चूक ठरतो असें दीक्षितांचें म्हणणें आहे.)

शब्दरत्न—अर्थान्तरोपसंक्रमे सति गतेति। तेनातिसर्वायेत्यादौ न दोषः। पुनः संज्ञा तु दुर्लभा, संज्ञोपसर्जनानां निषेधात्। पाठास्पर्युदासेन तदन्तग्रहणेनापि न संज्ञा। अर्थान्तरसंक्रमात्पूर्वन्तु स्मेभावस्य न प्रवृत्तिः। अकच्प्रवृत्तिस्तु ततः प्रागस्त्येवेति तन्निवृत्तये इदं सूत्रमित्यभिमानः। गच्छत्विति। निमित्तापायपरिभाषयेति भावः। दुर्लभेति। उपसर्जननिषेधादिति भावः। इत्यर्थ इति। अनङ्गकार्यत्वेनेत्यस्यार्थ इति भावः। क्लिष्टमिति। तत्त्वं तु स्पष्टमेव। न्यासग्रन्थासंमतिमुपपादयन्ननङ्गकार्यत्वेनेत्यस्य वैयर्थ्यमुपपादयति—तथा हीति। विशेषविषयत्वादिति। अन्यपदार्थविशेषणत्वादित्यर्थः। समुदायोहीति। तस्यैव तद्विशेषणत्वमित्यभिमानः।

अनन्तरयोरिति । त्वत्कपितृकमत्कपितृकयोरित्यर्थः । अङ्गसंज्ञानपेक्षत्वमेवार्थ इति । एवं चानुपदोक्ते यदपीति पक्षे कप्रत्ययापवादत्वस्याकचि प्रसिद्धत्वादेवोक्तरीत्यातदुक्तित्यर्थेति बोध्यम् ।

मनोरमेत 'अर्थान्तरोपसंक्रमे सति गता' असे म्हटले असल्यामुळें, 'अतिसर्वाय' इत्यादि स्थली कांही दोष येत नाही, म्हणजे 'स्मै' इत्यादि आदेश होण्याची आपत्ति येत नाही 'सर्व' या शब्दाची एकदा नष्ट झालेली सर्वनामसंज्ञा त्याला पुन्हा प्राप्त होऊ शकत नाही, कारण संज्ञावाचक असलेल्या व तसेच उपसर्जन झालेल्या सर्वादि शब्दांना ('संज्ञोपसर्जनीभूता न सर्वादय' या वार्तिकानें) सर्वनामसंज्ञेचा निषेध केला आहे या वार्तिकानें गणपाठात पठित असलेल्या सर्वादिगणातून उपसर्जन झालेल्या सर्वादि शब्दाचा पर्युदास केला असल्यामुळें, म्हणजे तशा उपसर्जनीभूत झालेल्या शब्दांना सर्वनामसंज्ञा होत नाही असे विधान केले असल्यामुळें, ('पदाङ्गाधिकारे तस्य च तदन्तस्य च' या परिभाषेंत जें तदन्तग्रहण केले आहे त्या) तदन्तग्रहणानें होणारी संज्ञा देखील ('प्रियसर्व, अतिसर्व' इत्यादि शब्दांना) होत नाही, (कारण ते शब्द सर्वनामान्त आहेत असे मानता येत नाही व त्यामुळें त्या शब्दाहून सर्वनामकार्य होऊ शकत नाहीत 'अतिसर्वाय' इत्यादि स्थली 'सर्व' या सर्वनामरूप शब्दाचा अर्थ 'अति' या) अन्यपदार्थामध्यें संक्रमित होण्यापूर्वी 'स्मै' आदेशाची प्रवृत्ति होऊ शकत नाही, पण त्यापूर्वी 'अकच्' प्रत्ययाची प्राप्ति होतेच व तिचे निवारण करण्याकरिता प्रकृत सूत्र पाणिनीनें आरंभिले आहे असे प्रकाशकार मानतात ('सर्वानतिक्रान्त अतिसर्व' या तत्पुरुषसमासस्थली 'सर्व' या सर्वनामसंज्ञक शब्दाचा अर्थ 'अति' या अन्यपदार्थात संक्रमित होण्यापूर्वी 'सर्व' हा शब्द द्वितीयान्त आहे तशा स्थितीत 'स्मै' आदेशाची प्राप्तीच नाही 'सर्व' या शब्दाचा अर्थ 'अति' या अन्यपदार्थामध्यें संक्रमित होऊन व 'सुपो धातुप्रातिपदिकयो' सू ६५० या सूत्रानें अन्तर्वर्ति द्वितीयेच्या विभक्ति-

प्रत्ययाचा लुक् होऊन 'अतिसर्व' असें जेव्हां सामासिकशब्द-स्वरूप अङ्ग होतें तेव्हां त्या अङ्गाहून 'ङे' प्रत्यय केला असतां, त्या अङ्गाच्या अन्तीं असणाऱ्या 'सर्व' या शब्दाची सर्वनामसंज्ञा उपसर्जनत्वामुळें नष्ट झाली असल्यामुळें, 'अतिसर्व' हें अदन्त अङ्ग सर्वनामान्त आहे असें मानतां येत नाहीं व त्यामुळें 'स्मै' आदेशाची प्राप्ति होत नाहीं. पण 'त्वं पिता यस्य' या विग्रह-वाक्यांतील 'युष्मद्' या अवयवाची सर्वनामसंज्ञा नष्ट झाली नसून कायम असल्यामुळें, त्याहून 'अकच्' प्रत्यय होण्याची जी प्राप्ति आहे तिचें निवारण करण्याकरितां प्रकृत सूत्र आरंभिलें आहे असें प्रकाशकारांचें म्हणणें आहे. यावर मनोरमेंत पूर्वी उत्तर दिलेंच आहे.) 'तर्हि अकजपि गच्छतु' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे तें 'निमित्तापाये नैमित्तिकस्याप्यपायः' या परिभाषेच्या आधारें म्हटलें आहे. ('अव्ययसर्वनाम्नामकच्' सू. २०२६ या सूत्रानें 'अकच्' प्रत्यय होण्याकरितां सर्वनामसंज्ञा असणें या निमित्ताची आवश्यकता आहे. त्या संज्ञेमुळें होणारा 'अकच्' प्रत्यय ती सर्व-नामसंज्ञा असतांना केलेला असला तरी, ती सर्वनामसंज्ञा नष्ट झाल्यावर, वरील परिभाषान्वयें, तो 'अकच्' प्रत्यय आपोआपच नाहींसा होईल. म्हणून तो प्रत्यय न व्हावा याकरितां प्रकृत सूत्र असण्याची कांहीं गरज नाहीं असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे असें शब्दरत्नकार म्हणतात.) 'सा च दुर्लभा' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचें कारण हें कीं, समासांत 'सर्व' हा शब्द उपसर्जन झाला असतां ('उपसर्जनीभूता न सर्वादयः' या निषेधक वार्तिकान्वयें) त्याला सर्वनामसंज्ञा पुन्हा होऊं शकत नाहीं. 'अङ्गमप्रधानं वाच्यं तद्विरुद्धमनङ्गं बाधकमित्यर्थः' असें जें प्रकाशकारांनीं व्याख्यान केलें आहे तें प्रक्रियाकौमुदींतील 'अनङ्गकार्यत्वेन' या पदाचें व्याख्यान होय. तें व्याख्यान क्लिष्ट आहे हें अगदीं उघड आहे. (कारण 'अङ्ग' या शब्दाचा वाच्य व 'अनङ्ग' या शब्दाचा बाधक असा अर्थ कोठेंहि प्रसिद्ध नसून तो ओढून ताणून

केलेला अर्थ आहे हे अगदी स्पष्ट आहे ) तो अर्थ न्यासग्रन्थाविरुद्ध आहे व तसा अर्थ करणे व्यर्थ आहे हे सिद्ध करण्याच्या हेतूनें दीक्षितानी 'तथा हि' इत्यादि न्यासग्रन्थाचा उपन्यास केला आहे त्या न्यासग्रन्थातील 'विशेषविषयत्वात्' या पदाचा 'अन्यपदार्थविशेषणत्वात्', म्हणजे बहुव्रीहीचा अर्थ जो अन्यपदार्थ त्याचे 'युष्मद्, अस्मद्' हे शब्द विशेषण होत असल्यामुळें, असा अर्थ आहे (याचे विवरण पूर्वी मनोरमेत केलेच आहे ) 'समुदायो हि विशेषेवर्तते' असे जें न्यासकारानें म्हटले आहे तें असा आशय मनात धरून म्हटले आहे की, (बहुव्रीहिसमासातील अवयव अन्यपदार्थाचे विशेषण होत नसून, बहुव्रीहिसामासिकशब्दरूप सपूर्ण) समुदायच अन्यपदार्थाचे विशेषण होत असतो (या पक्षीत 'इत्याभिमान' ही जी अरुचिप्रदर्शक पदें घातली आहेत त्याचे कारण हे की, समुदायाचे अवयव देखील अन्यपदार्थाची विशेषणे होत असल्यामुळें उपसर्जन होतात व हे मागील शब्दरत्नात स्पष्ट सांगितलेच आहे ) न्यासग्रन्थातील 'अनत्वरयो' या पदाचा 'त्वत्कपितृकमत्कपितृकयो' असा अर्थ आहे. 'अनङ्कार्यत्व' या पदाचा 'अङ्गसंज्ञानपेक्षत्वमेवार्थो लभ्यते', म्हणजे 'अङ्गसंज्ञानपेक्षत्व' असाच अर्थ होतो, असे दीक्षितानी मनोरमेंत म्हटले असल्यामुळें व 'अकच्' प्रत्यय 'क' प्रत्ययाचा बाधक आहे हे प्रसिद्ध असल्यामुळें, 'अकच्' प्रत्यय होण्याची आपत्ति येते असा जो प्रकाशकारानी प्रक्रियाकौमुदीतील 'अनङ्कार्यत्वेनाकच् स्यात्' या पदाचा अर्थ केला आहे तसा अर्थ करणे व्यर्थ ठरते. (याचे विवरण पूर्वी मनोरमेंत केलेच आहे )

मनोरमा—यदपि व्याचख्युः । यद्यपि सूत्रवार्तिककृतोरप्येतन्मत तथाऽपि न्यासकृता वितृतत्वाद् न्यासकृन्मतमित्युक्तमिति । तदपि स्थवीयः । वार्तिककृता अस्यार्थस्यास्पृष्टत्वात् । न्यासकृता समासे कृते सतोरत्यादिवदता त्वदुक्तार्थस्य दूरस्थत्वेन तद्विवृतत्वाभावाच्च ।

प्रकाशकार पुन्हा असे म्हणतात की, प्रक्रियाकौमुदीत 'न बहुव्रीहौ' या सूत्राचा जसा अर्थ केला आहे तसाच अर्थ जरी

सूत्रकार पाणिनी व वार्तिककार या दोघांनाहि मान्य आहे तरी न्यासकारानें त्या अर्थाचें स्पष्ट विवरण केलें असल्यामुळें, प्रक्रिया-कौमुदीकारांनीं 'इति न्यासकृन्मतम्' असें प्रकृत सूत्रावरील टीकेंत म्हटलें आहे. पण हें त्यांचें म्हणणें देखील अगदीच चूक आहे; कारण वार्तिककारानें केलेल्या ('उपसर्जनीभूता न सर्वादयः' या) वार्तिकांतून प्रकाशकारांनीं केलेला अर्थ मुळींच निघूं शकत नाहीं आणि तसेंच न्यासकारानें 'समासे कृते सति' इत्यादि म्हटलें असल्यामुळें, प्रकाशकारांनीं जसा अर्थ केला आहे तसा अर्थ न्यासकारानें दूर झुगारून दिला आहे हें स्पष्ट होतें आणि त्यामुळें न्यासकारानें तशा अर्थाचें विवरण केलें आहे असें मुळींच म्हणतां येत नाहीं. (प्रक्रिया-कौमुदीकारांनीं जी प्रकृत सूत्रावर वृत्ति लिहिली आहे तिचें विवरण करितांना प्रकाशकारांनीं 'त्वं पिता यस्येत्यादौ विग्रहवाक्ये प्राप्ता संज्ञा निषिध्यते' असें म्हटलें आहे व त्यांचें असेंहि म्हणणें आहे कीं, सूत्रकार पाणिनी व वार्तिककार यांचें देखील असेंच मत आहे, पण न्यासकारानें या मताचें स्पष्ट विवरण केलें असल्यामुळें, 'इति न्यास-कृन्मतम्' असें प्रक्रियाकौमुदीकारांनीं म्हटलें आहे. यावर दीक्षित असें म्हणतात कीं, विग्रहवाक्यांत बहुव्रीहिसमासांतील सर्वादि शब्दांना सर्वनामसंज्ञेचा निषेध होतो असें जरी पाणिनीचें मत असलें तरी, वार्तिककाराचें असेंच मत आहे हें म्हणणें बरोबर नाहीं; कारण वार्तिक-कारानें या विषयासंबंधानें कांहींहि म्हटलें नसून, 'संज्ञोपसर्जनीभूता न सर्वादयः' असा सामान्य सिद्धान्त सांगितला आहे व त्या वार्तिकावरून हा निष्कर्ष निघतो कीं, सर्वादि शब्द उपसर्जनीभूत झाले असतां, मग ते बहुव्रीहिसमासांत उपसर्जन झाले असो किंवा इतर रीतीनें उपसर्जन झाले असो, ते सर्वनामसंज्ञक ठरत नाहींत. न्यासकारानें आपल्या विवरणांत प्रकाशकारांनीं ज्या मताचें प्रतिपादन केलें आहे त्या मताचें प्रतिपादन केलें नसून उलट अशा मताचें प्रतिपादन केलें आहे कीं, विग्रहवाक्यांत सर्वादि शब्दाची सर्वनामसंज्ञा नष्ट होत नसून बहुव्रीहिसमास केल्यावर समासांत अन्तर्भूत असलेल्या

तदा सर्वादि शब्दाची सर्वनामसंज्ञा नष्ट होते. यावरून हे स्पष्ट होते की, प्रकाशकारांनी ज्या मताचे प्रतिपादन केले आहे ते मत न्यासकाराला मुळीच मान्य नाही आणि म्हणून न्यासकाराचे मत हेच आहे असे जें प्रकाशकार म्हणतात ते म्हणणे चूक ठरते हे अगदी उघड आहे.)

शब्दरत्न—इत्यादि वदतेति । वृत्तिग्रन्थव्याख्यावसरे इति शेषः ।

'इत्यादि वदता' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्यापुढें 'वृत्तिग्रन्थव्याख्यावसरे', म्हणजे 'काशिकावृत्तीचे व्याख्यान करते-वेळी' हे पद अध्याहृत आहे

मनोरमा—यदप्याहुः । न्यासकृच्छब्देन सूत्रकार एव विवक्षित इत्यादि । तदपि न । सूत्रकारमते बहुव्रीहावित्यादिपूर्वग्रन्थेन सह विरोधात् भाष्यकारमते त्विति ग्रन्थेन तस्य विच्छिन्नत्वाच्च । तस्मा-दिहप्राचः प्रक्रियाग्रन्थास्तद्व्याख्यातृग्रन्थाश्चापातरमणीया एवे-त्यास्तां तावत् ।

पुन्हा प्रकाशकार असे म्हणतात की, प्रक्रियाकौमुदीत 'इति न्यासकृन्मतम्' असे जें म्हटले आहे त्यातील 'न्यासकृत्' या पदाचा ('न्यासकार' असा अर्थ विवक्षित नसून) 'सूत्रकार पाणिनि' असा अर्थ विवक्षित आहे पण हे त्यांचे म्हणणे देखील बरोबर नाही, कारण तसा अर्थ मानल्यास, 'सूत्रकारमते बहुव्रीहौ न सर्वनामता' या प्रक्रियाकौमुदीतील पूर्वग्रन्थाशी विरोध येतो दुसरे असे की, 'भाष्यकारमते तु गौणत्वमात्रे' या पक्तीनें पुढील पंक्ति विच्छिन्न झाली आहे ('न्यासकृत्' या पदाचा 'सूत्रकार' असा अर्थ प्रक्रिया-कौमुदीकारांना विवक्षित असता तर त्यांनी 'सूत्रकारमते बहुव्रीहौ न सर्वनामता' या पंक्तीच्या लगेच पुढें 'न्यासकृत् मत' दिले असतें व त्यानंतर भाष्यकाराचे मत दिले असतें आणि या दोन पंक्तींच्या मध्यें त्यांनी भाष्यकाराचे मत न सांगता ते मत अखेरीस सांगितले असते.) सारांश वरील सर्व विवेचनावरून हे स्पष्ट होते

कीं, प्रकृत सूत्रावरील वृत्तींत प्रक्रियाकौमुदीकारांनीं जें म्हटलें आहे व त्या ग्रन्थाचें व्याख्यान करितांना टीकाकार, म्हणजे प्रकाशकार, यांनीं जें आपल्या टीकेंत म्हटलें आहे तें केवळ दिसण्यांत रमणीय आहे, म्हणजे विचारान्तीं तें सर्व म्हणणें चूक ठरतें. या विषयासंबंधानें एवढें पुरें.

मनोरमा–यदि तु प्रक्रियाग्रन्थोऽपि कथंचिद्भाष्याविरोधेन व्याख्येय इत्याग्रहस्तर्हीत्थं व्याख्यायताम्– "ननु प्रियविश्वायेति गौणतया गतार्थम्। अतोनिष्कर्षमाह—सूत्रकारमत इति । बहुव्रीहाविति । चिकीर्षिते सतीति शेषः । गौणत्वमात्र इति । मात्रशब्दोऽवधारणे, गौणत्वे एव न तु ततः प्राक् । तथा च सूत्रं प्रत्याख्यातमिति भावः । न्यासकृन्मतस्य तु अतिफल्गुत्वात् स्वरूपव्याक्रियेव पराक्रियेत्याशयेनाह–स्वरूपमिल्लक इत्यादि" । एतच्च प्राचीनतत्तद्ग्रन्थपरिशीलनशालिभिर्विभावनीयम् । प्रकृतमनुसरामः । संज्ञाकार्यमिति । सर्वनामसंज्ञाप्रयुक्तं स्मायादिकमित्यर्थः । अन्तर्गणकार्यमिति । "अद्ड्डतरादिभ्यः" "त्यदादीनामः" "तदोः सस्सौ" इत्यादिकमित्यर्थः ।

जर भाष्याशीं विरोध न येतां प्रकृत सूत्रावरील प्रक्रियाकौमुदीचा अर्थ कसा तरी लावला पाहिजे असा आग्रह असेल तर, त्या ग्रन्थाचें पुढें सांगितल्याप्रमाणें व्याख्यान करावें:–'प्रियविश्वाय' हें जें प्रकृत सूत्राचें उदाहरण दिलें आहे तें वास्तविक ('प्रियविश्व' या अन्यपदार्थप्रधान बहुव्रीहिसमासांत 'विश्व' हें सर्वनामसंज्ञक पद उपसर्जन झालें असल्यामुळें, 'उपसर्जनीभूता न सर्वादयः' या वार्तिकान्वयें) गौणत्वामुळें गतार्थ होतें, म्हणजे अन्यथासिद्ध होतें. म्हणून प्रकृत सूत्र कशाकरितां केलें आहे हें कळावें याकरितां 'सूत्रकारमते बहुव्रीहौ न सर्वनामता' हा निष्कर्ष दिला आहे. या पंक्तीतील 'बहुव्रीहौ' या पदापुढें 'चिकीर्षिते सति' हीं पदें अध्याहृत आहेत असें मानावें. (हीं पदें अध्याहृत केलीं असतां,

दीक्षितानी जसा प्रकृत सूत्राचा कौमुदीत अर्थ केला आहे तसाच सूत्रार्थ होतो. ) 'भाष्यकारमते तु गौणत्वमात्रे' या पक्तीतील 'मात्र' हा शब्द ( साकल्यार्थक नसून ) अवधारणार्थक आहे असे मानून त्या पक्तीचा असा अर्थ करावा की, सर्वादि शब्द उपसर्जन झाल्यावरच त्यांची सर्वनामसज्ञा नष्ट होते, त्या पूर्वी ती नष्ट होत नाही. असे भाष्यकाराचे मत असल्यामुळें त्यांनी प्रकृत सूत्राचे प्रत्याख्यान केले आहे असा प्रक्रियाकौमुदीकाराच्या म्हणण्याचा भावार्थ समजावा. न्यासकाराचे मत अगदीच चूक असल्यामुळें, ते मत उद्धृत करणे हेच त्याचे खण्डन करणे होय हा आशय मनात धरून प्रक्रियाकौमुदीकारानी 'त्वत्कपितृकः' इत्यादि पुढील पक्ति लिहिली आहे. (असे मानावे.) प्राचीन वैयाकरणाच्या प्रसिद्ध ग्रन्थाचे ज्यांनी परिशीलन—विचारपूर्वक अध्ययन—केले आहे त्यांना वरप्रमाणे केलेले व्याख्यान योग्य आहे हे कळून येईल (प्रक्रियाकौमुदीकारानी प्रकृत सूत्रावर आपल्या ग्रन्थात जी वृत्ति लिहिली आहे ती पूर्वी मनोरमेत दिलीच आहे, व ती वृत्ति समोर ठेवून त्या वृत्तीचे दीक्षितानी केलेले व्याख्यान वाचले असता, ते नीट ध्यानात येईल.) आता आपण प्रकृत विषयाकडे वळू. (प्रकृत सूत्रावरील कौमुदीचे व्याख्यान करिताना दीक्षितानी मधेंच प्रक्रियाकौमुदीकार व त्यांचे टीकाकार यानी प्रकृत सूत्राचे जें व्याख्यान केले आहे ते कसे चूक आहे हें सिद्ध करण्याकरिताच मनोरमेंत बरीच टीका केली व आता ते प्रकृत सूत्रावरील कौमुदीच्या अवशिष्ट भागाचे व्याख्यान करण्यास सुरुवात करतात.) प्रकृत सूत्रावरील कौमुदीत 'अतः सज्ञाकार्यमन्तर्गणकार्यं च तेषां न भवति' असे जें म्हटले आहे त्यातील 'सज्ञाकार्यम्' या पदाचा 'सर्वनामसज्ञेच्या निमित्तामुळें होणारे 'स्मै' इत्यादि आदेशरूप कार्यं', म्हणजे सू. २१४–२१७ या सूत्रानी होणारी विशेष कार्यें, असा अर्थ आहे आणि 'अन्तर्गणकार्यम्' या पदाचा 'अद्ड्–डतरादिभ्यः पञ्चभ्यः.' सू. ३१५, 'त्यदादीनाम.' सू. २६५ व 'तदो. सः सौ' सू. ३८१ इत्यादि सूत्रानी होणारी कार्यें

असा अर्थ आहे. (सर्वादिगणांत एकंदर पसतीस शब्द पठित आहेत. या मोठ्या गणांत 'त्यदादि', 'डतरादि' असे कांहीं लहान गण अन्तर्भूत आहेत व या अन्तर्गणांत निर्दिष्ट असलेल्या शब्दांना जीं विशेष कार्यें पाणिनीय सूत्रांनीं होणें सांगितलीं आहेत तीं अन्तर्गण-कार्यें होत. उदाहरणार्थ सर्वादिगणांत त्यदादिगण अन्तर्भूत असून त्या त्यदादिगणांत 'त्यद्' या शब्दापासून 'द्वि' या शब्दापर्यंत पठित असलेले शब्द येतात व त्या शब्दांपुढें विभक्तिप्रत्यय आला असतां, त्यांच्या अन्त्य वर्णाचे जागीं अकारादेश होतो हें अन्तर्गणकार्य 'त्यदादीनामः' या सूत्रानें होणें सांगितलें आहे. त्याचप्रमाणें डतर-प्रत्ययान्त, डतमप्रत्ययान्त, 'अन्य, अन्यतर, इतर' या एकंदर पांच शब्दांपुढें येणाऱ्या 'सु' व 'अम्' या विभक्तिप्रत्ययांचे जागीं नपुंसक-लिङ्गामध्यें 'अद्ड्' आदेश होतो हें अन्तर्गणकार्य 'अद्ड्डतरादिभ्यः पञ्चभ्यः' या सूत्रानें होणें सांगितलें आहे. या वरील कार्यांना अन्तर्गणकार्यें असें म्हणतात.)

**मनोरमा–तृतीयासमासार्थे ति । इह "पूर्वसदृश" इति विहितः समासो गृह्यते प्रतिपदोक्तत्वात् । न तु "कर्तृकरणे कृता" इति । तेन त्वयका कृतमित्यत्र निषेधो न ।**

'तृतीयासमासे' सू. २२३ या सूत्रावरील कौमुदींत 'तृतीया-समासार्थवाक्येऽपि न' असें म्हटलें आहे व या सूत्रांतील 'तृतीया-समासे' या पदानें 'पूर्वसदृश' सू. ६९३ या सूत्रानें होणाऱ्या समासाचें ग्रहण होतें; कारण हा प्रतिपदोक्त तृतीयासमास आहे. 'कर्तृकरणे कृता बहुलम्' सू. ६९४ या सूत्रानें होणाऱ्या तृतीया-समासाचें प्रकृत सूत्रांतील 'तृतीयासमास' या पदानें ग्रहण होत नाहीं. त्यामुळें 'त्वयका कृतम्' या उदाहरणांत सर्वनामसंज्ञेचा निषेध होत नाहीं. ('तृतीया तत्कृतार्थेन गुणवचनेन सू. ६९२ या सूत्रापासून 'भक्ष्येण मिश्रीकरणम्' सू. ६९७ या सूत्राच्या अखेरपर्यंत जीं सहा सूत्रें अष्टाध्यायींत पठित केलीं आहेत तीं तृतीयातत्पुरुषसमासाचें

विधान करणारी सूत्रें होत. या सहा सूत्रांपैकीं 'पूर्वसदृश' हें एकच असे सूत्र आहे की, ज्यात 'पूर्व' या सर्वनामसंज्ञक शब्दाचा निर्देश केला असून त्या सर्वनामाशी तृतीयातत्पुरुषसमास होणे सांगितले आहे. इतर पाच सूत्रात कोणत्याहि सर्वनामसंज्ञक शब्दाचा निर्देश केला नाही म्हणून 'पूर्वसदृश' या सूत्रानें 'पूर्व' या सर्वनामाशी जो तृतीयातत्पुरुषसमास होतो त्याचेच सर्वनामसंज्ञानिषेधक प्रकृत सूत्रातील 'तृतीयासमासे' या पदानें ग्रहण होतें आणि म्हणूनच प्रकृत सूत्रावरील कौमुदीत 'मासेन पूर्वाय मासपूर्वाय' हें प्रकृत सूत्राचे उदाहरण दिले आहे. या स्थली 'मासेन' या तृतीयान्त पदाशी 'पूर्व' या सर्वनामसंज्ञक शब्दाचा तृतीयातत्पुरुषसमास झाला असल्यामुळे, 'पूर्व' या शब्दाची सर्वनामसंज्ञा नाहीशी होते. त्यामुळें 'मासपूर्वस्मै' असे रूप न होता 'मासपूर्वाय' असे रूप होते. 'विभाषा दिक्समासे बहुव्रीहौ' या पूर्व सूत्रातून प्रकृत सूत्रात 'समासे' या पदाची अनुवृत्ति होत असून देखील, पुन्हा प्रकृत सूत्रात 'समासे' या पदाचे जें ग्रहण केले आहे ते अशाकरिता की, तृतीयासमास करण्याकरिता जें लौकिक विग्रहवाक्य केले जाते व ज्याला 'तादर्थ्यात्ताच्छब्द्यम्' या न्यायान्वयें गौणरूप तृतीयासमास म्हणता येते त्याचे देखील मुख्य तृतीयासमासाप्रमाणे ग्रहण व्हावे आणि म्हणूनच 'तृतीयासमासार्थवाक्येऽपि न' असे दीक्षितानी प्रकृत सूत्रावरील कौमुदीत म्हटले आहे. 'तृतीयासमासे' सू. १-१-३० या सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात – 'समास इति वर्तमाने पुनः समासग्रहणं किमर्थम् ? । अयं तृतीयासमासोऽप्यस्त्येव प्रायमवलिपको यस्मिन्नैकपद्यमैकस्वर्यमेकविभक्तिकत्वं च । अस्ति तादर्थ्यात्ताच्छब्द्यं तृतीयासमासार्थानि पदानि तृतीयासमास इति । तद्यत्तादर्थ्यात्ताच्छब्द्यं तस्येदं ग्रहणम् ।' या भाष्याचा भावार्थ हा आहे की, पूर्व सूत्रातून प्रकृत सूत्रात 'समास' या पदाची अनुवृत्ति होत असून, पुन्हा प्रकृत सूत्रात 'समासे' या पदाचे ग्रहण जें केले आहे 'तृतीयासमास' असा शब्द उच्चारला असतां,

ज्यामध्यें अनेक पदांचें मिळून एक सामासिक पद तयार होतें व ज्याला एकच स्वर होतो आणि एकच विभक्तिप्रत्यय लागतो तशा मुख्य तृतीयातत्पुरुषसमासाची कल्पना एकदम मनांत येते. परंतु एखादी वस्तु तयार करण्याकरितां जी एक विशेष प्रकारची अवस्था मांडण्यांत येते त्या अवस्थेलाहि त्या वस्तूचें नांव देण्याची लोकांत प्रथा आहे. म्हणून तृतीयासमास करण्याकरितां जें लौकिक विग्रह-वाक्य तयार केलें जातें त्याला देखील 'तृतीयासमास' असें म्हणतां येतें आणि प्रकृत सूत्रांतील 'तृतीयासमासे' या शब्दानें अशा लौकिक विग्रहवाक्याचें देखील ग्रहण व्हावें याकरितां प्रकृत सूत्रांत 'समासे'-या पदाचें मुद्दाम ग्रहण केलें आहे. त्यामुळें 'मासपूर्वाय, संवत्सरपूर्वाय' इत्यादि मुख्य तृतीयासमासांत जसा सर्वनामसंज्ञेचा निषेध होतो त्याचप्रमाणें 'मासेन पूर्वाय, संवत्सरेण पूर्वाय' या लौकिक विग्रह-वाक्यांत देखील 'तादर्थ्यात्ताच्छब्द्यम्' या वचनान्वयें सर्वनामसंज्ञेचा निषेध होतो. त्यामुळें 'मासेन पूर्वस्मै, संवत्सरेण पूर्वस्मै' असे प्रयोग होऊं शकत नाहींत. 'कर्तृकरणे कृता बहुलम्' सू. ६९४ या सूत्रानें होणाऱ्या 'त्वया कृतं त्वत्कृतम्' या तृतीयासमासाचें प्रकृत सूत्रांतील 'तृतीयासमासे' या पदानें ग्रहण होत नसल्यामुळें, 'त्वया' या सर्वनामाची सर्वनामसंज्ञा नाहींशी होत नाहीं व 'त्वया' या सर्वनामसुबन्ताहून 'ओकारसकारभकारादौ सुपि सर्वनाम्नः टेः प्राक् अकच्, अन्यत्र तु सुबन्तस्य टेः प्रागकच्'-सू. २०२८ वरील वार्तिक-या वार्तिकान्वयें 'अकच्' प्रत्यय होऊन 'त्वयका कृतम्, त्वकत्कृतम्' हा प्रयोग साधु ठरतो.)

शब्दरत्न-प्रतिपदोक्तत्वादिति । यदन्तत्वमादाय सर्वनामत्व-प्राप्तिस्तमुच्चार्य विहितत्वाद् । वाक्यमपि तत्सम्बन्ध्येव, प्रत्यासत्ते-रिति भावः । तेन करोतिद्वारा सामर्थ्ये मासेन कृताय पूर्वस्मै मास-पूर्वस्मै इति समासे, तत्सम्बन्धिनि वाक्ये च न । तत्र वाक्यस्य प्रतिपदोक्तसमाससम्बन्धिन एव ग्रहणे फलान्तरमप्याह-त्वयकेति ।

तृतीयासमासमात्रस्यग्रहणे हि तदर्थे वाक्ये यत्र क्वापि स्थितस्य सर्वादेः संज्ञा नेत्यर्थेऽत्रापि स्यादिति भावः ।

मनोरमेंत 'पूर्वसदृश' या सूत्रानें होणाऱ्या प्रतिपदोक्त तृतीयासमासाचे प्रकृत सूत्रानें ग्रहण होते असे जें म्हटले आहे त्याचे कारण हे की, जो शब्द समासाच्या अन्ती असता, समासाला तदन्तत्वामुळें सर्वनामसंज्ञा होण्याची प्राप्ति आहे तो 'पूर्व' शब्द त्या सूत्रात उच्चारून तृतीयासमास होण्याचे विधान केले आहे ज्या लौकिक विग्रहवाक्यात सर्वनामसंज्ञेचा प्रकृत सूत्रानें निषेध केला आहे ते, प्रत्यासत्तिन्यायान्वयें, 'पूर्वसदृश' या सूत्रानें होणाऱ्या तृतीयासमासाचेच लौकिक विग्रहवाक्य घेतले जाते. इतर प्रकारच्या लौकिक विग्रहवाक्याचे प्रकृत सूत्रानें ग्रहण करता येत नसल्यामुळें, तृतीयाविभक्तीचा 'पूर्व' या शब्दामध्यें अन्वय होण्याकरिता 'कृ' धातूचे रूप मध्यें घालून 'मासेन कृताय पूर्वस्मै मासपूर्वस्मै' या ('तृतीया तत्कृतार्थेन गुणवचनेन' सू. ६९२ या सूत्रानें होणाऱ्या) तृतीयासमासात किंवा त्या समासाच्या लौकिक विग्रहवाक्यात सर्वनामसंज्ञेचा निषेध होत नाही (व त्यामुळें समासात व विग्रहवाक्यात 'ङे' चे जागी 'स्मै' आदेश होतो, कारण हा समास 'पूर्वसदृश' या सूत्रानें झालेला समास नसून वर सांगितल्याप्रमाणे 'तृतीया तत्कृतार्थेन' सू. ६९२ या सूत्रानें झालेला समास आहे म्हणून त्याला 'तृतीयासमासे' हा प्रकृत निषेध लागू पडत नाहीं व समासातील किंवा विग्रहवाक्यातील 'पूर्व' या शब्दाची सर्वनामसंज्ञा नष्ट होत नाही) 'पूर्वसदृश' या सूत्रानें होणाऱ्या प्रतिपदोक्त तृतीयासमासाकरिता केलेल्या लौकिक विग्रह-वाक्यालाच प्रकृत निषेधक सूत्र लागू पडत असल्यामुळें, 'त्वयका कृतम्' हें दुसरे फल दीक्षित मनोरमेंत सांगतात. जर कोणत्याहि सूत्रानें होणाऱ्या तृतीयासमासाचे व त्या समासाकरिता केलेल्या लौकिक विग्रह-वाक्याचे प्रकृत निषेधक सूत्रानें ग्रहण झाले असतें तर, ते निषेधक सूत्र कोणत्याहि तृतीयासमासात किंवा त्या समासाकरिता केलेल्या लौकिक

विग्रहवाक्यांत असलेल्या सर्वादि सर्वनामसंज्ञक शब्दाला लागू पडलें असतें आणि त्यामुळें 'त्वयका कृतम्' या तृतीयासमासाच्या लौकिक विग्रहवाक्याला देखील तें सूत्र लागू पडण्याची आपत्ति आली असती (व 'त्वयका कृतं त्वकत्कृतम्' हा इष्ट प्रयोग सिद्ध होऊं शकला नसता.)

मनोरमाः– समुदायस्यैति । तत्रैव द्वन्द्वशब्दस्य मुख्यत्वान्न तु द्वन्द्वे यानिसर्वादीनीति सम्बन्धः, कारकाणां क्रिययैवान्वयात् । न च द्वन्द्वे विद्यमानानि यानीति सम्बन्धः, विद्यतिक्रियाध्याहारे गौरवात् ।– निषेध्याया भवतिक्रियाया एव प्राधान्येन तदन्वयस्यैवन्याय्यत्वाच्च । किं च त्यदादीनां द्वन्द्वो नास्ति, एकशेषेण बाधितत्वात् । ततः प्राचीनास्त्वदन्तास्तत्र काकचोर्न विशेषः । न च दक्षिणोत्तरपूर्वाणा-मित्यत्रेष्टमपि पुंवद्भावं निषेधुमिदं किं न स्यादिति वाच्यम् । "सर्वनाम्नो वृत्तिमात्र" इति मात्रग्रहणं हि क्वचित्सर्वनामत्वेन दृष्टानां सम्प्रति संज्ञाभावेऽपि पुंवद्भावार्थम् । अतएव दक्षिणपूर्वायै इत्यत्र संज्ञाभावेऽपि पुंवद्भावः । तस्माद् न्यायबलात् फलबलाच्च समुदायग्रहणमेवोचितम् । यद्यपि त्वच्छब्दस्तान्त इति पक्षेऽवयव-निषेधेऽपि फलं सुवचम् । तथाऽपि शास्त्रस्याल्पविषयता स्याद् न्यायश्च विरुध्येतेति भावः । सुदृप्रसङ्ग इति । वर्णाश्रमेतराणामि-त्यादाविति भावः । न च निषेधसामर्थ्यम् । अनाङ्कत्यं त्रतसिलादेर्व्या-वृत्त्या चरितार्थत्वात् ।

'द्वन्द्वे च' सू. २२४ या सूत्रावरील कौमुदींत 'समुदायस्यै-वायं निषेधः, तत्ययवानाम्' असें जें म्हटलें आहे त्याचें कारण हें कीं, 'द्वन्द्व' हा शब्द, म्हणजे 'द्वन्द्व' ही संज्ञा, प्राधान्यानें समुदाया-लाच लागू पडते. 'द्वन्द्वे यानि सर्वादीनि (तानि सर्वनामसंज्ञ-कानि न भवन्ति)' असा अन्वय करणें बरोबर नाहीं; कारण कारकांचा क्रियेशींच अन्वय होत असतो. ('द्वन्द्वे यानि सर्वादीनि' असा अन्वय केल्यास, 'द्वन्द्वे' या अधिकरणरूप कारकाचा 'भवति' या

क्रियेशी अन्वय न होता, 'सर्वादीनि' या सुबन्ताशी अन्वय होतो परंतु 'क्रियान्वयि कारकम्' अशी कारकाची व्याख्या असल्यामुळें, जेथें कारकाचा विधेयाशी साक्षात् अन्वय होणे संभवते तेथें उद्देश्याशी अन्वय करणे योग्य नाही असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे ) 'द्वन्द्वे विद्यमानानि यानि सर्वादीनि (तानि सर्वनामसंज्ञकानि न भवन्ति)' असा देखील अन्वय करणे योग्य नाही, कारण तसा अन्वय केल्यानें 'विद्यति' या क्रियेचा अध्याहार करावा लागतो व तसे करण्यात गौरव आहे 'द्वन्द्वे च' या प्रकृत सूत्रात ज्या 'भवति' क्रियेचा ('द्वन्द्वे = द्वन्द्वस्य सर्वनामसंज्ञा न भवति' अशा रीतीनें) निषेध केला जातो ती प्रधान क्रिया असल्यामुळें, त्या प्रधान क्रियेंतच 'द्वन्द्वे' या कारकाचा अन्वय होणे योग्य आहे. ('द्वन्द्वे विद्यमानानि यानि सर्वादीनि' असा अन्वय केल्यानें जरी 'द्वन्द्वे' या अधिकरणकारकाचा 'विद्यमानानि' या क्रियेशी अन्वय होतो तरी ती क्रिया अध्याहृत करावी लागते व ज्याअर्थी 'भवति' या प्रधान क्रियेशी त्या कारकाचा अन्वय होणे संभवते त्याअर्थी अध्याहृत गौण क्रियेशी त्या कारकाचा अन्वय करणे अयोग्य असून तसे करण्यात गौरव आहे ) दुसरे असे की, ('त्यदादीनि सर्वैर्नित्यम्' सू ९३८ या सूत्रानें) 'त्यदादि' शब्दाचा इतर शब्दाशी द्वन्द्वसमास न होता एकशेषच होत असतो, कारण एकशेष हा द्वन्द्वाचा बाधक आहे (म्हणून द्वन्द्वसमासात 'त्यदादि' हे शब्द अवयवरूपाने मिळणे असंभवनीय असल्यामुळें, तशा अवयवरूप सर्वनाम शब्दांना सर्वनामसंज्ञेचा निषेध करण्याची काहीच गरज नाही व तसा निषेध केल्यानें कोणतेहि फल निष्पन्न होत नाही ) 'त्यदादि' शब्दाच्या पूर्वी जे शब्द सर्वादिगणात पठित आहेत, म्हणजे 'सर्व' या शब्दापासून 'अन्तर' या शब्दापर्यंत जे शब्द पठित आहेत, ते सर्व शब्द अदन्त–अकारान्त– असल्यामुळें, त्या शब्दाहून 'अक्च्' प्रत्यय केला किंवा 'क' प्रत्यय केला तरी रूपात काहीच फरक पडत नाही (म्हणून त्या अकारान्त सर्वनामसंज्ञक शब्दांना सर्वनामसंज्ञेचा निषेध केल्यानें काहीच फलनिष्पत्ति

होत नसल्यामुळें, त्यांना देखील सर्वनामसंज्ञानिषेध करणें व्यर्थ ठरतें हें उघड आहे.) 'दक्षिणोत्तरपूर्वाणाम्' या द्वन्द्वसमासांत जरी ('सर्वनाम्नो वृत्तिमात्रे पुंवद्भावः'–सू. ७२८ वरील वार्तिक–या वार्तिकान्वयें 'उत्तरा' या स्त्रीलिंग सर्वनामरूप अवयवाला) पुंवद्भाव होणें इष्ट असलें तरी, त्या अवयवाला त्या वार्तिकान्वयें होणारा पुंवद्भाव न व्हावा याकरितां (द्वन्द्वसमासांतील सर्वनामरूप अवयवांना सर्वनामसंज्ञा न व्हावी यासाठीं) 'द्वन्द्वे च' हें प्रकृत सूत्र केलें आहे असें कां म्हणूं नये असें कोणीं म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण 'सर्वनाम्नो वृत्तिमात्रे पुंवद्भावः' या वार्तिकांत साकल्यार्थवाचक जें 'मात्र' शब्दाचें ग्रहण केलें आहे तें अशाकरितां केलें आहे कीं, ज्यांना पूर्वी सर्वनामसंज्ञा होती व ती सांप्रत नष्ट झाली तशा भूतपूर्व सर्वनामांना देखील पुंवद्भाव व्हावा. अशाकरितां तें वार्तिक केलें असल्यामुळेंच, 'दक्षिणपूर्वायै' या स्थलीं सर्वनामसंज्ञेचा अभाव असून देखील पुंवद्भाव झाला आहे. ('दक्षिणा पूर्वा यस्याः तस्यै दक्षिणपूर्वायै' या बहुव्रीहिसमासांत 'दक्षिणा' हें स्त्रीलिङ्ग सर्वनाम अन्यपदार्थाचें उपसर्जन झालें असल्यामुळें, 'उपसर्जनीभूता न सर्वादयः' या वार्तिकानें त्याची सर्वनामसंज्ञा नष्ट होते. तरी पण त्याला पूर्वी सर्वनामसंज्ञा होती व सांप्रत उपसर्जनत्वामुळें त्याची सर्वनामसंज्ञा नष्ट झाली असल्यामुळें त्याच्या भूतपूर्वसंज्ञेचा आश्रय करून 'सर्वनाम्नो वृत्तिमात्रे' या वार्तिकानें जसा पुंवद्भाव करतां येतो तसाच 'दक्षिणोत्तरपूर्वाणाम्' या स्थलीं देखील 'उत्तरा' या स्त्रीलिङ्ग सर्वनामाची सर्वनामसंज्ञा 'द्वन्द्वे च' या सूत्रानें नष्ट झाली आहे असें मानलें तरी, त्याला पूर्वी जी सर्वनामसंज्ञा होती त्या सर्वनामसंज्ञेचा आश्रय केल्यानें, त्याचा पुंवद्भाव होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. म्हणून द्वन्द्वसमासांतील सर्वनामरूप अवयवांना सर्वनामसंज्ञेचा निषेध केल्यानें कोणतेंहि फल निष्पन्न होत नसल्यामुळें, द्वन्द्वसमासांतील अवयवांना सर्वनामसंज्ञेचा निषेध न करितां समुदायालाच प्रकृत सूत्रानें सर्वनामसंज्ञेचा निषेध करणें

योग्य आहे असा दीक्षिताच्या म्हणण्याचा भावार्थ आहे. म्हणून दीक्षित म्हणतात की) न्यायाच्या बलानें व फलाच्या बलानें प्रकृत सूत्रातील 'द्वन्द्वे' या शब्दानें समुदायाचेच ग्रहण करणे उचित आहे ('कारकाणा क्रियर्यैवान्वयात्' असा न्याय असल्यामुळें व द्वन्द्व-समासातील सर्वनामरूप अवयवाला सर्वनामसंज्ञेचा निषेध केल्यानें वर सांगितल्याप्रमाणे कोणतेहि फल निष्पन्न होत नसल्यामुळें व द्वन्द्वसमासानें निष्पन्न झालेल्या सर्वनामान्त सामासिक शब्दरूप समुदायाला सर्वनामसंज्ञेचा निषेध केल्यानें 'वर्णाश्रमेतराणाम्' इत्यादि अनेक इष्ट रूपाची सिद्धि होऊन तो निषेध सफल ठरत असल्यामुळें, द्वन्द्वसमासातील सर्वनामरूप अवयवाना सर्वनामसंज्ञेचा निषेध न करिता, सर्वनामान्त द्वन्द्वसमासाला सर्वनामसंज्ञेचा निषेध करणे योग्य आहे असे दीक्षिताचे म्हणणे आहे आता 'त्यदादि' शब्दापूर्वी पठित असलेल्या सर्वादिगणातील शब्दामध्यें) 'त्वत्' असा तकारान्त शब्द पठित आहे (व 'त्व' असे दोन अकारान्त शब्द पठित नाहींत) असा पक्ष मानल्यास, प्रकृत सूत्रानें द्वन्द्वसमासातील सर्वनामरूप अवयवाना देखील सर्वनामसंज्ञेचा निषेध केला आहे असे मानल्यानें फलात फरक दाखविता येतो असं म्हणतो येऊ शकेल तरी, प्रकृत सूत्राचा तसा अर्थ केल्यास (त्याला प्रवृत्त होण्याकरिता 'त्वत्' हे एकच उदाहरण मिळू शकत असल्या-मुळें) तें सूत्र अल्पविषयक ठरते, म्हणजे त्या सूत्राच्या प्रवृत्तीचे क्षेत्र अत्यन्त संकुचित ठरण्याचा प्रसग येतो व ('कारकाणा क्रियर्यै-वान्वय' या) न्यायाशी देखील विरोध येतो ('त्वत्' व 'इतर' या दोन शब्दांचा द्वन्द्वसमास केल्यास, 'त्वत्' या सर्वनामरूप अवयवाची सर्वनामसंज्ञा प्रकृत सूत्रानें नष्ट होते असे मानले तर, 'त्वत्' शब्दाहून 'अकच्' प्रत्यय न होता 'क' प्रत्यय होऊन 'त्वत्केतरौ' असे सामासिक रूप होईल परतु प्रकृत सूत्रानें द्वन्द्वसमासालाच तदन्तत्वामुळें प्राप्त होणाऱ्या सर्वनामसंज्ञेचा निषेध केला आहे व त्या समासातील सर्वनामरूप अवयवांना सर्वनामरूपसंज्ञेचा निषेध

केला नाहीं असें मानलें तर, 'त्वत्' याहून 'अकच्' प्रत्यय होऊन 'त्वकदितरौ' असें सामासिक रूप होईल व अशा रीतीनें फलांत फरक दाखवितां येणें शक्य आहे. तथापि प्रकृत सूत्रानें द्वन्द्वसमासांतील सर्वनामरूप अवयवांना सर्वनामसंज्ञेचा निषेध केला आहे असें मानल्यानें तें सूत्र 'त्वत्' या एकाच सर्वनामाचे ठिकाणीं चरितार्थ होऊं शकेल. पण 'नैकमुदाहरणं योगारम्भं प्रयोजयति' असा न्याय असल्यामुळें, एकाच उदाहरणाकरितां पाणिनीनें प्रकृत सूत्र केलें आहे असें मानणें अयोग्य ठरतें आणि सर्वनामान्त द्वन्द्वसमासाला सर्वनामसंज्ञेचा निषेध केला आहे असें मानल्यानें त्या सूत्राला अनेक उदाहरणें मिळून तें सूत्र अनेक ठिकाणीं चरितार्थ ठरूं शकत असल्यामुळें व त्या सूत्राचा असा अर्थ केल्यानें 'कारकाणां क्रिययैवान्वयः' या न्यायाशीं विरोध येत नसल्यामुळें, कौमुदींत जसा प्रकृत सूत्राचा अर्थ केला आहे तसाच अर्थ करणें योग्य आहे असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे.) 'न चैवं तदन्तविधिना सुट्प्रसङ्गः' असें जें प्रकृत सूत्रावरील कौमुदींत म्हटलें आहे तें 'वर्णाश्रमेतराणाम्' इत्यादि उदाहरणांना अनुलक्षून म्हटलें आहे. 'द्वन्द्वे च' या प्रकृत निषेधक सूत्रानें द्वन्द्वसमासरूप समुदायाला सर्वनामसंज्ञेचा निषेध केला असल्यामुळें, त्या निषेधाच्या सामर्थ्यानेंच 'वर्णाश्रमेतराणाम्' या स्थलीं 'आम्' प्रत्ययाला 'सुट्' आगम होण्याची आपत्ति येत नाहीं असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण 'द्वन्द्वे च' हा निषेध, अङ्गाधिकारांत पठित नसलेले व सर्वनामाहून होणारे 'स, स्मिन्' इत्यादि प्रत्यय (सर्वनामान्त द्वन्द्वसमासाहून) न होण्यामध्यें, चरितार्थ ठरतो. (शंकाकाराचें असें म्हणणें आहे कीं, 'द्वन्द्वे च' या सूत्रानें सर्वनामान्त द्वन्द्वसमासाला सर्वनामसंज्ञेचा निषेध केला असल्यामुळें, 'वर्णाश्रमेतराणाम्' या द्वन्द्वसमासाला सर्वनामसंज्ञा होत नाहीं व त्यामुळें 'आमि सर्वनाम्नः सुट्' सू. २१५ या सूत्रानें 'आम्' प्रत्ययाला होणाऱ्या सुडागमाची प्राप्तीच होत नाहीं. या शंकेवर

दीक्षित असे उत्तर देतात की, 'द्वन्द्वे च' हा निषेध अङ्गाधिकारात पठित नसलेल्या 'त्र, तसिल्' इत्यादि प्रत्ययाची निवृत्ति करण्यात चरितार्थ ठरत असल्यामुळें, तो निषेध 'पदाङ्गाधिकारे तस्य च तदन्तस्य च'–परि. २९–या परिभाषेचा बाध करू शकत नाही. म्हणून 'वर्णाश्रमेतराणाम्' या द्वन्द्वसमासात 'इतर' हा सर्वनामसंज्ञक शब्द समासाच्या अन्ती असल्यामुळें व प्रकृत सूत्रानें त्या अवयवाची सर्वनामसंज्ञा नष्ट होत नसल्यामुळें, अङ्गाधिकारात पठित असलेल्या 'आमि सर्वनाम्नः सुट्' या सूत्रानें वरील परिभाषेच्या सामर्थ्यानें, सर्वनामान्त समुदायाहून झालेल्या 'आम्' प्रत्ययाला सुडागम होण्याचा प्रसंग येतो. परंतु 'आमि सर्वनाम्नः सुट्' या सूत्राचा 'सर्वनाम्नो विहितः य. आम् तस्य सुट्' असा अर्थ केल्यानें तो प्रसंग टळतो; कारण या उदाहरणात 'इतर' या सर्वनामरूप अवयवाहून 'आम्' प्रत्यय झाला नसून 'वर्णाश्रमेतर' या समुदायाहून तो प्रत्यय झाला असल्यामुळें व त्या समुदायाला प्रकृत सूत्रानें सर्वनामसंज्ञेचा निषेध केला असल्यामुळें, 'आमि सर्वनाम्नः सुट्' या सूत्राची या स्थली प्रवृत्ति होऊ शकत नाही व सुडागम होण्याची आपत्ति टळते.)

शब्दरत्न–व्याप्यत्वाच्चेति । किं चावयवमात्रनिषेधे "प्रयोजनं सर्वनामाव्ययसंज्ञायाम्" इति "येन विधिः" इति सूत्रस्थभाष्यप्रामाण्येन तदन्तस्य संज्ञायां वर्णाश्रमेतराणामिति भाष्यप्रयोगानुपपत्तिः । न ह्यत्र सर्वार्थवाचकत्वं नास्तीति वक्तुं शक्यं मानाभावात् । लोकव्युत्पत्तिसिद्धस्य तस्यानेन निषेद्धुमशक्यत्वात् । नापि तस्य सर्वादिपाठो निषिध्यत इति युक्तम् । तस्याऽप्रधानत्वादविधेयत्वाच्च । न च निषेधवैयर्थ्यम् । अवयवभूतसाधोपसर्जनस्यावृत्त्या चारितार्थ्यात् । तदेव ध्वनयन्नाह–फलबलाच्चेति । फलं सुवचमिति । तथा दक्षिणोत्तरपूर्वाणामित्यादावयवनिषेधेन चप्रत्यये समुदायसंज्ञाभावोऽपि फलम् । द्वन्द्वावयवमात्रे सुन्दरादिविशेषणान्वया-

भाववत् कुत्सादिविवक्षाया असंभावः । समुदाये तद्विवक्षायान्तु समुदायोत्तरप्रत्ययेन तदुक्तेरवयवात्तदुत्पत्तिरिति चिन्त्यमेतत् ।

'भवतिक्रियाया एव प्राधान्येन तदन्वयस्यैव न्याय्यत्वाच्च' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याखेरीज असें देखील म्हणतां येतें कीं, प्रकृत सूत्रानें द्वन्द्वसमासांतील सर्वनामरूप अवयवालाच सर्वनामसंज्ञेचा निषेध केला आहे (व सर्वनामान्त द्वन्द्वसमासरूप समुदायाला सर्वनामसंज्ञेचा निषेध केला नाहीं) असें मानल्यास, 'येन विधिस्तदन्तस्य' सू. १–१–७२ या सूत्रावरील भाष्यांत त्या सूत्राचीं प्रयोजनें सांगतांना भाष्यकारांनीं 'प्रयोजनं सर्वनामाव्ययसंज्ञायाम्', म्हणजे सर्वनामसंज्ञा आणि अव्ययसंज्ञा ही ज्या शब्दांना सांगितली आहे ते शब्द अन्तीं असलेल्या शब्दांनाहि ती संज्ञा होते हें त्या सूत्राचें एक प्रयोजन आहे, असें जें प्रयोजन सांगितलें आहे त्या प्रमाणभूत भाष्यांतील प्रयोजनान्वयें, सर्वनामान्त 'वर्णाश्रमेतर' या द्वन्द्वसमासरूप समुदायाला तदन्तविधीनें सर्वनामसंज्ञा होईल व त्यामुळें 'वर्णाश्रमेतराणाम्' असा जो भाष्यांत प्रयोग केला आहे तो अयोग्य ठरण्याची आपत्ति येईल. (प्रकृत सूत्रानें द्वन्द्वसमासांतील सर्वनामरूप अवयवाला सर्वनामसंज्ञेचा निषेध केला आहे व द्वन्द्वसमासरूप समुदायाला तदन्तविधीनें प्राप्त होणाऱ्या सर्वनामसंज्ञेचा निषेध केला नाहीं असें मानलें तर, 'वर्णाश्रमेतर' या द्वन्द्वसमासाच्या अन्तीं 'इतर' हा सर्वनामसंज्ञक शब्द असल्यामुळें, त्या समुदायाला सर्वनामसंज्ञा होईल व त्याहून होणाऱ्या 'आम्' प्रत्ययाला 'आमि सर्वनाम्नः सुट्' सू. २१७ या सूत्रानें 'सुट्' आगम होऊन 'वर्णाश्रमेतरेषाम्' असें रूप होईल व भाष्यांत 'वर्णाश्रमेतराणाम्' असा जो प्रयोग केला आहे तो चूक ठरण्याची आपत्ति येईल. ती आपत्ति टाळण्याकरितां द्वन्द्वसमासरूप समुदायाला तदन्तविधीनें प्राप्त होणाऱ्या सर्वनामसंज्ञेचा प्रकृत सूत्रानें निषेध केला आहे हें मानणें भाग आहे. यावर शंकाकार अशी शंका करतो कीं, प्रकृत सूत्रानें द्वन्द्वसमासांतील सर्वनामरूप अवयवाला सर्वनामसंज्ञेचा निषेध

केला आहे असे मानले असता, 'वर्णाश्रमेतर' या द्वन्द्वसमासाच्या अन्ती असणाऱ्या 'इतर' या सर्वनामरूप अवयवाला सर्वनामसंज्ञेचा निषेध होत असल्याकारणानें, 'वर्णाश्रमेतर' हा द्वन्द्वसमासरूप समुदाय सर्वनामान्त आहे असे मानता येत नाही व त्यामुळें त्या समुदायाला तदन्तविधीने सर्वनामसंज्ञा होत नाही आणि म्हणून त्या समुदायाहून होणाऱ्या 'आम्' प्रत्ययाला सुडागम होण्याची व 'वर्णाश्रमेतरेषाम्' असा प्रयोग होण्याची आपत्ति मुळीच येत नाही या शंकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, ) 'वर्णाश्रमेतर' या द्वन्द्वसमासाच्या अन्ती असणारा 'इतर' हा शब्द सर्वार्थवाचक नाही असे मानण्यास काहीच प्रमाण नसल्यामुळें, तो शब्द सर्वार्थवाचक नाही असे म्हणता येणे शक्य नाही. (शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय हा आहे की, 'वर्णाश्रमेतर' या समुदायातील 'इतर' या अन्त्य पदाला प्रकृत सूत्रानें सर्वनामसंज्ञेचा निषेध केला तरी, तो शब्द समासात उपसर्जन झाला नसून, 'उभयपदार्थप्रधानो द्वन्द्वः' या वचनान्वयें, प्रधान असल्यामुळें, त्याचे ठिकाणी जी सर्वार्थवाचकता आहे ती कधी नाहीशी होणार ? ती नाहीशी होऊ शकत नसल्याकारणानें, त्या शब्दाचे ठिकाणी सर्वादित्व आहे असे मानणे भाग आहे व तसा सर्वार्थवाचक सर्वादिगणान्तर्भूत 'इतर' हा शब्द द्वन्द्वसमासाच्या अन्ती असल्यामुळें, 'प्रयोजनं सर्वनामाव्ययसंज्ञायाम्' या प्रमाणभूत भाष्यवचनान्वयें त्या समुदायाला तदन्तविधीनें सर्वनामसंज्ञा होण्याची व 'वर्णाश्रमेतरेषाम्' असे भाष्यविरुद्ध अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येते. सर्वनामान्त द्वन्द्वसमासरूप समुदायाला प्रकृत सूत्रानें सर्वनामसंज्ञेचा निषेध केला आहे असे मानल्यानेंच ती आपत्ति टळते. प्रकृत सूत्रावरील शब्देन्दुशेखरात देखील 'किञ्चावयवमात्रस्य निषेधे वर्णाश्रमेतराणामित्यत्र सर्वार्थवाचकमर्वादित्वेन समुदायसञ्ज्ञायां सुडापत्तिः, तस्य सञ्ज्ञानिषेधेऽपि सर्वार्थवाचकसर्वादित्वानपायात् ।' असेच म्हटले आहे. आता सर्वनामसंज्ञेचा निषेध केल्यानें सर्वार्थवाचकतेचा निषेध आपोआपच सिद्ध होतो असे शंका-

कारानें म्हटल्यास, त्यावर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं, ) 'वर्णाश्रमेतर' या द्वन्द्वसमासाच्या अन्तीं असणाऱ्या 'इतर' या शब्दाच्या लौकिक व्यवहारांत प्रसिद्ध असलेल्या सर्वार्थवाचकतेचा प्रकृत सूत्रानें निषेध करतां येणें शक्य नाहीं. ( शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा भावार्थ हा आहे कीं, सर्वादिगणांत पठित असलेल्या शब्दांची सर्वार्थवाचकता लौकिकव्यवहारसिद्ध असल्यामुळें, त्यांना सर्वनामसंज्ञेचा निषेध केला तरी त्यांची सर्वार्थवाचकता त्या योगानें नाहींशी होऊं शकत नाहीं; कारण कितीहि निषेध केलें तरी वस्तुस्थिति बदलतां येणें अशक्य आहे हें 'वचनशतेनापि वस्तुनोऽन्यथाकरणाशक्तेः' या न्यायावरून सिद्ध होतें. म्हणून 'वर्णाश्रमेतर' या समुदायाच्या अन्तीं 'इतर' हा सर्वार्थवाचक सर्वादिगणान्तर्भूत शब्द असल्यामुळें त्या समुदायाला तदन्तविधीनें सर्वनामसंज्ञा होण्याची आपत्ति येते व त्यामुळें 'वर्णाश्रमेतरेषाम्' असें अनिष्ट रूप होऊं पाहतें.) द्वन्द्वसमासांतील सर्वनामरूप अवयवांचा सर्वादिगणांत पाठ नाहीं असें मानावें अशा प्रकारचा प्रकृत सूत्रानें निषेध केला आहे असें देखील म्हणणें योग्य नाहीं; कारण तशा प्रकारचा निषेध प्रकृत प्रकरणांत आरंभिला नसून प्रकृत सूत्रांत तो विधेयरूपानें सांगितला नाहीं. ('वर्णाश्रमेतर' या द्वन्द्वसमासांतील 'इतर' हा अन्त्य शब्द प्रधान असून उपसर्जन नसल्यामुळें त्याची स्वभावसिद्ध लोकप्रसिद्ध सर्वार्थवाचकता नष्ट होऊं शकत नाहीं. त्यामुळें 'वर्णाश्रमेतर' हा समुदाय तदन्तविधीनें सर्वनामसंज्ञक ठरण्याची आपत्ति येते. 'उपसर्जनीभूता न सर्वादयः' या वार्तिकानें ज्याप्रमाणें उपसर्जन झालेले सर्वादि शब्द सर्वादिगणांत पठित नाहींत असें त्या वार्तिकांतील 'न सर्वादयः' या विधेयानें सांगितलें आहे तसें 'द्वन्द्वावयवीभूता न सर्वादयः' अशा प्रकारें प्रकृत सूत्रानें विधान केलें नाहीं. तसें विधान केलें असतें तर, द्वन्द्वसमासावयवीभूत सर्वनामें सर्वादिगणांत पठित नाहींत व त्याहून बहिर्भूत आहेत असें मानतां आलें असतें. पण तसें विधान केलें नसल्यामुळें,

'वर्णाश्रमेतरेषाम्' असे रूप होण्याची, वर सांगितल्याप्रमाणे जी आपत्ति येते ती टाळण्याकरितां हे मानणे भाग आहे की, प्रकृत सूत्रानें सर्वनामान्त द्वन्द्वसमासाला सर्वनामसंज्ञेचा निषेध केला आहे. 'द्वन्द्वावयवीभूता न सर्वादय' असा जर सर्वादिगणात) सर्वनामसंज्ञानिषेधक पाठ केला असता तर तो व्यर्थ ठरला असता असे म्हणतां येत नाहीं, कारण तसा पाठ केला असता तर, द्वन्द्वसमासातील सर्वनामरूप अवयवाहून त्या अवयवाची कुत्सा बोधित करणारा 'अकच्' प्रत्यय झाला नसता व अशा रीतीनें तो निषेधक पाठ चरितार्थ ठरला असता (पण तसा निषेधक पाठ न करितां 'द्वन्द्वे च' हे निषेधक सूत्र केले असल्यामुळें त्यावरून हें स्पष्ट होतें की, द्वन्द्वसमासातील सर्वनामरूप अवयवाला सर्वनामसंज्ञानिषेध होणे अभिप्रेत नसून द्वन्द्वसमासरूप समुदायालाच सर्वनामसंज्ञानिषेध होणे अभिप्रेत आहे ) आणि हे ध्वनित करण्याच्या हेतूनेंच 'फलाभावाच्च समुदायग्रहणमेवोचितम्' असे मनोरमेंत म्हटले आहे. 'यद्यपि स्वच्छन्दस्तान्त इति पक्षेऽवयवनिषेधेऽपि फल सुवचम्' असे जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याखेरीज, द्वन्द्वसमासातील सर्वनामरूप अवयवाला सर्वनामसंज्ञेचा निषेध केल्यानें 'दक्षिणोत्तरपूर्वकाणाम्' इत्यादि द्वन्द्वसमासांत 'पूर्व' या अवयवाला कुत्सार्थक ('अकच्' प्रत्यय न होतां) 'क' प्रत्यय होऊन त्यायोगानें द्वन्द्वसमासरूप समुदायाला जी ( तदन्तविधीनें ) सर्वनामसंज्ञेची प्राप्ति होती ती देखील (सामासिकशब्दरूप समुदायाच्या अन्तीं सर्वनामसंज्ञक नसणारा 'इतरक' हा 'क' प्रत्ययान्त शब्द येत असल्यामुळें) होऊं शकत नाहीं, असेंहि फल दाखवितां येतें (आतां 'यद्यपि ... फल सुवचम्' असे जें मनोरमेंत म्हटलें आहे त्या मताचें शब्दरत्नकार 'द्वन्द्वावयवमात्रे ... इति चिन्त्यमेतत्' या पुढील पङ्क्तीत खण्डन करितात ) द्वन्द्वसमासांतील केवळ अवयवाचे 'सुन्दर' इत्यादि शब्द जसे विशेषण मानतां येत नाहींत व त्या शब्दांचा त्या अवयवांत विशेषणरूपानें जसा अन्वय करतां येत नाहीं (व समुदायाचेंच

'सुन्दर' इत्यादि शब्द विशेषण मानतां येतात व त्यांतच विशेषणरूपानें अन्वित होतात ) त्याचप्रमाणें द्वन्द्वसमासांतील अवयवाचे ठिकाणीं कुत्सा इत्यादि अर्थाची विवक्षा नसते, म्हणजे द्वन्द्वसमास केल्यावर द्वन्द्वसमासांतील अवयवाहून कुत्साद्यर्थक प्रत्यय करतां येत नाहीं व तसा प्रत्यय समुदायाहूनच करतां येऊं शकतो, असें मानलें पाहिजे. समुदायाचे ठिकाणीं कुत्सा इत्यादि अर्थाची विवक्षा असल्यास, समुदायाहून कुत्साद्यर्थक प्रत्यय केला असतां, त्या प्रत्ययानें त्या समासांतील अवयवांची देखील कुत्सा बोधित होत असल्यामुळें, पुन्हा अवयवाहून कुत्साद्यर्थक प्रत्यय करतां येऊं शकत नाहीं आणि म्हणून 'अवयवनिषेधेऽपि फलं सुवचम्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे तें बरोबर आहे असें मानतां येत नाहीं. ('सुन्दररामलक्ष्मणौ' या द्वन्द्वसमासांतील 'सुन्दर' हा शब्द केवळ राम किंवा लक्ष्मण या अवयवाचें विशेषण होऊं शकत नाहीं. तो शब्द 'रामलक्ष्मणौ' या समुदायाचेंच विशेषण होऊं शकतो. तसेंच 'रामलक्ष्मणौ' असा द्वन्द्वसमास केल्यावर त्या समासांतील एकाच अवयवाचें सुंदरत्व बोधित करण्याकरितां 'सुन्दरः' या विशेषणाचा प्रयोग करतां येत नाहीं. त्याचप्रमाणें द्वन्द्वसमासांतील अवयवांची कुत्सा बोधित करण्याकरितां त्या समासांतील अवयवांहून कुत्सा-बोधक प्रत्यय करतां येत नाहीं. तसा प्रत्यय समुदायाहूनच करतां येतो व समुदायाहून तसा प्रत्यय केला असतां, तो प्रत्यय समासांतील प्रत्येक अवयवाची कुत्सा बोधित करणारा ठरत असल्यामुळें, 'उक्तार्थानामप्रयोगः' या न्यायान्वयें, पुन्हा अवयवांहून कुत्साबोधक प्रत्यय करतां येत नाहीं. सारांश द्वन्द्वसमासांतील सर्वनामरूप अवयवांहून कुत्साद्यर्थबोधक प्रत्यय करतां येऊं शकत नसल्यामुळें, 'अवयवनिषेधेऽपि फलं सुवचम्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे तें म्हणणें योग्य ठरत नाहीं. म्हणून द्वन्द्वसमासांतील सर्वनामरूप अवयवांना सर्वनामसंज्ञेचा निषेध करून कोणतेंहि फल निष्पन्न होत नसल्यामुळें, सर्वनामान्त द्वन्द्वसमासरूप समुदायालाच प्रकृत सूत्रानें

सर्वनामसंज्ञेचा निषेध केला आहे हेंच मानणें योग्य ठरतें असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे. आणखी असे की, सर्वादिगणांत 'त्वत्' असा तान्त शब्द पठित आहे असा पक्ष मानून दीक्षितानी 'अवयवनिषेधेऽपि फलं सुवचम्' असे म्हटलें आहे. पण तसा तान्त पाठ अनेक वैयाकरणांच्या मते अप्रामाणिक असल्यामुळे, 'अवयवनिषेधे फलाभावः' असेच मानणे उचित ठरते. )

शब्दरत्न-समुदायनिषेधे तु द्वन्द्वस्य संज्ञिनोऽधिकरणत्वविवक्षया सप्तमी बोध्या । यद्वा इयं सप्तमी प्रथमार्थे । "अकच्स्वरौ तु कर्तव्यौ प्रत्यङ्गं मुक्तसंशयौ" इति भाष्योक्तं तत्प्रकरणविषयमुस्यन्तरेण, तद्विषये "न बहुव्रीहौ" इत्येतत्साहचर्येण वा एतत्प्रकरणस्यसप्तमीनिर्देशानां तदर्थकत्वौचित्यात् । किं च "विभाषा जसि" इत्यनेन फलाभावादवयवनिषेधाभावे तत्साहचर्येणार्थाधिकारानुरोधेन च "द्वन्द्वे च" इत्यस्याप्यवयवनिषेधकत्वाभावः । एतेन सप्तमीनिर्देशसामर्थ्याद्, बहुलक्ष्यसंस्कारानुरोधाच्च विद्यमानानीत्यध्याहारेण समुदायस्यावयवानां चायं निषेधः । तत्र समुदायस्य व्यपदेशिवद्भावेन निषेधः । आधाराधेयभावेऽपि व्यपदेशिवद्भावस्य "अनद्यतने लङ्" "तुल्यास्य" "प्रत्ययस्यात्" इत्यादिसूत्रस्थभाष्यादौ स्पष्टत्वात् । तत्फलं च वर्णाश्रमेतराणामित्यादावकच्यसर्वनामत्वप्रयुक्तोऽपि नाकजित्यपास्तम् । इतरशब्देन समासेऽतिभवकानित्यादावपि तच्छ्रवणस्य दुर्वारत्वेन तन्निषेधे फलाभावाच्चेति दिक् । स्यादृत्येति । समुदायात्प्राप्तस्येति शेषः ।

प्रकृत सूत्रानें द्वन्द्वरूप समुदायाला सर्वनामसंज्ञेचा निषेध केला आहे असे मानले असतां, या पक्षामध्यें 'द्वन्द्वे' ही सप्तमी, संज्ञी जो द्वन्द्व त्याचे ठिकाणी अधिकरणाची विवक्षा करून, म्हणजे तो सर्वनामसंज्ञानिषेधाचें अधिकरण आहे असे मानून, केली आहे असें समजावें, किंवा 'द्वन्द्वे' ही सप्तमी प्रथमेच्या अर्थाची वाचक आहे असे मानावें. (असें मानले असतां, 'द्वन्द्वे = द्वन्द्वस्य सर्वनामसंज्ञा

न भवति' किंवा 'द्वन्द्वः सर्वनामसंज्ञको न भवति' असा प्रकृत सूत्राचा अर्थ होऊन दोन्ही प्रकारच्या वाक्यांचा सारखाच अर्थ होतो.) सर्वनामसंज्ञानिषेधक प्रकरणामध्यें ('न बहुव्रीहौ' १-१-२९ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं) 'अकच्स्वरौ तु कर्तव्यौ प्रत्यङ्गं मुक्तसंशयौ' असें जें स्मृतिरूप वचनान्तर पठित केलें आहे त्या वचनाच्या आधारें किंवा 'न बहुव्रीहौ' या सूत्राच्या साहचर्यरूप सामर्थ्यामुळें, सर्वनामसंज्ञानिषेधक प्रकरणांत सप्तमीचा निर्देश करून जीं सूत्रें पठित केलीं आहेत त्या सूत्रांतील सप्तमी प्रथमा विभक्तीची वाचक आहे असें मानून त्या सूत्रांचा अर्थ करणें उचित आहे. (बहुव्रीहिसमासांतील सर्वनामरूप अवयवाला, कोणताहि संशय मनांत न बाळगतां, अकच् प्रत्यय करावा असें 'न बहुव्रीहौ' या सूत्रावरील भाष्यांत म्हटलें असल्यामुळें, 'न बहुव्रीहौ' या सूत्राचा 'बहुव्रीहौ यानि सर्वादीनि तेषां सर्वनामसंज्ञा न भवति' असा अर्थ करतां येत नाहीं; कारण तसा अर्थ केल्यास, बहुव्रीहिसमासांतील सर्वनामरूप अवयवाहून, त्यांची त्या अर्थान्वयें सर्वनामसंज्ञा नाहींशी होत असल्यामुळें, 'अकच्' प्रत्यय करतां येणें शक्य नाहीं, आणि म्हणून 'बहुव्रीहौ' हें सप्तम्यन्त पद प्रथमेच्या अर्थाचें वाचक मानून 'बहुव्रीहिः सर्वनामसंज्ञको न भवति' असा त्या सूत्राचा अर्थ करणें उचित ठरतें. त्याचप्रमाणें प्रकृत सूत्र देखील सर्वनामसंज्ञा-निषेधक प्रकरणांत पठित असून 'न बहुव्रीहौ' या सूत्राच्या जवळ तें पठित केलें असल्यामुळें, त्या सूत्राच्या साहचर्यानें प्रकृत सूत्रांतील 'द्वन्द्वे' ही सौत्र सप्तमी 'व्यत्ययो बहुलम्' सू. ३४३३ या सूत्राच्या आधारें प्रथमेच्या अर्थाची वाचक मानून 'द्वन्द्वः सर्व-नामसंज्ञको न भवति' असाच प्रकृत सूत्राचा अर्थ करणें योग्य ठरतें. तसा अर्थ केला असतां, द्वन्द्वसमासरूप समुदायालाच सर्वनामसंज्ञेचा निषेध होतो व त्या समासांतील सर्वनामरूप अवयवाला तो निषेध लागू पडत नाहीं हें उघड होतें.) दुसरें असें कीं, 'विभाषा जसि' सू. २२५ या सूत्रानें द्वन्द्वसमासांतील सर्वनामरूप अवयवाला सर्व-

नामसंज्ञेचा विकल्पेंकरून निषेध केला आहे असे मानल्यानें कोणतेंहि फल निष्पन्न होत नसल्यामुळें, अवयवाला सर्वनामसंज्ञेचा निषेध केला नाही असेंच मानलें पाहिजे व (प्रकृत सूत्र 'विभाषा जसि' या सूत्राच्या लगेंच पूर्वी पठित असून त्या उत्तर सूत्रात अनुवृत्त होत असल्यामुळें) त्या उत्तर सूत्राच्या साहचर्यसामर्थ्यानें आणि तसेच अर्थाधिकाराच्या अनुरोधानें हेंच निष्पन्न होतें की, 'द्वन्द्वे च' या प्रकृत सूत्रानें द्वन्द्वसमासातील सर्वनामरूप अवयवाला सर्वनामसंज्ञेचा निषेध होत नाही (व सर्वनामान्त द्वन्द्वसमासालाच प्रकृत सूत्रानें सर्वनामसंज्ञेचा निषेध होतो. 'विभाषा जसि' या सूत्रानें, सर्वनामान्त द्वन्द्वसमासापुढें 'जस्' प्रत्यय आला असता, जें विकल्पेंकरून सर्वनामसंज्ञा होण्याचें विधान केलें आहे तें, द्वन्द्व-समासातील सर्वनामरूप अवयवाला लागू पडणारें विधान नसून, द्वन्द्वसमासरूप समुदायालाच लागू पडणारें विधान आहे; कारण 'जस्' प्रत्यय द्वन्द्वसमासरूप समुदायाहूनच होत असून त्या समा-सातील सर्वनामरूप अन्त्य अवयवाहून होत नाही, आणि त्या सूत्राच्या लगेंच मागें प्रकृत सूत्र पठित असल्यामुळें त्या सूत्राच्या साहचर्यसामर्थ्यानें हेंच मानणें उचित आहे की, त्या उत्तर सूत्रासारखेंच प्रकृत सूत्र देखील द्वन्द्वसमासरूप समुदायासंबंधानेंच, म्हणजे त्या समुदायाला सर्वनामसंज्ञा न व्हावी याचेंच, विधान करणारें सूत्र आहे. दुसरें असें की, 'विभाषा जसि' या उत्तर सूत्रात प्रकृत सूत्राची अनुवृत्ति होते व ती अनुवृत्ति शब्दाधिकारानुरोधानें होत नसून अर्थाधिकारानुरोधानें होते असेंच मानलें पाहिजे; कारण जेथें अर्थाधिकार मानून अनुवृत्ति करणें संभवतें तेथें शब्दाधिकार मानून अनुवृत्ति करणें अयोग्य आहे असा सिद्धान्त आहे व या सिद्धान्ताच्या आधारें हेंच मानलें पाहिजे की, 'द्वन्द्वे च' या प्रकृत सूत्राचा जसा अर्थ आहे त्या अर्थाला धरूनच त्या सूत्राची 'विभाषा जसि' या सूत्रात अनुवृत्ति केली आहे व त्या अर्थाचा परित्याग करून केवळ शब्दाची अनुवृत्ति केली नाहीं असें मानलें असता, 'विभाषा जसि' या

सूत्राचा, वर सांगितल्याप्रमाणें, इष्ट अर्थ सिद्ध होण्याकरितां हेंच मानणें भाग आहे कीं, त्या सूत्रांत अर्थाधिकारानुरोधानें अनुवृत्त होणारें प्रकृत सूत्र द्वन्द्वसमास रूप समुदायालाच सर्वनामसंज्ञेचा निषेध करणारें सूत्र आहे. तसें न मानतां तें सूत्र अवयवनिषेधक आहे असें मानल्यास, त्या सूत्राच्या अर्थानुपूर्वक अनुवृत्तिसामर्थ्यानें 'विभाषा जसि' हें सूत्र देखील द्वन्द्वसमासांतील सर्वनामरूप अन्त्य अवयवाला 'जस्' प्रत्यय पुढें आल्यास विकल्पेंकरून सर्वनामसंज्ञा होण्याचें विधान करणारें सूत्र आहे असा त्या सूत्राचा अनिष्ट अर्थ होण्याची आपत्ति येईल. ती आपत्ति टाळण्याकरितां प्रकृत सूत्र सर्वनामान्त द्वन्द्वसमासाला सर्वनामसंज्ञेचा निषेध करणारें सूत्र आहे असेंच मानणें भाग आहे. आता प्रकृत सूत्रासंबंधानें खण्डनकाराचें असें म्हणणें आहे कीं, प्रकृत सूत्रांत 'द्वन्द्वस्य' असा षष्ठीनिर्देश न करितां 'द्वन्द्वे' असा ) सप्तमीनिर्देश केला असल्यामुळें त्या निर्देशाच्या सामर्थ्यानें व तसेंच तें सूत्र अनेक लक्ष्यांना लागू पडावें याकरितां, 'विद्यमानानि' हें पद अध्याहृत केल्यानें, द्वन्द्वरूप समुदायाला व तसेंच त्या समुदायांतील सर्वनामरूप अवयवाला सर्वनामसंज्ञेचा निषेध सिद्ध होतो. व्यपदेशिवद्भावानें समुदायाला सर्वनामसंज्ञेचा निषेध लागू पडतो; कारण 'अनद्यतने लङ्' सू. ३-२-१११, 'तुल्यास्यप्रयत्नं सवर्णम्' सू. १-१-९, 'प्रत्ययस्थात्कात्पूर्वस्य' सू. ७-३-४४ इत्यादि सूत्रांवरील भाष्यांवरून हें स्पष्ट होतें कीं, आधाराधेयभावाला देखील व्यपदेशिवद्भाव लागू पडतो, म्हणजे 'व्यपदेशिवदेकस्मिन्'-परि. ३०-ही परिभाषा लागू पडते, व अशा रीतीनें सर्वनामान्त द्वन्द्वसमासरूप समुदायाला व त्यांतील सर्वनामरूप अवयवाला प्रकृत सूत्रानें सर्वनामसंज्ञेचा निषेध केला आहे असें मानल्यानें, 'वर्णाश्रमेतराणाम्' इत्यादि स्थलीं द्वन्द्वसमासांतील अन्त्यावयव 'इतर' या शब्दाहून सर्वनामसंज्ञेच्या निमित्तामुळें होणारा 'अकच्' प्रत्यय देखील होत नाहीं हें फल सिद्ध होतें. पण प्रकृत सूत्राचें वर जसें व्याख्यान केलें आहे त्या व्याख्यानानें हें

वरील म्हणणे खण्डित होते. (खण्डनकाराच्या म्हणण्याचा असा आशय आहे की, जर द्वन्द्वरूप सर्वनामान्त समुदायालाच सर्वनामसंज्ञानिषेध होणे पाणिनीला अभिप्रेत असते तर पाणिनीनें प्रकृत सूत्रात षष्ठीनिर्देश करून 'द्वन्द्वस्य च' असे सूत्र पठित केले असते व त्यायोगानें प्रकृत सूत्राचा 'द्वन्द्वस्य सर्वनामसंज्ञा न भवति' असा स्पष्ट अर्थ झाला असता परंतु पाणिनीनें प्रकृत सूत्रात 'द्वन्द्वे' असा आधारसप्तमीचा निर्देश केला असल्यामुळें, या सूत्रात आधाराधेयभाव व्यक्त करणारे 'विद्यमानानि' हे पद अध्याहृत करणे उचित आहे व ते पद अध्याहृत केल्यानें, द्वन्द्वरूप समुदाय हा आधार असून त्या समुदायातील पदें ही आधेय असल्यामुळें, 'द्वन्द्वे विद्यमानानि यानि सर्वादीनि तानि सर्वनामसंज्ञकानि न भवन्ति' असा सूत्रार्थ होतो एवढेंच नव्हे, तर व्यपदेशिवद्भावानें द्वन्द्व हा आधार व द्वन्द्व हाच आधेय मानल्यास, द्वन्द्वसमासाला देखील सर्वनामसंज्ञेचा निषेध होतो अशा रीतीनें प्रकृत सूत्रातून अधिक अर्थ निघत असून ते सूत्र अधिक लक्ष्यसंस्कारक व व्यापक होत असल्यामुळें, म्हणजे सर्वनामसंज्ञानिषेधाकरिता प्रकृत सूत्राला द्वन्द्वसमास व त्यातील पदें ही दोन्ही प्रकारची लक्ष्यें मिळत असल्यामुळें, आधारसप्तमीनिर्देशाच्या सामर्थ्यानें प्रकृत सूत्राचा वर जसा व्यापक अर्थ केला आहे तसाच अर्थ करणे इष्ट आहे. आतां जेथें आधार त्यात राहणाऱ्या आधेयाहून भिन्न आहे तशाच ठिकाणी आधाराधेयभाव मानता येतो आणि म्हणून जरी द्वन्द्वसमास त्यात विद्यमान असणाऱ्या पदांचा आधार मानतां येतो तरी द्वन्द्वसमास हाच द्वन्द्वसमासाचा आधार मानतां येत नाही आणि त्यामुळें द्वन्द्वसमासाला सर्वनामसंज्ञेचा निषेध सिद्ध होऊ शकत नाही अशी कोणी दावा केल्यास, त्या दाव्यावर खण्डनकाराचे असे उत्तर आहे की, जरी आधार व आधेय एकच असले तरी त्यांच्यात भेद आरोपित केल्यानें व्यपदेशिवद्भावानें आधाराधेयभाव मानतां येतो. जसे एकाच खोलीचे घर असल्यास घर जरी खोलीहून भिन्न नाहीं तरी,

'घरांतील खोली' असा लौकिक व्यवहारांत ज्याप्रमाणें प्रयोग होतो त्याचप्रमाणें प्रकृत स्थलीं देखील समजावें. आधार व आधेय एकच असून देखील तशा स्थलीं व्यपदेशिवद्भावानें आधाराधेयसंबंध कल्पितां येतो या मताचें समर्थन करण्याकरितां खण्डनकारानें तीन सूत्रांवरील भाष्यांचें प्रमाण दिलें आहे. प्रथम सूत्र 'अनद्यतने लङ्' हें होय. त्या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं 'न विद्यते अद्यतनः अस्मिन् सः अनद्यतनः तस्मिन् अनद्यतने' असा बहुव्रीहिसमास करून त्याचें प्रयोजन सांगतांना 'अभ्य च ह्यस्वाऽभुक्ष्महीति व्यामिश्रे लुङेव यथा स्यात्' असें म्हटलें आहे. यावर पूर्वपक्षीनें 'यद्येवमद्यतनेऽपि लङ् प्राप्नोति । न ह्यद्यतनेऽद्यतनो विद्यते ।' अशी शंका केली असतां, भाष्यकार असें उत्तर देतातः—'अद्यतनेऽपि ह्यद्यतनो विद्यते । कथम् ? । व्यपदेशिवद्भावेन ।' या भाष्यांतील 'व्यपदेशिवद्भावेन' या पदाचें व्याख्यान करितांना कैयटानें 'यथा मुख्ये भेद आधाराधेयभावो भवति तटे तिष्ठतीति, तथेहापि समुदायावयवभेदाश्रयेण समुदायेऽद्यतनेऽवयवा अद्यतनाः सन्तीत्यनद्यतनो न भवतीत्युच्यते ।' असें म्हटलें आहे. द्वितीय सूत्र 'तुल्यास्यप्रयत्नं सवर्णम्' हें होय. या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार म्हणतात—'सर्वमुखस्थानमवर्णमेक इच्छन्ति । एवमपि व्यपदेशो न प्रकल्पत आस्ये येषां तुल्यो देश इति । व्यपदेशिवद्भावेन व्यपदेशो भविष्यति ।' या भाष्याचा अर्थ हा आहे कीं, कित्येक असें म्हणतात कीं, सगळेंच मुख हें 'अ'वर्णाचें स्थान होय. पण असें मानल्यास मुखामध्यें ज्यांचा तुल्य देश आहे हा व्यवहार जुळूं शकणार नाहीं अशी कोणी शंका केल्यास, या शंकेवर भाष्यकार असें उत्तर देतात कीं, 'व्यपदेशिवदेकस्मिन्' या परिभाषान्वयें तसा व्यवहार जुळण्यांत, म्हणजे व्यपदेशिवद्भावानें मुख हेंच आधार व मुख हेंच आधेय मानलें असतां, कांहीं अडचण येत नाहीं. 'प्रत्ययस्थात्कात्पूर्वस्य' हें तृतीय सूत्र होय. या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं असा प्रश्न केला आहे कीं, 'कात्' या

पदानें 'क' या सघाताचे ग्रहण होते किंवा केवळ ककार या वर्णाचे ग्रहण होते. सघाताचे ग्रहण होते असे मानल्यास, जेथें 'क' प्रत्यय झाला आहे तेथें त्या 'क' प्रत्ययाला प्रत्ययस्थ 'क' कसे म्हणता येईल? यावर भाष्यकाराचा आशय स्पष्ट करिताना कैयटानें 'स्थग्रहणे तु क्रियमाणे सर्वत्र भवति, प्रत्ययस्यापि व्यपदेशिवद्भावेन प्रत्ययस्थत्वात्' असे म्हटले आहे. साराश वरील तीन्ही भाष्यावरून हें स्पष्ट होते की, जेथें आधार व आधेय एकच आहे तेथें देखील व्यपदेशिवद्भावानें आधाराधेयसबध गौणोपचारानें कल्पिता येतो व तसा सबध द्वन्द्वसमासाचे ठिकाणी कल्पिल्यानें द्वन्द्वसमासाला देखील सर्वनामसज्ञेचा निषेध सिद्ध होतो असे खण्डनकाराचे म्हणणे आहे. यावर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, द्वन्द्वसमासातील सर्वनामरूप अवयवाला सर्वनामसज्ञेचा निषेध केल्यानें कोणतेहि फल निष्पन्न होत नाही हे वर सिद्ध करून दाखविले असल्यामुळें, खण्डनकारानें 'द्वन्द्वे' ही आधारसप्तमी मानून प्रकृत सूत्रानें द्वन्द्वसमासरूप समुदायाला व तसेच त्या समुदायातील सर्वनामरूप अवयवाला सर्वनामसज्ञेचा निषेध होतो असे जें सिद्ध करून दाखविले आहे तसे करण्यात काहीच फायदा नाही व तसे करण्याची काही गरजहि नाही. 'द्वन्द्वे' ही प्रथमार्थक सप्तमी मानून पूर्वी जसा प्रकृत सूत्राचा अर्थ केला आहे तसा अर्थ केल्यानें सर्व इष्ट रूपाची सिद्धि होत असल्यामुळें, तसाच अर्थ करणे योग्य आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे ) दुसरे असे की, ('अकच्स्वरौ तु कर्तव्यौ प्रत्यङ्ग मुक्तसशयौ' या भाष्यवचनान्वयें अन्तरङ्गत्वामुळें 'इतर' शब्दाहून प्रथम 'अकच्' प्रत्यय करून 'इतरक' असे जें रूप होते त्या ) 'इतरक' शब्दाशी ('वर्णाश्रम' या शब्दाचा ) द्वन्द्वसमास केल्यासें, 'अतिभवकान्' इत्यादि स्थली जसे 'अकच्' प्रत्ययाचे श्रवण होते तसेच, ('वर्णाश्रमेतरका.' या ) द्वन्द्वसमासात 'अकच्' प्रत्ययाचे श्रवण होणे हे टाळता येणे अशक्य आहे. म्हणून अवयवाला सर्वनामसज्ञेचा निषेध केल्यानें काहीच

फल निष्पन्न होत नाहीं हें उघड होतें. ( 'भवत्' या सर्वनामाहून 'अकच्' प्रत्यय केला असतां 'भवकत्' असें रूप होतें व 'भवकन्तमतिक्रान्तः अतिभवकान्' असें प्रथमेच्या एकवचनाचें रूप होऊन त्यांत जसें 'अकच्' प्रत्ययाचें स्पष्ट श्रवण होतें त्याचप्रमाणें 'इतर' या सर्वनामाहून प्रथम 'अकच्' प्रत्यय करून नंतर द्वन्द्वसमास केला असतां, 'वर्णाश्रमेतरकाः' असें जें सामासिक रूप होतें त्यांत देखील 'अकच्' प्रत्ययाचें श्रवण होतेंच. म्हणून द्वन्द्वसमासांतील सर्वनामरूप अवयवाला सर्वनामसंज्ञेचा निषेध करून कांहींच फायदा नाहीं आणि 'आम्' प्रत्यय 'इतरक' या सर्वनामाहून झाला नसून सर्वनामसंज्ञक नसणाऱ्या समुदायाहून झाला असल्यामुळें व सुडागमाच्या विषयांत विहितविशेषणपक्ष मानला असल्यामुळें, सुडागमाची निवृत्ति होतेच असें शब्दरत्नकारांचें म्हणणें आहे. ) 'व्यावृत्त्या चरितार्थत्वात्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्यापूर्वी 'समुदायात् प्राप्तस्य' हीं पदें अध्याहृत आहेत, म्हणजे 'अनाङ्गस्य समुदायात् प्राप्तस्य तसिलादेर्व्यावृत्त्या चरितार्थत्वात्' अशी ती मनोरमेंतील पंक्ति वाचावी. ( या विषयाचें विवरण मनोरमेंत पूर्वीं केलेंच आहे. )

मनोरमा– जसाधारमिति । यद्यपि शीभावेन जस् अपह्रियते तथाऽपि औपचारिकमाधारत्वं बोध्यम् । यद्वा । जसः, इः जसिः, तस्मिन् । सौत्रः सप्तम्या लुक्, इत्यर्थतो व्याचष्टे–जसाधारमिति ।

('विभाषा जसि' सू. २२५ या सूत्रावरील कौमुदींत 'जसाधारं यत्कार्यं शीभावाख्यं तत्र कर्तव्ये द्वन्द्वे उक्ता संज्ञा वा स्यात्' असें जें व्याख्यान केलें आहे त्यांत 'जसाधारम्' हें पद कां घातलें आहे याचें कारण दीक्षित सांगतात. 'जसःशी' सू. २१४ या सूत्रानें) 'जस्' प्रत्ययाचे जागीं 'शी = ई' हा आदेश केला असतां, जरी 'जस्' प्रत्यय नाहींसा होतो तरी, 'जस्' स्थानिक, म्हणजे 'जस्' प्रत्ययाचे जागीं, 'शी' आदेश होत असल्यामुळें, 'जस्' प्रत्यय हा

'शी' कार्याचा गौण किंवा आरोपित व्यवहारानें आधार मानता येतो हे जाणावें (प्रकृत सूत्रात 'जसि' या आधारसप्तमीचा निर्देश केला असल्यामुळें, दीक्षितांना त्या पदाचा 'जसाधारे शीभावे कर्तव्ये' असा अर्थ करावा लागला वास्तविक स्थानी व आदेश या दोहोंत निवर्त्यनिवर्तकभावरूप संबंध असतो त्याच्यात आधाराधेयभावरूपसंबंध संभवत नाही, कारण तसा संबंध असण्याकरिता आधार व आधेय हे दोन्ही आपापल्या स्वरूपानें युगपत् विद्यमान असावे लागतात तथापि येथें कल्पित किंवा आरोपित आधाराधेयभाव मानून दीक्षितांनी 'जसि' या आधारसप्तमीचे असें तरी समर्थन केले आहे पण हे समर्थन समाधानकारक न मानल्यास, दीक्षित 'जसि' या पदाचा दुसऱ्या रीतीनें अर्थ करितात ) अथवा 'जस इ जसि तस्मिन्' असा या 'जसि' पदाचा विग्रह करून व येथें सप्तमीविभक्तीचा सौत्रलुक् झाला आहे असे मानून सूत्रार्थ करावा आणि हा आशय मनांत धरूनच प्रकृत सूत्राचे कौमुदीत 'जसाधार यत् शीभावाख्य कार्यं वा स्यात्' असे व्याख्यान केले आहे (प्रकृत सूत्रातील 'जसि' या पदाचा 'जस इ तस्मिन्' असा विग्रह केल्यानें व सप्तमीच्या प्रत्ययाचा सौत्र लुक् झाला आहे असें मानल्यानें, 'जसि' या पदाचा 'जस स्थाने इकारे कार्ये कर्तव्ये = जस स्थाने जस शी इति सूत्रेण शी इति आदेशरूपे कार्ये कर्तव्ये' असा अर्थ होतो आणि म्हणून दीक्षितांनी तसा विग्रह सूत्रार्थ स्पष्ट होण्याकरिता केला आहे )

शब्दरत्न—यद्यपीति । जसीत्याधारसप्तमीति भाव । जस इरिति । इकारेण ईकारग्रहण बोध्यम् ।

'यद्यपि शीभावेन आधारत्व बोध्यम्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, 'जसि' ही आधारसप्तमी आहे (आणि म्हणूनच दीक्षितांनी त्या पदाचा 'जसाधार यत् शीकार्यं तस्मिन् कर्तव्ये' असा कौमुदीत अर्थ केला

आहे.) 'जसः इः' असा जो 'जसि' या पदाचा विग्रह करून भिन्न तन्त्रैनें दीक्षितांनीं अर्थ केला आहे त्या विग्रहांतील इकारानें दीर्घ ईकाराचें ग्रहण होतें असें समजावें. ('जसःशी' सू. २१४ या सूत्रानें 'जस्' चे जागीं ऱ्हस्व इकारादेश होत नसून दीर्घ ईकारादेश होतो; परंतु इवर्णानें अठराहि प्रकारच्या इवर्णाचें ग्रहण होत असल्यामुळें, येथें इकारानें 'जसःशी' या सूत्रानें होणाऱ्या दीर्घ ईकाररूप आदेशाचें ग्रहण करतां येतें.)

मनोरमा–"जराया जरसन्यतरस्याम्" ॥ विभक्ताविति । एतच्च "अष्टन आविभक्तौ" इत्यतोऽनुवर्तते । तेन जराया इदं जारमित्यादौ नातिव्याप्तिरिति भावः । पदेति । पदमङ्गं च विशेष्यम् विशेषणेन च तदन्तविधिरिति भावः । तदनुसारिभिरिति । इनातोः पूर्वविप्रतिषेधे एकसूत्रोपात्तत्वात् स्यादेशोऽपि ग्रहितुमुचित इति तेषामाशयः । अतएव–

वीतजन्मजरसः परं शुचि ब्रह्मणः पदमुपैतुमिच्छताम् ॥

इति भारविप्रयोगमसमञ्जसमिति मत्वा वीतजन्मजरस इति पठनीयमिति तैरुक्तम् । एतच्चेति । भाष्यकृता हि "टाङसि" इति सूत्रे इनातौ प्रत्याख्याय नादेशमदादेशं च विधाय नादेशे परे एत्वं योगविभागेन साधितम् । "बहुवचने झल्येत्" "ओसि च" तत "आङि" आङि च परेऽत एत्वं स्यात् । रामेण । तत "आपः संबुद्धौ च" एकारः स्यात् संबुद्धौ आङि ओसि च । न चैवमनेनेत्यत्र हलि लोपः स्यादिति वाच्यम् । अनादेशस्य नकारे परे विशिष्य विधानात् । तथा हि । "अनापि" नकारे आपि च परेऽन् स्यादित्यर्थः । सूत्रे अ, इति नान्तस्य नपुंसकनिर्देशः । न च ङसेरदादेशे कृते पररूपं स्यादिति वाच्यम् । अकारोच्चारणसामर्थ्याद्दीर्घसम्भवादिति । तथा च "जराया जरसन्यतरस्याम्" इति सूत्रे उपतम् गोनर्दीयस्त्वाह–अतिजरैरिति भवितव्यं सन्निपातपरिभाषयेति । एवं च पूर्वविप्रतिषेधेनेत्यादि सर्वं भाष्यविरुद्धमित्यर्थः ।

'जराया जरसन्यतरस्याम्' सू २२७ या सूत्रात 'अष्टन आ विभक्तौ' या पूर्वसूत्रातून 'विभक्तौ' हे पद अनुवृत्त होते (व 'अचि र ऋत' या पूर्वसूत्रातून 'अचि' या पदाची अनुवृत्ति होत असून ते पद 'विभक्तौ' याचे विशेषण होत असल्यामुळें, 'यस्मिन्विधिस्तदादावल्ग्रहणे'–परि ३३–या परिभाषान्वयें त्या अनुवृत्त पदाचा 'अजादौ' असा अर्थ होतो अशा रीतीनें 'विभक्तौ' व 'अचि = अजादौ' ही दोन पदें प्रकृत सूत्रात अनुवृत होत असल्यामुळें, प्रकृत सूत्राचे कौमुदीत 'जराशब्दस्य जरस वा स्यादजादौ विभक्तौ' असे व्याख्यान केले आहे) त्यामुळें 'जराया इद जारम्' इत्यादि स्थली अतिव्याप्तिरूप दोष येत नाही, म्हणजे 'जरा' या शब्दाचे जागी जरसादेश होण्याची आपत्ति येत नाही, असा भावार्थ आहे ('जराया इद जारम' या स्थली 'तस्येदम्' सू १५०० या अर्थामध्यें 'जरा' या शब्दाहून जरी 'अण्' हा अजादि प्रत्यय होतो तरी तो तद्धित् प्रत्यय असून विभक्तिप्रत्यय नसल्यामुळें, 'जरा' या शब्दाचे जागी 'जरस्' आदेश होत नाही) 'पदाङ्गाधिकारे तस्य च तदन्तस्य च'–परि २९–या परिभाषेंतील 'पद' व 'अङ्ग' हे शब्द विशेष्य असून विशेषणाहून तदन्तविधि होतो असा भावार्थ आहे (वरील परिभाषेंतील 'अङ्ग' हे पद विशेष्य होत असून अङ्गाधिकारात पठित असलेल्या सूत्रात निर्दिष्ट असलेले कार्यी, म्हणजे ज्याना कार्य होणे सागितले आहे ते शब्द, 'अङ्ग' या विशेष्याचे विशेषण होतात आणि त्यामुळें 'विशेषण तदन्तस्य सज्ञा स्यात' या अर्थाच्या वाचक 'येन विधिस्तदन्तस्य' सू २६ या सूत्रानें विशेषणाला तदन्तविधि होतो त्यामुळें ज्या अङ्गाच्या शेवटी 'जरा' शब्द आहे तशा अङ्गापुढें देखील अजादि विभक्तिप्रत्यय आला असता 'जरा'चे जागी 'जरस्' आदेश होतो उदाहरणार्थ 'निर्गता जरा यस्मात् स निजर' अशा रीतीनें सिद्ध झालेल्या 'निजर' शब्दाहून 'औ' हा अजादि विभक्तिप्रत्यय केला असता, 'निजर औ' या स्थली जरी 'जरा' एवढेंच अङ्ग नसून 'निर्जर'

हें अङ्ग आहे तरी, त्या अङ्गाच्या शेवटीं 'जर' असा 'गोस्त्रियो-रुपसर्जनस्य' सू. ६५६ या सूत्रानें ऱ्हस्व झालेला एकदेशविकृत शब्द असून तो 'एकदेशविकृतमनन्यवत्'–परि. ३७–या परिभाषा-न्वयें 'जरा'च आहे असें मानतां येत असल्यामुळें, 'जर'चे जागीं विकल्पेंकरून 'जरस्' आदेश होतो व 'निर्जरौ, निर्जरसौ' इत्यादि पाक्षिक रूपें सिद्ध होतात.) 'तदनुसारिभिश्च षष्ठ्येकवचने निर्जरस्य इत्येव रूपमिति स्वीकृतम्' असें जें प्रकृत सूत्रावरील कौमुदींत म्हटलें आहे त्याचा आशय हा आहे कीं, ('टाङसिङसामिनात्स्याः' सू. २०१ या सूत्रांत निर्दिष्ट असलेले) 'इन, आत्' हे आदेश जसे पूर्वविप्रतिषेधानें प्रथम होतात त्याचप्रमाणें त्याच सूत्रांत निर्दिष्ट असलेला 'स्य' हा आदेश देखील पूर्वविप्रतिषेधानें प्रथम होतो असेंच मानणें उचित आहे. (प्रकृत सूत्राच्या मानानें 'टाङसिङसाम्' हें पूर्व सूत्र आहे व 'विप्रतिषेधे परं कार्यम्' सू. १७५ या वचनान्वयें प्रकृत पर सूत्र प्रथम प्रवृत्त झालें पाहिजे. परंतु 'विप्रतिषेधे परं कार्यम्' या सूत्रांतील 'परम्' या पदाचा 'इष्टम्' असा भाष्य-कारांनीं अर्थ केला असल्यामुळें, कित्येक वैयाकरणांच्या मतें 'टाङसिङसाम्' हें पूर्व सूत्र असून देखील प्रकृत उत्तर सूत्राच्या पूर्वी प्रवृत्त होतें. त्यामुळें 'निर्जर टा, निर्जर ङसि' या स्थलीं 'टा'चे जागीं 'इन' व 'ङसि'चे जागीं 'आत्' असा प्रथम आदेश होऊन 'निर्जर इन, निर्जर आत्' अशी स्थिति झाली असतां, 'निर्जर' या एकदेशविकृत जरान्त अङ्गापुढें 'इन, आत्' हे अजादि विभक्ति-प्रत्यय असल्यामुळें 'जर'चे जागीं प्रकृत सूत्रानें नंतर 'जरस्' आदेश होऊन 'निर्जरसिन, निर्जरसात्' अशीं तृतीयेच्या व पञ्च-मीच्या एकवचनाचीं पाक्षिक रूपें होतात. 'निर्जर ङस्' या स्थलीं देखील पूर्वविप्रतिषेधानें 'टाङसिङसाम्' या सूत्रान्वयें 'ङस्'चे जागीं 'स्य' हा आदेश प्रथम होऊन 'निर्जर स्य' अशी स्थिति झाली असतां, 'स्य' हा हलादि असून अजादि विभक्तिप्रत्यय नसल्यामुळें, 'निर्जर' यांतील 'जर'चे जागीं प्रकृत सूत्रानें होणारा

'जरस्' आदेश होत नाही व त्यामुळें षष्ठीच्या एकवचनाचे 'निर्जरस्य' असेच एक रूप सिद्ध होत असून 'निर्जरसः' असे पाक्षिक रूप सिद्ध होत नाही असे त्या वैयाकरणाचे म्हणणे आहे,) आणि म्हणून 'वीतजन्मजरसः परं शुचि ब्रह्मणः पदमुपैतुमिच्छताम्' (किरात पञ्चमसर्ग श्लोक २२) या श्लोकात 'वीतजन्मजरस' असा जो षष्ठीचा प्रयोग भारवीनें केला आहे तो अशुद्ध आहे असे मानून ते म्हणतात की, त्या पदाऐवजी 'वीतजन्मरजसः' असे पद पठित करावे. 'एतच्च भाष्यविरुद्धम्', म्हणजे त्या वैयाकरणाचे वरील म्हणणे भाष्यविरुद्ध आहे, असे जें प्रकृत सूत्रावरील कौमुदीत म्हटले आहे त्याचे कारण हें की, भाष्यकारानी 'टा, ङसि' याचे जागी 'टाङसिङसाम्' सू. २०१ या सूत्रानें होणाऱ्या अनुक्रमें 'इन, आत्' या आदेशाचे प्रत्याख्यान करून त्या आदेशाऐवजी 'न, अत्' हे आदेश अनुक्रमें होणे सांगितले आहे आणि 'न' हा आदेश पुढें असता (अकारान्त अङ्गाला) एत्व होणे हे ('आङि चापः' या सूत्राचा 'आङि च' असा योगविभाग करून त्या) योगविभागानें साधले आहे. 'बहुवचने झल्येत्, ओसि च' या सूत्रानंतर 'आङि च' हें (योगविभागानें पृथक् केलेले) सूत्र पठित करावे व त्या सूत्राचा, अकारान्त अङ्गापुढें 'आङ्' आला असता त्या अङ्गातील अन्त्य अकाराचे एत्व होते, असा अर्थ करावा. असा अर्थ केल्यानें 'रामेण' हे रूप सिद्ध होते. ('राम टा' या स्थली 'राम' या अदन्त अङ्गापुढें 'टा = आङ्' हा प्रत्यय आला असल्यामुळें, त्या अङ्गातील अन्त्य अकाराचे 'आङि च' या योगविभागानें पृथक् केलेल्या सूत्रानें एत्व झाल्यावर नतर 'टा' चे जागी 'न' हा आदेश होऊन 'रामेण' हे रूप सिद्ध होते. यानतर 'आङि चापः' या सूत्रातील 'आपः' हा अवशिष्ट भाग 'सम्बुद्धौ च' या उत्तर सूत्राला जोडून) 'आपः सम्बुद्धौ च' असे एक सूत्र पठित करावे व त्याचा अर्थ असा करावा की, 'आबन्तस्याङ्गस्य आङि ओसि सम्बुद्धौ च परे एत्व स्यात्.' पण अशा रीतीनें योगविभाग

करून अर्थ केल्यास 'अनेन' या उदाहरणांत 'हलि लोपः' सू. ३४७ या सूत्रानें ('इद' यांतील 'इद्' चा) लोप होण्याची आपत्ति येते (व त्यामुळें 'अनेन' असें रूप सिद्ध होऊं शकत नाहीं; कारण 'इदम् टा' या स्थलीं 'त्यदादीनामः' सू. २६५ या सूत्रानें 'इदम्' यांतील अन्त्य मकाराचे जागीं अकारादेश होऊन व 'अतो गुणे' सू. १९१ या सूत्रानें पररूप एकादेश होऊन आणि 'टा' प्रत्ययाचे जागीं 'न' असा आदेश होऊन 'इद + न' अशी स्थिति झाली असतां, 'न' हा स्थानिवद्भावानें प्रत्यय ठरून तो हलादि प्रत्यय असल्यामुळें, 'हलि लोपः' सू. ३४७ या सूत्रानें 'इद' यांतील 'इद्'चा लोप होऊन 'अ + न' अशी स्थिति होईल व 'आङि' या योगविभागानें अकाराचें एत्व केल्यानें 'एन' असें रूप होईल.) असें कोणी म्हटल्यास, त्यावर हें उत्तर आहे कीं, 'अनाप्यकः' सू. ३४६ या सूत्रानें 'न' प्रत्यय पुढें असतां 'इद' यांतील 'इद्' चे जागीं 'अन्' असा आदेश होतो असें विशिष्ट विधान केलें आहे. अशा रीतीनें त्या सूत्राचा, नकार किंवा 'आप्' प्रत्यय पुढें असतां 'इद' यांतील 'इद्' चे जागीं 'अन्' असा आदेश होतो, असा अर्थ होतो. (पण त्या सूत्राचा तसा अर्थ केल्यास, 'अनाप्यकः' असें सूत्र पठित करावें लागेल असें कोणी म्हटल्यास, त्यावर असें उत्तर आहे कीं, 'अनाप्यकः' या सूत्राची 'अ, नापि, अकः' अशीं पदें पाडावीं व) 'अ' हें 'अन्' या शब्दाचें नपुंसकलिङ्गाचें प्रथमेच्या एकवचनाचें रूप आहे असें समजावें. (असें मानल्यास, 'इदम् टा = इद टा=इद न' अशी वर सांगितल्याप्रमाणें स्थिति झाल्यावर 'इद' यांतील 'इद्' चे जागीं 'अन्' असा आदेश होऊन व 'अन् अ न = अन् + न' अशी स्थिति होऊन व 'आङि' या योगविभागानें 'अन' या अङ्गांतील अन्त्य अकाराचें एत्व होऊन 'अनेन' असें रूप सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं.) आतां 'ङसि' या प्रत्ययाचे जागीं ('आत्' असा आदेश न करितां) 'अत्' असा आदेश केल्यास (राम ङसि = राम अत्'

अशा स्थितीत 'अतो गुणे' सू. १९१ या सूत्रानें) पररूप एकादेश होईल (व 'रामत्' असे विकृत रूप होण्याची आपत्ति येईल) असे कोणी म्हटल्यास, ते म्हणणे बरोबर नाही; कारण आदेशातील अकारोच्चारणसामर्थ्यानें सवर्णदीर्घ होऊ शकतो. (जर 'अतो गुणे' या सूत्रानें पररूप सन्धि होणे इष्ट असते तर केवळ 'त्' असाच आदेश पठित केला असता व 'अत्' असा आदेश पठित करण्याची काहीच गरज नव्हती पण ज्याअर्थी भाष्यकारांनी 'ङसि' प्रत्ययाचे जागी 'अत्' असा आदेश होणे मुद्दाम सांगितले आहे त्याअर्थी त्या आदेशातील अकारोच्चारण-सामर्थ्यामुळें, 'अतो गुणे' हें सूत्र प्रवृत्त होऊं शकत नाही व 'अकः सवर्णे दीर्घः' सू. ८५ हे सूत्र प्रवृत्त होऊन 'राम अत् = रामात्' असे इष्ट रूप सिद्ध होते असा दीक्षिताच्या म्हण-ण्याचा आशय आहे. वर जें दीक्षितानी व्याख्यान केले आहे ते सर्व 'टाङसिङसाम्' सू. ७–१–१२ या सूत्रावरील भाष्यात स्पष्टपणे सांगितले आहे. त्या भाष्यात भाष्यकार म्हणतात–'किमर्थमिनादेश उच्यते न नादेश एवोच्येत । का रूपसिद्धिः, वृक्षेण प्लक्षेण । एवं योगविभागः करिष्यते । कथम् ? । इदमस्ति, बहुवचने झल्येत् । ओसि च । ततः आङि च । आङि च परतोऽत एत्वं भवति, वृक्षेण प्लक्षेण । ततः आप सम्बुद्धौ च । आप. सम्बुद्धौ च आङि च ओसि चेति । नैवं शक्यम्, इह हि अनेन इति इद्रूपलोप. प्रसज्येत । झलि लोपः करिष्यते । न शक्यो झलि लोप कर्तुम्, इह हि लोप. स्यात्, अया विप्ठेति । एवं तर्हि अन् लोपापवादो विज्ञास्यते । कथम् ? । एवं वक्ष्यामि-अन् ने च आपि चेति । तत्रकारग्रहणं कर्तव्यम् ? । न कर्तव्यम् । क्रियते न्यास एव, लुप्तनिर्दिष्टोनकारः । यद्येवं नोपधाया इति दीर्घत्वं प्राप्नोति । सौत्रो निर्देश । अथवा नपुंसकनिर्देश· करिष्यते । अथ किमर्थमादिरुच्यते, न अदेवोच्येत । का रूपसिद्धि , वृक्षात् प्लक्षात् । सवर्णदीर्घत्वेन सिद्धम् । न सिध्यति । अतो गुणे पर-रूपमिति पररूपत्वं प्राप्नोति । अकारोच्चारणसामर्थ्यान्न भविष्यति ।'

या भाष्याचें विवरण वरील मनोरमेंत केलेंच आहे.) तसेंच 'जराया जरसन्यतरस्याम्' सू. ७-२-१०१ या सूत्रावरील भाष्यांत 'गोनर्दीयस्त्वाह। अतिजरैरिति भवितव्यं सन्निपातपरिभाषयेति' असें म्हटलें आहे. त्यामुळें 'पूर्वविप्रतिषेधेन' इत्यादि जें कित्येक वैयाकरणांचें म्हणणें आहे तें सर्व भाष्यविरुद्ध ठरतें हें उघड आहे. (या भाष्यांत भाष्यकार म्हणतात— 'यदा च जरस्भावः कृतस्तदा लुग् न भविष्यति, सन्निपातलक्षणो विधिरनिमित्तं तद्विघातस्येति। यद्येवमतिजरसमतिजरसैरित्यत्र न प्राप्नोति, अतिजरमतिजरैरिति भवितव्यम्। गोनर्दीय आह–इष्टमेवैतत्सङ्गृहीतं भवति। अतिजरमतिजरैरिति भवितव्यं, सत्यामेतस्यां परिभाषायां सन्निपातलक्षणो विधिरनिमित्तं तद्विघातस्येति।' या भाष्याचा भावार्थ हा आहे कीं, 'अतिजर अम्' या स्थलीं जरान्त नपुंसक अङ्गापुढें 'अम्' हा द्वितीयेच्या एकवचनाचा अजादि प्रत्यय असल्यामुळें, जर'चे जागीं जरसादेशाची प्राप्ति आहे व तो आदेश केल्यावर 'स्वमोर्नपुंसकात्' सू. ३१९ या सूत्रानें 'अम्' प्रत्ययाचा लुक् होण्याची प्राप्ति आहे. पण अजादि 'अम्' प्रत्ययाच्या निमित्तामुळें जरसादेश झाला असल्यामुळें, तो आदेश सन्निपातपरिभाषान्वयें 'अम्' प्रत्ययाचा लुक् करण्यास कारणीभूत होऊं शकत नाहीं. म्हणून 'अम्' प्रत्ययाचा लुक् न होतां 'अतिजरसम्' असें रूप झालें पाहिजे. परंतु ती परिभाषा असल्यामुळें, अतिजरसम्, अतिजरसैः' अशीं रूपें वास्तविक होऊं शकत नाहींत. 'अतिजर सु, अतिजर अम्, अतिजर टा' अशा स्थितींत अदन्त अङ्गाला मानून प्रथम दोन स्थलीं 'अतोऽम्' सू. ३०९ या सूत्रानें 'सु' व 'अम्' चे जागीं जो अमादेश होतो व तृतीय स्थलीं 'टाङसि' सू. २०१ या सूत्रानें 'टा' चे जागीं जो इनादेश होतो तो अमादेश व इनादेश, सन्निपातपरिभाषा असल्यामुळें, जरसादेश होऊं देण्यांत कारणीभूत होऊं शकत नाहीं; कारण 'जर' चे जागीं जरसादेश केल्यास, अकारान्त अङ्ग नाहींसें होऊन सकारान्त अङ्ग व त्यापुढील अजादि

प्रत्यय याच्या सन्निपाताचा नाश होणार व वरील परिभाषा असल्यामुळें, तसे करता येऊ शकत नाही. म्हणून या स्थली जरसादेश होऊ शकत नसल्यामुळें, 'अतिजरम् अतिजरैः' अशीच रूपें होऊ शकनात असे भाष्यकाराचे म्हणणे आहे या भाष्यावरून हे स्पष्ट होते की, भाष्यकारानी पूर्वविप्रतिषेध मानला नाही किंवा सन्निपातपरिभाषा अनित्य मानून 'निर्जरसिन, निर्जरसात्' इत्यादि रूपाची सिद्धि केली नाही म्हणून पूर्वविप्रतिषेध मानून व सन्निपातपरिभाषेचे अनित्यत्व मानून ज्या वैयाकरणानी तशा रूपाची सिद्धि केली आहे ते त्याचे करणे *भाष्यविरुद्ध असल्यामुळें स्वीकारार्ह* नाही दुसरे असे की, भाष्यकारानी 'टा' चे जागी 'न' व 'ङसि' चे जागी 'अत्' आदेश होणे सागितले असल्यामुळें, 'निर्जर टा' या स्थली पूर्वविप्रतिषेधानें 'टा' चे जागी, भाष्यकारानी सागितलेला, 'न' हा आदेश प्रथम केल्यास देखील, 'न' हा हलादि विभक्तिप्रत्यय होत असल्यामुळें, प्रकृत सूत्रानें 'निर्जर' यातील 'जर' चे जागी 'जरस्' आदेश पावतच नाही व त्यामुळें 'निर्जरसिन' असे तृतीयेच्या एक वचनाचे रूप होऊच शकत नाही. 'निर्जरेण' असेच रूप होऊ शकते त्याचप्रमाणे 'निर्जर ङसि' या स्थली पूर्वविप्रतिषेधानें 'ङसि' प्रत्ययाचे जागी, भाष्यकारानी सागितलेला, 'अत्' हा आदेश प्रथम केला असता, तो आदेश अजादि असल्यामुळें जरी 'निर्जर' यातील 'जर' चे जागी प्रकृत सूत्रानें 'जरस्' आदेश करता येतो तरी, तो आदेश केल्यावर 'निर्जरस् अत्' अशी स्थिति होऊन 'निर्जररात्' असे रूप होऊ शकते, 'निर्जरसात्' असे रूप होऊ शकत नाही. म्हणून पूर्वविप्रतिषेधवादी वैयाकरणानी 'निर्जरसिन, निर्जरसात्' अशी रूपें सिद्ध होतात असे जें म्हटले आहे ते म्हणणे, वर सागितल्याप्रमाणे, भाष्यविरुद्ध ठरते हे अगदी उघड आहे तसेच 'अतिजर भिस्' या स्थली 'अतो भिस ऐस्' सू २०३ या सूत्रानें 'भिस्' चे जागी पूर्वविप्रतिषेधानें 'ऐस्' आदेश प्रथम केल्यास तो आदेश अजादि असल्यामुळें, 'अतिजर' यातील 'जर' चे जागी 'जरस्'

आदेश होऊन 'अतिजरसैः' असें पाक्षिक रूप होऊं शकतें. पण भाष्य-कार तर म्हणतात कीं, सन्निपातपरिभाषा-परि. ८६-असल्यामुळें, 'अतिजरैः' असेच रूप झालें पाहिजे; कारण अदन्ताङ्गरूप निमित्ता-मुळें 'भिस्' चे जागीं जो 'ऐस्' आदेश होतो तो आदेश सन्निपातपरिभाषान्वयें अङ्गाच्या अदन्तत्वाचा नाश करूं शकत नाहीं. सारांश पूर्वविप्रतिषेध मानल्यानें जीं रूपें सिद्ध होतात तीं भाष्यविरुद्ध ठरत असल्यामुळें पूर्वविप्रतिषेध मानतां येत नाहीं असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे.)

शब्दरत्न-प्रत्याख्यायेति । प्रत्याख्यानेन चेदं ध्वन्यते-वक्ष्यमाणक्लेशपरिहारार्थं एवेकारो न तु फलान्तरेऽभिनिवेशस्यमिति । आदादेशे त्वदिति च्छेद एव सूत्रतात्पर्यमिति ।

(भाष्यकारांनीं 'इन, आत्' या आदेशांचें जें प्रत्याख्यान केलें आहे त्या) प्रत्याख्यानानें हें ध्वनित होतें कीं, (सूत्रकारानें 'टा' चे जागीं 'इन' आदेश होणें सांगितलें असून त्यांत) जें इकाराचें ग्रहण केलें आहे, म्हणजे 'न' असा आदेश होणें न सांगतां 'इन' असा आदेश होणें जें सांगितलें आहे, तें (भाष्यकारांनीं) पुढें सांगितलें जाणारें योगविभागादिक करण्यामध्यें जे क्लेश होतात ते क्लेश न व्हावे या हेतूनें सांगितलें असून (भाष्यकारांच्या मतें जीं रूपें सिद्ध होऊं शकत नाहींत तशीं) भिन्न रूपें सिद्ध व्हावीं याकरितां सांगितलें नाहीं, व 'आत्' या आदेशाऐवजीं 'अत्' असा आदेश होण्याकरितां ('इनात्' या पदाचा 'इन आत्' असा पदच्छेद न करितां) 'इन अत्' असा पदच्छेद करावा असें सूत्रकार पाणिनीच्या म्हणण्याचें तात्पर्य आहे. (सारांश शब्दरत्नकारांचें असें म्हणणें आहे कीं, पाणिनीच्या मतें देखील 'टा, ङसि' या प्रत्ययांचे जागी 'न, अत्' असेच आदेश होणें इष्ट असून, पाणिनीनें 'न'च्या ऐवजीं 'इन असा जो आदेश पठित केला आहे तो एवढ्याचकरितां कीं, योगविभागादिक क्लेश टळावे.)

मनोरमा—"पदन्नो"। अत्र शस्प्रभृतयो निमित्ततयोपात्ताः। ते च पदाद्यादेशानुरूपान् प्रकृतिविशेषानाक्षिपन्तीत्याह–पाददन्तेति। यद्यपि "शीर्षश्छन्दसि" इत्यतोऽत्र "छन्दसि" इत्यनुवर्तते तथाऽपि भाषायामपि क्वचिद्भवति "मासश्छन्दसि" इति वार्तिके छन्दोग्रहणात् ज्ञापकाद् इति वक्ष्यते। प्रामादिकमिति। तथा हि। "आस्नो वृकस्य वर्तिकामभीके" इति मन्त्रे मुखादित्यर्थः औचित्यात्। "वृकस्य चिद्वर्तिकामन्तरास्यात्" इति मन्त्रान्तरसंवादाच्च। एवं हव्या जुह्वान आसनि। आसन्य प्राणमूचुरित्यादावपि। व्याख्यात च तथैव वेदभाष्येषु। अतएव हरदत्तेनापि काशिकाया प्रामादिकत्वमाविष्कृतमिति ध्येयम्।

'पद्दन्नोमास्' सू. २२८ या सूत्रातील 'शस्प्रभृतिषु' या पदात 'शस्' इत्यादि प्रत्ययाचे निमित्तरूपानें ग्रहण केलें आहे, म्हणजे 'पाद' इत्यादि शब्दापुढें 'शस्' पासून सुरू होणारे प्रत्यय आले असतां त्या शब्दाचे जागी 'पद्' इत्यादि आदेश अनुक्रमें व्हावे असे विधान केलें आहे. ते निमित्तरूपानें गृहीत केलेले 'शस्' इत्यादि प्रत्यय 'पद् इत्यादि आदेशाना अनुरूप अशा विशिष्ट प्रकृतीना स्थानिरूपानें आक्षिप्त करतात आणि म्हणूनच प्रकृत सूत्रावरील कौमुदीत 'पाददन्तनासिका - एषां पदादय आदेशा. स्युः शसादौ वा' असें व्याख्यान केलें आहे. (प्रकृत सूत्रात केवळ आदेशाचा निर्देश केला असून ज्या स्थानीचे जागी ते आदेश होतात त्या स्थानीचा निर्देश केला नाही. तरी पण आदेश स्थानीचेच जागीं होत असल्यामुळें, प्रकृतसूत्रनिर्दिष्ट आदेश आपल्या अर्थाला व स्वरूपाला अनुरूप अशाच स्थानीचा आक्षेप करितात.) जरी 'शीर्षश्छन्दसि' या पूर्व सूत्रातून प्रकृत सूत्रात "छन्दसि' या पदाची अनुवृत्ति होते (व त्यामुळें वैदिक प्रयोगातच प्रकृत सूत्रात सांगितलेले आदेश होतात असा सूत्रार्थ होतो) तरी पण अगे आदेश भाषेंत देखील क्वचित् होत असतात हें, मासश्छन्दसीति वक्तव्यम्'— सू. ३५९४ वरील वार्तिक—या वार्तिकात 'छन्दसि'

या पदाचें ग्रहण केलें असल्यामुळें, ज्ञापित होतें हें पुढें सांगण्यांत येईल. (जर असे आदेश वेदांतच होत असते व भाषेंत होत नसते तर, 'मासश्छन्दसि' या वार्तिकांत 'छन्दसि' या पदाचें ग्रहण करण्याची कांहींच गरज नव्हती. प्रकृत सूत्रावरील काशिकेंत 'केचिदत्र छन्दसीत्यनुवर्तयन्ति । अपरे पुनरविशेषेणेच्छन्ति । तथा हि भाषायामपि पदादयः शब्दाः प्रयुज्यन्ते ।' असें म्हटलें आहे.) काशिकावृत्तींत 'आसन' या शब्दाचे जागीं 'आसन्' आदेश होतो असें जें म्हटलें आहे तें चूक आहे. (वास्तविक 'आस्य' या शब्दाचे जागीं 'आसन्' असा आदेश होतो.) उदाहरणार्थ 'आस्नो वृकस्य वर्तिकामभीके' या वेदमन्त्रांतील 'आस्नः' या पदाचा 'मुखात्' असाच अर्थ करणें उचित आहे; कारण 'वृकस्य चिद्वर्तिकाम-न्तरास्यात्' या दुसऱ्या वेदमन्त्रांत 'आस्यात्' असा स्पष्ट प्रयोग केला आहे. (त्यामुळें पूर्व मन्त्रांतील 'आस्नः' या पदाचा 'आस्यात्' असाच अर्थ करणें योग्य ठरतें व या वेदमन्त्रावरून हें स्पष्ट होतें कीं, 'आसन' या शब्दाचे जागीं 'आसन्' असा आदेश होत नसून, 'आस्य' या शब्दाचे जागीं तो आदेश होतो.) तसेंच 'एवं हव्या जुह्वान आसनि, आसन्यं प्राणमूचुः' इत्यादि वैदिक प्रयोगांवरून देखील हेंच सिद्ध होतें, म्हणजे 'आस्य' चे जागीं 'आसन्' आदेश होतो हेंच सिद्ध होतें. ('आसनि' हें 'आसन्' या आदेशाचें सप्तमीचें एकवचन आहे व 'आस्ये भवः आसन्यः' या स्थलीं 'तत्र भवः' या अर्थामध्यें 'आस्य' या शब्दाहून 'शरीराव-यवाच्च' सू. १४३० या सूत्रानें 'यत्' प्रत्यय होतेवेळीं 'आस्य' चे जागीं 'आसन्' आदेश झाला आहे.) वरप्रमाणेंच वेदभाष्यांत वरील शब्दांचें व्याख्यान केलें आहे आणि म्हणूनच हरदत्तानें देखील आपल्या टीकेंत काशिकाकारांचें म्हणणें चूक आहे असेंच प्रदिपादित केलें आहे, हें ध्यानांत ठेवावें. (हरदत्तानें प्रकृत सूत्रावरील पदमञ्जरींत 'अन्ते आसनशब्दः पठ्यते, आस्यशब्दस्तु पठितव्यः, आस्नो वृकस्य वर्तिकामभीके, ग्रीवायां बद्धो अपि कक्ष

आसनि, आसनो यत्सीसमुञ्चतं वृकस्येत्यादौ ह्यास्यार्थोऽवगम्यते' असे म्हटले आहे. )

शब्दरत्न— ते चेति । ये निमित्ततयोपात्तास्ते शस्प्रभृतय इत्यर्थः । अनुरूपानिति । स्वार्थबोधनसमर्थान्स्वसदृशवर्णवतश्चेत्यर्थः। वस्तुतो "वा शोकष्यञ्" इति वद् व्यवस्थार्थमेवेति बोध्यम् । अनुवर्तते इति । अस्येति प्राञ्च इति शेषः । ज्ञापकादिति । तन्निवृत्तेरिति भावः । अतएव भाष्ये तदनुवृत्तिर्नोक्ता ।

मनोरमेंतील 'ते च' या पदातील 'ते' या पदाचा 'ये निमित्ततयोपात्तास्ते शस्प्रभृतयः' असा अर्थ आहे. ( मनोरमेंत 'अत्र शस्प्रभृतयो निमित्ततयोपात्ताः' असे एक वाक्य असून त्यापुढें 'ते च' इत्यादि भिन्न वाक्य आहे परंतु 'सम्भवत्येकवाक्यत्वे वाक्यभेदस्यान्याय्यत्वात्' व 'यत्तदोर्नित्यसम्बन्धः' हे न्याय लक्षांत धरून शब्दरत्नकारानी वरील दोन वाक्यांचे 'ये निमित्ततयोपात्तास्ते शस्प्रभृतय. पदाद्यादेशाननुरूपान् .. आक्षिपन्ति' असे एक वाक्य तयार केले आहे. ) मनोरमेंतील 'अनुरूपान्' या पदाचा 'स्वार्थबोधनसमर्थान्स्वसदृशवर्णवतश्च', म्हणजे आदेशाच्या अर्थाचा बोध करून देण्यास समर्थ व आदेशात जसे वर्ण आहेत त्या वर्णांसारखे ज्या शब्दात वर्ण आहेत असे त्यानो, असा अर्थ आहे. ( त्यामुळें पादादिवाचक 'चरणादि' असदृश – वर्णसादृश्यरहित – रूपाची व्यावृत्ति होते, कारण जेथें अनेक धर्मांमुळें सादृश्य संभवते तेथें त्या धर्मांपैकी कोणत्याहि धर्माचा होता होईतोपर्यंत त्याग न करिता सर्व धर्मांनी जे सदृश आहेत त्याचेच ग्रहण करणे उचित आहे या अर्थाचा 'भूयसा व्यपदेशः' हा न्याय आहे. ) वास्तविक 'वा शोकष्यञ्रोगेषु' सू. ९८९ या सूत्रासारखेंच प्रकृत सूत्र केवळ प्रयोगनियामक सूत्र आहे असे समजावे. ( प्रकृत सूत्रात पठित असलेले शब्द आदेश नसून 'पाद, दन्त, नासिका' इत्यादि शब्दासारखे स्वतंत्र शब्द आहेत व सर्वनामस्थानप्रत्यय, म्हणजे 'सु' पासून

'औट्' पर्यंत पांच प्रत्यय, पुढें असतांना या सूत्रनिर्दिष्ट शब्दांचा प्रयोग करतां येत नसून, ते पांच प्रत्यय खेरीज करून इतर प्रत्यय पुढें असतांना या सूत्रनिर्दिष्ट शब्दांचा विकल्पें करून प्रयोग करतां येतो अशी व्यवस्था प्रदर्शित करणारें, म्हणजे अशा प्रकारचा नियम घालून देणारें, प्रकृत सूत्र आहे असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे आणि या म्हणण्याच्या समर्थनार्थ ते 'वा शोकष्यञ्रोगेषु' या सूत्राचें प्रमाण देतात. त्या सूत्राचा असा अर्थ आहे कीं, 'शोक, रोग' हे शब्द व तसेंच 'ष्यञ्' हा प्रत्यय पुढें असतांनाच, 'हृदय' व 'हृद्' या दोन्ही शब्दांचा विकल्पेंकरून प्रयोग करतां येतो, परंतु इतर शब्द किंवा प्रत्यय पुढें असतांना 'हृद्,' शब्दाचा प्रयोग करतां येत नाहीं व 'हृदय' शब्दाचाच प्रयोग करतां येतो. ही जशी व्यवस्था त्या सूत्रांत या दोन भिन्न व स्वतंत्र शब्दांसंबंधानें सांगितली आहे त्याप्रमाणें प्रकृत सूत्र देखील आदेशविधायक नसून स्वतंत्र व भिन्न शब्दांसंबंधानें व्यवस्थादर्शक आहे असें समजावें असें शब्दरत्नकार म्हणतात. 'शीर्षंश्छन्दसि' सू. ६–१–६० या सूत्रावरील भाष्यांत 'शीर्षन् छन्दसि प्रकृत्यन्तरम्' असें वचन पठित केलें आहे व त्या वचनाचें व्याख्यान करितांना भाष्यकार म्हणतात – 'शीर्षन् छन्दसि प्रकृत्यन्तरं द्रष्टव्यम् । किं प्रयोजनम् ? । आदेशप्रतिषेधार्थम् । आदेशो मा विज्ञायि, प्रकृत्यन्तरं यथा विज्ञायेत । किं च स्यात् ? । अस्कारान्तस्य छन्दसि श्रवणं न स्यात् । शिरो मे श्रीर्यशो मुखे । इदं ते शिरो भिनद्मीति ।' या भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं, 'शिरस्' या शब्दाचे जागीं 'शीर्षन्' असा आदेश होत नसून हे दोन्ही स्वतंत्र शब्द आहेत आणि तसेंच प्रकृत सूत्रासंबंधानेंहि समजावें असें शब्दरत्नकारांचें म्हणणें आहे.) मनोरमेंतील 'अनुवर्तते' या पदापुढें 'इति प्राञ्चः' हीं पदें अध्याहृत आहेत, म्हणजे प्रकृत सूत्रांत 'छन्दसि' हें पद अनुवृत्त होतें हें प्राचीन वैयाकरणांचें मत आहे. (या मताचा निर्देश मनोरमेंत केलेला आहे. यास्तविक 'शीर्षंश्छन्दसि' या सूत्रांतून प्रकृत सूत्रांत 'छन्दसि' हें पद अनुवृत्त

होत नाही; कारण त्या सूत्राच्या लगेच पुढें असलेल्या 'ये च तद्धिते' व 'अचि शीर्षः' या दोन सूत्रात ते पद अनुवृत्त होत नसल्यामुळें, त्या दोन सूत्रापुढें असणाऱ्या प्रकृत सूत्रात त्या पदाची मण्डूकप्लुतीने अनुवृत्ति करावी लागेल व तसे करण्यात दोष आहे हे पूर्वी अनेकदा सांगितलेच आहे) 'मासश्छन्दसि इति वार्तिके छन्दोग्रहणात् ज्ञापकात्' या मनोरमेच्या पंक्तीत 'ज्ञापकात्' हे जें पद घातले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, प्रकृत सूत्रात 'छन्दसि' या पदाची निवृत्ति होते, म्हणजे अनुवृत्ति होत नाही, याचे ज्ञापक 'मासश्छन्दसि' या वार्तिकातील 'छन्दसि' हें पद आहे. (सारांश प्रकृत-सूत्रनिर्दिष्ट आदेश भाषेंत देखील क्वचित् होतात याचे वार्तिकातील 'छन्दसि' हे पद ज्ञापक नसून, 'छन्दसि' हे पद प्रकृत सूत्रात अनुवृत्त होत नाही याचे ते वार्तिकस्थ पद वास्तविक ज्ञापक आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा भावार्थ आहे.) असे आहे म्हणूनच, म्हणजे प्रकृत सूत्रात 'छन्दसि' हे पद अनुवृत्त होत नसल्यामुळेंच, प्रकृत सूत्रावरील भाष्यात भाष्य-कारानी 'छन्दसि' या पदाची प्रकृत सूत्रात अनुवृत्ति होते असे म्हटले नाही.

मनोरमा-"अल्लोपोऽन." । अत्र प्राञ्चः । अन्नन्तस्य भस्याङ्गस्याकारस्य लोप. स्यादिति । तथा सति तक्ष्णा इत्यादौ तकाराकारस्यापि लोपः स्यात् । भस्याङ्गस्यानोऽकारस्य इति व्याख्याने तु अनसा, मनसा इत्यादौ स्यात् । तस्मादुपधादिना ऽन्नन्तस्य भस्यानोऽकारस्येति व्याख्यानेऽपि अनस्तक्ष्णेत्यादौ अति-व्याप्तिरेवातो व्याख्येऽङ्गावयव इत्यादि । भस्येत्यनेनाक्षिप्त. प्रत्ययविशेषोऽङ्ग चेति द्वयमनो विशेषणम्, अन् तु तकारस्य, अतो नोक्तदोष इति भावः । एतच्च "ष्यङः सम्प्रसारणम्" इति सूत्रे भाष्ये स्पष्टम् ।

'अल्लोपोऽनः' सू. २३४ या सूत्राचा प्राचीन वैयाकरणांनीं, म्हणजे काशिकाकार व प्रक्रियाकौमुदीकार यांनी, 'अन्नन्तस्य भस्याङ्गस्याकारस्य लोपः स्यात्', म्हणजे अन्नन्त भसंज्ञक अङ्गांतील अकाराचा लोप होतो, असा अर्थ केला आहे. (काशिकाकारांनीं प्रकृत सूत्राचा 'अनित्येवमन्तस्य भस्य अकारलोपो भवति' असा अर्थ केला असून, प्रक्रियाकौमुदीकारांनीं 'अन्नन्तस्य भस्याङ्गस्याकारस्य लोपः स्यात्' असा मनोरमेंत दिल्याप्रमाणें अर्थ केला आहे.) पण हा अर्थ बरोबर मानल्यास, 'तक्ष्णा' इत्यादि उदाहरणांत तकारापुढें असलेल्या अकाराचा देखील लोप होण्याची आपत्ति येते. ('तक्षन् टा = तक्षन् आ' या स्थलीं 'यचि भम्' सू. २३१ या सूत्रान्वयें 'तक्षन्' हें भसंज्ञक अङ्ग आहे व त्या अङ्गाच्या अन्तीं 'अन्' देखील आहे. अशा अङ्गांतील अकाराचा लोप होतो एवढाच प्रकृत सूत्राचा अर्थ केल्यास, 'तक्षन्' या अङ्गांत तकारापुढें अकार असून क्षकारापुढें देखील अकार असल्यामुळें व या दोन अकारांपैकी कोणत्या अकाराचा लोप करावा हें काशिकाकार व प्रक्रियाकौमुदीकार यांनीं प्रकृत सूत्राचा अर्थ करितांना स्पष्ट केलें नसल्यामुळें, दोन्ही अकारांचा किंवा दोनपैकीं पूर्व अकाराचा लोप होण्याची आपत्ति येते व तसा लोप केल्यास 'तक्ष्णा' असें इष्ट रूप सिद्ध होऊं शकत नाहीं हें उघड आहे.) 'भस्य अङ्गस्य अनः अकारस्य लोपः स्यात्', म्हणजे भसंज्ञक अङ्गांत असणाऱ्या 'अन्' मधील अकाराचा लोप होतो, असा प्रकृत सूत्राचा अर्थ केला तर, 'अनसा, मनसा' इत्यादि स्थलीं 'अन्' यांतील अकाराचा लोप होण्याची आपत्ति येते. (प्रकृत सूत्र अङ्गाधिकारांत पठित असून त्या अधिकारांत अन्तर्भूत असलेल्या भाधिकारांत पठित असल्यामुळें, या सूत्रांत 'अङ्गस्य' व 'भस्य' हीं पदें अनुवृत्त होतात आणि या दोन अनुवृत्त पदांपैकीं 'भस्य' हें पद 'अङ्गस्य' या पदाचें विशेषण मानल्यानें, प्रकृत सूत्राचा वरप्रमाणें अर्थ होतो व त्या अर्थान्वयें 'मनस् टा, अनस् टा' या दोन्ही उदाहरणांत

'टा = आ' हा अजादि असर्वनामस्थानप्रत्यय 'मनस्, अनस्' या अङ्गापुढें असल्यामुळें, 'यचि भम्' सू. २३१ या सूत्रानें ती अङ्गें भसंज्ञक ठरतात व त्या अङ्गात 'अन्' असल्यामुळें आणि वरील अर्थान्वयें तो 'अन्' अङ्गाच्या अन्ती असणे आवश्यक नसल्यामुळे, त्या 'अन्' मधील अकाराचा लोप होण्याची व 'मनसा, अनसा' अशी इष्ट रूपें सिद्ध न होण्याची आपत्ति येते.) तन्त्र, आवृत्ति इत्यादिकाच्या सहायानें प्रकृत सूत्राचा 'अन्नन्तस्य भस्य अनः अकारस्य लोपः स्यात्' असा अर्थ केला तरी देखील, 'अनस्तक्ष्णा' इत्यादि उदाहरणात अतिव्याप्तिरूप दोष येतो आणि म्हणूनच, म्हणजे वर दिलेल्या सर्व आपत्ति टाळण्याकरिताच, 'अङ्गावयवोऽसर्वनामस्थानयजादिस्वादिपरः योऽन् तस्य अकारस्य लोपः स्यात्' असा प्रकृत सूत्राचा कौमुदीत अर्थ केला आहे. (प्रकृत सूत्रात निर्दिष्ट असलेला 'अन.' हा शब्द दोनदा उच्चारून आणि प्रथम उच्चारलेले 'अनः' हें पद 'भस्य' या अनुवृत्त पदाचे विशेषण मानून 'येन विधिस्तदन्तस्य' सू. २६ या सूत्राने 'अन.' या विशेषणाचा 'अन्नन्तस्य' असा अर्थ केल्यास व दुसऱ्यानें उच्चारलेले 'अनः' हे पद अवयवषष्ठी मानून व त्याचा 'अत् = अत' या सूत्रनिर्दिष्ट पदामध्यें अन्वय करून 'अनः अकारस्य' असा 'अनः अतः' या पदाचा अर्थ केल्यास, प्रकृत सूत्राचा 'अन्नन्तस्य भस्य अनः अकारस्य लोप. स्यात्' असा अर्थ होतो व 'अनस्तक्षन् टा' या स्थली 'अनस्तक्षन्' या अङ्गापुढें 'टा = आ' हा अजादि असर्वनामस्थानप्रत्यय असल्यामुळें, हे अङ्ग भसंज्ञक ठरते व ते अन्नन्त देखील आहे. परंतु या अङ्गामध्यें दोन 'अन्' आहेत व कोणत्या 'अन्' मधील अकाराचा लोप व्हावा हे, वर जसा प्रकृत सूत्राचा अर्थ केला आहे त्यात, सांगितले नसल्यामुळें, 'अनस्' या पूर्व पदाच्या 'अन्' मधील अकाराचा लोप होण्याची व 'अनस्तक्ष्णा' अशे इष्ट रूप सिद्ध न होण्याची आपत्ति येते. या वर दर्शविलेल्या सर्व आपत्ति टाळण्याकरिताच प्रकृत सूत्राचा कौमुदीत वर सांगितल्या-

प्रमाणें अर्थ केला आहे. तसा अर्थ केला असल्यामुळें, 'तक्षन् टा' या उदाहरणांत तकारापुढील अकाराचा लोप होण्याची आपत्ति टळते; कारण या स्थलीं जरी 'तक्षन्' हें अङ्ग भसंज्ञक व अन्नन्त असून 'अन्'च्या लगेंच पुढें 'टा = आ' हा असर्वनामस्थान अजादि प्रत्यय आहे तरी, तकारापुढील ज्या अकाराचा लोप होण्याची आपत्ति दिली आहे तो अकार 'अन्' चा अवयव नाहीं. त्यामुळें तकारापुढील अकाराचा लोप न होतां 'अन्' यांतील अकाराचा प्रकृत सूत्रानें लोप होऊन 'तक्ष्णा' असें इष्ट रूप सिद्ध होतें. 'मनस् टा, अनस् टा' या उदाहरणांत भसंज्ञक अङ्गामध्यें जो 'अन्' आहे तो 'टा = आ' या असर्वनामस्थान अजादि प्रत्ययाच्या लगेंच पूर्वी नसून दोहोंमध्यें 'अस्' चें व्यवधान आहे. म्हणून येथें कौमुदींत दिलेल्या अर्थान्वयें 'अन्' यांतील अकाराचा लोप होण्याची आपत्ति टळते व 'मनसा, अनसा' अशीं इष्ट रूपें सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. तसेंच 'अनस्तक्षन् टा' या उदाहरणांत 'अनस्' यांतील 'अन्' असर्वनामस्थान अजादि 'टा = आ' या प्रत्ययाच्या लगेंच पूर्वी नसल्यामुळें, त्या 'अन्' मधील अकाराचा लोप होण्याची आपत्ति टळते. परंतु त्या उदाहरणांतील 'तक्षन्' यामध्यें जो 'अन्' आहे तो 'टा = आ' या असर्वनामस्थान अजादि प्रत्ययाच्या लगेंच पूर्वी असल्यामुळें, त्या द्वितीय 'अन्' मधील अकाराचा लोप होऊन 'अनस्तक्ष्णा' असें इष्ट रूप सिद्ध होतें. यकारादि किंवा अजादि असर्वनामस्थानप्रत्यय पुढें असतांनाच, 'यचि भम्' सू. २३१ या सूत्रानें अङ्गाला भसंज्ञा होत असल्यामुळें, प्रकृत सूत्रांत अनुवृत्त असलेल्या) 'भस्य' या पदानें तसा विशिष्ट प्रत्यय, म्हणजे असर्वनामस्थान यजादि स्वादि प्रत्यय, आक्षिप्त होतो आणि या आक्षिप्त प्रत्यय व प्रकृत सूत्रांत अनुवृत्त होत असलेलें 'अङ्गस्य' हें पद या सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या 'अनः' या पदाचीं विशेषणें होतात आणि 'अनः' हें पद सूत्रनिर्दिष्ट 'अन् = अतः' या पदाचें विशेषण होतें व अशा रीतीनें अन्वय केल्यानें वर दर्शविलेल्या

दोषापैकी कोणताहि दोष येत नाही (व सर्व इष्ट रूपाची सिद्धि होते) असा या म्हणण्याचा भावार्थ आहे. कौमुदीत जें प्रकृत सूत्राचे व्याख्यान केले आहे ते 'ष्यङ. सम्प्रसारणम्' सू. ६-१-१३ या सूत्रावरील भाष्यावरून स्पष्ट होते. (त्या भाष्याचे विवरण शब्दरत्नात करण्यात येईल.

शब्दरत्न–तथा सतीति। प्राचीनसंमतव्याख्यादरे इत्यर्थः। भस्येत्यनेनेति। अङ्गस्येत्येतत्सहितेनेत्यर्थः। एतेन भत्वस्य वृषणोऽप्रत्ययवस्त्वस्वशब्दयोरपि विधानात्तेन न प्रत्ययाक्षेप इत्यपास्तम्। अङ्ग चेति अधिकारलब्धमिति भावः। ननु भत्वस्य तत्सूत्रे "यस्मात्प्रत्ययविधिः" इत्यनुवृत्त्याऽङ्गनिष्ठत्वेन तेनाङ्गनिष्ठयजादिपरत्वाक्षेपेण तदवयवस्य तस्वालाभः। किं चानो विशेषणेऽपि 'विधौ परिभाषोपतिष्ठते नानुवादे' इति निर्दिष्टपरिभाषानुपस्थितेरनन्तर्णोस्यादौ दोषो दुर्वार इति चेतनाह–एतच्चेति। तथा च भाष्यम्–"एवं तर्हि कार्यकालं सञ्ज्ञापरिभाषं यत्र कार्यं तत्रोपस्थितमिदं द्रष्टव्यं "भस्य" इत्युपस्थितमिदं भवति "यचि भम्" इति तत्र यजादिपरतयाऽङ्कार विशेषयिष्यामः. अनो वाकारम्। यजादिस्वादिपरस्यानोऽकारस्येति"। तस्याय भावः। कार्यकालपक्षे "भस्य" इति श्रुते भपदार्थजिज्ञासाया "यचि भम्" इत्युपस्थितेन वाक्यपदे धृते एतद्वाक्यार्थबोधकाले तदयानुरोधेन तत्राऽदिन्यायाश्रयणाद् यचोऽस्यान्विशेषणताऽपि। विधौ परिभाषेति न्यायस्तु "इको गुणवृद्धी" "अचश्च" इति व्यतिरिक्ते नास्त्येव "उदात्तस्वरितयोर्यण" इत्यादावुदात्तस्वरितस्यानिरयण इत्यर्थस्येष्टत्वादिति। एतच्च स्त्रीप्रत्यये इत्यप्रकरणे निरूपयिष्यामः।

यदि तु अदमुयद्विरयर्थमनन्त्यविकार इति परिभाषाऽऽश्रयणे तर्पचानस्तरणेत्यादौ व्यावृत्तिः। अत्र शान्तमहत इत्यादौ चानेकक्लिष्टकल्पनापेक्षया परिभाषाश्रयोऽकार एवोचितः। भाष्यन्तु वार्तिकोक्तफलानां अन्यथासिद्धिप्रदर्शनमात्रपरम्। अत एव यान्ये-

तस्या परिभाषायाः प्रयोजनानि तदर्थमेषा परिभाषा कर्तव्येति भाष्ये उपसंहृतम् । यत्तु "न सम्प्रसारण" इति सूत्रे "नैतस्याः परिभाषायाः सन्ति प्रयोजनानि" इति भाष्यं तत्तु "न सम्प्रसारण" इत्यादेरेव ज्ञापकात्प्रयोजनाल्पत्वसूचकमित्युच्यते तदाऽस्तु अङ्गविशेषणमेव तदित्याहुः ।

मनोरमेंतील 'तथा सति' या पदांचा 'प्राचीन वैयाकरणांना, म्हणजे काशिकाकार व प्रक्रियाकौमुदीकार यांना, जो प्रकृत सूत्राचा अर्थ होणें संमत आहे तो बरोबर मानल्यास' असा अर्थ आहे. 'भस्य इत्यनेन आक्षिप्तः' या मनोरमेच्या पंक्तींतील 'भस्य इत्यनेन' या पदांचा 'अङ्गस्य इत्येतत्सहितेन भस्य इत्यनेन' असा अर्थ आहे. असा अर्थ केल्यानें, (प्रत्यय पुढें असतांनाच भसंज्ञा होते असें नसून, 'वृषण्वस्वश्वयोः'–सू. ३३८९ वरील वार्तिक–या वार्तिकास्वयें) प्रत्यय नसणारे, म्हणजे असर्वनामस्थान यजादिस्वादि प्रत्यय नसणारे, 'वसु' किंवा 'अश्व' हे शब्द 'वृषन्' शब्दापुढें आल्यास 'वृषन्' शब्दाला भसंज्ञा होत असल्यामुळें, 'भस्य' या पदानें प्रत्ययविशेषणाचा, म्हणजे असर्वनामस्थान यजादिस्वादि प्रत्ययाचा, नियमेंकरून आक्षेप होत नाहीं असें जे कोणी म्हणतात तें त्यांचें म्हणणें चूक ठरतें. (शंकाकार अशी शंका करतो कीं, असर्वनामस्थान यजादिस्वादि प्रत्यय पुढें असतांनाच अङ्गाला भसंज्ञा होते असें नसून, 'वृषन्' शब्दापुढें 'वसु' किंवा 'अश्व' शब्द आल्यास 'वृषन्' शब्दाला भसंज्ञा होत असल्यामुळें, 'भस्य इत्यनेन आक्षिप्तः प्रत्ययविशेषः' असें जें दीक्षितांनीं मनोरमेंत म्हटलें आहे तें बरोबर मानतां येत नाहीं. जर प्रत्ययविशेष पुढें आला असतांच अङ्गाला भसंज्ञा होत असती तर दीक्षितांचें म्हणणें योग्य ठरलें असतें. या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं, प्रकृत सूत्र अङ्गाधिकारान्तर्गत भाधिकारांत पठित असल्यामुळें आणि 'अङ्गस्य' व 'भस्य' हीं दोन्ही पदें त्यांत अनुवृत्त होत असल्यामुळें, 'भस्य' हें 'अङ्गस्य' याचें विशेषण मान-

स्थानीं त्या दोन अनुवृत्त पदाचा 'भसंज्ञकस्य अङ्गस्य' असाच अर्थ होतो आणि 'यस्मात् प्रत्ययविधिस्तदादि प्रत्ययेऽङ्गम्' सू १९९ या सूत्रान्वयें अङ्गसंज्ञा होण्याकरिता प्रत्यय पुढें असणे आवश्यक असल्यामुळें, अङ्गाला भसंज्ञा होण्याकरिता प्रकृत सूत्रात असर्वनामस्थान यजादिस्वादि प्रत्ययाचा नियमानें आक्षेप होतोच आणि तो आक्षिप्त प्रत्यय 'अन्' चे विशेषण होऊन सूत्रार्थ असा होतो की, भसंज्ञक अङ्गाच्या अन्ती 'अन्' असून तो 'अन्' तशा आक्षिप्त प्रत्ययाच्या लगेच पूर्वी असल्यास, त्या 'अन्' मधील अकाराचा लोप होतो. 'वृषण्वसुः, वृषणश्वः' या दोन्ही उदाहरणात 'वृषन्' या शब्दापुढें प्रत्यय नसून 'वसु' व 'अश्व' हे शब्द असल्यामुळे, 'वृषन्' शब्दाला जरी वरील वार्तिकान्वयें, नकारलोप टाळण्याकरिता, भसंज्ञा होते असे विधान केले आहे तरी, त्या शब्दाला अङ्गसंज्ञा होत नाही व त्यामुळें 'वृषन्' शब्दातील 'अन्' च्या अकाराचा अङ्गाधिकारस्थ प्रकृत सूत्रानें लोप होऊ शकत नाही. वरील वार्तिकाचे कौमुदीत विवरण करिताना दीक्षितानी 'अल्लोपोऽनः इत्यल्लोपो न, अनङ्गत्वात्' असेच म्हटले आहे.) 'अङ्ग वेति' असे जें मनोरमेंत म्हटले आहे ते 'अङ्गस्य' या अधिकारसूत्रातून प्रकृत सूत्रात अनुवृत्त होणारे पद होय. (आता येथें शंकाकार अशी शंका करतो की, भसंज्ञेचे विधान करणाऱ्या 'यचि भम्' सू २३१ या सूत्रात) 'यस्मात् प्रत्ययविधिः' या सूत्राची अनुवृत्ति होत असल्यामुळें व अशा रीतीनें भत्व अङ्गनिष्ठ ठरत असल्यामुळें, म्हणजे भत्व हा धर्म अङ्गाचे ठिकाणी राहणारा धर्म ठरत असल्यामुळें, अङ्गाला भसंज्ञा होण्याकरिता जरी अङ्गापुढें असर्वनामस्थान यजादिस्वादि प्रत्यय असणे याचा आक्षेप होतो तरी, त्या भसंज्ञक अङ्गातील अवयव 'अन्' हा यजादिस्वादिप्रत्ययपरक, म्हणजे यजादिस्वादिप्रत्ययाच्या लगेच पूर्वी असणारा, असावा असा 'अल्लोपोऽन.' या प्रकृत सूत्रातून अर्थ निघू शकत नाही. दुसरे असें की, 'अन्' हा जरी सूत्रनिर्दिष्ट 'अन्' याचे विशेषण होतो तरी,

तो 'अन्' 'अत्' या उद्देश्याचें विशेषण होत असल्यामुळें व 'विधौ परिभाषा उपतिष्ठते नानुवादे'—परि. १०२—अशी परिभाषा असल्यामुळें, 'तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य' सू. ४० ही निर्दिष्ट परिभाषा 'अन्' चे ठिकाणीं उपस्थित होऊं शकत नाहीं (व त्यामुळें 'यजादिस्वादिप्रत्ययपरको योऽन् तस्य अकारस्य लोपो भवति' असा सूत्रार्थ होऊं शकत नाहीं आणि) त्यामुळें, 'अनस्त-क्षणा' इत्यादि उदाहरणांत 'अनस्' यांतील 'अन्' मध्यें अस-णाऱ्या अकाराचा लोप होण्याची आपत्ति टाळतां येत नाहीं. (शंका-कार असें म्हणतो कीं, अङ्गाला भसंज्ञा होण्याकरितां त्या अङ्गापुढें असर्वनामस्थान यजादिस्वादिप्रत्यय असणें आवश्यक असल्यामुळे, जरी अङ्गाला भसंज्ञा झाल्यानें तशा प्रकारच्या प्रत्ययाचा नियमें-करून आक्षेप करतां येतो तरी, तो आक्षिप्त प्रत्यय 'असर्वनाम-स्थानयजादिस्वादिप्रत्ययपरकं भसंज्ञकमङ्गम्' अशा रीतीनें भसंज्ञक अङ्गाचेंच विशेषण होऊं शकतो, 'अन्' चें विशेषण तो आक्षिप्त प्रत्यय होऊं शकत नाहीं. त्यामुळें 'यजादिस्वादिप्रत्ययपरकः यः अन् तस्य अकारस्य लोपःस्यात्' असा प्रकृत सूत्राचा अर्थ होऊं शकत नाहीं. दुसरें असें कीं, 'विधौ परिभाषा उपतिष्ठते नानुवादे' या परिभाषान्वयें, कोणतीहि परिभाषा विधेयाच्या विशेषणाचे ठिकाणीं प्रवृत्त करतां येते, उद्देश्याच्या विशेषणाचे ठिकाणीं परिभाषा प्रवृत्त करतां येत नाहीं. प्रकृत सूत्रांत अकाराच्या लोपाचें विधान केलें असल्यामुळें, 'लोप' हा विधेय ठरत असून, ज्या अकाराचा, म्हणजे 'अत्' चा, लोप होणें सांगितलें आहे तो अकार उद्देश्य ठरतो व त्या उद्देश्याचें 'अनः' हें विशेषण असल्यामुळें, 'विधौ परिभाषा उपतिष्ठते' या परिभाषान्वयें, 'तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य' ही परिभाषा त्या 'अन्' चे ठिकाणीं प्रवृत्त करतां येत नाहीं आणि त्यामुळें देखील 'यजादिस्वादिप्रत्ययपरकः यः अन् तस्य अकारस्य लोपः स्यात्' असा प्रकृत सूत्राचा अर्थ होऊं शकत नाहीं. त्यामुळें 'अनस्तक्षन् टा' या स्थलीं 'अनस्तक्षन्'

हें अङ्ग भसञ्ज्ञक असल्यामुळें, जरी 'अनस्' या पूर्व पदातील 'अन्' हा 'टा' या अजादिस्वादिप्रत्ययाच्या लगेंच पूर्वी नाही तरी, त्यातील अकाराचा लोप होण्याची आपत्ति येते व ती टाळता येणे अशक्य आहे ) या शंकेचे निवारण करण्याकरिता दीक्षितानी मनोरमेंत 'एतच्च प्यङः सम्प्रसारणमिति सूत्रे भाष्ये स्पष्टम्' असे म्हटले आहे. ते भाष्य 'एव तर्हि कार्यकाल सञ्ज्ञापरिभाषम् ... अनोऽकारस्येति' असे आहे. ( 'प्यङः सम्प्रसारणम्' सू. ६–१–१३ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी 'अनन्त्यविकारेऽन्त्यसदेशस्य'– परि. १०४ – ही परिभाषा पठित करून त्या परिभाषेची अनेक प्रयोजनें सांगतेवेळी त्यानी 'अन्कारान्तस्याऽल्लोपे' हें वार्तिक पठित केलें आहे व त्या वार्तिकाचे व्याख्यान करिताना भाष्यकार म्हणतात:- 'अन्कारान्तस्याऽल्लोपे प्रयोजनम्–तक्ष्णा तक्ष्णे इति । त इत्यत्रापि प्राप्नोति । अनन्त्यविकारेऽन्त्यसदेशस्य कार्यं भवतीति न दोषो भवति । एतदपि नास्ति प्रयोजनम्, – अनाऽकारं विशेषयिष्यामः, –अनो योऽकार इति । एवमप्यनसा अनसे इत्यत्रापि प्राप्नोति । अन्कारेणाङ्गं विशेषयिष्यामोऽनाऽकारम् – अन्कारान्तस्याङ्गस्याऽनो योऽकार इति । एवमप्यनस्तक्ष्णाऽनस्तक्ष्णे इत्यत्रापि प्राप्नोति ।' या भाष्याचा भावार्थ हा आहे की, 'अल्लोपोऽनः' या प्रकृत सूत्राचा अनन्त भसञ्ज्ञक अङ्गातील अकाराचा लोप करावा असा अर्थ केल्यास, 'तक्षन् टा' या स्थली तकारापुढील अकाराचा लोप होण्याची जी आपत्ति येते ती आपत्ति 'अनन्त्यविकारे' ही परिभाषा असल्यामुळें टाळता येते, कारण या परिभाषेचा असा अर्थ आहे की, जेथें एखाद्या सूत्रानें सांगितलेले आदेशरूप कार्य अन्त्य वर्णाहून भिन्न अशा दोन वर्णांना एखाद्या शब्दस्वरूपामध्यें युगपत् प्राप्त होते तेथें ते कार्य अन्त्य वर्णाच्या लगेंच मागें असणाऱ्या वर्णालाच करावे. 'तक्षन् टा' या स्थली प्रकृत सूत्रानें 'तक्षन्' यातील अन्त्य नकाराला लोपरूप कार्य पावले नसून अकाराला ते कार्य पावले आहे पण 'तक्षन्' या अनन्त भसञ्ज्ञक अङ्गात तर दोन अकार आहेत व त्या दोन अकारां-

पैकीं कोणत्या अकाराचा लोप करावा असा प्रश्न उपस्थित झाला असतां, 'अनन्त्यविकारे' ही परिभाषा असें सांगते कीं 'तक्षन्' यांतील नकाराच्या लगेंच पूर्वी असणाऱ्या अकाराचाच लोप करावा. त्यामुळें तकारापुढील अकाराचा लोप होण्याची आपत्ति टळते व क्षकारापुढील अकाराचाच लोप होतो आणि 'तक्ष्णा, तक्ष्णे' अशीं इष्ट रूपें सिद्ध होतात. यावर भाष्यकार असें म्हणतात कीं, 'अनन्त्यविकारे' ही परिभाषा न मानली तरी, 'तक्ष्णा, तक्ष्णे' अशीं रूपें सिद्ध करतां येतात. 'अल्लोपोऽनः' या प्रकृत सूत्रांतील 'अनः' हें पद 'अत् = अतः' या सूत्रनिर्दिष्ट पदाचें विशेषण मानून 'अनः यः अकारः' असा अर्थ केला असतां, 'तक्ष्णा' या उदाहरणांत तकारापुढील अकार 'अन्' यांतील अकार नसल्यामुळें, त्याचा लोप होऊं शकत नाहीं व क्षकारापुढील अकार 'अन्' यांतील अकार असल्यामुळें त्याचाच लोप होऊं शकतो व 'तक्ष्णा, तक्ष्णे' इत्यादि रूपें सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. पण पुढें भाष्यकार असें म्हणतात कीं, 'अनः अकारस्य लोपः स्यात्' असा जर प्रकृत सूत्राचा अर्थ केला तर, 'अनस् टा' या स्थलीं 'अनस्' हें भसंज्ञक अङ्ग असून त्यांत 'अन्' असल्यामुळें, त्या 'अन्' मधील अकाराचा लोप होण्याची व 'अनसा' असें इष्ट रूप सिद्ध न होण्याची आपत्ति येते. ही आपत्ति टाळण्याकरितां भाष्यकार असें सुचवितात कीं, प्रकृत सूत्रांत अनुवृत्त असलेल्या 'अङ्गस्य' या पदाचें सूत्र-निर्दिष्ट 'अनः' हें पद विशेषण मानावें व 'अनः' याचा 'येन विधिस्तदन्तस्य' सू. २६ या सूत्रान्वयें 'अन्नन्तस्य' असा अर्थ करावा. त्याचप्रमाणें 'अनः' हें पद सूत्रनिर्दिष्ट 'अत् = अतः' याचें देखील विशेषण मानावें व 'अनः अतः' याचा 'अनः यः अकारः तस्य' असा अर्थ करावा. असें केलें असतां, प्रकृत सूत्राचा असा अर्थ होतो कीं, अन्नन्त भसंज्ञक अङ्गाच्या 'अन्' मधील अकाराचा लोप होतो. 'अनस् टा' या उदाहरणांत 'अनस्' हें अङ्ग जरी भसंज्ञक आहे तरी तें अन्नन्त नसल्यामुळें, वरील

अर्थान्वयें त्या अङ्गातील 'अन्' च्या अकाराचा लोप होण्याची आपत्ति आपोआपच टळते. पण पुढें भाष्यकार असे म्हणतात की, वरप्रमाणे प्रकृत सूत्राचा अर्थ केल्यानें जरी 'अनसा' यातील अकाराचा लोप होण्याची आपत्ति टळते तरी, 'अनस्तक्षन् टा' या उदाहरणात, अनन्त्यविकारे' ही परिभाषा न मानल्यास, 'अनस्' या पूर्व पदातील 'अन्' यात असणाऱ्या अकाराचा लोप होण्याची आपत्ति येऊ पाहते; कारण 'अनस्तक्षन्' हें अङ्ग अन्नन्त व भसंज्ञक असून त्या अङ्गात दोन 'अन्' आहेत. पण वरील परिभाषा मानली तर, त्या दोन 'अन्' पैंकी उत्तर 'अन्' यातील अकाराचा लोप करता येतो व पूर्व 'अन्' मधील अकाराचा लोप करता येत नाही. म्हणून ती परिभाषा मानणें आवश्यक आहे असे शंकाकारानें म्हटलें असता, त्या शंकेवर भाष्यकार शब्दरत्नात उद्धृत केलेले उत्तर देतात, व ते उत्तर असें आहे- 'एवं तर्हि । कार्यकालं संज्ञापरिभाषम् । यत्र कार्यं तत्रोपस्थितं द्रष्टव्यम् । भस्येति तत्रोपस्थितमिदं भवति यचि भमिति, तत्र यजादिपरतयाऽन्कार विशेषयिष्यामोऽन्नाऽकारयजादिपरस्याऽन्नो योऽकार इति ।' या भाष्याचा भावार्थ शब्दरत्नकार स्वत च पुढील पंक्तीत सागतात.) या भाष्याचा भावार्थ हा आहे की, (प्रकृत सूत्र भाधिकारात पठित असल्यामुळें, त्यात 'भस्य' या पदाची अनुवृत्ति होते व) कार्यकालपक्षात 'भस्य' या अनुवृत्त पदाचें श्रवण झालें असता, 'भ' या पदाचा अर्थ काय आहे अशी जिज्ञासा उत्पन्न होताक्षणीच ('यदा कार्यं तदा संज्ञा-परिभाषम्' या न्यायान्वयें) 'यचि भम्' हे भसंज्ञाविधायक सूत्र उपस्थित होऊन 'भ' या शब्दाचा अभिधावृत्तीनें होणारा अर्थ कळतो व (ते संज्ञासूत्र प्रकृत विधिसूत्राशी एकवाक्यतापन्न झालें असता) प्रकृत सूत्राचा अर्थ करतेवेळी इष्ट रूपाची सिद्धि होण्या-करिता तन्त्रादिन्यायाचा आश्रय केल्यानें, म्हणजे 'यचि भम्' या सूत्रातील 'यचि' हें पद दोनदा उच्चारल्यानें, (ते पद जसे

'अङ्गस्य' या अनुवृत्त पदाचें विशेषण होतें त्याचप्रमाणें) तें पद प्रकृत सूत्रांतील 'अनः' या पदाचें देखील विशेषण होतें (व त्यामुळें 'भसंज्ञकं यदङ्गं तदवयवस्य यजादिस्वादिप्रत्ययपरकस्य अनः अकारस्य लोपः स्यात्' असा प्रकृत सूत्राचा अर्थ होतो व तसा अर्थ केल्यानें 'अनस्तक्ष्णा' या उदाहरणांत 'अनस्' या पूर्व पदांतील 'अन्' हा अजादिस्वादिप्रत्ययपरक नसल्यामुळें त्यांतील अकाराचा लोप होण्याची आपत्ति टळते व 'तक्षन्' या उत्तर पदांतील 'अन्' जो अजादिस्वादिप्रत्ययपरक आहे त्यांतीलच अकाराचा लोप होऊन 'अनस्तक्ष्णा' असें इष्ट रूप सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. म्हणून भाष्यकार म्हणतात कीं, 'अनन्त्यविकारे' ही परिभाषा न मानली तरी, प्रकृत सूत्राचा जसा वर अर्थ केला आहे तसा अर्थ केल्यानें सर्व दोषांचें निवारण होऊन सर्व इष्ट रूपें सिद्ध होऊं शकतात. सारांश दीक्षितांनीं कौमुदींत प्रकृत सूत्राचा जो अर्थ दिला आहे त्याला हें वरील भाष्य प्रमाण आहे असें शब्दरत्नकारांचें म्हणणें आहे.) 'विधौ परिभाषा उपतिष्ठते नानुवादे' ही परिभाषा 'इको गुणवृद्धी' सू. ३४ व 'अचश्च' सू. ३५ हीं दोन सूत्रें खेरीज करून इतर कोणत्याहि सूत्रास लागू पडत नाहीं; कारण 'उदात्त-स्वरितयोर्यणः' सू. ३६५७ इत्यादि सूत्रांतील 'उदात्तस्वरितयोः' या पदाचा 'उदात्तस्वरितस्थानिकयणः' असा अर्थ करणें इष्ट आहे. या विषयाचें विवेचन ('प्रत्ययस्थात्कात्पूर्वस्य' सू. ४६३ या) स्त्रीप्रत्ययप्रकरणांतील इत्वविधायक सूत्राचें व्याख्यान करितांना करण्यांत येईल. ('किञ्च विधौ परिभाषेति प्रवादः इको गुणवृद्धी अचश्च इत्यनयोर्विधीयत इत्यध्याहारमूलकोऽन्यत्र तु नास्याः फलम्', म्हणजे 'विधौ परिभाषा उपतिष्ठते' ही जी प्राचीन वैयाकरणांनीं परिभाषा मानली आहे ती 'इको गुणवृद्धी' व 'अचश्च' या दोन सूत्रांत 'विधीयते' या पदाचा जो अध्याहार करावा लागतो त्याच्या आधारावरच मानली आहे व हीं दोन सूत्रें खेरीज करून इतर कोठेंहि ही परिभाषा मानल्यानें कोणत्याहि विशेष फळाची निष्पत्ति

दितां हल उपधायाः' सू. ४१५ या सूत्रानें 'अञ्च्' यांतील नकाराचा लोप होऊन व 'वेरपृक्तस्य' सू. ३७५ या सूत्रानें 'क्विन् = व्' या अपृक्त प्रत्ययाचा लोप होऊन 'अदस् अच्' अशी स्थिति झाल्यावर 'विष्वग्देवयोः' सू. ४१८ या सूत्रानें 'अदस्' यांतील 'टि' चे, म्हणजे 'अस्' चे, जागीं 'अद्रि' असा आदेश होऊन 'अदद्रि अच् = अदद्र्यच्' अशी स्थिति होते. अशा स्थितींत 'अदसोसेर्दादु दो मः' सू. ४१९ या सूत्रानें 'अदद्र्यच्' यांतील प्रथम दकाराचा मकार व त्या दकारापुढील अकाराचा उकार आणि त्याचप्रमाणें द्वितीय दकाराचे जागीं मकार व त्या दकारापुढील रेफाचे जागीं उकार केल्यास, 'अमुमुयच्' असें रूप होतें. पण असें रूप होणें ज्या वैयाकरणांना इष्ट नाहीं व 'अदमुयच्' असेंच रूप होणें इष्ट आहे त्यांचें असें म्हणणें आहे कीं, 'अमुमुयच्' हें रूप सिद्ध न व्हावें याकरितां 'अनन्त्यविकारे' ही परिभाषा मानणें इष्ट आहे व ही परिभाषा मानली असतां, 'अदद्र्यच्' यांतील अन्त्य वर्णाच्या मागें असणाऱ्या उत्तर दकारास व त्यापुढील रकारास 'अदसोऽसेः' या सूत्रानें होणारें कार्य होतें व पूर्व दकारास व त्यापुढील अकारास तें कार्य होत नाहीं आणि त्यामुळें 'अमुमुयच्' असें रूप होण्याची आपत्ति टळते. तसेंच ही परिभाषा मानली असतां 'अनस्तक्षन् टा' इत्यादि स्थलीं उत्तर 'अन्' मधील अकाराचा प्रकृत सूत्रानें लोप होतो व पूर्व 'अन्' मधील अकाराचा लोप होण्याची आपत्ति टळते.) म्हणून 'सान्त महतः' सू. ३१७ इत्यादि सूत्रांच्या विषयांत अनेक क्लिष्ट कल्पना करण्यापेक्षां 'अनन्त्यविकारे' ही परिभाषा मानणेंच उचित आहे. वार्तिककारानें त्या परिभाषेचीं जीं फलें सांगितलीं आहेत तीं फलें (ती परिभाषा न मानतां देखील) इतर रीतीनें सिद्ध होऊं शकतात एवढेंच दाखविण्यापुरतें ('ष्यङः सम्प्रसारणम्' या सूत्रावरील) भाष्य आहे आणि म्हणूनच त्या भाष्यांत 'यान्येतस्याः परिभाषायाः प्रयोजनानि तदर्थमेषा परिभाषा कर्तव्या' असा उपसंहार केला आहे. ('ष्यङः सम्प्रसारणम्'

सू ६–१–१३ या सूत्रावरील भाष्यात 'अनन्त्यविकारे' या परिभाषेची वार्तिककारानें जो आठ प्रयोजनें सांगितली आहेत त्यापैकी 'सान्त महतो दीर्घत्वे' हे द्वितीय प्रयोजन आहे याचे व्याख्यान करितांना भाष्यकार म्हणतात–'सान्त महतो दीर्घत्वे प्रयोजनम्। पयांसि यशांसि। प य इत्यस्यापि प्राप्नोति। अनन्त्यविकारेऽन्त्यसदेशस्य कार्यं भवतीति न दोषो भवति' या भाष्याचा भावार्थ हा आहे की, 'पयस् जस्, यशस् जस्' या उदाहरणात 'जश्शसोः शि.' सू. ३१२ या सूत्रानें 'जस्' प्रत्ययाचे जागी 'शि = इ' असा आदेश होऊन व तो आदेश 'शि सर्वनामस्थानम्' सू. ३१३ या सूत्रान्वयें सर्वनामस्थानसंज्ञक असल्यामुळें 'नपुंसकस्य झलच.' सू. ३१४ या सूत्रानें नुमागम होऊन 'पयन्स् इ, यशन्स् इ' अशी स्थिति झाली असता, या स्थली सान्त संयोग अन्ती असून त्यापुढें 'इ' हा सर्वनामस्थानप्रत्यय असल्यामुळें, 'सान्त महत. संयोगस्य' सू. ३१७ या सूत्रानें संयोगाच्या पूर्वी असणाऱ्या अचाला दीर्घकार्य पावले आहे. 'पयन्स्' या स्थली पकारापुढें व तसेच यकारापुढें अकार आहे. 'यशन्स्' या स्थली देखील यकारापुढें व तसेच शकारापुढें अकार आहे. या दोन अकारांपैकी कोणत्या अकाराला दीर्घकार्य करावे ? पूर्व अकारास दीर्घकार्य केले असता अनिष्ट रूपें होण्याची आपत्ति येते. 'अनन्त्यविकारे' ही परिभाषा मानल्यानें, पूर्व अकारास दीर्घकार्य न होतां उत्तर अकारालाच ते कार्य होऊन इष्ट रूपें सिद्ध होतात आणि म्हणून ती परिभाषा मानणे आवश्यक आहे. अशा प्रकारें व्याख्यान करून पुढें भाष्यकार म्हणतात–'एतदपि नास्ति प्रयोजनम्' व हे प्रयोजन अन्यथासिद्ध ठरविण्याच्या हेतूनें भाष्यकारांनी अनेक क्लिष्ट कल्पना योजिल्या आहेत अशाच रीतीनें इतर प्रयोजनांचे खण्डन करितांना देखील भाष्यकारांनी त्त्हेतऱ्हेच्या क्लिष्ट कल्पना केल्या आहेत. तरी पण त्यांनी 'अनन्त्यविकारे' या परिभाषेचे प्रत्याख्यान केलें नाहीं. उलट 'एते दोषा. समा भूयांसो वा,

तस्मान्नार्थोऽनया परिभाषया' असें शंकाकारानें म्हटलें असतां, त्या शंकेवर भाष्यकारांनीं 'न हि दोषाः सन्तीति परिभाषा न कर्तव्या लक्षणं वा न प्रणेयम्, न हि भिक्षुकाः सन्तीति स्थाल्यो नाधिश्रीयन्ते, न च मृगाः सन्तीति यवा नोप्यन्ते । दोषाः खल्वपि साकल्येन परिगणिताः……तस्मादान्येतस्याः परिभाषायाः प्रयोजनानि तदर्थमेषा परिभाषा कर्तव्या, प्रतिविषयं दोषेषु' असें उत्तर दिलें आहे. या भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं, भाष्यकारांनीं 'अनन्त्यविकारे' या परिभाषेचें प्रत्याख्यान केलें नसून ती परिभाषा स्वीकारली आहे. प्राचीन वैयाकरणांनीं जसा प्रकृत सूत्राचा अर्थ केला आहे तो बरोबर आहे असें मानल्यास, मनोरमेंत ज्या अनेक अडचणी दाखविल्या आहेत त्या सर्व अडचणी 'अनन्त्यविकारे' ही परिभाषा मानल्यानें सहज टाळतां येऊं शकत असल्यामुळें, दीक्षितांनीं कौमुदींत जसें प्रकृत सूत्राचें व्याख्यान केलें आहे तसें व्याख्यान न करितां काशिकाकार व प्रक्रियाकौमुदीकार यांनीं जें प्रकृत सूत्राचें व्याख्यान केलें आहे तें स्वीकारलें तरी, 'अनन्त्यविकारे' ही परिभाषा असल्यामुळें, कोणताहि दोष उपस्थित होण्याचा संभव नाहीं असा त्या वैयाकरणांच्या म्हणण्याचा आशय आहे. पण या त्यांच्या म्हणण्यावर अशी शंका करण्यांत येते कीं, ) 'न सम्प्रसारणे सम्प्रसारणम्' सू. ६–१–३७ या सूत्रावरील भाष्यांत 'नैतस्याः परिभाषायाः सन्ति प्रयोजनानि' असें 'अनन्त्यविकारे' या परिभाषेसंबंधानें म्हटलें आहे. ( त्यावरून असें दिसून येतें कीं, 'अनन्त्यविकारे' ही परिभाषा भाष्यकारांनीं अखेरीस प्रत्याख्यात केली आहे. म्हणून ती परिभाषा मुळींच मानतां येत नाहीं आणि त्यामुळें प्राचीन वैयाकरणांनीं जें प्रकृत सूत्राचें व्याख्यान केलें आहे तें स्वीकारतां येत नाहीं; कारण तें स्वीकारल्यास, दीक्षितांनीं मनोरमेंत दाखविलेल्या आपत्ति, त्या परिभाषेच्या अभावीं, टाळतां येणें अशक्य आहे. म्हणून दीक्षितांनीं जसें प्रकृत सूत्राचें व्याख्यान केलें आहे तेंच बरोबर मानणें भाग आहे. या शंकेवर ते वैयाकरण असें उत्तर देतात कीं, 'न

सम्प्रसारणे सम्प्रसारणम्' या सूत्रावरील 'नैतस्याः परिभाषाया सन्ति प्रयोजनानि' हे ) वरील भाष्य, 'न सम्प्रसारणे सम्प्रसारणम्' इत्यादि सूत्रनिर्देशच (सूत्रविहित कार्य उत्तर यणालाच होत असून पूर्व यणाला ते कार्य होत नाही याचे) ज्ञापक असल्यामुळें, 'अनन्त्यविकारे' या परिभाषेची प्रयोजनें थोडी आहेत एवढेंच सुचविते (व त्या परिभाषेचें भाष्यकारानी प्रत्याख्यान केले आहे असे त्या भाष्यावरून सूचित होत नाही. 'ष्यङः सम्प्रसारणम्' या सूत्रावरील भाष्यात 'अनन्त्यविकारे' या परिभाषेचें 'प्रयोजन न सम्प्रसारणे सम्प्रसारणम्' हे जें प्रथम प्रयोजन सांगितले आहे त्याचे व्याख्यान करिताना भाष्यकार म्हणतात – 'न सम्प्रसारणे सम्प्रसारणमित्येतन्न वक्तव्य भवति । कथं व्यधेविद्ध इति ? । अनन्त्यविकारेऽन्त्यसदेशस्य कार्यं भवतीति न दोषो भवति । नैतदस्ति प्रयोजनम्, क्रियते न्यास एव ।' या भाष्यावरून हे स्पष्ट होत की, भाष्यकाराच्या म्हणण्याचा आशय हा आहे की, 'अनन्त्यविकारे' या परिभाषेची जी अनेक प्रयोजनें वार्तिककारानें सांगितली आहेत त्यापैकी बरीचशी प्रयोजनें सूत्रन्यासानेंच, म्हणजे पाणिनीय सूत्रात वापरलेल्या शब्दानीच, सिद्ध होतात व त्यामुळें ती परिभाषा मानण्यास फारच थोडी प्रयोजनें अवशिष्ट राहतात पण त्या अवशिष्ट अल्प प्रयोजनांच्या सिद्धीकरिता ती परिभाषा मानणे भागच आहे, नाही तर त्या परिभाषेच्या अभावीं ती प्रयोजनें सिद्ध न होता अनिष्ट रूपें होण्याची आपत्ति येईल सारांश 'अनन्त्यविकारे' ही परिभाषा भाष्यकारानी प्रत्याख्यात केली नसून स्वीकारली असल्यामुळें, प्राचीन वैयाकरणांनी केलेलें प्रकृत सूत्राचे व्याख्यान मानले असता दीक्षितांनी मनोरमेंत ज्या अनेक आपत्ति दर्शविल्या आहेत त्या, त्या परिभाषेच्या सहायानें, सहज टाळता येऊ शकतात म्हणून 'न सम्प्रसारणे सम्प्रसारणम्' या सूत्रातील ) वरील भाष्यावर जर अशा प्रकारचे उत्तर देता येत तर मग प्रकृत सूत्रांतील 'यपि' हें पद प्रकृत सूत्रांत अनुवृत्त होणाऱ्या 'अङ्गस्य' या पदाचेंच विशेषण

मानणें पुरे आहे असें वैयाकरणांचें म्हणणें आहे (व 'यचि' हें पद 'अन्'चें विशेषण मानून 'यजादिस्वादिपरस्य अनः अकारस्य' असें प्रकृत सूत्राचें लांबलचक व्याख्यान करण्याची कांहीं गरज नाहीं व 'अन्नन्तस्य भस्य अङ्गस्य अकारलोपः स्यात्' असें जें प्राचीन वैयाकरणांनीं प्रकृत सूत्राचें व्याख्यान केलें आहे तें स्वीकारलें असतां, 'अनन्त्यविकारे' ही परिभाषा असल्यामुळें, कोणताहि दोष येत नाहीं व सर्व इष्ट रूपांची सिद्धि होऊं शकते असें शब्दरत्नकार म्हणतात.)

मनोरमा– "रषाभ्याम्" ॥ पद इतीयतैव सामर्थ्यादेकपदत्वे लब्धेऽपि समानग्रहणं यत्समानमेव अखण्डमिति यावत् । तत्र यथा स्यात्तेन समासे न भवति । रामनाम । यूष्ण इति । यूषो मण्डः ।

मुद्गामलकयूषस्तु भेदी दीपनपाचनः ॥

इति दर्शनात् । इति पक्षे त्विति । एतेन पञ्चमीसमासस्य पाक्षिकतां ध्वनयति । तथा हि । भाष्ये बेभिदिता, माथितिकः, अपीपचन्निति प्रयोजनत्रयमुक्तम् । तच्चान्यथा सिद्धम् । एकाच उपदेशे इत्यत्र विहितविशेषणादेव बेभिदितेत्यत्र इण्निषेधो न । मथितं पण्यमस्येति विग्रहे ठकि ठस्येकादेशे "यस्येति च" इत्यल्लोपे "इसुसुक्तान्तात्कः" इति कादेशस्तु न भविष्यति, ठस्याभावात् । न च स्थानिवद्भावेन ठत्वमल्विधित्वात् । "ठस्येकः" इत्यत्र हि स्थान्यादेशयोरकार उच्चारणार्थः । अपीपचन्नित्यपि णिलोपस्य, चङन्त्यकारयोरेकादेशस्य, च स्थानिवद्भावं विनापि सिद्धम् । विदिसाहचर्यादभ्यस्तादपि लङ एव झेर्जुस्विधानात् । न च सिचा साहचर्याद् लुङ एव किं न स्यादिति वाच्यम् । पूर्वसाहचर्यात्परसाहचर्यस्य बलीयस्त्वादिति दिक् ।

'रषाभ्यां नो णः समानपदे' सू. २३५ या सूत्रांत 'पदे' एवढेंच जरी म्हटलें असतें तरी त्या शब्दाच्या सामर्थ्यानें 'एकपदे', असा अर्थ झालाच असता. असें असून देखील 'समानपदे' या पदांत

'समान' या शब्दाचे जें ग्रहण केलें आहे ते अशाकरिता की, 'समान' म्हणजे 'अखण्ड पद' असा अर्थ बोधित व्हावा व तशाच स्थली णत्व व्हावे प्रकृत सूत्राचा असा अर्थ होत असल्यामुळें, सामासिक पदात असलेल्या नकाराचे णत्व होत नाही उदाहरणार्थ 'रामनाम.' ('रामनाम' हें अखण्ड पद नसून 'राम' व 'नाम' या दोन अखण्ड पदाचे बनलेले सामासिक पद आहे 'रामस्य नाम रामनाम' या षष्ठीसमासातील 'राम' या पूर्वपदात णत्वाचे निमित्त रकार असून 'नाम' या उत्तर पदात णत्वाचा कार्यी नकार असल्यामुळें व अशा रीतीनें निमित्त व कार्यी हे एकाच अखण्ड पदात नसल्यामुळें, या उदाहरणात नकाराचे णत्व होऊ शकत नाही णत्वकार्य होण्याकरिता णत्वाचे निमित्त व णत्वाचा कार्यी हे दोन्ही एकाच अखण्ड पदात, म्हणजे ज्या पदाची पदरूप शकले पाडता येत नाहीत अशा पदात, असणे आवश्यक आहे व हा अर्थ बोधित करण्याकरिताच प्रकृत सूत्रात 'समान' या पदाचे पाणिनीनें ग्रहण केले आहे असा दीक्षिताच्या म्हणण्याचा भावार्थ आहे. प्रकृत सूत्रावरील कौमुदीत प्रकृत सूत्रानें णत्व होण्याचे) 'यूष्ण' हे उदाहरण दिले आहे (या उदाहरणात 'यूष्ण' या अखण्ड पदामध्यें णत्वाचे निमित्त षकार असून त्याच्या लगेंच पुढें त्याच पदात नकार हा णत्वाचा कार्यी असल्यामुळें, त्या नकाराचे प्रकृत सूत्रानें णत्व झाले आहे ) 'यूष' या शब्दाचा 'मण्ड', म्हणजे पेज, असा अर्थ आहे. 'मुद्गामलकयूषस्तु भेदी दीपनपाचन', म्हणजे मूग व आवळे याची पेज शौच साफ करणारी, जठराग्नीचे उद्दीपन करणारी व अन्न पचन करणारी आहे, या वैद्यकशास्त्रातील श्लोकात 'यूष' हा शब्द 'पेज' या अर्थामध्यें वापरला आहे. प्रकृत सूत्रावरील कौमुदीत 'पूर्वस्मादपि विधौ स्थानिवद्भाव इति पक्षे स्वहृस्वयाय इत्येवात्र णत्वम्' असे जें म्हटले आहे त्यानें हे ध्वनित केले आहे कीं, ('अचःपरस्मिन् पूर्वविधौ' सू ५० या सूत्रातील 'पूर्वविधौ' या पदाचा 'पूर्वस्मात्

विधौ' असा) वैकल्पिक पञ्चमीसमासपक्ष मानला आहे. ('पूर्वविधौ' या पदाचा भाष्यकारांनीं 'पूर्वस्य विधौ' असा षष्ठीसमास व त्याचप्रमाणें 'पूर्वस्मात् विधौ' असा पञ्चमीसमास केला आहे. 'पूर्वस्य विधौ' असा षष्ठीसमासपक्ष मानल्यास, 'यूषन् शस् = यूषन् अस्' या स्थलीं 'यूषन्' या भसंज्ञक अन्नन्त अङ्गांत असणान्या 'अन्' मधील ज्या अकाराचा 'अल्लोपोऽनः' सू. २३४ या सूत्रानें लोप झाला आहे त्याच्या पूर्वी असलेल्या वर्णाला कार्य करणें नसून त्या अकारापुढें असणारा जो नकार त्याला णत्वरूप कार्य करणें असल्यामुळें, 'अचःपरस्मिन्' हें सूत्र त्या पक्षांत 'यूष्णः' या उदाहरणास लागू पडत नाहीं व त्यामुळें अकारलोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव होत नाहीं व प्रकृत सूत्रानेंच णत्व होतें. परंतु 'पूर्वस्मात् विधौ' हा पञ्चमीसमासपक्ष मानल्यास, या पक्षांत 'अचः परस्मिन्' हें सूत्र 'यूष्णः' या उदाहरणास लागू पडतें; कारण वर सांगितल्याप्रमाणें त्या उदाहरणांत ज्या अकाराचा लोप झाला आहे त्याच्या पूर्वी णत्वाचें निमित्त षकार असून त्या निमित्तामुळें त्या अकारापुढें असलेल्या नकाराचें णत्व करणें आहे. त्यामुळें 'अन्' यांतील ज्या अकाराचा लोप झाला आहे तो अकार विद्यमान आहे अशी या पक्षांत 'अचः परस्मिन्' या सूत्रान्वयें स्थानिवद्भावानें बुद्धि करावी लागते व अशा रीतीनें षकाराच्या लगेच पुढें नकार नसून दोहोंमध्यें 'अ' या 'अट्' चें व्यवधान आहे असें मानावें लागत असल्यामुळें, 'यूष्णः' या स्थलीं पञ्चमीसमासपक्षांत 'रषाभ्यां नो णः' या प्रकृत सूत्रान्वयें णत्व न होतां, 'अट्कुप्वाङ्नुम्व्यवायेऽपि' सू. १९७ या सूत्रान्वयें णत्व होतें असें दीक्षितांचें म्हणणें आहे.) भाष्यकारांनीं पञ्चमीसमासपक्ष मानण्याचीं 'वैभिदिता, माथितिकः, अपीपचन्' अशीं तीन प्रयोजनें सांगितलीं आहेत. ('अचः परस्मिन्' सू. १-१-५७ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार म्हणतात–' अथ विधिग्रहणं किमर्थम् ? । सर्वविभक्त्यन्तः समासो यथा विज्ञायेत ।

पूर्वस्य विधिः पूर्वविधिः, पूर्वस्मात् विधिः पूर्वविधिरिति। कानि पुनः पूर्वस्माद्विधौ स्थानिवद्भावस्य प्रयोजनानि ? । बेभिदिता, माथितिकः, अपीपचन् । बेभिदिता चेच्छिदितेत्यकारलोपे कृत एकाज्लक्षण इट्प्रतिषेधः प्राप्नोति । स्थानिवद्भावान्न भवति । माथितिक इत्यकारलोपे कृते तान्तात्क इति कादेशः प्राप्नोति । स्थानिवद्भावान्न भवति । अपीपचन्नित्येकादेशे कृतेऽभ्यस्ताज्झेर्जुसभवतीति जुस्भावः प्राप्नोति । स्थानिवद्भावान्न भवति।' या भाष्यासबंधानें दीक्षितानी जें पुढील पंक्तीत म्हटले आहे त्याचे विवरण करतेवेळी या भाष्याचेहि व्याख्यान करण्यांत येईल. या वरील भाष्यासंबधानें दीक्षित असे म्हणतात की, पञ्चमीसमासपक्ष न मानता देखील त्या भाष्यात दिलेली ) वरील तीन्ही रूपें इतर रीतीनें सिद्ध करता येतात. ' एकाच उपदेशे ' सू. २२४६ या सूत्रात वलादि आर्धधातुकप्रत्ययाचे 'विहितः' हे विशेषण मानल्यानेंच 'बेभिदिता ' या स्थली इडागमाचा निषेध पावत नाही. ( 'भिद्' धातूहून ' यङ् = य ' प्रत्यय केला असता, 'सन्यङोः' सू. २१९५ या सूत्रानें द्विर्वचन होऊन व 'अभ्यासे चर्च' सू. २१८२ या सूत्रानें अभ्यासातील भकाराचे जागी बकार होऊन व 'गुणो यङ्लुको ' सू. २६३० या सूत्रानें अभ्यासातील इकाराचा गुण होऊन 'बेभिद्य ' असे जें रूप होते ते यङन्त असल्यामुळें, 'सनाद्यन्ता धातवः' सू २३०४ या सूत्रानें त्याला धातुसंज्ञा होते. या धातूहून 'ण्वुल्तृचौ ' सू. २८९५ या सूत्रानें 'तृच्' प्रत्यय केला असता, 'अतो लोपः ' सू. २३०८ या सूत्रानें त्या धातूतील अन्त्य अकाराचा लोप होऊन व 'यस्य हलः' सू. २६३१ या सूत्रानें अवशिष्ट यकाराचा लोप होऊन 'बेभिद् तृच्' अशी स्थिति होते भाष्यकार म्हणतात की, या स्थली 'एकाच उपदेशे ' या सूत्रानें आर्धधातुक वलादि 'तृच्' प्रत्ययाला इडागम होऊं शकत नाही; कारण 'बेभिद्' यातील मूळ धातु 'भिद्' हा उपदेशात–धातुपाठात–एकाच् असून अनुदात्त पठित आहे व त्याच्या लगेच पुढें 'तृच्' परतु पूर्व-

विधौ' हा पञ्चमीसमास मानल्यानें, 'अतो लोपः' या सूत्रानें ज्या अकाराचा लोप झाला आहे त्याच्या पुढील 'तृच्' प्रत्ययाला इडागम प्रतिषेध करतेवेळीं अकारलोप झालाच नाहीं व अकार विद्यमान आहे अशी 'अचः परस्मिन्' सू. ५० या सूत्रान्वयें स्थानिवद्भावानें बुद्धि करतां येते आणि अशा रीतीनें 'भिद्' धातु व 'तृच्' प्रत्यय या दोहोंमध्यें त्या अकाराचें व्यवधान आहे असें मानतां येत असल्यामुळें, या स्थलीं 'एकाच उपदेशे' हें सूत्र प्रवृत्त होऊं शकत नाहीं व त्यामुळें 'आर्धधातुकस्येड्वलादेः' सू. २१८४ या सूत्रानें 'तृच्' प्रत्ययाला इडागम होऊन 'बेभिदिता' असें इष्ट रूप सिद्ध होतें असा भाष्यकारांच्या म्हणण्याचा आशय आहे. यावर दीक्षित असें म्हणतात कीं, 'एकाच उपदेशे' या सूत्रांत 'विहित' हें पद अध्याहृत करून व तें पद आर्धधातुकप्रत्ययाचें विशेषण मानून त्या सूत्राचा 'उपदेशे यो धातुरेकाच् अनुदात्तश्च तस्माद्विहितस्य वलादेरार्धधातुकप्रत्ययस्य इट् न स्यात्' असा अर्थ केल्यानें, प्रकृत स्थलीं जो आर्धधातुकवलादि 'तृच्' प्रत्यय झाला आहे तो उपदेशांत पठित असलेल्या 'भिदिर् विदारणे' या एकाच् अनुदात्त धातूहून झाला नसून 'बेभिद्य' या यङन्त अनेकाच् धातूहून झाला असल्यामुळें, 'एकाच उपदेशे' हें इडागमनिषेधाचें सूत्र येथें प्रवृत्त होऊं शकत नाहीं व त्यामुळें 'तृच्' प्रत्ययाला इडागम होऊन 'बेभिदिता' हें इष्ट रूप सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. सारांश पञ्चमीसमासपक्ष न मानतां 'बेभिदिता' हें इष्ट रूप वर सांगितल्याप्रमाणें इतर रीतीनें सहज सिद्ध होऊं शकत असल्यामुळें, त्या रूपाच्या सिद्धीकरितां पञ्चमीसमासपक्ष मानण्याची कांहीं आवश्यकता नाहीं असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे.) 'मथितं पण्यमस्य' असा विग्रह करून 'ठक्' प्रत्यय केला असतां, 'ठ' चे जागीं 'इक' असा आदेश होऊन 'यस्येति च' सू. ३११ या सूत्रानें अकारलोप झाल्यावर 'इसुसुक्तान्तात्कः' सू. १२२१ या सूत्रान्वयें कादेश होऊं शकत नाहीं; कारण या ठिकाणीं

'ठ्' चा अभाव आहे. येथें स्थानिवद्भावानें ठकार विद्यमान आहे असे मानता येत नाही. कारण हा अल्विधि आहे 'ठस्येक' सू. ११७० या सूत्रात स्थानी व आदेश या दोहोमध्यें जो अन्त्य अकार आहे तो केवळ उच्चारणार्थ आहे ('मथित पण्यमस्य सः माथितिक' या स्थली 'तदस्य पण्यम्' सू १६०१ या सूत्रानें 'मथित' या शब्दाहून 'ठक्' प्रत्यय होऊन व तो प्रत्यय कित् असल्यामुळें 'किति च' सू १०७६ या सूत्रानें 'मथित' यातील आद्य अचाची वृद्धि होऊन व 'ठस्येक' सू ११७० या सूत्रानें 'ठ' चे जागी 'इक' असा आदेश होऊन आणि 'यस्येति च' सू ३११ या सूत्रानें 'मथित' यातील अन्त्य अकाराचा लोप होऊन 'माथित् इक' अशी स्थिति झाली असता, 'इक' हा 'ठ' च आहे अशी स्थानिवद्भावानें बुद्धि केल्यानें 'इसुसुक्तान्तात्कः' सू १२२१ या सूत्रानें 'माथित्' या तकारान्त अङ्गापुढील 'इक' चे जागी 'क' होण्याची आपत्ति येते परतु पञ्चमीसमासपक्ष मानल्यानें ती आपत्ति टळते; कारण 'यस्येति च' या सूत्रानें 'माथित' यातील ज्या अन्त्य अकाराचा लोप झाला आहे त्यापुढील 'ठ = इक' चे जागी आदेश करतेवेळी, त्या अकाराचा लोप झालाच नाही व तो अकार विद्यमान आहे असे 'अचः परस्मिन्' या सूत्रानें स्थानिवद्भावानें मानल्यानें, 'माथित्' हे अङ्ग तकारान्त नसून ते अकारान्त आहे असे मानता येऊ शकत असल्यामुळें, 'इसुसुक्तान्तात्कः' या सूत्राची येथें प्रवृत्ति होऊ शकत नाही त्यामुळें 'ठ' चे जागी 'क' असा आदेश न होता पूर्वी झालेला 'इक' आदेश कायम राहतो व 'माथितिक' असे इष्ट रूप सिद्ध होते असा भाष्यकाराच्या म्हणण्याचा आशय आहे येथें हे लक्षात ठेवावे की, 'ठस्येक' या सूत्रात 'ठ' हे सघातग्रहण आहे, म्हणजे अकारसहित ठकार आहे, असे मानून भाष्यकारानी 'ठ' चे जागी झालेला 'इक' हा आदेश स्थानिद्भावानें 'ठ' च आहे असे मानले आहे यावर दीक्षित असे म्हणतात की, 'ठस्येक.' या सूत्रानें

'ठ' चे जागीं 'इक' असा आदेश होत नसून त्या 'ठक् = ठ' प्रत्ययांतील केवळ ठकाराचे जागीं 'इक्' असा आदेश होतो असें मानल्यानें, म्हणजे 'ठकारस्य स्थाने इक् आदेशः स्यात्' असा त्या सूत्राचा अर्थ केल्यानें, ज्या स्थानीचे जागीं 'इक्' आदेश त्या सूत्रानें होतो तो स्थानी 'ठ' असा अनल् संघात नसून 'ठ्' असा अल् असल्यामुळें व 'स्थानिवदादेशः' सू. ४९ या सूत्रांत 'अनल्विधौ' असा प्रतिषेध असल्यामुळें, ठकार या अल्रूप स्थानीचे जागीं झालेला 'इक्' हा आदेश ठकारच आहे असें मानतां येत नाहीं आणि त्यामुळें 'इसुसुक्तान्तात्कः' या सूत्राची येथें प्राप्तीच होत नाहीं; कारण तें सूत्र असें सांगतें कीं, तकारान्त अङ्गापुढें ठकार असल्यास त्याचे जागीं 'क' असा आदेश करावा. परंतु प्रकृत स्थलीं तर ठकाराचे जागीं 'इक्' हा आदेश पूर्वीच होऊन गेला आहे आणि वर सांगितल्याप्रमाणें तो अल्विधि असल्यामुळें, 'इक्' हा ठकारच आहे असें स्थानिवद्भावानें मानतां येत नाहीं. म्हणून ठकारच जर नाहीं तर 'क' या आदेशाची प्राप्ति कशी होणार? सारांश पञ्चमीसमासपक्ष न मानतां 'माथित् इक् अ = माथितिक' हें इष्ट रूप देखील वर सांगितल्याप्रमाणें सहज सिद्ध होऊं शकत असल्यामुळें, त्या रूपाच्या सिद्धीकरितां पञ्चमीसमास-पक्ष मानण्याची कांहीं गरज नाहीं असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे.) 'अपीपचन्' या उदाहरणांत देखील णिलोपाचे ठिकाणीं व तसेंच 'चङ् = अ' व 'झि = अन्ति' या स्थलीं जो एकादेश होतो त्याचे ठिकाणीं स्थानिवद्भाव न मानतां देखील 'अपीपचन्' हें रूप सिद्ध होऊं शकतें; कारण 'सिजभ्यस्तविदि-भ्यश्च' सू. २२२६ या सूत्रांत अभ्यस्ताला 'विद्' धातूचें साहचर्य असल्यामुळें, अभ्यस्त धातूहून केवळ 'लङ्' लकारांतच होणाऱ्या 'झि'चे जागीं त्या सूत्रानें 'जुस्' आदेश होऊं शकतो. त्या सूत्रांत अभ्यस्ताला 'सिच्'चें देखील साहचर्य असल्यामुळें, अभ्यस्त धातूहून 'लुङ्' लकारांत होणाऱ्या 'झि'चे जागीं 'जुस्' आदेश कां

होऊ नये असे कोणी म्हटल्यास, ते म्हणणे बरोबर नाही; कारण पूर्वसाहचर्यापेक्षा परसाहचर्य बलवत्तर असते. ('पच्' धातूहून 'णिच्' प्रत्यय केला असता, 'अत उपधाया.' सू. २२८२ या सूत्रानें 'पच्' यातील अकाराची वृद्धि होऊन 'पाच् णि' अशी स्थिति होते. या णिजन्त धातूहून लुङ् करणे झाल्यास, 'णिश्रिद्रुस्रुभ्यः कर्तरि चङ्' सू. २३१२ या सूत्रानें 'च्लि' चे जागी 'चङ् = अ' होऊन व 'चङि' सू. २३१५ या सूत्रानें द्विर्वचन होऊन आणि 'ऱ्हस्वः' सू. २१८० या सूत्रानें अभ्यासाचा ऱ्हस्व होऊन 'अ पपाच् णि चङ् झि' अशी स्थिति झाली असतां 'णौ चङि उपधाया ऱ्हस्वः' सू. २३१४ या सूत्रानें 'पाच्' यातील 'आ' या उपधेचा ऱ्हस्व, म्हणजे अकार, होऊन आणि 'सन्वल्लघुनि' सू. २३१६ या सूत्रानें सन्वद्भाव होत असल्यामुळें, 'सन्यतः' सू. २३१७ या सूत्रानें अभ्यासातील अकाराचा इकार होऊन व 'दीर्घो लघोः' सू. २३१८ या सूत्रानें तो इकार दीर्घ होऊन 'अपीपच् णि चङ् झि' अशी स्थिति होते. अशा स्थितीत 'इतश्च' सू. २२०७ या सूत्रानें 'झि' यातील इकाराचा लोप होऊन व 'झोऽन्तः' सू. २१६९ या सूत्रानें झकाराचे जागी 'अन्त्' असा आदेश होऊन 'अपीपच् णि अ अन्त्' अशी स्थिति झाली असता, 'णेरनिटि' सू. २३१३ या सूत्रानें णिलोप होऊन व 'अतो गुणे' सू १९१ या सूत्रानें 'चङ् = अ' आणि 'अन्त्' यातील अकार या दोहोंचे जागी 'अ' असा पररूप एकादेश होऊन 'अपीपचन्त्' अशी स्थिति होते. या स्थली 'चङ् = अ' व 'झ' चे जागी झालेल्या 'अन्त्' या आदेशाचा अकार या दोहोंचा जो एकादेश होतो त्या एकादेशाचे ठिकाणी परादिवद्भाव केल्यानें 'अपीपच्' या अभ्यस्त अङ्गापुढें 'झ्' चे जागी झालेला 'अन्त्' हा आदेश आहे असे मानता येते आणि 'झि' यातील इकाराचा 'इतश्च' या सूत्रानें लोप झाल्यावर 'झ्' असे जें एकदेशविकृत रूप होतें त्याचे जागी झालेला हा 'अन्त्' आदेश 'झि' च आहे असे स्थानिवद्भावानें मानता येतें. अशा रीतीनें

अभ्यस्त अङ्गाच्या लगेंच पुढें 'झि' आहे असें मानावें लागत असल्यामुळें, 'झि' चे, म्हणजे 'अन्त्' चे, जागीं 'सिजभ्यस्त-विदिभ्यश्च' या सूत्रानें 'जुस्' आदेश होण्याची व अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येते. परंतु पञ्चमीसमासपक्ष मानल्यानें ती आपत्ति टळते; कारण 'णेरनिटि' या सूत्रानें जो 'णि = इ' चा लोप झाला आहे व 'अतो गुणे' या सूत्रानें पररूप एकादेश केल्यानें जो 'चङ् = अ' नाहींसा झाला आहे त्यांच्या पुढें असणाऱ्या 'झि = अन्त्' चे जागीं 'जुस्' आदेश करतेवेळीं णिलोपाचे ठिकाणीं व तसेंच एकादेशानें लुप्त झालेल्या 'चङ् = अ' चे ठिकाणीं 'अचः परस्मिन्' या सूत्रानें स्थानिवद्भाव केल्यानें ते 'इ' व 'अ' विद्यमान आहेत आणि अशा रीतीनें 'अपीपच्' हें अभ्यस्त अङ्ग व 'झि = अन्त्' या दोहोंमध्यें 'णि' व 'चङ्' चें व्यवधान आहे असें मानतां येऊं शकत असल्यामुळें, 'सिजभ्यस्त-विदिभ्यश्च' हें सूत्र येथें प्रवृत्त होऊं शकत नाहीं व त्यामुळें 'अन्त्' चे जागीं 'जुस्' आदेश न होतां, 'संयोगान्तस्य लोपः' सू. ५४ या सूत्रानें 'अपीपचन्त्' या संयोगान्त पदांतील अन्त्य तकाराचा लोप होऊन 'अपीपचन्' असें इष्ट रूप सिद्ध होतें असा भाष्यकारांच्या म्हणण्याचा आशय आहे व हा आशय कैयटानें आपल्या टीकेंत 'झेरितश्चेतीकारलोपे कृते एकदेशविकृतमनन्य-वद्भवतीति झिरेवायम्, तदान्तादेशे कृते चङकारस्य च पररूपे कृते तस्यादिवद्भावाज्जुस् प्राप्नोति। स्थानिवद्भावे तु णिलोपस्य पररूपस्य च व्यवधानान्न भवति।' या शब्दांत थोडक्यांत स्पष्टपणें व्यक्त केला आहे. यावर दीक्षित असें म्हणतात कीं, पञ्चमीसमासपक्ष न मानतां व णिलोप आणि 'चङ्' जो एकादेशानें लुप्त झाला आहे त्यांचे ठिकाणीं स्थानिवद्भाव न करितां देखील 'अपीपचन्' असें इष्ट रूप सिद्ध होऊं शकतें; कारण 'सिजभ्यस्तविदिभ्यश्च' सू. २२२६ या सूत्रानें अभ्यस्त धातूपुढें येणाऱ्या 'झि' चे जागीं जो 'जुस्' आदेश होणें सांगितलें आहे तो

वास्तविक लुङ् लकारात होणे सांगितले नसून लङ् लकारातच होणे सांगितले आहे हे 'विद्' धातूच्या साहचर्यावरून स्पष्ट होते 'अविदु' हे लङाचे रूप सिद्ध होण्याकरिताच त्या सूत्रात 'विद्' धातूचे मुद्दाम ग्रहण केले आहे हे अगदी उघड आहे 'अवेदिषु' हे लुङाचे रूप सिद्ध होण्याकरिता त्या धातूचे ग्रहण केले आहे असे मुळीच म्हणता येऊ शकत नाही, कारण त्या सूत्रात 'सिच्' चे ग्रहण केले असल्यामुळें व 'च्लि लुङि' सू. २२२१ या सूत्रानें लुङ-लकारामध्येंच होणाऱ्या 'च्लि' चे जागी 'च्लेः सिच्' सू. २२२२ या सूत्रानें 'सिच्' आदेश होत असल्यामुळें, 'अवेदिषु' हे रूप आपोआपच सिद्ध होऊ शकते पण त्या सूत्रात अभ्यस्त धातूला जसे 'विद्' चे साहचर्य आहे तसे 'सिच्' चे देखील साहचर्य आहे व 'सिच्' हा वर सांगितल्याप्रमाणे लुङातच होत असल्यामुळें, त्या 'सिच्' च्या साहचर्याच्या सामर्थ्यानें असे म्हणता येते कीं, लुङात देखील अभ्यस्त धातुपुढें 'झि' आल्यास त्या 'झि' चे जागी त्या सूत्रानें 'जुस्' आदेश करता येतो असे कोणी म्हटल्यास, त्यावर दीक्षित असे उत्तर देतात की, वरील सूत्रात अभ्यस्त धातूला जें 'सिच्' चे साहचर्य आहे ते पूर्वसाहचर्य असून त्या धातूला 'विद्' धातूचे परसाहचर्य आहे, म्हणजे 'सिजभ्यस्तविदिभ्यश्च' या सूत्रात अभ्यस्त धातूच्या पूर्वी 'सिच्' पठित असून अभ्यस्त धातूनंतर 'विद्' धातु पठित आहे, आणि 'पूर्वात्पर बलवत्' या न्यायान्वयें पूर्वसाहचर्यापेक्षा परसाहचर्य बलवत्तर ठरत असल्यामुळें, लङ् लकारातच अभ्यस्त धातुपुढील 'झि' चे जागी 'जुस्' आदेश होतो असाच त्या सूत्राचा अर्थ करणे न्याय्य ठरते 'अपीपचन्' हे लुङाचे रूप असल्यामुळें, येथें 'झि' चे जागी 'जुस्' आदेशाची प्राप्तीच होत नाही म्हणून तो आदेश होणे टाळण्याकरिता भाष्यकारानी पञ्चमीसमासपक्ष मानून जो णिलोपाचे व एकादेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव केला आहे तो करण्याची काहीच गरज नाही असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे

सारांश ज्या भाष्यांत पञ्चमीसमासपक्षाचीं प्रयोजनें सांगितलीं आहेत ते एकदेशि भाष्य आहे व 'नैतानि सन्ति प्रयोजनानि' या पुढील भाष्यावरून तें एकदेशिभाष्य आहे हें स्पष्ट होतें असें दीक्षितांच्या म्हणण्याचें तात्पर्य आहे.)

शब्दरत्न–सामर्थ्यादिति । निमित्तनिमित्तिनोरपदस्थयोरसम्भवादिति भावः । अखण्डमिति । तत्त्वं च निमित्तानधिकरणनिमित्तिमत्पदाघटितत्वम् । तेन मातृभोगीण इत्यत्र णत्वसिद्धिः । केवलभोगीनेत्यस्य प्रत्ययमात्रस्य वा तत्त्वाभावात् । अत एव "आत्मन्विश्वजन" इति सूत्रस्यम् "आचार्यादणत्वं च" इति चरितार्थम् । सुपर्वणेत्यादिसिद्धये निमित्तानधिकरणेति । पदं चात्र लोके विभक्तीतरानपेक्षतयाऽर्थबोधकत्वेन दृष्टम् । तेन गन्धर्वगानमित्यादौ सुबुत्पत्तेः प्राक् समासेऽपि णत्वं न । क्षुभ्नादिषु. नृनमनशब्दस्तु संज्ञाभूतोऽखण्ड इति तस्य ऋवर्णात्परस्य णत्वे ज्ञापकता भाष्योक्ता नासङ्गतेत्याहुः ।

'सामर्थ्यादेकपदत्वे लब्धेऽपि' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, णत्वाचें निमित्त व णत्वाचा कार्यी हे पदांत नसणें संभवत नाहीं, म्हणजे हे पदांतच असूं शकतात (व प्रकृत सूत्रांतील 'पदे' ही आधारसप्तमी असून एकवचन असल्यामुळें, णत्वाचें निमित्त व णत्वाचा कार्यी हे दोन्ही एकाच पदांत असले पाहिजेत हें स्पष्ट होतें, मग तें पद अखण्ड पद असो किंवा सामासिक पद असो.) ज्या पदांत णत्वाचा कार्यी आहे तें पद ज्यात णत्वाचें निमित्त आहे अशा पदाचें अवयव नसणें (व ज्या पदाची पदरूप शकलें पडूं शकत नाहींत अशा एकाच पदामध्यें णत्वाचें निमित्त व निमित्ती हे दोन्ही विद्यमान असणें) याला अखण्डपदांत असणें असें म्हणतात. अखण्ड पदाची अशी व्याख्या केल्यानें 'मातृभोगीणः' या उदाहरणांत णत्वाची सिद्धि होते; कारण या स्थलीं केवळ 'भोगीन' हें पद किंवा केवळ

'ईन' हा प्रत्यय याचे ठिकाणी अखण्डपदत्व आहे असे मानता येत नाही. ('आत्मन्विश्वजनभोगोत्तरपदात् खः' सू. १६७० या सूत्रानें ज्यात 'भोग' हे उत्तर पद आहे अशा 'मातृभोग' या सामासिक पदाहून 'ख = ईन' प्रत्यय झाला आहे. म्हणून 'मातृभोगाय हितः मातृभोगीणः' हे अखण्ड पद ठरते व या अखण्डपदात णत्वाचे निमित्त ऋकार व णत्वाचा कार्यी नकार हे दोन्ही असल्यामुळें, या स्थली 'अट्कुप्वाङ्नुम्व्यवायेऽपि' सू. १९७ या सूत्रानें णत्व होते. जर केवळ 'भोग' या शब्दाहून 'ख' प्रत्यय झाला असता तर 'भोगीन' एवढेंच अखण्ड पद मानता येऊ शकले असते व 'मातृभोगीन' हे अखण्ड पद मानता येऊ शकले नसते. त्याचप्रमाणे 'ख = ईन' हा प्रत्यय असल्यामुळें व तो 'मातृभोग' या शब्दाहून झाला असल्यामुळें, 'ईन' हे अखण्ड पद मानता येऊ शकत नाही व ज्या प्रकृतीहून तो प्रत्यय झाला आहे त्या प्रकृतिप्रत्ययसमुदायालाच अखण्ड पद मानता येते हे उघड आहे) अखण्ड पदाची अशी व्याख्या असल्यामुळेंच, 'आत्मन्विश्वजन' सू ५–१–९ या सूत्रावरील भाष्यात 'आचार्यादणत्वं च' असे जें वार्तिक पठित केलें आहे तें चरितार्थ ठरतें. ('आचार्यभोग' या शब्दात 'भोग' हें उत्तर पद असल्यामुळें, 'आत्मन्विश्वजन' या सूत्रानें 'ख' प्रत्यय होऊन 'आचार्यभोगीनः' असे रूप होते. येथें जर 'आचार्य' व 'भोगीन' ही दोन भिन्न पदें मिळून 'आचार्यभोगीन' हें पद बनले आहे असे मानतां आले असते तर, येथें अखण्डपदत्वाच्या अभावामुळें, णत्वाची प्राप्तीच नव्हती व 'प्राप्तस्यैव निषेधः' हा न्याय असल्यामुळें, वरील निषेधक वार्तिक करण्याची काहीच गरज नव्हती. परंतु 'आचार्यभोग' या संपूर्ण शब्दाहून 'ख' प्रत्यय झाला असल्यामुळें, 'ख' प्रत्ययान्त 'आचार्यभोगीन' हे अखण्ड पद ठरत व त्या अखण्ड पदात णत्वाचे निमित्त रकार व णत्वाचा कार्यी नकार हे दोन्ही विद्यमान असल्यामुळें जी णत्वाची प्राप्ति होती तिचे निवारण करण्याकरितां तें वार्तिक मुद्दाम केलें आहे व अशा

रीतीनें तें वार्तिक चरितार्थ ठरतें. ) 'सुपर्वणा' इत्यादि रूपांची सिद्धि होण्याकरितां 'निमित्तानधिकरण' हा शब्द 'अखण्ड' या पदाच्या व्याख्येंत घातला आहे. ( 'सुपर्वणा' हें पद 'सु' व 'पर्वणा' या दोन पदांचें बनलेलें जरी सामासिक पद आहे तरी या सामासिक पदांतील 'पर्वणा' या उत्तर अखण्ड पदरूप अवयवांतच णत्वाचें निमित्त व कार्यी हे दोन्ही विद्यमान आहेत आणि 'सु' या पूर्व पदांत निमित्त व कार्यी या दोहोंपैकीं एकहि नाहीं. म्हणून ज्या पदांत निमित्त नाहीं व कार्यी आहे अशा पदांनीं बनलेलें 'सुपर्वणा' हें पद नसल्यामुळें, या स्थलीं णत्व झालें आहे. ) प्रकृत सूत्रांतील 'समानपदे' या पदांत जो 'पद' हा शब्द आहे त्याचा ( 'सुप्तिङन्तं पदम्' असा पारिभाषिक अर्थ नसून ) 'ज्याचे ठिकाणीं लौकिकी अर्थबोधकता येण्याकरितां विभक्तिप्रत्यय खेरीज करून इतर कशा-चीहि अपेक्षा नसते असा शब्द' असा अर्थ आहे. प्रकृत सूत्रांतील 'पद' या शब्दाचा असा अर्थ केल्यानें, 'गन्धर्वगानम्' इत्यादि स्थलीं सुबुत्पत्ति होण्यापूर्वी समास होतो तरी, णत्व होत नाहीं. ( 'गान' या कृदन्त शब्दाहून सुबुत्पत्ति होण्यापूर्वीच त्याचा, 'गतिकारकोपपदानां कृद्भिः सह समासवचनं प्राक् सुबुत्पत्तेः'—परि. ७६—या परिभाषान्वयें, 'गन्धर्व' या पदाशीं समास होतो. प्रकृत सूत्रांतील 'पद' या शब्दानें 'सुप्तिङन्तं पदम्' या सूत्रान्वयें पदसंज्ञक ठरणाऱ्या सुबन्तांचेंच ग्रहण केलें तर, 'गान' हा शब्द पदसंज्ञक ठरत नाहीं व त्यामुळें 'गंधर्वगान' हा संपूर्ण शब्द अखण्ड पद ठरण्याची आपत्ति येते व या पदांत णत्वाचें निमित्त रकार व णत्वाचा कार्यी नकार हे दोन्ही विद्यमान असल्यामुळें, णत्व होऊन 'गन्धर्व-णानम्' असें अनिष्ट रूप होण्याचा प्रसङ्ग येतो. परंतु 'गान' हा शब्द जरी सुबन्त नाहीं तरी, त्या शब्दाहून विभक्तिप्रत्यय [illegible] त्यांत अर्थबोधकता येत असल्यामुळें, तो शब्द प्रकृत-सूत्रांतील विवक्षित 'पद' मानला येतो आणि त्यामुळें 'गन्धर्व-गानम्' हें अखण्ड पद ठरत नाहीं व णत्वाचें निमित्त व कार्यी

भिन्नपदस्थ असल्यामुळें णत्व होण्याची आपत्ति टळते.) क्षुम्नादिगणात पठित असलेला 'नृनमन' हा शब्द संज्ञावाचक असल्यामुळें अखण्ड पद ठरतो आणि ऋकारापुढील नकाराचे देखील णत्व होतें याचा तो शब्द ज्ञापक ठरतो असे जें भाष्यात म्हटले आहे ते म्हणणे असङ्गत ठरत नाही असे कित्येक वैयाकरणांचे म्हणणे आहे. (प्रकृत सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात–'अथवा आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति भवति ऋकाराण्णत्वमिति । यदयं क्षुम्नादिषु नृनमनशब्दं पठति.' जर 'नृ' हे पद व 'नमन' हा कृदन्त शब्द ही दोन भिन्न पदें मानता येऊं शकली असती तर या उदाहरणात, अखण्ड पदाच्या अभावामुळें, णत्वाची प्राप्तीच नव्हती आणि 'नृनमन' हा शब्द णत्वनिवारणार्थ क्षुम्नादिगणात पठित करण्याची काहीच गरज नव्हती. पण तो शब्द संज्ञावाचक असल्यामुळें त्याला अखण्ड पद मानता येतें व त्या पदात ऋकारापुढें असलेल्या नकाराचे जें णत्व प्राप्त होतें त्या णत्वाचें निवारण व्हावें याकरिता त्या शब्दाचा क्षुम्नादिगणात पाठ करावा लागला व तो पाठ ऋकारापुढें येणाऱ्या नकाराचे णत्व होतें याचा देखील ज्ञापक ठरतो.)

शब्दरत्न–मण्ड इति । तद्विशेष इत्यर्थः । बेभिदितेति । बेभिद्यतेर्यङन्तात्तृचि अल्लोपयलोपयोः "एकाच उपदेशे" इति निषेधादिण् न स्यात् । पञ्चमीसमासे त्वल्लोपस्य स्थानिवत्त्वान्निषेधाप्रवृत्तिरिति भावः । एवमितरयोः कादेशजुसोरभावो बोध्य । विहितविशेषणेति । एवं च स्थानिवत्त्वं विनाऽपि तदप्रवृत्तिः सिद्धेति भावः । विहितविशेषणत्वं चास्य "एकाचो द्वे" इत्यत्र भाष्ये ध्वनितम् । तत्र हि यङ्लोपे बेभिदितेत्यत्र यङन्तात्तृचि इट्प्रतिषेधमाशङ्क्यैकाचोऽङ्गादिति व्याख्यानेन परिहृतम् । तद्भाष्यस्य यथाश्रुतत्वे बिभित्सतीत्यादौ दोषवारणायोपदेशग्रहणस्यैकाजंशेऽपि सम्बन्धे बेभिदितेत्यादावपि परिहारासम्भवेन तस्य विहितविशेषणत्वे तात्पर्यमावश्यकम् । प्रत्ययविधानावधेरेव प्रायेणाङ्गत्वा दङ्गादित्यनेनेव सूचितम् । विहितविशेषणे च बिभित्सतीत्यादावदोषेऽपि क्षणं ऽकाजंशे

उपदेशग्रहणासम्बन्ध इति तदाशयः । न भविष्यतीति । स्थानिवत्त्वं विनापीति शेषः । अविधित्वादिति । "ठस्येकः" इत्यत्र स्थानिनि प्रत्ययेषु च सर्वत्राकारो न विवक्षितः । आदेश एव तु विवक्षितः । अन्यथा निषादकर्षूशब्दात् "ओर्देशे" इति ठञि व्यञ्जनमात्रस्य व्यञ्जनरूपकादेशे कशब्दस्य लाक्षणिकत्वात् "केऽण" इति ह्रस्वानापत्तिरिति भावः । स्थान्यादेशयोरिति । इकादेशस्थानिभूत-प्रत्यये, आदेशविधायके सूत्रे चेत्यर्थः । स्पष्टं चेदं "ठस्येकः" इत्यत्र भाष्यकैयटयोः । इदमुपलक्षणम् । सन्निपातपरिभाषयापि कादेशवारणं बोध्यम् । स्पष्टं चेदं "ठक्छसोश्च" इति वार्त्तिकभाष्ये ।

मनोरमेंत दिलेल्या श्लोकांतील 'यूष' या शब्दाचा मण्डविशेष, म्हणजे विशेषप्रकारची पेज असा अर्थ आहे. ('तण्डुलैश्च कृतो मण्डः' या वैद्यक शास्त्रांतील वचनान्वयें तांदुळाच्या पेजेला वास्तविक मण्ड अशी संज्ञा आहे. मूग व आवळे यांच्या पेजेला मण्ड ही संज्ञा नाहीं. म्हणून मनोरमेंत दिलेल्या वैद्यक शास्त्रांतील श्लोकांत जो 'यूष' शब्द वापरला आहे त्याचा पेज असा सामान्य अर्थ न करितां विशेष प्रकारची पेज असा अर्थ करणें इष्ट आहे असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे.) यङन्त 'बेभिद्य' धातूहून 'तृच्' प्रत्यय केला असतां अकारलोप व यकारलोप झाल्यावर 'एकाच उपदेशे' सू. २२४६ या निषेधक सूत्रानें इडागम न होण्याची आपत्ति येते. परंतु पञ्चमीसमासपक्ष मानल्यानें, अकार-लोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव करतां येत असल्यामुळें, त्या निषेधक सूत्राची प्रवृत्ति होत नाहीं (व 'तृच्' प्रत्ययाला इडागम होऊन 'बेभिदिता' हें इष्ट रूप सिद्ध होतें) असा भाष्यकारांच्या म्हण-ण्याचा भावार्थ आहे. त्याचप्रमाणें 'माथितिकः' व 'अपीपचन्' या दोन इतर उदाहरणांत (पञ्चमीसमासपक्ष मानून अजादेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव केल्यानें) 'इक्' चे जागीं कादेश व 'झि' चे जागीं 'जुस्' आदेश होण्याची आपत्ति टळते हें जाणावें. (याचे

विस्तृत विवरण मनोरमेंत केलेच आहे ) 'विहितविशेषणादेव बेभिदितेत्यत्र इण्णिषेधो न' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, 'बेभिदिता' या उदाहरणात अजादेशाचे ठिकाणी स्थानिवद्भाव न मानता देखील 'एकाच उपदेशे' सू २२४६ (या सूत्राचा 'उपदेशे य एकाच् अनुदात्तश्च तस्माद्विहित य. वलादि आर्धधातुकप्रत्ययः तस्य इडागमो न भवति' असा अर्थ केल्यानें, त्या उदाहरणात) हे निषेधक सूत्र प्रवृत्त होऊ शकत नाही (याचे देखील विस्तृत विवरण मनोरमेंत केलेच आहे.) 'एकाच उपदेशे' या सूत्रात 'विहित' हे पद आर्धधातुकप्रत्ययाचे विशेषण आहे हें 'एकाचो द्वे प्रथमस्य' सू ६–१–१ या सूत्रावरील भाष्यात ध्वनित केले आहे त्या भाष्यात 'बेभिदिता' या स्थली 'बेभिद्य' या यङन्ताहून 'तृच्' प्रत्यय येला असता, 'यङ् = य' या प्रत्ययाचा लोप केल्यावर 'तृच्' प्रत्ययाला इडागम न होण्याची आपत्ति येते अशी शंका उपस्थित करून त्या शंकेचे, भाष्यकारानी 'एकाच उपदेशे 'या सूत्रातील 'एकाचः' या पदाचा 'एकाच अङ्गात्' असा अर्थ करून, निवारण केले आहे (त्या भाष्यात स्थाने द्विर्वचनपक्ष न मानता 'द्वि प्रयोगो द्विर्वचनम्' हा पक्ष मानल्यास 'इड्वचन च यङ्लोपे' असे वचन पठित करावे लागेल असे मागून त्या वार्तिकाचे व्याख्यान व प्रत्याख्यान करितांना भाष्यकार म्हणतात–'इट् च यङ्लोपे वक्तव्य । बेभिदिता, बेभिदितुम् । एकाच उपदेशेऽनुदात्तादितीट्प्रतिषेध प्राप्नोति । स्थाने पुनर्द्विर्वचने सति समुदायस्य समुदाय आदेशस्तत्र यङ्लुक्परत्वात् प्रकृतिप्रत्ययस्य नष्टः स भवति य एकाजुपदेशेऽनुदात्त । द्वि प्रयोगे चापि द्विर्वचने न दोष । एकाज्ग्रहणेनाङ्गं विशेषयिष्याम, एकाचोऽङ्गादिति ।' 'बेभिद तृच्' या स्थली पूर्वी सांगितल्याप्रमाणे 'अतो लोपः' सू. २३०८ या सूत्रानें 'बेभिद' यांतील अन्त्य अकाराचा व 'यस्य हल.' सू. २६३१ या सूत्रानें 'य' या समुदायांतील अवशिष्ट यकाराचा लोप केल्यावर 'बेभिद् तृच्' अशी स्थिति झाली असता, उपदेशात,

म्हणजे धातुपाठांत, एकाच् व अनुदात्त पठित असलेल्या 'भिद्' धातूपुढें 'तृच्' प्रत्यय आला असल्यामुळें, 'एकाच उपदेशे' या सूत्रानें 'तृच्' या वलादि आर्धधातुक प्रत्ययाला इडागम होऊं शकत नाहीं अशी भाष्यकारांनीं शंका उपस्थित केली आहे व त्या शंकेचें निरसन करितांना भाष्यकारांनीं असें म्हटलें आहे कीं, तें सूत्र अङ्गाधिकारांत पठित असल्यामुळें व त्यांत 'अङ्गस्य' हें पद अनुवृत्त होत असल्यामुळें, त्या अनुवृत्त पदाचा 'अङ्गात्' असा पञ्चमी-विभक्तींत विपरिणाम करून त्याचें सूत्रनिर्दिष्ट 'एकाचः' हें पद विशेषण मानल्यानें व 'एकाचः अङ्गात्परस्य' असा अर्थ केल्यानें, 'बेभिद्' हें अङ्ग एकाच् नसून अनेकाच् असल्यामुळें व तशा अनेकाच् अङ्गापुढें 'तृच्' प्रत्यय आला असल्यामुळें, 'एकाच उपदेशे' हें निषेधक सूत्र त्या उदाहरणांत प्रवृत्त होऊं शकत नाहीं व 'तृच्' प्रत्ययाला इडागम होऊन 'बेभिदिता' असें इष्ट रूप सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. परंतु त्या भाष्यांत जरी 'एकाचः' या सूत्रनिर्दिष्ट पदाचा 'एकाचः अङ्गात्' असा अर्थ केला आहे तरी, 'एकाचो विहितः' असा स्पष्ट अर्थ केलेला आढळत नाहीं अशी कोणी शंका केल्यास, त्या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं,) त्या भाष्याचा यथाश्रुत अर्थ केल्यास, म्हणजे 'एकाचोऽङ्गात्परस्य वलादेरार्धधातुकस्य इड् न स्यात्' असा केवळ अक्षरार्थ केल्यास, 'बिभित्सति' इत्यादि उदाहरणांत ('सन्' प्रत्ययाला इडागम होणें या) दोषाचें निवा-रण करण्याकरितां ('एकाच उपदेशे' या सूत्रांतील 'उपदेशे' हें पद जसें 'अनुदात्तात्' याचें विशेषण मानावें लागतें तसेंच) 'उपदेशे' हें पद 'एकाचः' या पदाचें देखील विशेषण मानावें लागतें. पण तसें मानलें तरी, 'बेभिदिता' इत्यादि उदाहरणांत जो इडागमनिषेध-रूप, म्हणजे 'तृच्' प्रत्ययाला इडागम न होणें हा, दोष येतो त्याचा परिहार होऊं शकत नसल्यामुळें, वरील भाष्याचें विहित-विशेषणत्वाचे ठिकाणीं तात्पर्य आहे, म्हणजे 'एकाचोऽङ्गाद्विहितः'

असा त्या भाष्याचा तात्पर्यार्थ आहे, हे मानणे आवश्यक आहे. ज्याहून प्रत्यय होण्याचे विधान केले जाते तेवढ्या शब्दस्वरूपाला बहुधा 'यस्मात्प्रत्ययविधिः' सू. १९९ या सूत्रानें अङ्गसंज्ञा होत असल्यामुळें, 'अङ्गात् विहितः' असे वरील भाष्यातील 'अङ्गात्' या पदाच्या ग्रहणानें सूचित होते. 'एकाच उपदेशे' या सूत्राच्या विषयात विहितविशेषणपक्ष मानल्यानें, 'बिभित्सति' इत्यादि रूपें सिद्ध होण्यात काही दोष–अडचण–येत नसल्यामुळें, त्या सूत्रातील 'उपदेशे' हे पद 'एकाचः' या पदाचे विशेषण मानण्याची काही गरज नाही असा वरील भाष्याचा आशय आहे. ( 'भिद्' धातूहून 'सन्' प्रत्यय केल्यावर, 'भिद् सन्' अशी स्थिति झाली असता, या स्थितीत उपदेशात–धातुपाठात–एकाच् व अनुदात्त पठित असलेल्या 'भिद्' धातूपुढें 'सन्' हा वलादि आर्धधातुक प्रत्यय आला असल्यामुळें, 'एकाच उपदेशे' या सूत्राचा 'उपदेशे यः एकाच् अनुदात्तश्च तस्मात्परस्य वलादेरार्धधातुकस्य इडागमो न भवति' असा अर्थ केल्यानें, 'भिद्' धातूपुढील वलादि आर्धधातुक 'सन्' प्रत्ययाला तशा स्थितीत इडागम होण्याची आपत्ति टळते. परंतु 'सन्' प्रत्ययाच्या निमित्तामुळें 'सन्यङोः' सू. २३९५ या सूत्रानें 'भिद्' धातूचे द्विर्वचन केल्यावर 'बिभिद् सन्' अशी स्थिति झाली असता, 'बिभिद्' या अनेकाच् अङ्गापुढें 'सन्' प्रत्यय येत असल्यामुळें, त्याला जो इडागम होण्याची आपत्ति येते ती टाळण्याकरिता 'एकाच उपदेशे' या सूत्रातील 'उपदेशे' हे पद 'एकाचः' या पदाशी संबद्ध करणे, म्हणजे 'एकाचः' या पदाचे विशेषण मानणे, आवश्यक आहे. तसे मानले असता, 'द्वि प्रयोगो द्विर्वचनम्' या सिद्धान्तपक्षात 'भिद्' धातूचे द्विर्वचन करतेवेळी 'भिद्' धातूचेच दोनदा उच्चारण केले जात असल्यामुळें व 'पूर्वोऽभ्यासः, धातुत्वमुत्तरखण्डे' या वचनान्वयें 'बिभिद्' यातील 'भिद्' हा उत्तरखण्ड धातु ठरत असून व तो उपदेशात–धातुपाठात–एकाच् व अनुदात्त पठित असून त्याच्या लगेच पुढें 'सन्' प्रत्यय येत असल्यामुळें, 'एकाच उपदेशे'

हें इडागमनिषेधक सूत्र येथें प्रवृत्त होतें व 'सन्' प्रत्ययाला इडागम न होतां, 'बिभित्सति' हें इष्ट रूप सिद्ध होतें. पण अशा रीतीनें त्या सूत्राचा अर्थ केल्यास, 'बेभिद् तृच्' या स्थलीं उत्तरखण्डांतील 'भिद्' या, उपदेशांत एकाच् व अनुदात्त पठित असलेल्या, धातूपुढें 'तृच्' हा वलादि आर्धधातुक प्रत्यय आला असल्यामुळें, त्याला देखील इडागमनिषेध लागू पडण्याची आपत्ति येते व त्याला इडागम न केल्यास 'बेभित्ता' असें अनिष्ट रूप होण्याची व 'बेभिदिता' असें इष्ट रूप सिद्ध न होण्याची आपत्ति येते. तें रूप सिद्ध होण्याकरितां भाष्यकारांनीं 'एकाच उपदेशे' या सूत्रांतील 'उपदेशे' हें पद 'एकाचः' याचें विशेषण न मानतां, 'एकाचः' या पदाचा, पूर्वीं सांगितल्याप्रमाणें, 'एकाचः अङ्गात्' असा अर्थ केला आहे. पण 'एकाचः अङ्गात्' या भाष्यवचनाचा 'एकाचोऽङ्गात्परस्य' असा अर्थ अभिप्रेत आहे किंवा 'एकाचोऽङ्गात् विहितस्य' असा अर्थ अभिप्रेत आहे? जो अर्थ केल्यानें कोणत्याहि उदाहरणांत दोष न येतां सर्व इष्ट रूपांची सिद्धि होऊं शकते असाच अर्थ भाष्यकारांना अभिप्रेत होता हें मानणें उचित आहे. 'उपदेशे' हें पद 'एकाचः' याचें विशेषण मानून 'उपदेशे यः एकाच् अनुदात्तो धातुः तस्मात्परः' असा अर्थ केल्यास, 'विभिद् सन्' या स्थलीं जरी, वर सांगितल्याप्रमाणें, 'सन्' प्रत्ययाला इडागम होण्याची आपत्ति टळते तरी, 'बेभिद् तृच्' या स्थलीं त्या अर्थान्वियें 'तृच्' प्रत्ययाला इडागम न होण्याची आपत्ति येते. 'उपदेशे' हें पद 'एकाचः' याचें विशेषण न मानतां 'एकाचः' या पदाचा 'एकाचः अङ्गात्परः' असा अर्थ केल्यास, जरी 'बेभिद् तृच्' या स्थलीं 'बेभिद्' या अनेकाच् अङ्गापुढें 'तृच्' प्रत्यय असल्यामुळें त्याला इडागमनिषेध लागू न पडतां इडागम होऊं शकतो तरी, 'विभिद् सन्' या स्थलीं देखील 'विभिद्' या अनेकाच् अङ्गापुढें 'सन्' प्रत्यय आला असल्यामुळें, त्यालाहि वरील अर्थान्वियें इडागम होण्याची आपत्ति येते. परंतु 'एकाचो-

ऽङ्गात्' या भाष्यातील पदांचा 'एकाचोऽङ्गात् विहितः' असा अर्थ केल्यानें कोणत्याहि उदाहरणात दोष न येता सर्व इष्ट रूपें सिद्ध होऊं शकतात. उदाहरणार्थ द्विर्वचन करून 'विभिद् सन्' अशी स्थिति झाली असता, जरी 'विभिद्' या अनेकाच् अङ्गापुढें 'सन्' प्रत्यय येतो तरी, 'भिद्' या एकाच् अङ्गाहून तो प्रत्यय 'धातोः कर्मणः' सू. २६०८ या सूत्रानें विहित–झाला–असल्यामुळें, त्याला इडागम होत नाही. पण 'बेभिद्य तृच्' या स्थली 'सनाद्यन्ता धातवः' सू. २३०४ या सूत्रानें धातुसंज्ञक ठरणाऱ्या 'बेभिद्य' या अनेकाच् अङ्गाहून 'ण्वुलतृचौ' सू. २८९५ या सूत्रानें 'तृच्' प्रत्यय विहित–झाला–असल्यामुळें, त्याला इडागम होतो. सारांश 'एकाच उपदेशे' या सूत्राचा यथाश्रुत अर्थ न करिता भाष्यकारांनी जो भिन्न तऱ्हेनें अर्थ केला आहे तो अर्थ सर्व इष्ट रूपाची सिद्धि व्हावी या हेतूनेंच केला असल्यामुळें, तो हेतु सिद्ध होण्याकरिता भाष्यकारांनी घेतलेल्या 'एकाच = अङ्गात्' या पदाचा 'एकाचः अङ्गाद्विहितः' असाच अर्थ करणे योग्य ठरते व अशा रीतीनें 'एकाचो द्वे प्रथमस्य' या सूत्रावरील भाष्य तसा अर्थ करण्यास व 'एकाच उपदेशे' या सूत्राच्या विषयात विहितविशेषणपक्ष मानण्यास प्रमाणभूत ठरते असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. शब्दरत्नातील प्रकृत पङ्क्तीत 'प्रत्ययविधानावधेरेव प्रायेणाङ्गत्वात्' असे म्हटले असून त्यांत 'प्रायेण' हा जो शब्द घातला आहे त्याचे कारण भैरवीत 'यस्मात् प्रत्ययविधान तद्भिन्नस्य सदादेरप्यङ्गत्व भवामीत्यादौ दृष्टमतः प्रायेणेति' असे दिले आहे. याचा भावार्थ हा आहे की, ज्या शब्दाहून प्रत्यय होण्याचे विधान केले जाते त्या शब्दस्वरूपाला जरी बहुधा 'यस्मात् प्रत्ययविधि.' सू. १९९ या अङ्गसंज्ञाविधायक सूत्रानें अङ्गसंज्ञा होत असते तरी, केव्हां केव्हां त्याहून अधिक शब्दस्वरूपाला देखील अङ्गसंज्ञा होते. उदाहरणार्थ 'निष्ठसि' सू. २१५४ या सूत्रांत निर्दिष्ट असलेले प्रत्यय धातूहून होणे सांगितले आहे. 'भू' धातूहून 'सि' प्रत्यय केल्यास, 'कर्तरि शप्' सू. २१६७

या सूत्रानें 'भू' धातूला ' शप् = अ ' हें विकरण होऊन व ' सार्वधातुकार्धधातुकयोः ' सू. २१६८ या सूत्रानें 'भू' धातूंतील ऊकाराचा 'ओ' असा गुण होऊन आणि 'एचोऽयवायावः' सू. ६१ या सूत्रानें त्या 'ओ' चे जागीं अवादेश होऊन 'भव मि' अशी स्थिति झाली असतां, जरी ' भू ' या धातूहून ' मि ' प्रत्यय झाला आहे तरी, त्या 'भू' चें ' भव ' असें रूप झाल्यावर तें रूप ' मि ' या प्रत्ययाचें अङ्ग ठरतें आणि तें अदन्त अङ्ग असल्यामुळें, ' अतो दीर्घो यञि' सू. २१७० या सूत्रानें त्या अङ्गांतील अन्त्य अकार दीर्घ होऊन 'भवामि' असें इष्ट रूप सिद्ध होतें.) 'इसुसुक्तान्तात्कः इति कादेशस्तु न भविष्यति' या मनोरमेंतील पंक्तींत 'स्थानिवत्वं विनापि' हीं पदें अध्याहृत आहेत. (तीं पदें अध्याहृत केल्यानें त्या पंक्तीचा असा अर्थ होतो कीं, 'माथित' या अङ्गांतील अन्त्य अकाराचा 'यस्येति च' सू. ३११ या सूत्रानें जो लोप होतो त्या अकारलोपाचे ठिकाणीं तो अकार विद्यमानच आहे अशी स्थानिवद्भावानें बुद्धि न करितां देखील, 'ठ् = इक' चे जागीं 'इसुसुक्तान्तात्कः' सू. १२२१ या सूत्रानें 'क' असा आदेश होऊं शकत नाहीं; कारण ठकार या अल्रूप स्थानीचे जागीं 'इक' हा आदेश झाला असल्यामुळें हा अल्विधि ठरतो व म्हणून 'अनल्विधौ' या प्रतिषेधान्वयें 'इक' हा ठकारच आहे अशी स्थानिवद्भावानें बुद्धि करतां येत नसल्यामुळें, कादेशाची प्राप्तीच होत नाहीं.) 'अल्विधित्वात्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचें कारण हें कीं 'ठस्येकः' सू. ११७० या सूत्रांत 'ठ' असा जो स्थानी निर्दिष्ट आहे त्यांत व तसेंच ठकारादि 'ठक्, ठन्, ठञ्' इत्यादि प्रत्ययांत 'ठ' मधील अकार विवक्षित नाहीं; पण त्या सूत्रांत 'इक' हा जो आदेश निर्दिष्ट आहे त्यांतील अन्त्य अकार (उच्चारणार्थ नसून) विवक्षित आहे. (सारांश 'ठक्' या प्रत्ययांत ठकार हा अल् स्थानी असून त्याचे जागीं 'इक' असा अकारान्त आदेश होतो व येथें स्थानी अल् असल्यामुळें, हा अल्विधि ठरतो.) 'ठस्येकः इत्यत्र हि स्थान्या-

देशयोरकार उच्चारणार्थः' असे जें मनोरमेंत म्हटले आहे ते बरोबर मानल्यास, 'निषादकर्षू' या देशविशेषाच्या वाचक शब्दाहून 'ओर्देशे ठञ्' सू. १३४३ या सूत्रानें ('तत्र भवः' या अर्थामध्यें) 'ठञ्' प्रत्यय केला असता, ('निषादकर्षू' हा शब्द उगन्त असल्यामुळें 'इसुसुक्तान्तात्कः' सू. १२३१ या सूत्रानें ठकाराचे जागी कादेश पावत असल्यामुळें) जर 'ठ्' या व्यञ्जनमात्राचे जागी व्यञ्जनरूप ककारादेश होतो असे मानले तर, म्हणजे 'क' या आदेशांतील अकार उच्चारणार्थ आहे असे मानले तर, तसा व्यञ्जनरूप ककारादेश लाक्षणिक असल्यामुळें, 'केऽणः' सू. ८३४ (या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या 'क' या प्रतिपदोक्त प्रत्ययानें त्या लाक्षणिक व्यञ्जनरूप ककारादेशाचे ग्रहण होऊं शकणार नाही व त्यामुळें) या सूत्रानें होणारे ऱ्हस्वकार्य न होण्याची आपत्ति येईल. ('लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैव ग्रहणम्' – परि. ११४ – या परिभाषान्वयें, 'केऽणः' या सूत्रात अकारसहित प्रतिपदोक्त ज्या 'क' प्रत्ययाचे ग्रहण केले आहे त्या प्रतिपदोक्त प्रत्ययानें व्यञ्जनरूप 'क्' या लाक्षणिक प्रत्ययाचे ग्रहण करता येत नाही व त्यामुळें 'केऽणः' हे सूत्र 'निषादकर्षू ठञ् = निषादकर्षुक्' या स्थली प्रवृत्त होऊं शकत नाही व ते सूत्र प्रवृत्त न झाल्यास 'नैषादकर्षुकः' असे इष्ट रूप सिद्ध न होण्याची आपत्ति येते.) म्हणून मनोरमेच्या वरील पङ्क्तीतील 'स्थान्यादेशयोः' या पदाचा 'इकादेश स्थानिभूतप्रत्यये, आदेशविधायके सूत्रे च' असा अर्थ करावा, म्हणजे 'इक' या आदेशाचा 'ठक् ठञ्' इत्यादि प्रत्ययांतील 'ठ' हा जो स्थानी आहे त्यातील अकार व तसेच 'ठस्येकः' सू. ११७० या आदेशविधायक सूत्रातील 'ठ' मधील अकार उच्चारणार्थ आहे असा अर्थ करावा. 'ठस्येकः' सू. ७–३–५० या सूत्रावरील भाष्यांत व त्या भाष्यावरील कैयटवृत्तींत हें स्पष्ट केले आहे. ('ठस्येकः' या सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात – 'किमिदं ठादेशे वर्णग्रहणमाहोस्वित् सङ्घातग्रहणम्? ... सङ्घात-

ग्रहणं चेदुणादिमाथितिकादीनां प्रतिषेधो वक्तव्यः … इह च मथितं पण्यमस्य माथितिक इति, अकारलोपे कृते तान्तादिति कादेशः प्राप्नोति । वर्णग्रहणे पुनः सत्यल्विधिरयं भवति । तस्मात् विशिष्टग्रहणम् । तस्मात् विशिष्टस्य ठकारस्य ग्रहणं कर्तव्यम् । तर्हि कर्तव्यम् ? न कर्तव्यम् । अस्तु तावद्वर्णग्रहणम् ।' या भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं, भाष्यकारांनीं 'ठक्, ठञ्' इत्यादि प्रत्ययांतील 'ठ' हा संघात आदेशाचा स्थानी मानला नसून, 'ठ' मधील ठकार हा अल् आदेशाचा स्थानी मानला आहे. सारांश 'ठ' यांतील अकार अनुनासिक मानल्यानें, 'उपदेशेऽजनुनासिक इत्' सू. ३ या सूत्रानें तो अकार इत्संज्ञक ठरून केवळ ठकार हा अल् 'इक' या आदेशाचा स्थानी ठरतो.) 'अल्विधित्वात्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे तें उपलक्षण आहे. सन्निपातपरिभाषान्वयें देखील कादेशाचें निवारण करतां येतें हें 'ठस्छसोश्च'— सू. ८३६ वरील वार्तिक—या वार्तिकावरील भाष्यावरून स्पष्ट होतें. ('तसिलादिष्वाकृत्वसुचः' सू. ६–३–३५ या सूत्रावरील भाष्यांत वरील वार्तिक पठित केलें आहे व त्या वार्तिकाचें व्याख्यान करितांना भाष्यकार म्हणतात—'मथितं पण्यमस्य माथितिक इत्यकारलोपे कृते तान्तादिति कादेशो न भवति।' व 'तान्तादिति कादेशो न भवति' हें प्रतीक घेऊन कैयटानें 'ठस्येति वर्णमात्रस्य स्थानित्वेऽल्विधित्वात् स्थानिवत्त्वाभावात् । सङ्घातस्य तु स्थानित्वे सन्निपातपरिभाषोपस्थानात् ।' असें म्हटलें आहे. या कैयटाच्या म्हणण्याचा आशय हा आहे कीं, जर 'ठ' प्रत्ययांतील अकार उच्चारणार्थ आहे असें मानलें तर, ठकार या अल्रूप स्थानीचे जागीं जो 'इक' आदेश होतो तो अल्विधि ठरत असल्यामुळें व 'अनल्विधौ' हा प्रतिषेध असल्यामुळें, 'इक' हा ठकारच आहे असें स्थानिवद्भावानें मानतां येत नाहीं व त्यामुळें 'इसुसुक्तान्तात्कः' सू. २२२१ या सूत्रानें तकारान्त अङ्गापुढील ठकाराचे जागीं होणारा 'क' हा आदेश 'इक' चे जागीं होऊं

शकत नाही आणि 'माथितिक.' असे इष्ट रूप सिद्ध होऊ शकते. आता 'ठ' प्रत्यातील अकार उच्चारणार्थ नसून 'ठ' हे सङ्घात-ग्रहण आहे असे मानले तरी, 'मथित ठक् = माथित इक' या स्थली 'यस्येति च' सू. ३११ या सूत्रानें ज्या 'इक' च्या सन्निपाता-मुळें 'माथित' यातील अन्त्य अकाराचा लोप होऊन 'माथित्' असे तकारान्त अङ्ग होते ते तकारान्त अङ्ग सन्निपातपरिभाषान्वयें 'इक' च्या नाशाला कारणीभूत होऊ शकत नाही व जरी हा अनल्विधि असल्यामुळें 'इक' हा 'ठ' च आहे असे 'स्थानिव-दादेश' सू. ४९ या सूत्रान्वयें स्थानिवद्भावानें मानता येते तरी, 'इक' चे जागी, सन्निपातपरिभाषान्वयें, कादेश होऊ शकत नाही व त्यामुळें देखील 'माथितिकः' असे इष्ट रूप सिद्ध होऊ शकते )

शब्दरत्न—बलीयस्त्वादिति । एतच्च "यस्य विभाषा" "विसो भोग—" इति सूत्रस्थकैयटे स्पष्टम् । एतत्सर्वं "अपर-विधाविति तु वक्तव्यम्" इति वार्तिकस्थकैयटानुरोधेन । दिगिति । दिगर्थस्तु एतदर्थं पञ्चमीसमासस्यावश्यकत्वम् । तथा हि परसाह-चर्यस्य बलवत्त्वे मानाभाव. विप्रतिषेधसूत्रे कार्यशब्देन शास्त्रीयस्यैव ग्रहीतुमौचित्येनात्र तदप्राप्ते. ।

"नित्य.परयणादेशः परश्चासौ व्यवस्थया ।
युगपत्सम्भवो नास्ति बहिरङ्गेण सिध्यति ॥"

इति "अचः परस्मिन्" इति सूत्रस्थभाष्योक्तरीत्या पूर्वसाह-चर्यस्यान्तरङ्गत्वेन तस्यैव ग्रहीतुमौचित्याच्च । "विभाषा गमहन-विदविशाम्" इत्यत्र लुग्विकरणपरिभाषानुग्रहाय परसाहचर्याश्रयणं "नुदविदोन्दत्रा" इत्यत्राप्यन्तरङ्गपरिभाषाऽनित्यत्वाद्स्यापयानेन परसाहचर्याश्रयणमिति बोध्यम् । प्रत्येपिपभित्यादौ लङि "उभे अभ्यस्तम्" इति सूत्रस्थभाष्यसमने । एवमपि दोषाच्च । पूर्वोत्तर-साहचर्येण भावस्थादेशानपहृतविकरणाभ्यस्तस्यैव ग्रहणमित्य-स्यातिक्लिष्ट ततो वर पञ्चमीसमास एव । "अपर विधाविति तु

वक्तव्यम्" इति न्यासान्तरेऽपि पञ्चमीसमासो वक्तुं शक्यः। न्यासान्तरन्तु स्वविधेरपि सङ्ग्रहार्थेति स्पष्टमेव। अतिप्रसङ्गस्त्व-नित्यत्वेन परिहरणीय इति ॥

'पूर्वसाहचर्यात्परसाहचर्यस्य बलीयस्त्वात्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे तें 'यस्य विभाषा' सू. ७–२–१५ व 'वित्तो भोग-प्रत्यययोः' सू. ८–२–५८ या सूत्रांवरील भाष्याच्या वृत्तींत कैयटानें स्पष्ट सांगितलें आहे. ('विभाषा गमहनविदविशाम्' सू. ३०९९ या सूत्रांत निर्दिष्ट असलेला 'विद्' धातु अदादि 'हन्' धातूच्या साहचर्यामुळें अदादि मानतां येतो, पण तुदादि 'विश्' धातूच्या साहचर्यामुळें तो तुदादि मानतां येतो. परंतु 'विद्' धातूला 'हन्' धातूचें पूर्वसाहचर्य असून 'विश्' धातूचें परसाहचर्य असल्यामुळें व पूर्व शब्दाच्या साहचर्यापेक्षां परशब्दाचें साहचर्य बलवत्तर ठरत असल्यामुळें, वरील सूत्रांत अदादि 'विद्' धातूचें ग्रहण केलें नसून तुदादि 'विद्' धातूचें ग्रहण केलें आहे हें सिद्ध होतें असें कैयटाचें म्हणणें आहे. 'यस्य विभाषा' या सूत्रावरील भाष्यांत 'यस्य विभाषाऽविदेः' हें वार्तिक पठित करून त्या वार्तिकाचें व्याख्यान करितांना भाष्यकार म्हणतात– 'यस्य विभाषाऽविदेरिति वक्तव्यम्। इह मा भूत्, विदितः विदित-वानिति। तर्हि वक्तव्यम्? । न वक्तव्यम्। यदुपाधेर्विभाषा तदुपाधेः प्रतिषेधः। अविकरणस्य विभाषा, लुग्विकरण-श्चायम्' या भाष्याच्या वृत्तींत कैयटानें 'यद्यपि हन्तिना साहचर्यं विदेरस्ति तथापि शब्दपरविप्रतिषेधाद् विशिर्व्यवस्थाहेतुर्न हन्तिः।' असें म्हटलें आहे. तसेंच 'नुदविदोन्दत्राघ्रा' सू. ३०३८ या सूत्रांत तुदादि 'नुद्' धातूच्या साहचर्यामुळें 'विद्' धातु तुदादि मानतां येतो. पण 'उन्द्' रुधादि धातूच्या साहचर्यामुळें 'विद्' धातु रुधादि मानतां येतो. परंतु पूर्व शब्दाच्या साहचर्यापेक्षां पर शब्दाचें साहचर्य बलवत्तर असल्यामुळें, वरील सूत्रांतील 'विद्' धातु रुधादि ठरतो असें कैयटानें म्हटलें आहे. 'वित्तो भोगप्रत्य-

यथोः' या सूत्रावरील भाष्याच्या वृत्तीत कैयटानें 'यद्यपि' नुदिना तौदादिकेन साहचर्यं तथापि शब्दपरविप्रतिषेधादुन्दिरत्र व्यवस्थाहेतुर्न नुदिः।' असे म्हटले आहे.) पञ्चमीसमासपक्षाचे खण्डन करिताना दीक्षितांनी जें मनोरमेंत म्हटले आहे ते सर्व 'अपरविधाविति तु वक्तव्यम्' या वार्तिकावरील भाष्याच्या वृत्तीत कैयटानें जें व्याख्यान केले आहे त्या व्याख्यानाला अनुसरून म्हटले आहे. ('अचः परस्मिन्' सू. १-१-५७ या सूत्रावरील भाष्यात पठित असलेल्या 'अपरविधाविति तु' या वार्तिकावरील भाष्याच्या वृत्तीत कैयटानें 'नन्वपरविधावित्युच्यमाने कथं वेभिदितेत्यादयः सगृह्यन्ते। उच्यते–निमित्तापेक्षापरत्वविज्ञानात्। तथाहि। वेभिदितेत्यत्राकारलोपस्य निमित्तमार्धधातुकम्। न च तस्मात्परस्य विधिः। किं तर्हि? तस्यैवेति सिद्धः स्थानिवद्भावः। एवं मार्थितिक' अपीपचन्नित्यत्र बोद्धव्यम्।' असें म्हटले आहे.) 'इति दिक्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, 'अपीपचन्' हे रूप सिद्ध करण्याकरिता 'पूर्वविधौ' हा पञ्चमीसमास मानणे आवश्यक आहे; कारण पूर्व शब्दाच्या साहचर्यापेक्षा पर शब्दाचे साहचर्य बलवत्तर असते असे जें कैयटानें म्हटले आहे तें बरोबर मानण्यास काहीं प्रमाण नाही. 'विप्रतिषेधे परं कार्यम्' सू. १७५ या सूत्रातील 'कार्यम्' या शब्दानें, विधायक सूत्रांनी जी शास्त्रीय कार्यें होण्याचे विधान केले आहे तशाच शास्त्रीय कार्यांचे ग्रहण करणे उचित ठरत असल्यामुळें, पूर्व शब्द व पर शब्द यांच्या साहचर्याच्या विषयामध्यें त्या सूत्राची प्राप्ति होऊं शकत नाहीं. ('तुल्यबलयोः शास्त्रयोः एकस्मिन् लक्ष्ये युगपत् प्राप्तौ परशास्त्रविहितं कार्यमेव कर्तव्यम्' असा 'विप्रतिषेधे परं कार्यम्' या सूत्राचा अर्थ आहे. या अर्थावरून हें स्पष्ट होते कीं, जेथें एखाद्या स्थळाचे ठिकाणीं दोन तुल्यबल शास्त्रांची युगपत् प्राप्ति होते तसाच स्थलीं पर सूत्रानें विहित असलेलें कार्य करणे भाग पडतें. जेथें पूर्व शब्द व पर शब्द यांचे एखाद्या शब्दाशीं साहचर्य आहे तेथें दोन तुल्यबल

शास्त्रांची युगपत् प्राप्ति होते किंवा अप्राप्त व अपूर्व अशा कोणत्या तरी शास्त्रीय कार्याची प्राप्ति होते असें मुळींच म्हणतां येत नाहीं. त्यामुळें पूर्वपर शब्दांच्या साहचर्याच्या विषयांत 'विप्रतिषेधे परं कार्यम्' हें सूत्र लागू पडत नाहीं हें उघड आहे. म्हणून विप्रतिषेध सूत्रान्वयें परशब्दाचें साहचर्य पूर्व शब्दाच्या साहचर्यापेक्षां बलवत्तर ठरतें असें मानतां येऊं शकत नसल्यामुळें, 'सिजभ्यस्तविदिभ्यश्च' सू. २२२६ या सूत्रांतील 'विद्' या पर शब्दाच्या साहचर्यामुळें लङ् लकारांतच अभ्यस्त धातूपुढील 'झि'चे जागीं 'जुस्' आदेश होतो असें सिद्ध होत नाहीं. 'सिच्' या पूर्व शब्दाच्या साहचर्यामुळें लुङ् लकारांत देखील अभ्यस्त धातूपुढील 'झि'चे जागीं 'जुस्' आदेशाची प्राप्ति होते असें देखील म्हणतां येऊं शकतें व 'पूर्वविधौ' हा पञ्चमीसमास मानल्यानेंच, 'अपीपचन्' या स्थलीं 'झि'चे जागीं 'जुस्' आदेश होण्याची आपत्ति टाळतां येते. म्हणून 'पूर्वविधौ' हा पञ्चमीसमास देखील मानणें आवश्यक आहे असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे.) दुसरें असें कीं, 'अचः परस्मिन्' १-१-५७ या सूत्रावरील भाष्यांतील 'नित्यः परयणादेशः परश्चासौ व्यवस्थया। युगपत्सम्भवो नास्ति बहिरङ्गेण सिध्यति।' या वचनांत जी रीति प्रदर्शित केली आहे तिचें अनुसरण केल्यानें (पर शब्दाच्या साहचर्याच्या मानानें) पूर्व शब्दाचें साहचर्य अन्तरङ्ग ठरत असल्यामुळें ('असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे'— परि. ५०—या परिभाषान्वयें) पूर्व साहचर्याचेंच ग्रहण करणें, म्हणजे पूर्व साहचर्यच बलवत्तर मानणें, उचित ठरतें. (भाष्यांतील वरील कारिकेचा भावार्थ हा आहे कीं, 'पटु ई टा आ') या स्थलीं पूर्व यणादेश प्रथम केला किंवा मागून केला तरी, पर यणादेशाची प्राप्ति आहेच. 'पट्वी' असा पूर्व यणादेश प्रथम केल्यावर देखील पर यणादेश होऊं शकतो व 'पट्व्या' असें रूप सिद्ध होऊं शकतें. पूर्व यणादेश प्रथम न केला तरी, पर यणादेश करतां येतो व नंतर केल्यानें 'पटुया' असें रूप होतें. पण पर यणादेश प्रथम केला,

म्हणजे 'पट्‌ या' असे रूप प्रथम केले, तर, 'पटु' यातील उकारापुढें यकार येत असून अच् येत नसल्यामुळें, पूर्व यणादेश होऊ शकत नाही. म्हणून 'क्वचित् कृताकृतप्रसङ्गमात्रेणापि नित्यता'–परि. ४६–या न्यायान्वयें पर यणादेश पूर्व यणादेशाच्या मानानें नित्य ठरतो व तो वर्णक्रमानुसार पर देखील आहे. दोन्ही यणादेश एकेच वेळी होणें शक्य नाही, कारण वर सांगितल्याप्रमाणे पर यणादेश प्रथम करून 'ई आ = या' असे रूप केल्यास, पूर्व यणादेशाची प्राप्तीच होत नाही म्हणून पर यणादेश पर असल्यामुळें, 'विप्रतिषेधे परं कार्यम्' सू १७५ या सूत्रानें तो प्रथम झाला पाहिजे, कारण दोन कार्यें युगपत् प्राप्त झाली असता, पर कार्य प्रथम करावे अशी व्यवस्था सांगणारे ते सूत्र आहे पण पर यणादेश प्रथम केल्यास, 'पट्व्या' असे इष्ट रूप सिद्ध न होता, 'पटुया' असे अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येते. ती आपत्ति टाळण्याकरिता भाष्यकार असे म्हणतात की, जरी पर यणादेश नित्य आहे तरी तो पूर्व यणादेशाच्या मानानें बहिरङ्ग आहे, कारण पूर्व यणादेशाचे निमित्त 'ई' हे प्रथम उपस्थित असून, पर यणादेशाचे निमित्त 'आ' हें त्याच्या नंतर उपस्थित आहे व 'नित्यादप्यन्तरङ्गं बलीय.' हा न्याय असल्यामुळें आणि तसेच 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' ही परिभाषा असल्यामुळें, अन्तरङ्ग पूर्व यणादेश पर व नित्य उत्तर यणादेशाला बाधून प्रथम होतो व त्यामुळें 'पट्व्या' असे इष्ट रूप सिद्ध होते. या वरील भाष्यावरून हे स्पष्ट होते की, ज्या कार्याचे निमित्त शब्दस्वरूपामध्यें वर्णक्रमानुसार प्रथम उपस्थित होतेते कार्य अन्तरङ्ग ठरत असून, ज्या कार्याचें निमित्त पुढें–पलीकडे–उपस्थित होते ते कार्य बहिरङ्ग ठरते व अशा रीतीनें 'पूर्वोपस्थितनिमित्तमन्तरङ्गं परोपस्थितनिमित्तं बहिरङ्गम्' हा न्याय या भाष्यावरून सिद्ध होतो हें जे वरील भाष्यांत सांगितले आहे त्याचें पूर्वपरशब्दसाहचर्याच्या विषयांत अनुसरण केल्यास,

'सिजभ्यस्तविदिभ्यश्च' सू. २२२६ या शब्दस्वरूपांत 'अभ्यस्त' या शब्दाला 'सिच्' या पूर्व शब्दाचें जें साहचर्य आहे ते प्रथम उपस्थित असून 'विद' या पर शब्दाचें जें साहचर्य आहे तें नंतर—पलीकडे—उपस्थित असल्यामुळें, पूर्वसाहचर्य अन्तरङ्ग ठरून त्याच्या मानानें परसाहचर्य वहिरङ्ग ठरतें व परापेक्षां अन्तरङ्ग बलवत्तर ठरत असल्यामुळें, पूर्व साहचर्य बलवत्तर ठरून त्याच्या सामर्थ्यानें लुङ् लकारांत अभ्यस्त धातुपुढील 'झि' चे जागीं 'जुस्' आदेशाची प्राप्ति होते व तो आदेश केल्यास, 'अपीपचन्' असें इष्ट रूप सिद्ध न होतां 'अपीपचुः' असें अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येते. ती आपत्ति टाळण्याकरितां पञ्चमी-समासपक्ष मानणें आवश्यक आहे व तो पक्ष मानल्यानें ती आपत्ति कशी टळते हें पूर्वी सांगितलेंच आहे. पण अशा रीतीनें वरील भाष्यानुसार परसाहचर्यापेक्षां पूर्वसाहचर्य बलवत्तर मानल्यास, 'विभाषा गमहनविदविशाम्' सू. ३०९९ या सूत्रांतील 'विद' धातु 'हन्' या अदादि धातूच्या पूर्वसाहचर्यामुळें अदादि मानण्याची आपत्ति येते व तसेंच 'नुदविदोन्दत्राघ्रा' सू. ३०३८ या सूत्रांतील 'विद्' धातु 'नुद्' या तुदादि धातूच्या पूर्वसाहचर्यामुळें तुदादि मानण्याची आपत्ति येते अशी कोणी शंका केल्यास, त्या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं,) 'विभाषा गमहनविदविशाम्' या सूत्राच्या विषयांत 'लुग्विकरणालुग्विकरणयोरलुग्विकरणस्य'—परि. ९१—या परिभाषानुसार पर साहचर्याचें अवलंबन केलें आहे हें जाणावें. ('अदिप्रभृतिभ्यः शपः' सू. २४२३ या सूत्रान्वयें अदादिगणांत पठित असलेल्या धातुपुढील विकरणाचा लुक् होत असल्यामुळें, अदादि धातूंना लुग्विकरण म्हणतात. इतर गणांतील धातूं-पुढील विकरणाचा लुक् होत नसल्यामुळें, त्या धातूंना अलुग्विकरण म्हणतात. सूत्रांत निर्दिष्ट असलेला एखादा धातु लुग्विकरण व तसेंच अलुग्विकरण मानतां येत असल्यास, तो अलुग्विकरण मानावा या अर्थाची वरील परिभाषा असल्यामुळें व 'विभाषा गमहनविदवि-

याम्' या सूत्रात 'विद' धातूच्या पूर्वी लुग्विकरण 'हन्' धातूचा निर्देश असून, 'विद' धातूच्या नंतर अलुग्विकरण 'विश्' धातूचा निर्देश असल्यामुळें या दोन धातूंच्या साहचर्यामुळें 'विद' धातु लुग्विकरण मानावा किंवा अलुग्विकरण मानावा असा प्रश्न उपस्थित झाल्यास, वरील परिभाषा असे सांगते की, 'विद' धातु अलुग्विकरण मानावा. तो जो धातु अशा रीतीनें अलुग्विकरण मानला जातो तो पर साहचर्य बलवत्तर आहे असें मानून मानला जात नसून, वरील परिभाषेच्या आधारें तो अलुग्विकरण मानला जातो व तो तसा मानतेवेळी पर शब्दाच्या साहचर्याचें अवलंबन केलें जातें. आता 'नुदविदोन्दत्रा' या सूत्रात जे धातु निर्दिष्ट आहेत ते सर्व अलुग्विकरण असल्यामुळें, त्या सूत्रास वरील परिभाषा लागू पडत नाहीं आणि पर साहचर्यापेक्षा पूर्व साहचर्य अन्तरङ्ग व बलवत्तर असतें असें वर सांगितलें असल्यामुळें, तुदादि 'नुद्' धातूच्या पूर्व साहचर्यामुळें 'विद' धातु वास्तविक तुदादि मानला पाहिजे. पण तो तुदादि न मानता रुधादि 'उन्द्' धातूच्या पर साहचर्यामुळें रुधादि का मानला आहे असा कोणी प्रश्न केल्यास, त्यावर शब्दरत्नकार असें उत्तर देतात की ) 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे'— परि ५० — ही अन्तरङ्ग परिभाषा अनित्य मानली असल्यामुळें, तिच्या अनित्यत्वाचा आश्रय करून व्याख्यान केल्यानें, 'नुदविदोन्द' या सूत्रात देखील पर साहचर्याचें अवलंबन केलें आहे हें जाणावें ( शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय हा आहे की, अन्तरङ्गपरिभाषा — परि. ५० — ही भाष्यकारानी अनित्य मानली असल्यामुळें, जेथें ती प्रवृत्त केली असतां अनिष्ट रूपें होण्याची आपत्ति येते तेथें ती प्रवृत्त न करिता इष्टसिद्धि केली पाहिजे. सारांश पूर्व साहचर्य अन्तरङ्ग व पर साहचर्य बहिरङ्ग असून देखील, प्रकृत स्थली इष्टसिद्धीकरिता पूर्व साहचर्य बलवत्तर न मानता पर-साहचर्याचें अवलंबन करून त्याच्या आश्रयानें 'विद' धातु रुधादि मानणें योग्य आहे. 'संप्रसारणाच्च' सू ६-१-१०८ या सूत्रावरील

भाष्यांत अन्तरङ्गपरिभाषेसंबंधानें भाष्यकारांनीं 'आद्ये योगे बहूनि प्रयोजनानि सन्ति यदर्थमेषा परिभाषा कर्तव्या । प्रतिविधेयं दोषेषु ।' असें म्हटलें असल्यामुळें त्यावरून हें ध्वनित होतें कीं, ही परिभाषा अनित्य आहे असें परिभाषेन्दुशेखरांत सांगितलें आहे -- पहा परिभाषेन्दुशेखराचें मराठी भाषान्तर पान २३२ ) आणखी असें कीं पूर्वसाहचर्यापेक्षां परसाहचर्य बलवत्तर असतें असें मानलें तर, 'उभे अभ्यस्तम्' सू. ६-१-५ या सूत्रावरील भाष्यांत दिलेल्या रूपानुसार 'प्रत्यैषिषन्' असें जें भाष्यसंमत रूप ठरतें त्या रूपामध्यें देखील 'झि' चे जागीं लङ् लकारांत 'जुस्' आदेश होण्याची आपत्ति येते. ( 'कटी गतौ' धा. नं. ३२० या भ्वादिगणांत निर्दिष्ट असलेल्या धातूंत प्रश्लिष्ट मानलेल्या 'इ' या भ्वादि धातूच्या 'सन्' च्या लङाचें 'प्रत्यैषिषन्' हें प्रथम पुरुषाचें बहुवचनाचें रूप आहे. 'इण्' धातूच्या 'सन्' चें हें रूप नव्हें. 'इण्' धातूहून 'सन्' प्रत्यय केला असतां, त्या धातूचे जागीं 'सनि च' सू. २६१५ या सूत्रानें गमादेश होणें सांगितलें आहे. प्रश्लिष्ट 'इ' या भ्वादि धातूहून 'सन्' प्रत्यय केला असतां, 'अज्झनगमां सनि' सू. २६१४ या सूत्रानें 'इ' धातु दीर्घ होऊन 'ईसन्' अशी स्थिति होते. या स्थलीं 'सार्वधातुकार्धधातुकयोः' सू. २१६८ या सूत्रानें इगन्त अङ्गाला होणारा गुण होत नाहीं; कारण 'इ' हा धातु एकाच् अनुदात्त असल्यामुळें, 'एकाच उपदेशेऽनुदात्तात्' सू. २२४६ या निषेधक सूत्रान्वयें 'सन्' प्रत्ययाला इडागम होत नाहीं व अशा रीतीनें इडागमरहित 'सन्' झलादि राहत असल्यामुळें, 'इको झल्' सू. २६१२ या सूत्रान्वयें तो कित् ठरतो आणि म्हणून 'क्ङिति च' सू. २२१७ या निषेधक सूत्रान्वयें 'ई' या अङ्गाला गुण होत नाहीं. 'प्रति' या उपसर्गपूर्वक 'इ' धातूच्या सन्चें लङाचें प्रथम पुरुषाच्या बहुवचनाचें रूप करितांना 'आडजादीनाम्' सू. २२५४ या सूत्रानें 'इ' या अजादि धातूला 'आट्' आगम होऊन 'प्रति आ ई सन्

सप् झि' अशी स्थिति झाली असता 'सन्यङोः' सू. २३९५ या सूत्रानें 'ईस' या सन्नन्त अजादि धातूच्या 'स' या द्वितीय एकाचाचे 'अजादेर्द्वितीयस्य' सू. २१७६ या सूत्रानें द्वित्व व 'सन्यतः' सू. २३१७ या सूत्रानें अभ्यासातील अकाराचा इकार व 'आटश्च' सू. २६९ या सूत्रानें वृद्धिरूप एकादेश करून नतर 'इको यणचि' या सूत्रानें यणादेश आणि 'अतो गुणे' सू १९१ या सूत्रानें पररूप एकादेश व 'आदेशप्रत्यययो' सू. २१२ या सूत्रानें दोन्ही सकाराचे षत्व केल्यावर, 'प्रत्यैषिप झि' अशी स्थिति होते. 'सिजभ्यस्तविदिभ्यश्च' सू. २२२६ या सूत्रात अभ्यस्त धातूला अदादि 'विद' धातूचे परसाहचर्य असल्यामुळें 'झि' चे जागी लङ् या ङित् लकारात 'जुस्' आदेश होतो असे मानले तर, या वरील उदाहरणात 'झि' चे जागी 'जुस्' आदेश होण्याची व 'प्रत्यैषिषम्' असे रूप न होता 'प्रत्यैषिषुः' असे रूप होण्याची आपत्ति येते. पण 'उभे अभ्यस्तम्' या सूत्रा-वरील भाष्यात तर भाष्यकारानी 'ऐरसंन्, ऐप्सन्' अशी 'ऋध्' व 'आप्' या सन्नन्त अभ्यस्त धातूच्या लङाची रूपें देताना 'झि' चे जागी 'जुस्' आदेश न करिता 'अन्त् = अन्' आदेश केला आहे व तदनुसार वरील उदाहरणात 'झि' चे जागी 'अन्' आदेश करून 'प्रत्यैषिषन् असेच रूप होणे इष्ट आहे सारांश 'सिजभ्यस्त-विदिभ्यश्च' या सूत्रात पूर्वसाहचर्यापेक्षा परसाहचर्य बलवत्तर मानले तर, 'प्रत्यैषिषन्' असे वरील भाष्यात दिलेल्या रूपासारखें इष्ट रूप सिद्ध होऊ शकत नसल्यामुळें, पूर्वसाहचर्यापेक्षा परसाहचर्य बलवत्तर मानता येत नाहीं हे उघड आहे आता 'सिजभ्य-स्तविदिभ्यश्च' या सूत्रात अभ्यस्त मानून 'सिच्' चे पूर्वसाहचर्य असून 'विद्' या अदादि धातूचे परसाहचर्य असल्यामुळें, या ) पूर्वोत्तर साहचर्याच्या सामर्थ्यानें 'सिजभ्यस्तविदिभ्यश्च' या सूत्रां-तील 'अभ्यस्त' या शब्दानें अजाच अभ्यस्त धातूचे ग्रहण करता येतें कीं, त्यापुढील सिचरणाचा भावरूप आदेशानें व्यवहार–नात–

होत नाहीं असें कोणी म्हटल्यास, त्याला उत्तर हें आहे कीं, तसें व्याख्यान देखील अत्यन्त क्लिष्ट आहे. म्हणून तसें व्याख्यान करण्यापेक्षां पञ्चमीसमासपक्ष मानणेंच अधिक श्रेयस्कर आहे. ( कित्येक वैयाकरणांचें असें म्हणणें आहे कीं, पूर्वसाहचर्यापेक्षां परसाहचर्य बलवत्तर न मानलें व 'पूर्वविधौ' हा पञ्चमीसमास न मानला तरी 'प्रत्यैषिषन्' असें रूप सिद्ध करतां येतें. 'सिजभ्यस्तविदिभ्यश्च' सू. २२२६ या सूत्रांत अभ्यस्त धातुला 'सिच्' चें पूर्वसाहचर्य असल्यामुळें व जेथें 'सिच्' हें विकरण विद्यमान आहे, किंवा त्याचा लुक् झाला आहे व त्या सिच्चे जागीं कोणताहि भावरूप आदेश झाला नाहीं, तेथेंच 'झि' चे जागीं 'जुस्' आदेश होत असल्यामुळें हें स्पष्ट होतें कीं, जेथें अभ्यस्त धातूपुढील विकरणाचे जागीं भावरूप आदेश झाला नाहीं तशाच ठिकाणीं त्या अभ्यस्त धातूपुढील 'झि' चे जागीं 'जुस्' आदेश होतो. त्याचप्रमाणें वरील सूत्रांत अभ्यस्त धातूला लुग्विकरण अदादि 'विद्' धातूचें परसाहचर्य असल्यामुळें त्यावरून देखील हेंच सिद्ध होतें कीं, ज्या अभ्यस्त धातूपुढील विकरणाचा जरी लुक् झाला आहे तरी त्या विकरणाचे जागीं जेथें भावरूप आदेश होत नाहीं तशाच अभ्यस्त धातूपुढील 'झि' चे जागीं 'जुस्' आदेश होतो. अशा रीतीनें वर दर्शविलेल्या पूर्वोत्तर साहचर्यांच्या सामर्थ्यानें हाच नियम निष्पन्न होतो कीं, ज्या अभ्यस्त धातूपुढील विकरणाचा भावरूप आदेशानें अपहार झाला नाहीं तशाच अभ्यस्त धातूपुढील 'झि' चे जागीं 'जुस्' आदेश होत असून ज्या अभ्यस्त धातूपुढील विकरणाचा लुक् न होतां एकादेशानें अपहार झाला आहे तशा अभ्यस्त धातूपुढील 'झि' चे जागीं 'जुस्' आदेश न होतां 'अन्' आदेश होतो आणि असा नियम मानल्यानें सर्व इष्ट रूपांची सिद्धि होत असल्यामुळें, परसाहचर्यापेक्षां प्रथमोपस्थित पूर्वसाहचर्य बलवत्तर ठरतें हें मानण्याची कांहीं गरज राहत नाहीं असें त्या वैयाकरणांचें म्हणणें आहे आणि 'अपीपचन्, प्रत्यैषिषन्' इत्यादि उदाहरणांत

विकरणाचा लुक् झाला नसून 'अतो गुणे' सू. १९१ या सूत्रानें होणाऱ्या पररूप–भावरूप–एकादेशाने अपहार झाला असल्यामुळें, त्या उदाहरणात 'झि' चे जागी 'जुस्' आदेश होऊ शकत नाही व वरील नियमान्वयें 'अन्' आदेशच होतो. यावर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, अनेक क्लिष्ट कल्पना केल्याशिवाय 'सिजभ्यस्तविदिभ्यश्च' या सूत्रातून वर दिलेला नियम निघू शकत नसल्यामुळें, तशा अनेक क्लिष्ट कल्पना न करिता, 'पूर्वविधौ' या स्थली पञ्चमीसमासपक्ष मानणे हेच अधिक उचित आहे, कारण तसे मानण्यात कोणतीहि क्लिष्ट कल्पना करण्याची गरज पडत नाही आणि पञ्चमीसमासपक्ष मानला असता अजादेशाचे ठिकाणी 'अचः परस्मिन् पूर्वविधौ' सू. ५० या सूत्रानें स्थानिवद्भाव केल्यानें व अशा रीतीनें अभ्यस्त धातूपुढें 'झि' नसून दोहोंमध्यें 'अ' चे व्यवधान आहे असे मानणे भाग पडत असल्यामुळें, 'अपीपचन्, प्रयैयिपन्' इत्यादि उदाहरणात 'झि'चे जागी 'जुस्' आदेश होण्याची आपत्ति सहज टाळता येते.) 'अपरविधौ तु वक्तव्यम्' या भाष्यवचनान्वयें न्यायान्तर केले, म्हणजे 'अचः परस्मिन् पूर्वविधौ' या सूत्राऐवजी 'अचः परस्मिन्नपरविधौ' असे सूत्र पठित केले तरी, 'अपरविधौ' या स्थली देखील पञ्चमीसमास होतो असे म्हणता येऊ शकते. ('अचः परस्मिन्नपरविधौ' असे सूत्र केले तर, स्थानिभूत अचापुढील वर्णाला कार्य करतेवेळी स्थानिवद्भावाचा निषेध होईल व तसे झाल्यास 'वेभिदिता' इत्यादि रूपांची सिद्धि होऊ शकणार नाही असे कोणी म्हटल्यास, त्यावर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, 'अपरविधौ' या न्यायान्तरामध्यें देखील पञ्चमीसमास मानल्यानें त्या रूपांची सिद्धि करता येते. 'अपरस्मात् विधौ' असा समास केला असता, 'वेभिदिता' इत्यादि स्थलीं स्थानीच्या पूर्वी असणाऱ्या वर्णाला किंवा स्थानीला कार्य करणे नसून 'तृच्' इत्यादि पर वर्णांना कार्य करणे असल्यामुळें, अजादेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव करता येतो व त्यामुळे

इडागमादि कार्यें होऊं शकतात.) 'अपरविधौ' हें पद 'अचः परस्मिन्' १-१-५७ या सूत्रांत घालण्याचें प्रयोजन हें आहे कीं, स्थानीला किंवा आदेशाला कार्य करणें असल्यास देखील अजादेशाचें ठिकाणीं स्थानिवद्भाव व्हावा व हें त्या सूत्रावरील भाष्यावरून अगदीं स्पष्ट होतें. (त्या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार म्हणतात– 'अपरविधाविति तु वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । स्वविधावपि स्थानिवद्भावो यथा स्यात् । कानि पुनः स्वविधौ स्थानिवद्भावस्य प्रयोजनानि ? । आयन्, आसन् । धिन्वन्ति, कृण्वन्ति । दध्यत्र, मध्वत्र । चक्रतुः, चक्रुः ।' या भाष्यांतील 'स्वविधौ' या शब्दांत असणाऱ्या 'स्व' या शब्दाचा उद्योतांत 'स्थानी' व 'आदेश' असा अर्थ केला आहे. उद्योतकार म्हणतात 'भाष्ये स्वशब्देन स्थान्यादेशश्चोच्यते ।') पञ्चमीसमासपक्ष मानल्यानें जेथें इष्ट रूप सिद्ध न होण्याची आपत्ति येत असेल तशा स्थलीं तो पक्ष अनित्य मानून (व त्या पक्षाचा आश्रय न करितां षष्ठीसमासपक्षाचा आश्रय करून) इष्ट रूपांची सिद्धि करावी.

मनोरमा—पूर्वत्रासिद्धे नेति । एतच्च न्यायसिद्धमित्यबोचाम । त्रिपाद्या असिद्धत्वेन तत्रत्ये कार्ये कर्तव्ये "अचः परस्मिन्" इत्यतिदेशस्याप्रवृत्तेः । तस्येति । तस्य 'पूर्वत्रासिद्धे' इत्यस्य तथा च स्थलत्रये स्थानिवद्भावो वक्तव्य इत्यर्थः । संयोगादिलोपे चक्रय्यत्र । लत्वे निगाल्यते । णत्वे माषवपनी । इह "यस्येति च" इति अल्लोपस्य स्थानिवत्त्वेन नकारस्य प्रातिपदिकान्तत्वाभावाद् णत्वं न ।

'रषाभ्यां नो णः' सू. २३५ या सूत्रावरील कौमुदींत 'पूर्वत्रासिद्धे न स्थानिवत्' हें जें वार्तिक पठित केलें आहे तें न्यायसिद्ध आहे हें आम्ही पूर्वी सांगितलेंच आहे. (तें वार्तिक अपूर्व वचन नसून 'पूर्वत्रासिद्धम्' सू. १२ या सूत्रानेंच तें वचन सिद्ध होतें; कारण त्या सूत्रान्वयें सपादसप्ताध्यायीच्या दृष्टीनें) त्रिपादी असिद्ध असल्यामुळें, षैत्वादिक कार्य करतेवेळीं 'अच: परस्मिन्' सू. ५०

हें सापादिक अतिदेशशास्त्र त्रिपादीत प्रवृत्त होऊं शकत नाही (व त्यामुळें त्रैपादिक कार्य करतेवेळी अजादेशाचे ठिकाणी स्थानिवद्भाव मानता येत नाही हे आपोआपच सिद्ध होत असल्यामुळें, वरील वार्तिक गतार्थ होतें, म्हणजे ते मानण्याची काही गरज नाही) 'तस्य दोषः संयोगादिलोपलत्वणत्वेषु' हें जें भाष्यवचन प्रकृत सूत्रावरील कौमुदीत पठित केले आहे त्यातील 'तस्य' या पदाचा 'पूर्वत्रासिद्धे न स्थानिवत् इत्यस्य वार्तिकस्य' असा अर्थ आहे. (संयोगादिलोपकार्य, लत्वकार्य व णत्वकार्य ही तीन त्रैपादिक कार्यें करतेवेळी 'पूर्वत्रासिद्धे न स्थानिवत्' हें वार्तिक प्रवृत्त होत नाही, म्हणजे अजादेशाचे ठिकाणी स्थानिवद्भाव होतो, असा त्या भाष्यवचनाचा अर्थ आहे.) त्यामुळें वरील तीन स्थली स्थानिवद्भाव होतो असे सांगितले पाहिजे असा त्या भाष्यवचनाचा अर्थ होतो. संयोगादिलोपाचे 'चक्र्यत्र' हें उदाहरण आहे ('चक्री अत्र' या स्थली 'इको यणचि' सू. ४७ या सूत्रानें 'चक्री' या पदातील अन्त्य ईकाराचे जागी यकार होऊन 'चक्र्य्' असे संयोगान्त पद होते. पदान्ती असणाऱ्या 'क्र्य' या संयोगात ककार आदि असल्यामुळें, 'स्कोः संयोगाद्योः' सू. ३८० या त्रैपादिक सूत्रानें ककाराचा लोप होण्याची आपत्ति येते, पण यकार हा ईकारच आहे असी स्थानिवद्भावानें बुद्धि केल्याने ते पद संयोगान्त ठरत नसून अजन्त ठरत असल्यामुळें, ककारलोप होण्याची आपत्ति टळते व 'चक्र्यत्र' असा इष्ट प्रयोग सिद्ध होतो म्हणून त्रैपादिक संयोगादिलोपकार्य करतेवेळी अजादेशाचे ठिकाणी स्थानिवद्भाव होतो याचे दीक्षितांनी 'चक्र्यत्र' हे उदाहरण दिले आहे) त्रैपादिक लत्वकार्य करतेवेळी अजादेशाचे ठिकाणी स्थानिवद्भाव होतो याचे 'निगाल्यते' हे उदाहरण आहे. ('नि गॄ णि यक् ते' या स्थली, 'अचो ञ्णिति' सू. २५४ या सूत्रानें 'णि' च्या निमित्तामुळें 'गॄ' यांतील अन्त्य ऋकाराची 'आर्' अशी वृद्धि होऊन व 'अचि विभाषा' सू. २३१३ या सूत्रानें विकल्प होऊन 'निगाल्यते' असे रूप होते.

येथें 'णि = इ' लोपाचे ठिकाणीं 'अचः परस्मिन्' या सूत्रानें स्थानिवद्भाव केल्यानें व 'णि = इ' विद्यमान आहे असें मानल्यानें, 'अचि विभाषा' सू. २५४१ या त्रैपादिक सूत्रानें 'गार्' यांतील रकाराचा लकार होऊन 'निगाल्यते' असें पाक्षिक रूप सिद्ध होतें.) त्रैपादिक णत्वकार्य करतेवेळीं अजादेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव होतो याचें 'माषवपनी' हें उदाहरण आहे. या उदाहरणांत 'यस्येति च' सू. ३११ या सूत्रानें जो अकाराचा लोप होतो त्याचे ठिकाणीं स्थानिवद्भाव केल्यानें प्रातिपदिकाच्या अन्तीं नकार येत नसल्यामुळें, णत्व होत नाहीं. ('वप बीजसन्ताने' या भ्वादिगणांतील 'वप्' धातूहून 'करणाधिकरणयोश्च' सू. ३२९३ या सूत्रानें 'ल्युट् = अन' प्रत्यय केल्यानें 'वपन' असें रूप होतें. 'वपन' या टित्प्रत्ययान्त कृदन्त प्रातिपदिकाहून टिड्ढाणञ्' सू. ४७० या सूत्रानें 'ङीप् = ई' हा स्त्रीप्रत्यय केला असतां 'वपन' हें अङ्ग भसंज्ञक ठरत असल्यामुळें, त्यांतील अन्त्य अकाराचा 'यस्येति च' या सूत्रानें लोप होऊन 'वपनी' असें स्त्रीप्रत्ययान्त रूप होतें. 'माषाणां वपनी माषवपनी' या स्थलीं 'माष' या पूर्व पदांत णत्वाचें निमित्त षकार असल्यामुळें व 'यस्येति च' या सूत्रानें 'वपन' या कृदन्त प्रातिपदिकांतील अन्त्य अकाराचा लोप होऊन 'वपन्' असें नकारान्त प्रातिपदिक होत असल्यामुळें, 'प्रातिपदिकान्तनुम्विभक्तिषु च' सू. १०५५ या त्रैपादिक सूत्रानें त्या अन्त्य नकाराचें णत्व होण्याची आपत्ति येते. पण 'यस्येति च' या सूत्रानें वर सांगितल्याप्रमाणें जो अकारलोप झाला आहे त्याचे ठिकाणीं स्थानिवद्भाव केल्यानें व अकार विद्यमानच आहे असें मानल्यानें 'वपन' असें अदन्त प्रातिपदिक ठरत असल्यामुळें, णत्व होण्याची आपत्ति टळते.)

शब्दरत्न—चक्रचत्रेति । तक्षिरक्षिभ्यां ण्यन्ताभ्यां क्विपि लोपाभावोऽपि फलं । निगाल्यते इति । न चात्र णिलोपात्पूर्वं लत्वम् । सपादसप्ताध्यायीस्थकार्यस्य प्रवृत्तियोग्यतया तदप्रवृत्तेः । न

च स्थानिवत्त्वमल्विधित्वात् । प्रत्ययलक्षणं तु नियमार्थमिति भावः । अत्र बहिरङ्गासिद्धत्वं न, नाजानन्तर्ये इति तन्निषेधात्, त्रिपाद्या तदप्रवृत्तेरेव विसर्जनीयसूत्रस्थभाष्यसम्मतत्वाच्चेत्यन्यत्र प्रपञ्चितम् । एवं प्लायत इत्यप्ययताविलयस्योपसर्गविशेषणत्वे फलम् । माषवप-नीति । इह ङीबुत्पत्तेः प्राक् समासे ङीपि अल्लोपे समासरूपप्रातिपदि कान्तत्वाण्णत्वं प्राप्तम् । पूर्वपदाक्षिप्तसमासरूपप्रातिपदिकान्तस्य तेन णत्वविधानात्तस्यापि पूर्वपरोभयसापेक्षत्वेन, समासत्वज्ञानसापेक्षत्वेन च समानत्वात् त्रिपादीस्थत्वाच्च बहिरङ्गासिद्धत्वाशङ्का नात्रेति बोध्यम् ।

( 'यणः प्रतिषेधो वाच्य ' या वार्तिकाचा जर असा अर्थ केला की, पदान्ती यणन्त संयोग असून तो संयोग सकारानें किंवा ककारानें सुरू होणारा संयोग असल्यास त्याला ' स्कोः संयोगाद्योः ' हे सूत्र लागू पडत नाही तर, ' चक्ष्य ' या पदाच्या अन्ती असणाऱ्या यणन्त 'क्ष्य' या संयोगातील आद्य ककाराचा लोप पावतच नाही व अशा रीतीनें ' चक्ष्यत्र ' हे अन्यथासिद्ध उदाहरण ठरत असल्यामुळें, शब्दरत्नकार संयोगादिलोपाची दुसरी उदाहरणे देतात. ) 'तक्ष्' किंवा ' रक्ष् ' या धातूहून 'णिच्' करून नंतर क्विप् प्रत्यय केल्यास संयोगातील आद्य ककाराचा लोप होत नाही हे देखील ( अजादेशाचे ठिकाणी स्थानिवद्भाव मानण्याचे ) फल आहे ( ' तक्ष् णि क्विप् सु ' या स्थली ' णेरनिटि ' सू. २३१३ या सूत्रानें णिलोप होऊन व 'वेरपृक्तस्य' सू. ३७५ या सूत्रानें 'क्विप् = व्' या अपृक्त प्रत्ययाचा लोप होऊन आणि 'हल्ङ्याब्भ्य.' सू. २५२ या सूत्रानें 'सु'प्रत्ययाचा लोप होऊन, 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' सू. २६२ या सूत्रान्वयें 'तक्ष्' हें प्रत्ययलक्षणानें पदसंज्ञक ठरते. या पदाच्या अन्ती 'क्ष्' हा संयोग आहे. हा संयोग यणन्त नसून ककारानें सुरू होणारा हा संयोग असल्यामुळें, 'स्कोः संयोगाद्यो·' सू ३८० या सूत्रानें त्या ककाराचा लोप होण्याची आपत्ति येते. पण णिलोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव केल्यानें 'क्ष्'

हा संयोग पदान्तीं आहे असें मानतां येत नसल्यामुळें व 'तक्षि' असें अजन्त रूप आहे असें मानावें लागत असल्यामुळें, ककारलोप होण्याची आपत्ति टळते.) 'निगाल्यते' या स्थलीं णिलोप करण्यापूर्वी लत्व करतां येत नाहीं; कारण या उदाहरणांत सापादिक कार्याची प्रथम प्रवृत्ति होणें योग्य असल्यामुळें, त्रैपादिक लत्वकार्य प्रथम करतां येत नाहीं. (वरील उदाहरणांत 'णेरनिटि' या सापादिक सूत्रानें णिलोपकार्याची प्राप्ति होते व 'अचि विभाषा' सू. २५४१ या त्रैपादिक सूत्रानें लत्वकार्याची प्राप्ति होते आणि 'पूर्वत्रासिद्धम्' या सूत्रान्वयें सपादसप्ताध्यायीच्या दृष्टीनें त्रिपादी असिद्ध असल्यामुळें, सापादिक कार्य प्रथम केल्यावरच नंतर त्रैपादिक कार्य करतां येतें. म्हणून णिलोप प्रथम होत असल्यामुळें, लत्व होण्याकरितां णिलोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव मानणें आवश्यक आहे. तसें मानलें असतां, रकारापुढें 'णि = इ' हा अच् आहे असें मानतां येत असल्यामुळें, त्याचें विकल्पेंकरून लत्व होतें. आतां 'तस्य लोपः' या भाष्यवचनान्वयें त्रैपादिक लत्वकार्य करतेवेळीं अजादेशाचे ठिकाणीं जो स्थानिवद्भाव करतां येतो तो 'अचः परस्मिन्' या सूत्रान्वयें कां करावा व 'स्थानिवदादेशः' या सूत्रान्वयें वरील उदाहरणांत कां करूं नये असा कोणी प्रश्न केल्यास, त्यावर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं, 'स्थानिवदादेशः' या सूत्रानें वरील उदाहरणांत स्थानिवद्भाव करतां येत नाहीं.) कारण हा अल्विधि आहे (ज्या 'णि = इ' चा लोप झाला आहे तो अल्रूप स्थानी असल्यामुळें व 'अनल्विधौ' हा प्रतिषेध असल्यामुळें, णिलोपाचे ठिकाणीं 'स्थानिवदादेशः' या सूत्रानें स्थानिवद्भाव करतां येत नाहीं व 'णि' विद्यमान आहे असें मानतां येत नाही. 'अचः परस्मिन्' या अल्विध्यर्थक सूत्रानेंच 'णि' लोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव करतां येतो असें शब्दरत्नकारांचें म्हणणें आहे.) 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' सू. २६२ या सूत्रांत 'प्रत्ययलक्षणम्' हें पद नियमार्थ घातलें आहे. ('निगाल्यते' या स्थलीं जरी सापादिक

सूत्रानें होणारा णिलोप प्रथम होतो तरी 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' या सूत्रान्वयें 'णि' विद्यमानच आहे असे मानून नंतर वैपादिक सूत्रानें होणारे ह्रस्व करतां येतें असे कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाही, कारण 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' १-१-६२ हें सूत्र अशाच ठिकाणी प्रवृत्त करता येत की, जेथें प्रत्ययाच्या असाधारण रूपाच्या निमित्तामुळें पावलेले कार्य करणे आहे त्या सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात – 'न तर्हीदानीमयं योगो वक्तव्यः । वक्तव्यश्च । किं प्रयोजनम् ? । प्रत्ययं गृहीत्वा यदुच्यते तत्प्रत्ययलक्षणेन यथा स्यात् । शब्दं गृहीत्वा यदुच्यते तत्प्रत्ययलक्षणेन मा भूदिति ।' या भाष्याचा अर्थ असा आहे की, 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' हें सूत्र मग करावयास नको काय ? तें सूत्र केलेच पाहिजे व ते अशाकरितां की, प्रत्ययाच्या निमित्तानें जें कार्य होणे सांगितले आहे तें कार्य प्रत्ययाचा लोप झाला असतां प्रत्ययलक्षणानें व्हावें व एखाद्या शब्दाच्या निमित्तामुळें जें कार्य होणे सांगितले आहे तें कार्य प्रत्ययाचा लोप झाला असतां प्रत्ययलक्षणानें होऊं नये. 'निगाल्यते' या उदाहरणात 'णि' या विशिष्ट प्रत्ययाच्या निमित्तामुळें होणारे लत्वकार्य नसून, 'अचि विभाषा' सू. २५४१ या सूत्रानें केवळ 'अच्' च्या निमित्तामुळें होणारं तें कार्य आहे. सारांश 'अचि विभाषा' या लत्वविधायक सूत्रात कोणत्याहि विशिष्ट प्रत्ययाचे निमित्तरूपानें ग्रहण केलें नसून त्या सूत्रात 'अचि' या शब्दाचे निमित्तरूपानें ग्रहण केलें असल्यामुळें, 'निगाल्यते' या स्थली णिलोप झाला असतां, लत्व कार्य करतेवेळी, 'णि' विद्यमान आहे असे प्रत्ययलक्षणानें मानतां येत नाही म्हणून 'अच परस्मिन्' या स्थानिवद्भावसूत्रान्वयेंच, 'तस्य दोष' हें भाष्यवचन असल्यामुळें. येथें णिलोपाने ठिकाणी वैपादिक लत्वकार्य करतेवेळीं स्थानिवद्भाव करतां येऊं शकतो ) येथें णिलोप असिद्ध आहे तरी, 'नानार्थ-प्रतिषेधप्रसक्तिः'—परि. ५१—ही निर्देश परिभाषा असल्यामुळें.

णिलोप असिद्ध ठरत नाहीं. दुसरें असें कीं, 'स्वरवसानयोर्विसर्जनीयः' सू. ८-३-१५ या सूत्रावरील भाष्यान्वयें 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे'-परि. ५०-ही बहिरङ्गपरिभाषा त्रिपादींत प्रवृत्त होत नाहीं हें इतर स्थलीं सांगितलें आहे. ('नि गृ णि यक् ते' या स्थलीं 'यक्' या पुढील निमित्तामुळें णिलोप होत असून 'णि' या पूर्व निमित्तामुळें लत्वाची प्राप्ति होत असल्यामुळें, 'पूर्वोपस्थितनिमित्तकमन्तरङ्गं परोपस्थितनिमित्तकं बहिरङ्गम्' या न्यायान्वयें, लत्वकार्य अन्तरङ्ग ठरतें व त्याच्या मानानें णिलोपकार्य बहिरङ्ग ठरतें आणि 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' या परिभाषान्वयें तें णिलोपकार्य लत्वकार्याच्या दृष्टीनें असिद्ध ठरतें. म्हणून अन्तरङ्ग लत्वकार्य करतेवेळीं णिलोप झालाच नाहीं असें मानल्यानें लत्वकार्य होऊं शकतें असें शंकाकाराचें म्हणणें आहे. या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं, 'णि = इ' या लगेंच पुढें असलेल्या अचाच्या निमित्तामुळें 'निगार्' यांतील रकाराचें लत्व करणें असल्यामुळें, णिलोप बहिरङ्ग असून देखील 'नाजानन्तर्ये' या परिभाषान्वयें तो बहिरङ्ग व असिद्ध ठरत नाहीं व त्यामुळें तो झालाच नाहीं असें मानता येत नाहीं. म्हणून येथें लत्व होण्याकरितां णिलोपाचे ठिकाणीं 'अचः परस्मिन्' या सूत्रान्वयें स्थानिवद्भाव मानणें आवश्यक आहे. दुसरें असें कीं, त्रैपादिक कार्य करतेवेळीं बहिरङ्ग परिभाषा प. ५० त्रिपादींत प्रवृत्त होत नाहीं हें पूर्वी सन्धिप्रकरणांत सांगितलेंच आहे. त्यामुळें देखील त्रैपादिक अन्तरङ्ग लत्वकार्य करतेवेळीं सापादिक णिलोप बहिरङ्ग असून देखील असिद्ध ठरत नाहीं आणि म्हणून णिलोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव मानणें आवश्यक आहे.) 'उपसर्गस्यायतौ' सू. २३२६ या सूत्रांत ('अयतिपरकस्य उपसर्गस्य यो रेफः तस्य लत्वं स्यात्' अशा रीतीनें) 'अयतौ' हें उपसर्गाचें विशेषण होत असल्यामुळें, लत्वकार्य करतेवेळीं अजादेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव होतो याचें 'प्लायते' हें देखील उदाहरण देतां येतें. ('अय गतौ' हा धातु भ्वादिगणांत

आत्मनेपदी पठित आहे. 'प्र अय् शप् ते = प्र अय् अ ते = प्र अयते' या स्थली 'धातूपसर्गयोः कार्यमन्तरङ्गम्' या न्यायान्वयें धातु व उपसर्ग यांचे अन्तरङ्ग सन्धिकार्य प्रथम केल्यावर 'प्रायते' असे रूप होतें. येथें 'अकः सवर्णे दीर्घः' सू. ८५ या सूत्रानें सवर्ण-दीर्घरूप एकादेश झाला असल्यामुळें, 'प्र' असा उपसर्गहि दिसत नाही व त्यापुढें लत्वाचे निमित्त असा जो 'अय्' धातु तो देखील भिन्न–पृथक्–रूपानें दिसत नाही आणि त्यामुळे 'प्र' या उप-सर्गातील रकाराचे लत्व व्हावें कसें? 'आ' या एकादेशाला परादि-वद्भावानें 'अय्' धातूचा आदि मानल्यास 'प्र' असा उपसर्ग राहत नसून त्याचे 'प्र्' असें विकृत रूप होतें व या उपसर्गातील दोन मात्रांपैकी एक मात्रा नाहीशी होत असल्यामुळें, अर्धविकृत 'प्र्' याला 'एकदेशविकृतमनन्यवत्'–परि. ३७–या परिभाषा-न्वयें तो 'प्र' उपसर्ग आहे असे मानता येत नाही. दुसरें असे की, भैरवीत सांगितल्याप्रमाणे उपसर्गत्व हा धर्म 'अवतपरिमाणनिष्ठ' आहे, म्हणजे प्रादिगणात ज्या रूपानें प्रतिशब्द पठित आहेत त्यानाच उपसर्गसंज्ञा होऊ शकते व त्याच्या एकादेशविकृतस्वरूपाला उपसर्गसंज्ञा होऊ शकत नाही. त्यामुळें देखील 'प्र्' याला उपसर्ग मानता येत नाही आता 'आ' या एकादेशाला पूर्वान्तवद्भावानें 'प्र' या उपसर्गाचा अन्त मानल्यास, 'प्र' या उपसर्गापुढें लत्वाचे निमित्त जो 'अय्' धातु तो राहत नसून 'प्र' पुढें केवळ 'य्' राहतो व 'य्' हा धातु नव्हे. तो 'य्' 'अय्' धातूच आहे असे एकदेशविकृतन्यायान्वयें मानता येत नाही, कारण अर्ध्यापेक्षा अधिक भाग एकदेशानें नाहीसा झाला आहे. 'उभयत आश्रयणे नान्तादिवत्' या भाष्यवचनान्वयें एकादेशाला 'प्र' या उपसर्गाचा अन्त व 'अय्' या धातूचा आदि मानता येत नाही. म्हणून येथें लत्व होण्याकरिता 'आ' या एकादेशाचे ठिकाणीं तो 'अ अ' च आहे असा 'स्थानिवदादेशः' सू. ४९ या सूत्रान्वयें, स्थानिवद्भावानें बुद्धि करणे आवश्यक आहे.

तशी वृद्धि केल्यानें, 'प्र' हा उपसर्ग विद्यमान आहे व त्याच्या लगेंच पुढें लत्वाचें निमित्त 'अय्' धातु हा देखील विद्यमान आहे असें मानतां येतें व त्यामुळें लत्व होऊन 'प्लायते' असें रूप सिद्ध होतें.) 'माषवपनी' या स्थळीं 'ङीप्' प्रत्यय होण्यापूर्वी समास होतो व 'ङीप्' प्रत्यय केल्यावर अकाराचा लोप झाला असतां, 'माषवपन्' असें जें समासरूप प्रातिपदिक होतें त्याच्या अन्त्य नकाराला णत्वाची प्राप्ति होते. या स्थळीं पूर्व पदाचा आक्षेप –अनुवृत्ति– होत असल्यामुळें हें सिद्ध होतें कीं, ('प्रातिपदिकान्त' सू. १०५५ या सूत्रानें) समासरूप प्रातिपदिकाच्या अन्तीं असणाऱ्या नकाराचें णत्व होण्याचें विधान केलें आहे व अशा रीतीनें तें णत्व-कार्य देखील पूर्वपद व उत्तरपद या दोहोंच्याहि अपेक्षेनें होणारें कार्य असल्यामुळें व तें णत्वकार्य होण्याकरितां ज्या नकाराचें णत्व करणें आहे तो नकार सामासिक शब्दाचा अन्त्य वर्ण आहे या ज्ञानाची देखील अपेक्षा असल्यामुळें, णत्वकार्य व अकारलोप हे दोन्ही सारखेच ठरतात, म्हणजे एक अन्तरङ्ग असून दुसरें बहिरङ्ग आहे असें मानतां येत नाहीं. दुसरें असें कीं, त्रैपादिक णत्वकार्य करतेवेळीं सापादिक बहिरङ्गपरिभाषा–परि. ५०–त्रिपादींत उपस्थित होत नसल्यामुळें, अकारलोप असिद्ध आहे अशी शंकाच उद्भवूं शकत नाहीं हें जाणावें. ('गति-कारकोपपदानां कृद्भिः सह समासवचनं प्राक् सुबुत्पत्तेः'–परि. ७६–या परिभाषेंतील 'सुबुत्पत्तेः' हें पद उपलक्षणात्मक असून त्या पदानें 'स्त्रीप्रत्ययोत्पत्तेः' याचें देखील ग्रहण होतें–पहा परिभाषेन्दु-शेखराचें मराठी भाषान्तर पान १६६. त्यामुळें 'करपोल्युट्' प्रत्ययान्त 'यपन' या कृदन्ताहून सुबुत्पत्ति होण्यापूर्वी जसा समास होतो तसाच वरील परिभाषेन्वयें तो समास स्त्रीप्रत्यय होण्यापूर्वीच होतो. म्हणून 'वपन' पदाहून 'ङीप्' प्रत्यय होण्यापूर्वीच त्याचा 'माष' शब्दाशी समास झाला असतां, समासांतील पूर्वपदांत असणाऱ्या निमित्तामुळें होणारें णत्वकार्य असून पदीकडे असणाऱ्या

'ङीप्' प्रत्ययाच्या निमित्तामुळें अकारलोप पावत असल्यामुळें, अकारलोप, णत्वकार्याच्या मानानें, बहिरङ्ग ठरतो व 'असिद्ध बहिरङ्गमन्तरङ्गे' या परिभाषान्वयें तो बहिरङ्ग अकारलोप असिद्ध ठरत असल्यामुळें, म्हणजे झालाच नाही असे मानता येत असल्यामुळें, 'वपन' हे प्रातिपदिक नकारान्त न ठरता अदन्त ठरते व त्यामुळें 'माषवपनी' या स्थली 'प्रातिपदिकान्तनुम्विभक्तिषु च' सू. १०५५ या सूत्रानें होणाऱ्या णत्वाची प्राप्तीच होत नाही असे शंकाकाराचे म्हणणे आहे. या शंकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, 'प्रातिपदिकान्तनुम्विभक्तिषु च' या सूत्रात 'पूर्वपदात्संज्ञायामगः' या पूर्व सूत्रातून 'पूर्वपदात्' हे पद अनुवृत्त होत असल्यामुळें त्या अनुवृत्त पदाच्या सामर्थ्यानें हें स्पष्ट होते की, ज्यात पूर्व पद व उत्तर पद आहे अशा समासरूप प्रातिपदिकाच्या अन्ती असणाऱ्या नकाराचे त्या सूत्रानें णत्व होते. म्हणून ज्याअर्थी दोन पदाशिवाय समास होऊ शकत नाही व समासातील पूर्व पदात णत्वाचे निमित्त असणे व उत्तर पदाच्या अन्ती कार्यी नकार असणे अशा प्रकारचे पदद्वयापेक्ष णत्व-कार्य आहे त्याअर्थी अकारलोप बहिरङ्ग ठरतो व णत्वकार्य अन्त-रङ्ग ठरते असे मुळीच म्हणता येत नाही व अशा रीतीनें दोन्ही कार्ये सारख्याच दर्जाची ठरत असल्यामुळें, अकारलोपाच्या मानानें णत्वकार्य अन्तरङ्ग आहे असे मानता येत नाही व अकारलोप णत्वकार्याच्या मानानें बहिरङ्ग ठरत नाही त्यामुळें णत्वकार्य करतेवेळी अकारलोप असिद्ध ठरत नाही व तो झाला आहे असेच मानले पाहिजे. त्यामुळें 'माषवपनी' या स्थलीं णत्व टाळण्या-करिता अकारलोपाचे ठिकाणी 'अचः परस्मिन्' या सूत्रान्वयें स्थानिवद्भाव मानणे आवश्यक आहे दुसरें असे की, 'वाह ऊठ्' या षाष्ठिक सूत्रातील 'ऊठ्' ग्रहण 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' या बहिरङ्गपरिभाषेचे भाष्यकारांनी ज्ञापक मानले असल्यामुळें, ती परिभाषा षाष्ठिक ठरते आणि त्रिपादी दृष्टीनें त्रिपादी असिद्ध

असल्यामुळें ती, त्रैपादिक णत्वकार्य करतेवेळीं, त्रिपादींत प्रवृत्त होऊं शकत नाहीं. त्यामुळें सापादिक अकारलोप बहिरङ्ग मानला तरी, त्रैपादिक णत्वकार्य करतेवेळीं तो अकारलोप असिद्ध ठरत नाही आणि म्हणून देखील णत्व टाळण्याकरितां अकारलोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव मानणें आवश्यक आहे. तसें मानलें असतां, 'माषवपन्' असें नकारान्त प्रातिपदिक न ठरतां 'माषवपन' असें अकारान्त प्रातिपदिक ठरत असल्यामुळें, 'प्रातिपदिकान्तनुम्विभक्तिषु च' या सूत्रानें होणारें णत्व होण्याची आपत्ति टळते.)

मनोरमा—यत्त्वाहुः कथं चित्स्थानिवत्त्वाभावेऽपि यूष्ण इत्यादौ "रषाभ्याम्" इत्यस्य नोपयोगः, ष्टुत्वेन सिद्धेः। तथा च षग्रहणमुत्तरार्थमिति आकरे स्थितम्। ततश्च रभसवादेनैतदुपन्यस्तमिति स एवायं रभसवादः। तथा हि उत्तरार्थतयाऽपीह षग्रहणं स्थितम्। ततश्च यूष्णः पुष्णातीत्यादौ "रषाभ्याम्" इति णत्वस्य प्रवृत्तिः केन वार्यताम्। ष्टुत्वेनेति चेन्न। तस्यासिद्धत्वात्। न च वचनप्रामाण्यात् सिद्धत्वम्। पुष्टिरित्यादौ चरितार्थत्वात् तस्य षयोगे ण इत्यंशोऽचरितार्थ इति चेन्न। तस्य पृथगनुक्तेः। इह पात्परस्येत्युक्तिरचितार्थेत्यस्यापि तुल्यत्वाच्च। आकरे हि इह षग्रहणं विना लक्ष्यासिद्धिर्नास्ति इत्येवाभिप्रेतं न तु पुष्णातीत्यादौ "रषाभ्याम्" इत्यस्याप्रवृत्तिरिति दिक्।

प्रकाशकारांचें असें म्हणणें आहे कीं, 'यूष्णः' इत्यादि स्थलीं कोणत्या तरी रीतीनें स्थानिवद्भाव न केला तरी, 'रषाभ्यां नो णः' सू. २३५ हें प्रकृत सूत्र प्रवृत्त करण्याची कांहीं गरज नाहीं; कारण 'ष्टुना ष्टुः' सू. ११३ या सूत्रानें ष्टुत्व केल्यानें त्या उदाहरणांत णत्वाची सिद्धि होऊं शकते, आणि म्हणूनच भाष्यकारांनीं असें म्हटलें आहे कीं, 'रषाभ्यां नो णः' या सूत्रांत षकाराचें जें ग्रहण केलें आहे तें त्या षकाराची उत्तर सूत्रांत अनुवृत्ति व्हावी याकरितां केलें आहे. म्हणून 'रषाभ्यां नो णः' या सूत्राचा, 'यूष्णः' या

स्थली णत्वाची सिद्धि होण्याकरिता प्रक्रियाकौमुदीकारानी, जो उपन्यास केला आहे तो योग्य विचार न करिता केला आहे. पण प्रक्रियाकौमुदीकारानी त्या सूत्राचा जो उपन्यास केला आहे तो योग्य विचार न करिता केला नसून, त्या उदाहरणासवधानें प्रकाश-कारानी जें म्हटले आहे तेच वास्तविक योग्य विचार न करिता म्हटले आहे. (प्रकाशकाराचे असे म्हणणे आहे की, 'यूष्ण:' या उदाहरणात 'अल्लोपोऽन:' सू. २३४ या सूत्रानें ज्या अकाराचा लोप झाला आहे त्याचे ठिकाणी, पञ्चमीसमासपक्ष अनित्य मानून त्याची प्रवृत्ति न करिता स्थानिवद्भाव न केल्यास, षकार व तवर्गीतील नकार या दोहोमध्यें कोणत्याहि वर्णाचे व्यवधान होत नसून त्या दोन वर्णांचा संयोग होत असल्यामुळें, 'ष्टुना ष्टुः' सू. ११३ या सूत्रानें त्या नकाराचे णत्व करता येते व प्रकृत सूत्रातील षकाराचे ग्रहण भाष्यकारादिकानीं उत्तरार्थ मानले असल्यामुळें व अशा रीतीनें तें षकारग्रहण प्रकृत सूत्रात नाहीच असे मानता येत असल्यामुळें, प्रकृत सूत्रानें 'यूष्ण.' या स्थली णत्व करता येत नाही. पञ्चमीसमासपक्ष अनित्य आहे तरी त्याची प्रकृत उदाहरणांत प्रवृत्ति केल्यास, त्या पक्षात अकारलोपाचे ठिकाणी स्थानिवद्भाव करता येतो व अशा रीतीनें षकार व नकार या दोहोमध्यें अकाराचे व्यवधान आहे असे मानावे लागत असल्यामुळें, प्रकृत सूत्राची प्रवृत्ति होऊच शकत नाही व 'अट्कुप्वाङ्नुम्व्यवायेऽपि' सू. १९७ या सूत्रानेंच 'यूष्ण.' या स्थली णत्व करता येते. सारांश स्थानिवद्भाव मानला किंवा न मानला तरी, 'यूष्ण.' या स्थली प्रकृत सूत्रानें णत्व करता येत नसल्यामुळें, प्रकृत सूत्राचे 'यूष्ण.' हें जें प्रक्रियाकौमुदीकारानीं उदाहरण दिले आहे ते चूक ठरते असें प्रकाशकाराच्या म्हणण्याचे तात्पर्य आहे. यावर दीक्षित असें म्हणतात की, प्रक्रियाकौमुदीकारानी 'यूष्ण ' हें जें प्रकृत सूत्राचे उदाहरण दिले आहे ते चूक किंवा अयोग्य नसून, त्या उदाहरणासवधानें प्रकाशकारानीं जें म्हटले आहे तेंच वास्तविक चूक आहे. तें कसे चूक आहे हें दीक्षित

पुढील पंक्तींत सांगतात.) ' रषाभ्यां नो णः ' या प्रकृत सूत्रांत केलेलें षकारग्रहण उत्तर सूत्रांत अनुवृत्ति होण्याकरितां केलेलें असलें तरी, तें षकारग्रहण प्रकृत सूत्रांत विद्यमान असल्यामुळें, ' पूष्णः, पुष्णाति ' इत्यादि स्थलीं णत्वाची सिद्धि करण्याकरितां प्रकृत सूत्राची प्रवृत्ति कशी बंद करतां येऊं शकणार? ' ष्टुना ष्टुः ' या सूत्रानें त्या दोन्ही उदाहरणांत नकाराचें णत्व करतां येतें हें म्हणणें बरोबर नाहीं; कारण (' रषाभ्यां नो णः ' या त्रैपादिक पूर्व सूत्राच्या दृष्टीनें, ' पूर्वत्रासिद्धम् ' सू. १२ या वचनान्वयें) ' ष्टुना ष्टुः ' हें त्रैपादिक उत्तर सूत्र असिद्ध ठरतें. (सारांश जेथें त्रैपादिक पूर्व सूत्रानें इष्ट कार्य करतां येतें तेथें तें कार्य करण्याकरितां त्या पूर्व सूत्राच्या दृष्टीनें असिद्ध असलेल्या उत्तर सूत्राची प्रवृत्ति करणें अयोग्य आहे.) ' ष्टुना ष्टुः ' हें सूत्र मुद्दाम केलें असल्यामुळें तें सूत्र त्या वचनाच्या प्रामाण्यामुळें, ' रषाभ्यां नो णः ' या पूर्व सूत्राच्या दृष्टीनें (षकारापुढील नकाराचें णत्व करण्याच्या विषयांत) सिद्ध मानलें पाहिजे (तसें न मानल्यास, त्या विषयापुरतें तें सूत्र अचरितार्थ ठरण्याची आपत्ति येईल) असें म्हणणें असल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण तें सूत्र ' पुष्टिः ' इत्यादि स्थलीं चरितार्थ ठरतें. (सारांश तें सूत्र षकाराच्या विषयांत अनवकाश ठरत नसून, षकाराचा सकारशीं व, तवर्गातील पुढें येणारा नकार सोडून, इतर वर्णांशीं संयोग झाला असतां त्यांचें ष्टुत्व करून तें सूत्र ' पुष् ' धातूहून ' स्त्रियां क्तिन् ' सू. ३२७२ या सूत्रानें ' क्तिन् = ति ' प्रत्यय केला असतां, तकाराचें ष्टुत्व होऊन ' पुष्टिः ' इत्यादि उदाहरणांत चरितार्थ ठरत असल्यामुळें, ' येन नाप्राप्ते '–परि. ५८–या न्यायान्वयें तें सूत्र णत्वनिमित्त णत्वाच्या विषयांत प्रकृत सूत्राचें बाधक ठरूं शकत नाहीं व तें त्रैपादिक उत्तर सूत्र प्रकृत त्रैपादिक पूर्व सूत्राच्या दृष्टीनें मुळींच सिद्ध ठरूं शकत नाहीं.) नकाराचा षकाराशीं संयोग झाल्यास त्या नकाराचें णत्व होणें या कार्यापुरतें ' ष्टुना ष्टुः ' हें सूत्र अचरितार्थ ठरतें (आणि म्हणून तसें णत्व करतेवेळीं

ते सूत्र अनवकाश ठरत असल्यामुळें, 'रषाभ्यां नो णः' या सूत्राचे तेवढ्यापुरते ते बाधक ठरते) असे म्हणणे असल्यास, ते म्हणणे देखील बरोबर नाही; कारण त्या सूत्रात (षकारापुढें नकार आल्यास त्याचे णत्व करावे असे) पृथक् विशेष विधान केले नाही. (षकारापुढें नकार आला असता त्या नकाराचे 'ष्टुना ष्टुः' या सूत्रानें णत्व न केल्यास तेवढ्यापुरते ते सूत्र अचरितार्थ व व्यर्थ ठरते असे त्या सूत्रासंबंधानें जसे प्रकाशकारातर्फे म्हणण्यात येते त्याचप्रमाणे) प्रकृत सूत्रात 'पात्परस्य नस्य णत्व स्यात्' असें जें विधान केले आहे ते देखील (तशा स्थली 'ष्टुना ष्टुः' या सूत्रानें णत्व केल्यास) तेवढ्यापुरते सारखेंच व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते. (साराश ष्टुत्वाचे विधान करणारे 'ष्टुना ष्टुः' हे सामान्य सूत्र असून, षकारापुढें नकार आला असता त्याचें णत्व व्हावे हे विधान करणारे प्रकृत सूत्र विशेष सूत्र आहे म्हणून षकारापुढील नकाराचे णत्व करतेवेळी तें सामान्य सूत्र प्रवृत्त न करिता तशा स्थली णत्वाचे विशेष विधान करणारे प्रकृत सूत्रच प्रवृत्त करणें योग्य आहे असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे.) भाष्यकारांनी भाष्यात जें म्हटले आहे (व ज्याचा प्रकाशकारांनी उल्लेख केला आहे) त्या म्हणण्याचा आशय एवढाच आहे की, 'रषाभ्यां नो णः' या प्रकृत सूत्रात षकाराचे ग्रहण केले नसते तरी, कोणत्याहि उदाहरणात षकारापुढें येणाऱ्या नकाराचे 'ष्टुना ष्टुः' या सूत्रानें णत्व करून इष्ट रुपाची सिद्धि करतां आली असती भाष्यकारांच्या म्हणण्याचा असा मुळींच आशय नाही की, 'पुष्णाति' इत्यादि रुपांशी णत्व करण्याकरिता 'रषाभ्यां नो णः' या सूत्राची प्रवृत्ति करणें योग्य नाहीं ('पुष्ण, पुष्णाति' इत्यादि उदाहरणांत षकारापुढें आलेल्या नकाराचे 'ष्टुना ष्टुः' या सूत्रानेंच णत्व करता येते व 'रषाभ्यां नो णः' या सूत्रानें तेथें णत्व करतां येत नाहीं असे जर भाष्यकारांनी म्हटले असते तर प्रकाशकाराचे म्हणणे योग्य ठरले असते. पण भाष्यकारांनी तसे म्हटलें नसून, वरील उदाहरणांत

'ष्टुना ष्टुः' या सूत्रानें देखील णत्व करतां येऊं शकलें असतें एवढेंच म्हटलें असल्यामुळें, प्रकाशकारांचें म्हणणें योग्य ठरत नाहीं व प्रक्रियाकौमुदीकारांनीं प्रकृत सूत्राचें 'पूष्णः' हें जें उदाहरण दिलें आहे तें चूक ठरत नसून अगदीं योग्य उदाहरण ठरतें असें दीक्षितांचें म्हणणें आहे. )

शब्दरत्नः– अप्रवृत्तिरिति । अभिप्रेतेति शेषः ।

'रषाभ्याम् इत्यस्याप्रवृत्तिरिति दिक्' या मनोरमेच्या पंक्तींतील 'अप्रवृत्तिः' या पदापुढें 'अभिप्रेता' हें पद अध्याहृत आहे. ( याचें विवरण वर मनोरमेंत केलेंच आहे. )

मनोरमाः– " न लोपः प्रातिपदिकान्तस्य " । लुप्तषष्ठीके इति । सौत्रत्वान्न तु । षष्ठीतत्पुरुषयोः पूर्वपदे, सापेक्षत्वेन समासासम्भवात् । प्रातिपदिकस्य पदविशेषणत्वाच्चेति भावः । तदन्तस्येति । षष्ठीतत्पुरुषः । तस्यान्तो यो नकारस्तस्येत्यर्थः । उक्तं च हरदत्तेन– विशेष्यमन्तस्येत्यस्य नेत्येतदविभक्तिकम् । तथैव प्रातिपदिकेत्येतत्पदविशेषणमिति । यत्तु प्राचोक्तम्–प्रातिपादिकान्तस्य पदान्तस्य नस्येति । यच्च व्याख्यातम् । अन्तस्येत्युभाभ्यां संबध्यते इति । तद्गौरवग्रस्तम् । अन्तस्येत्यस्यावृत्तिप्रसङ्गात् । व्यधिकरणषष्ठीद्वयापत्तेश्च, यदि तु अभेदेनैव संबन्धेन प्रातिपदिकेनैव नेत्यनेनापि पदं विशेष्यते तदा विशेषणेन तदन्तविधौ सौत्रमन्तग्रहणं शक्यमकर्तुम् ।

'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' सू. २३६ या सूत्रांतील 'न' व 'प्रातिपदिक' हीं लुप्तषष्ठीक पदें आहेत असें जें या सूत्रावरील कौमुदींत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, सौत्र प्रयोगामुळें त्या दोन्ही पदांपुढील षष्ठीविभक्तीच्या प्रत्ययाचा ('छन्दोवत्सूत्राणि भवन्ति' या भाष्यवचनान्वयें 'सुपां सुलुक्' सू. ३५६१ या सूत्रानें ) सौत्र–आर्ष–लुक् झाला आहे. 'न' व 'प्रातिपदिक' हीं षष्ठीतत्पुरुषसमासाचीं पूर्व पदें नव्हत. तीं दोन्ही पदें सापेक्ष असल्यामुळें, त्यांचा

इतर पदाशी समास होणे असंभवनीय आहे आणि 'प्रातिपदिक' हे पद 'पदस्य' या पदाचे विशेषण आहे. (प्रकृत सूत्रातील 'न = नस्य' हे स्थानषष्ठ्यन्त पृथक् पद असून त्यापुढील षष्ठी-विभक्तीच्या प्रत्ययाचा वर सांगितल्याप्रमाणे सौत्र लुक् झाला आहे. हे पद 'लोपः' या सूत्रनिर्दिष्ट पुढील पदाशी अन्वित होत असून 'नकारस्य लोपः स्यात्' असा 'न, लोपः' या दोन पृथक् पदांचा अर्थ होतो. 'नलोपः' हे षष्ठीतत्पुरुषाचे सामासिक पद आहे असे मानता येऊ शकत नाही, कारण प्रकृत सूत्रातील 'अन्तस्य' हे अखेरचे पद 'न' या पदाचे विशेषण आहे व 'अन्तस्य नस्य लोपः स्यात्' असा 'न लोपः अन्तस्य' या तीन पृथक् पदांचा मिळून अर्थ होतो. सारांश 'न' हे पद विशेषणसापेक्ष असल्यामुळें व 'समर्थः पदविधिः' सू. ६४७ हे सूत्र असल्यामुळें व 'सापेक्षमसमर्थवत्' आणि 'सविशेषणानां वृत्तिर्न' असा भाष्य-सिद्धान्त असल्यामुळें, त्या पदाचा 'लोपः' या पदाशी, सामर्थ्याच्या अभावामुळें, समास होऊ शकत नाही, कारण 'नस्य लोपः नलोपः' असा षष्ठीसमास करून 'अन्तस्य नलोपः' असा प्रयोग केल्यास, त्याचा 'अन्तस्य नस्य लोपः स्यात्' असा अर्थ होऊं शकत नाही, म्हणजे त्या अर्थामध्यें तसा प्रयोग होऊ शकत नाही म्हणून इष्ट अन्वय व इष्ट अर्थ होण्याकरिता 'न' हे लुप्तषष्ठीक पृथक् पद मानणे आवश्यक आहे. त्याचप्रमाणे प्रकृत सूत्रातील 'प्रातिपदिकान्तस्य' हे सामासिक पद न मानतां, 'प्रातिपदिक' हे देखील लुप्तषष्ठीक पृथक् पद मानणे आवश्यक आहे. प्रकृत सूत्र पदाधिकारात पठित असल्यामुळें, या सूत्रांत 'पदस्य' सू. ८–१–१६ हे अधिकारसूत्र अनुवृत्त होत व या अनुवृत्त होणाऱ्या 'पदस्य' या अवयवषष्ठीचे 'प्रातिपदिक' हे लुप्तषष्ठीक पद विशेषण होत असून, 'प्रातिपदिकसंज्ञकस्य पदस्य अन्त्यावयवो यो नकारः, तस्य लोपः स्यात्' असा प्रकृत सूत्राचा अर्थ होतो. सारांश 'प्रातिपदिक' हे पद विशेष्यसापेक्ष असल्यामुळें, त्याचा 'अन्तस्य' या सूत्रनिर्दिष्ट

अन्त्य पदाशीं सामर्थ्याभावामुळें समास होऊं शकत नाहीं; कारण 'प्रातिपदिकान्तस्य पदस्य न लोपः' असा प्रयोग वरील इष्ट अर्थामध्यें होऊं शकत नाहीं, म्हणजे तसा इष्ट अर्थ तशा प्रयोगांतून निष्पन्न होऊं शकत नाहीं.) प्रकृत सूत्राचें व्याख्यान करितांना कौमुदींत 'तदन्तस्य' हें जें पद घातलें आहे तें षष्ठीतत्पुरुषाचें सामासिक पद होय व, 'तस्य पदस्य अन्तः अन्तावयवो यो नकारः तस्य' असा त्या पदाचा अर्थ आहे. हरदत्तानें देखील प्रकृत सूत्रावरील पदमञ्जरींत असेंच म्हटलें आहे कीं, 'न' हें अविभक्तिक पद, म्हणजे लुप्तषष्ठीक पद, 'अन्तस्य' याचें विशेष्य आहे आणि त्याचप्रमाणें 'प्रातिपदिक' हें अविभक्तिक पद 'पदस्य' याचें विशेषण आहे. प्रक्रियाकौमुदीकारांनीं 'प्रातिपदिकान्तस्य पदान्तस्य नस्य लोपः स्यात्' असें जें प्रकृत सूत्राचें व्याख्यान केलें आहे व त्या पंक्तीचें विवरण करितांना प्रसादकारांनीं 'अन्तस्येति उभाभ्यां सम्बध्यते', म्हणजे 'अन्तस्य' हें पद 'प्रातिपदिकस्य' व 'पदस्य' या दोन्ही पदांशीं 'प्रातिपदिकान्तस्य' व 'पदान्तस्य' अशा रीतीनें अन्वित होतें, असें जें म्हटलें आहे तसें व्याख्यान करण्यांत गौरव आहे; कारण तसें व्याख्यान करितांना 'अन्तस्य' हें पद दोनदां उच्चारावें लागतें आणि 'प्रातिपदिकस्य' व 'पदस्य' या दोन्ही व्यधिकरणषष्ठी मानण्याची आपत्ति येते. ('प्रातिपदिकसंज्ञं यत्पदं तदन्तस्य' अशा सामानाधिकरण्यानें अन्वय करणें संभवत असतां, 'सम्भवति सामानाधिकरण्ये वैयधिकरण्यमन्याय्यम्' या न्यायान्वयें वैयधिकरण्यानें अन्वय करणें अयोग्य आहे असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे.) ज्याप्रमाणें 'प्रातिपदिक' या पदाचा 'पदस्य' या पदाशीं अभेदान्वय, म्हणजे विशेषणविशेष्यभावरूप अन्वय, केला जातो त्याचप्रमाणें 'न' या पदाचा 'पदस्य' या पदाशीं अभेदान्वय केला तर, विशेषणत्वामुळें तदन्तविधि केल्यानें, म्हणजे 'न' हें लुप्तषष्ठीक विशेषण 'नान्तस्य' अशा रीतीनें 'येन विधिस्तदन्तस्य' सू. २६ या सूत्रान्वयें तदन्ताचें वाचक होऊं

शकत असल्यामुळें, प्रकृत सूत्रातून 'अन्तस्य' हे पद गाळता येणे शक्य आहे. ('न लोपः प्रातिपदिकस्य' एवढेंच जरी सूत्र केले व 'न = नस्य' आणि 'प्रातिपदिकस्य' ही दोन्ही पदें 'पदस्य' या प्रकृत सूत्रात अनुवृत्त होणाऱ्या पदाची विशेषणे मानली तर, 'विशेषण तदन्तस्य संज्ञा स्यात्' या अर्थाच्या वाचक 'येन विधिस्तदन्तस्य' सू. २६ या सूत्रान्वयें 'नस्य' याचा 'नकारान्तस्य' असा अर्थ होऊन 'नकारान्तस्य प्रातिपदिकसंज्ञकस्य पदस्य लोपः स्यात्' असा सूत्रार्थ होईल व 'पदस्य' ही स्थानषष्ठी मानल्यानें 'अलोऽन्त्यस्य' या परिभाषान्वयें अन्त्य नकाराचाच लोप होईल आणि अशा रीतीनें प्रकृत सूत्रातून 'अन्तस्य' हे पद गाळले तरी इष्ट रूपाची सिद्धि होऊ शकते असे दीक्षिताचे म्हणणे आहे परंतु प्रकृत सूत्रावरील भाष्यावरून हे स्पष्ट होतें की, भाष्यकारानी प्रकृत सूत्रात 'अन्तस्य' हे पद असणे आवश्यक मानले आहे. त्या भाष्यात–८–२–७–' नलोपेऽन्तग्रहणं किमर्थम् ? ।', म्हणजे प्रकृत सूत्रात 'अन्तस्य' या पदाचे ग्रहण का केले आहे, असा प्रश्न करून त्या प्रश्नाचे उत्तर देताना भाष्यकार 'नलोपेऽन्तग्रहण पदाधिकारस्य विशेषणत्वात्' हे वार्तिक पठित करितात व म्हणतात–'नलोपेऽन्तग्रहण क्रियते । किं कारणम् ? । पदाधिकारस्य विशेषणत्वात् । पदाधिकारो विशेषणम् । कथम् ? । पदस्येति नैषा स्थानषष्ठी । का तर्हि ? । विशेषणषष्ठी ।' कैयटानें भाष्यकारांनी जो प्रश्न केला आहे त्याचा 'नलोपः प्रातिपदिकस्येत्येतावत्युच्यमाने पदस्येति वर्तते, तत्र नकारेण पदे विशेष्यमाणे तदन्तविधिना नकारान्तस्य पदस्य प्रातिपदिकस्य लोपो विधीयमानोऽलोऽन्त्यस्येत्यन्त्यस्य भविष्यतीति प्रश्न.' असा आशय आहे हे सांगून पुढे भाष्याचे 'असत्यन्तग्रहणे प्रातिपदिकस्य पदस्य योऽन्त्यो नकारान्तस्य यत्र तत्र स्थितस्य लोपः स्यात् । तदन्त ग्रहणमित्यत्र स्यात्' असे व्याख्यान केले आहे. वरील भाष्यावरून हे स्पष्ट होते की, भाष्यकारांनी 'पदस्य' हे अनुवृत्त पद 'प्रातिपदिकस्य' याचे विशेषण मानले

असून दीक्षितांनीं 'प्रातिपदिकस्य' हें 'पदस्य' याचें विशेषण मानलें आहे. तसेंच भाष्यकारांनीं 'प्रातिपदिकस्य' हें विशेष्य अवयवषष्ठी मानली असून, दीक्षितांनीं 'पदस्य' हें विशेष्य स्थानषष्ठी मानली आहे; कारण ती स्थानषष्ठी मानल्याशिवाय तिचे ठिकाणीं 'अलोऽन्त्यस्य' ही परिभाषा उपस्थित होऊं शकत नाहीं. भाष्यकारांनीं 'प्रातिपदिकस्य' हें विशेष्य अवयवषष्ठी मानली असल्यामुळें व अशा रीतीनें त्या षष्ठीचे ठिकाणीं 'अलोऽन्त्यस्य' ही परिभाषा उपस्थित होऊं शकत नसल्यामुळें, कैयटानें सांगितल्याप्रमाणें कोणत्याहि नकाराचा लोप होण्याची जी आपत्ति येते व 'नर + भ्याम् = नराभ्याम्' या स्थलीं 'नर' हें प्रातिपादिक असून 'स्वादिष्वसर्वनामस्थाने' सू. २३० या सूत्रान्वयें पदसंज्ञक देखील असल्यामुळें, त्या प्रातिपदिकसंज्ञक पदांत असणाऱ्या आद्य नकाराचा लोप होण्याची जी आपत्ति येते ती टाळण्याकरितां प्रकृत सूत्रांत 'अन्तस्य' या पदाचें ग्रहण केलें आहे असें जें वार्तिककाराचें व भाष्यकारांचें म्हणणें आहे त्याशीं दीक्षितांचें म्हणणें विरुद्ध ठरतें हें उघड आहे. या विषयाचें अधिक विवरण शब्दरत्नांत करण्यांत येईल.)

शब्दरत्न– सापेक्षत्वेनेति । नलोप इत्येतद्विषयमिदम् । अन्ये आहु–पदविशेषणत्वाच्चेति । व्यधिकरणषष्ठीति । प्रातिपदिकस्य पदस्येत्यनयोः परस्परानन्वितयोरन्तेनान्वयादिति भावः । अभेदेनैवेति । सम्बन्धान्तरासत्त्वेऽपि विशेष्यविशेषणभावसम्बन्धेनेत्यर्थः । शक्यमकर्तुमिति । पदस्येत्यस्य क्वचिद्वैयधिकरण्येनान्वयोऽस्य तात्पर्यग्राहकत्वं भाष्ये उक्तम् । तत्तु लक्ष्यानुसारिव्याख्यानादेव ज्ञापकं विनाऽपि सिद्धमित्यभिमानः ।

'सापेक्षत्वेन समासासम्भवात्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे तें 'न लोपः' या दोन पदांसंबंधानें म्हटलें आहे, व 'पदविशेषणत्वात्' असें जें म्हटलें आहे तें 'प्रातिपदिक' या पदासंबंधानें म्हटलें आहे. 'व्यधिकरणषष्ठीद्वयापत्तेश्च' असें जें मनोरमेंत म्हटलें

आहे त्याचा भावार्थ हा आहे की, 'प्रातिपदिक = प्रातिपदिकस्य' व 'पदस्य' या दोन पदांचा विशेषणविशेष्यभावरूप अन्वय न करिता परस्पराशी अन्वित न केलेल्या त्या दोन पदांचा 'अन्तस्य' या पदाशी स्वतंत्र रीतीनें अन्वय केल्यास, 'प्रातिपदिकस्य' व 'पदस्य' या दोन्ही व्यधिकरणषष्ठी ठरण्याची आपत्ति येईल मनोरमेंतील 'अभेदेनैव सम्बन्धेन', या पदाचा 'सम्बन्धान्तरासत्वेऽपि विशेषण-विशेष्यभावसम्बन्धेन', म्हणजे 'न' व 'प्रातिपदिक' या दोन पदांचा 'पदस्य' या पदाशी इतर कोणत्याहि प्रकारचा अवयवावयवि-भावादिरूप संबंध नसला तरी त्याच्यामध्यें विशेषणविशेष्यभावरूप संबंध मानतां येतो, असा अर्थ आहे 'अन्तग्रहण शक्यमकर्तुम्' असे जें दीक्षितांनी मनोरमेंत म्हटले आहे ते अशा आशयानें म्हटले आहे की, जरी भाष्यांत असे म्हटले आहे की, 'पदस्य' या पदाचा क्वचित् स्थली वैयधिकरण्यानें अन्वय होतो याचें प्रकृत सूत्रांतील 'अन्तस्य' या पदाचें ग्रहण ज्ञापक आहे तरी, तें पद तशा अर्थाचें ज्ञापक न मानतां देखील इष्ट रूपाच्या सिद्धीकरिता जेथें जसें व्याख्यान करणें योग्य आहे तसें तेथें व्याख्यान केल्यानें, 'पदस्य' या पदाचा क्वचित् स्थली वैयधिकरण्यानें अन्वय करतां येऊं शकतो (शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय हा आहे की, प्रकृत सूत्रांत 'अन्तस्य' या पदाचें ग्रहण केलें असल्यामुळें त्यावरून हें ज्ञापित होतें की, पदाधिकारांत पठित असलेल्या सूत्रांत अनुवृत्त होणाऱ्या 'पदस्य' या पदाचा क्वचित् स्थली सामानाधिकरण्यानें अन्वय न होतां वैयधिकरण्यानें अन्वय होतो व प्रकृत सूत्रांत 'पदस्य' या अनुवृत्त पदाचा वैयधिकरण्यानें अन्वय केल्यास, पूर्वी सांगितल्याप्रमाणें, प्रातिपदिकसंज्ञक पदांतील कोणत्याहि नकाराचा लोप होण्याची जी आपत्ति येते ती टाळण्याकरितां प्रकृत सूत्रांत 'अन्तस्य' या पदाचें ग्रहण केलें आहे आणि अशा रीतीनें तें अन्त-ग्रहण प्रकृत सूत्रांत आवश्यक व अपरिहार्य ठरत असल्यामुळें, प्रकृत सूत्रांतून 'अन्तस्य' हें पद गाळतां येऊं शकत नाहीं पण दीक्षितांच

असें म्हणणे आहे कीं, पदाधिकारांत पठित असलेल्या सूत्रांत अनुवृत्त होणाऱ्या 'पदस्य' या पदाचा क्वचित् स्थलीं वैयधिकरण्यानें अन्वय होतो याचें पदाधिकारांत पठित असलेल्या प्रकृत सूत्रांतील 'अन्तस्य' या पदाचें ग्रहण ज्ञापक न मानतां देखील, जेथें इष्ट रूपांची सिद्धि करण्याकरितां वैयधिकरण्यानें अन्वय करणें योग्य आहे तेथें व्याख्यानद्वारा वैयधिकरण्यानें अन्वय करतां येतो व जेथें सामानाधिकरण्यानें अन्वय करणें योग्य आहे तेथें तसा अन्वय व्याख्यानद्वारा करतां येतो. सारांश लक्ष्यानुसारि व्याख्यान केल्यानें इष्ट रूपांची सिद्धि करण्यांत कोणतीहि अडचण येत नसल्यामुळें, प्रकृत सूत्रांतील 'अन्त' ग्रहण वरप्रमाणें ज्ञापक मानण्याची कांहीं गरज राहत नाहीं आणि म्हणून प्रकृत सूत्रांतील 'अन्त' ग्रहण व्यर्थच ठरतें व त्यामुळें तें प्रकृत सूत्रांतून गाळल्यानें कांहीं दोष येत नाहीं. यावर असें म्हणतां येऊं शकतें कीं, भाषेंत इष्ट रूपें कोणतीं व अनिष्ट रूपें कोणतीं व इष्ट रूपें सिद्ध करण्याकरितां कोठें वैयधिकरण्यानें व कोठें सामानाधिकरण्यानें 'पदस्य' या अनुवृत्त पदाचा अन्वय करणें योग्य आहे याचें ज्ञान लक्ष्यैकचक्षुष्क पुरुषांनाच असूं शकतें व लक्षणैकचक्षुष्क पुरुषांना तें ज्ञान असूं शकत नाहीं. म्हणून 'पदस्य' या अनुवृत्त पदाचा वैयधिकरण्यानें देखील कोठें कोठें अन्वय करतां येऊं शकतो हें लक्षणैकचक्षुष्क पुरुषांना समजण्याकरितां प्रकृत सूत्रांतील 'अन्तस्य' या पदाचें ग्रहण चरितार्थ ठरत असल्यामुळें, तें पद प्रकृत सूत्रांतून गाळतां येत नाहीं असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे आणि त्यांना दीक्षितांचें म्हणणें मान्य नाहीं हें सूचित करण्याकरितांच त्यांनीं प्रकृत पंक्तींत 'इत्यभिमानः' हीं अरुचिप्रदर्शक पदें घातलीं आहेत.)

मनोरमा– "विभाषा ङिश्योः" ॥ श्चीति "नपुंसकाच्च" इति विहितो न तु जश्शसोः शिः, तस्मिन् भत्वासम्भवात् । "भस्य" इत्यनेनासर्वनामस्थानस्यैव यजादेराक्षेपात्तदेतदाह–असर्वनामस्थानेति। अत एवेति । दीपणी इति प्रयोगात् । यद्यपि समाहारद्वन्द्वस्य

एकशेषे कृतेऽपि भाष्यं सुयोज, तथापि ककुदित्यस्य पृथक्पदत्वं न्याय्यम् । अन्यथा ककुद एकत्वं बाह्वोर्द्वित्वं च न लभ्येत इति भावः ।

"तमुपाद्रवदुद्यम्य दक्षिणं दोर्निशाचरः"

इति रघुः । तत्र दक्षिणं दोरिति उद्यम्येत्यनेन कर्मतया सम्बध्यते । दोषं तस्येति–

"दोषं तस्य तथाविधस्य भजतश्चापस्य गृह्णन् गुणम्" ।

इति श्रीहर्षप्रयोगः । तत्र दोषं हस्तं दूषणं च भजतश्चापस्य गुणं मौर्वीमतिशयं च गृह्णन् इति सम्बन्धः । अमरव्याख्यातारस्तु दोषशब्दं स्त्रियामपि स्वीकृत्य भागुरिमतेन टापि दोषेत्युक्त्वा–

"दोर्दोषा च भुजो बाहुः पाणिर्हस्तः करस्तथा" ।।

इति धनञ्जयनिघण्टुमुदाजह्रुः ।।

'विभाषा ङिश्योः' सू. २३७ या सूत्रात 'शी' हा जो निर्देश केला आहे तो 'नपुंसकाच्च' सू. ३१० या सूत्रानें ('औ' प्रत्ययाचे जागी होणारा) 'शी' हा आदेश असून, 'जश्शसोः शिः' सू ३१२ या सूत्रानें होणारा 'शि' हा आदेश नव्हे; कारण तो निर्देश 'शि' या आदेशाला लागू पडतो असे मानल्यास, अह्नाला भसंज्ञा होणे संभवनीय नाही. (प्रकृत सूत्र 'भस्य' या अधिकारात पठित असल्यामुळें, या सूत्रानें होणारे कार्य भसंज्ञक अह्नालाच होऊ शकते 'जश्शसोः शिः' या सूत्रानें होणारा 'शि' हा आदेश 'शि सर्वनामस्थानम्' सू. ३१३ या सूत्रान्वयें सर्वनामस्थानसंज्ञक असल्यामुळें, तो 'शि' पुढें असताना अह्नाला भसंज्ञा होऊ शकत नाही, कारण 'यचि भम्' सू २३१ या सूत्रान्वयें यजादि असर्वनामस्थानप्रत्यय पुढें असतानाच अह्नाला भसंज्ञा होत असते व नपुंसकात 'औ' चे जागी होणारा 'शी = ई' हा तसा अजादि असर्वनामस्थान प्रत्यय आहे ) प्रकृत सूत्रात अनुवृत्त असलेल्या 'भस्य' या पदानें असर्वनामस्थान यजादि प्रत्ययाचाच आक्षेप–ग्रहण–होत

असल्यामुळें, प्रकृत सूत्राचें कौमुदींत 'अङ्गावयवोऽसर्वनामस्थान-यजादिस्वादिपरो योऽन् तस्याकारस्य लोपो वा स्यात् ङिश्योः परयोः' असें व्याख्यान केलें आहे. 'दोष्शब्दस्य नपुंसकत्वमप्यत एव भाष्यात्' असें जें प्रकृत सूत्रावरील कौमुदींत म्हटलें आहे त्याचें कारण हें कीं, भाष्यकारांनीं 'दोषणी' असा 'दोष्' शब्दाचा नपुंसकलिङ्गांत प्रयोग केला आहे. समाहारद्वन्द्व करून एकशेष केल्यानें देखील जरी वरील भाष्याची सङ्गति लावतां येते तरी ('ककुद्दोषणी' या भाष्योदाहरणांतील) 'ककुद्' हें पृथक् पद मानणें योग्य आहे. तसें न मानल्यास, त्या पदांचा 'एक ककुद् व दोन हात' असा जो अर्थ होणें इष्ट आहे तो होऊं शकणार नाहीं. ('दोष्' हा शब्द नपुंसकलिङ्गी न मानतां पुलिङ्गी मानला तरी, 'ककुच्च दोश्चानयोः समाहारः ककुद्दोः' असा समाहारद्वन्द्व करून नंतर 'ककुद्दोश्च ककुद्दोश्च' असा एकशेष केल्यानें व 'स नपुंसकम्' सू. ८२१ या सूत्रान्वयें समाहारद्वन्द्व नपुंसक ठरत असल्यामुळें, 'ककुद्दोषणी' असें द्वितीयेच्या द्विवचनाचें एकशेषाचें रूप सिद्ध होऊं शकतें; पण तसें केल्यानें त्या पदाचा 'दोन ककुद् व दोन हात' असा अर्थ होण्याची आपत्ति येते. परंतु 'ककुद्दोषणी याचते महादेवः' या भाष्योदाहरणांतील 'ककुद्दोषणी' याचा 'एक ककुद् व दोन हात' असा अर्थ होणें इष्ट आहे असें दीक्षित म्हणतात व तसा अर्थ सिद्ध होण्याकरितां 'ककुद्दोषणी' हें सामासिक पद न मानतां 'ककुद्' व 'दोषणी' हीं भिन्न पदें मानणें आवश्यक आहे. तसें मानलें असतां, 'दोष्' हा शब्द नपुंसकलिङ्गी आहे व त्याच्या द्वितीयेच्या द्विवचनाचें 'दोषणी' हें रूप आहे हें उघड होतें. 'पद्दन्नोमास्' सू. ६-१-६३ या सूत्रावरील भाष्यवृत्तींत कैयटानें 'दोषणी याचते' हें भाष्यप्रतीक घेऊन 'औटि दोःशब्दस्य दोषन्नादेशः' असें जें म्हटलें आहे त्यावरून हें स्पष्ट होतें कीं, वरील भाष्योदाहरणांतील 'ककुद्दोषणी' हें एक सामासिक पद नसून 'ककुद्' व 'दोषणी' हीं दोन पृथक् पदें आहेत; नाहीं तर कैयटानें 'ककुद्दोषणी याचते'

असे प्रतीक घेऊन 'ककुद्दोषणी' या पदाचे व्याख्यान केले असते. या कैयटवृत्तीवर टीका करिताना उद्योतकारानी 'यत्तु ककुद्दोषणी इत्यत्र प्राण्यङ्गत्वात् समाहारद्वन्द्वगर्भ एकशेष इति तन्न, अल्पाच्तरत्वेन दो शब्दस्य पूर्वनिपातापत्तेः, तस्मात्ककुदिति पृथक्पदन्तद्ध्वनयन् तद्रहित प्रतीक गृह्णाति दोषणी याचत इति' असे म्हटले आहे साराश भाष्योदाहरणातील 'ककुद्' हें द्वितीयेचे एकवचन असून 'दोषणी' हे द्वितीयेचे द्विवचन आहे आणि हीं दोन्ही पृथक् पदें 'याचने' या क्रियेशी कर्मरूपानें अन्वित आहेत हे जाणावे ) 'तमुपाद्रवदुद्यम्य दक्षिण दोनिशाचर' ( रघुवश, सर्ग १५, श्लोक २३ ) असा रघुवशातील श्लोक आहे व या श्लोकात 'दक्षिण दो' ही पदें 'उद्यम्य' याशी कर्मरूपानें अन्वित होतात ( या श्लोकातील 'दो' हे नपुसकलिङ्गी 'दोष्' शब्दाच्या द्वितीयेचे एकवचन आहे येथें 'दो' या शब्दाचा भाष्यातील प्रयोगाप्रमाणे नपुसकलिङ्गात प्रयोग केला आहे ) 'दोष तस्य तथाविधस्य भजतश्चापस्य गृह्णन् गुणम्' ( नैषधकाव्य, सर्ग १२, श्लोक ९७ ) असा श्रीहर्षाचा प्रयोग आहे या श्लोकाचा 'दोष हस्त दूषण च भजतश्चापस्य गुण मौर्वीमतिशय च गृह्णन्' असा अन्वय आहे. ( या श्लोकात 'दोष्' या शब्दाचा पुल्लिङ्गात प्रयोग केला असून 'दोषम्' हे द्वितीयेचे एकवचन आहे ) अमरकोषाचे टीकाकार यानी 'दोष्' हा शब्द स्त्रीलिङ्गी देखील मानला आहे व ( 'वष्टि' भागुरिरल्लोपमवाप्योरुपसर्गयो । आप चैव हलन्ताना यथा वाचा दिशा निशा ।' या) भागुरिमतान्वयें 'दोष्' शब्दाहून 'टाप्' प्रत्यय केला असता, 'दोषा' असे रूप होतें हे सांगून, 'दोर्दोषा च भुजो बाहू पाणिर्हस्त करस्तथा' या धनञ्जयकोषाचे प्रमाण दिलें आहे ('दोष्' हा शब्द स्त्रीलिङ्गी देखील आहे हें या कोषावरून स्पष्ट होतें 'दाम्यरधनेन। दमु उपशमे। दमयति। भागुरिमते टाप्' असे रामाश्रमीत म्हटलें आहे )

शब्दरत्न– भत्वासम्भवादिति । सर्वनामस्थानत्वेनेति भावः । समाहारद्वन्द्वस्येति । प्राण्यङ्गत्वात्कृतसमाहारद्वन्द्वस्य ककुद्दोः शब्दस्येत्यर्थः । सुयोजम्–दोःशब्दस्य पुंस्त्वेऽपि सुनिर्वाहम् । न्याय्यम् । अल्पाच्तरत्वेन दोःशब्दस्य द्वन्द्वे पूर्वनिपातापत्तेः । किं च तदन्ते आदेशो दुर्लभः । विशेष्यासन्निधानादिति भावः । ककुद एकत्वमिति । प्रकरणात् श्रुतौ तथार्थकमेवेदमिति भावः । दक्षिणं तमुद्यम्य दोर्नामा निशाचर इत्यन्वयभ्रमवारणायाह–तत्रेति ।

'तस्मिन् भत्वासम्भवात्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, 'शि' हें सर्वनामस्थानसंज्ञक आहे (व तो प्रत्यय पुढें असतांना अङ्गाला भसंज्ञा होत नसते. नपुंसकांत होणारा 'औ' हा प्रत्यय 'सुडनपुंसकस्य' सू. २२९ या सूत्रान्वयें सर्वनामस्थानप्रत्यय नाहीं व त्याचें जागीं होणारा 'शी = ई' हा अजादि आदेश स्थानिवद्भावानें असर्वनामस्थान प्रत्यय ठरतो आणि तो पुढें असतांना अङ्गाला भसंज्ञा होत असून 'शि' पुढें असतांना तशी संज्ञा होत नसल्यामुळें, प्रकृत सूत्रांतील 'ङ्यो:' या निर्देशानें 'नपुंसकाच्च' सू. ३१० या सूत्रानें होणाऱ्या 'शी'चेंच ग्रहण करतां येतें. याचें विवरण मनोरमेंत केलेंच आहे.) 'समाहारद्वन्द्वस्य एकशेषे कृतेऽपि भाष्यं सुयोजम्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा अर्थ हा आहे कीं, 'ककुद्' व 'दोष्' हे दोन्ही प्राण्यङ्ग असल्यामुळें ('द्वन्द्वश्च प्राणितूर्यसेनाङ्गानाम्' सू. ९०६ या सूत्रानें 'ककुच्च दोश्चानयोः समाहारः ककुद्दोः' असा) समाहारद्वन्द्व करून 'ककुद्दोः' हा जो (नपुंसकलिङ्गाच्या एकवचनाचा) शब्द सिद्ध होतो त्याचा एकशेष केल्यानें, भाष्य सुसङ्गत ठरूं शकतें. या पंक्तींतील 'सुयोजम्' या पदाचा 'दोः शब्दस्य पुंस्त्वेऽपि सुनिर्वाहम्', म्हणजे 'दोष्' शब्द पुल्लिङ्गी मानला तरी भाष्याची सङ्गति लावतां येते, असा अर्थ आहे. 'ककुदिरयस्य पृथक्पदत्वं न्याय्यम्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचें कारण हें कीं, ('ककुद्' या शब्दाच्या मानानें 'दोः' या शब्दांत) कमी अच्

असल्यामुळें ('अल्पाच्तरम्' सू. ९०५ या सूत्रान्वयें 'दो' या शब्दाचा) पूर्वनिपात होण्याची आपत्ति येते. (पूर्वनिपातप्रकरण अनित्य असल्यामुळें 'ककुद्दोषणी' या द्वन्द्वसमासातील 'दोष्' शब्दाचा पूर्वनिपात केला नाही आणि म्हणून तो प्रयोग असाधु ठरत नाही असे कोणी म्हटल्यास, ती अरुचि मनात धरून शब्दरत्नकार दुसरा दोष देतात. 'ककुद्दोषणी' हा समाहारद्वन्द्व मानल्यास, त्या सामासिक पदातील 'दोष्' या अन्त्य पदाचे जागीं 'दोषन्' असा तदन्तविधीनें) आदेश करता येणे शक्य नाही, कारण कोणतेहि विशेष्य, जवळ उपलब्ध नाही ('येन विधिस्तदन्तस्य' सू २६ या सूत्रानें विशेषणाचे ठिकाणी तदन्तविधि करता येतो परंतु 'पद्दन्नोमास्' सू २२८ या सूत्रात कोणतेहि विशेष्यरूप पद निर्दिष्ट नाही किंवा अनुवृत्त होत नाही व 'शब्दस्वरूप विशेष्यमादाय तदन्तविधिस्तु सर्वत्र गमके' असे भैरवीत स्पष्ट म्हटले आहे तसेच ते सूत्र अङ्गाधिकारात पठित नसल्यामुळें, 'पदाङ्गाधिकारे तस्य च तदन्तस्य' ही परिभाषा त्या सूत्राचे ठिकाणी प्रवृत्त होऊ शकत नाही. त्यामुळें देखील 'ककुद्दोषणी' हे सामासिक पद मानल्यास, त्या सामासिक पदाच्या अन्ती असणाऱ्या 'दोस्' शब्दाचे जागी तदन्तविधीनें 'दोषन्' असा आदेश करता येऊ शकत नाही. पण 'ककुद्दोषणी' या स्थली 'दोषन्' असा आदेश केला असल्यामुळें, 'ककुद्' हे पृथक् पद आहे हे मानणे आवश्यक आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे ) 'ककुद एकत्वम्' असे जें मनोरमेंत म्हटल आहे त्याचे कारण हे की, ज्या प्रकरणात भाष्यात उदाहरणरूपानें दिलेली श्रुति, म्हणजे 'ककुद्दोषणी याचते महादेव' ही श्रुति, पठित आहे त्या प्रकरणावरून हे ज्ञात होते की, त्या श्रुतीत 'एक ककुद् व दोन हात' असाच अर्थ विवक्षित आहे 'दक्षिण तमुद्यम्य दोर्नामा निशाचर' असा कोणी (मनोरमेंत दिलेल्या रघुवंशातील श्लोकाचा) चुकीनें अन्वय करू नये म्हणून दीक्षितांनीं त्या श्लोकाचा मनोरमेंत अन्वय करून दाखविला आहे.

**मनोरमा—द्वयोरह्नोर्भव इति। "तद्धितार्थ" इति समासः, कालाट्ठञ्। "द्विगोर्लुगनपत्ये" इति लुक्। "राजाहःसखिभ्यः" इति टच्। "अह्नोऽह्न एतेभ्यः" इत्यह्नादेशः।**

'विभाषा ङिश्योः' सू. ३३७ या सूत्रावरील कौमुदींत 'द्वयोरह्नोर्भवः द्व्यह्नः' असें जें अखेरीस म्हटलें आहे त्या उदाहरणांत 'तद्धितार्थोत्तरपदसमाहारे च' सू. ७२८ या सूत्रान्वयें तद्धितार्थ द्विगु होऊन व 'कालाट्ठञ्' सू. १३८१ या सूत्रानें ('तत्रभवः' या अर्थामध्यें तद्धित) 'ठञ्' प्रत्यय होऊन व 'द्विगोर्लुगनपत्ये' सू. १०८० या सूत्रानें त्या 'ठञ्' प्रत्ययाचा 'लुक्' होऊन व 'राजाहस्सखिभ्यष्टच्' सू. ७८८ या सूत्रानें समासान्त 'टच्' प्रत्यय होऊन आणि 'अह्नोऽह्न एतेभ्यः' सू. ७९० या सूत्रानें 'अहन्' चे जागीं 'अह्न' असा आदेश होऊन 'द्व्यह्नः' असें रूप सिद्ध झालें आहे.

**मनोरमा—अह्नः साय इति। स्यतेर्घञि अवसानवचनः सायशब्दः। "संख्याविसाय–" इति ज्ञापकादेकदेशिसमासः॥ इत्यदन्ताः॥**

'सङ्ख्याविसायपूर्वस्य' सू. २३८ या सूत्रावरील कौमुदींत 'अह्नः सायः सायाह्नः' हें जें उदाहरण दिलें आहे त्यांतील 'सायः' हा अवसानवाचक शब्द ('षो अन्तकर्मणि' धातु नं. ११४७ या दिवादिगणांत पठित असलेल्या) धातूहून 'घञ् = अ' प्रत्यय होऊन सिद्ध झाला आहे. ('षो' धातूहून 'घञ्' प्रत्यय केला असतां, 'धात्वादेः षः सः' सू. २२६४ या सूत्रानें धातूंतील आद्य षकाराचे जागीं सकारादेश होऊन व 'आदेच उपदेशे' सू. २३७० या सूत्रानें त्या एजन्त धातूचें आत्व होऊन 'सा घञ्' अशी स्थिति झाली असतां, 'आतो युक् चिण्कृतोः' सू. २७६१ या सूत्रानें 'युक्' आगम होऊन 'साय' असें रूप सिद्ध झालें आहे व) 'सङ्ख्याविसाय' (या प्रकृत सूत्रांत 'साय' या शब्दाचें ग्रहण केलें असल्यामुळें) या

ज्ञापकाच्या आधारें हा एकदेशिसमास झाला आहे. ('पूर्वापराधरोत्तरमेकदेशिनैकाधिकरणे' सू ७१२ या एकदेशिसमासविधायक सूत्रात एकदेशीचा–अवयवीचा–या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या 'पूर्व, अपर, अधर, उत्तर' या चार एकदेशवाचक–अवयववाचक–शब्दांशी तत्पुरुषसमास होणे सांगितले आहे या सूत्रात 'साय' एकदेशवाचक शब्दाचे ग्रहण केले नसल्यामुळें, 'अहन्' या एकदेशीचा 'साय' या एकदेशाशी तत्पुरुषसमास कसा होऊ शकणार? या प्रश्नाचे 'सर्वोऽप्येकदेशोऽह्ना समस्यते। सङ्ख्याविसाय इति ज्ञापकात्। मध्याह्न सायाह्न।' असे उत्तर दीक्षितांनी 'पूर्वापराधर' या सूत्रावरील कौमुदीत दिले आहे आणि या सूत्रावरील व तसेच प्रकृत सूत्रावरील वृत्तीत काशिकाकारांनी देखील असेच म्हटले असून, दीक्षितांनी त्याचाच अनुवाद केला आहे दीक्षितांच्या म्हणण्याचा भावार्थ हा आहे की, 'साय' शब्दपूर्वक 'अह्न' शब्दापुढें सप्तमीच्या एकवचनाचा 'ङि' प्रत्यय आला असता, त्या 'अह्न' शब्दाचे जागी विकल्पेंकरून 'अहन्' आदेश होण्याचें प्रकृत सूत्रानें विधान केले असल्यामुळें व 'साय' या अवयववाचक शब्दापुढें 'अहन्' हा अवयविवाचक शब्द समासातच येऊ शकत असून त्याचे जागी 'अह्नोऽह्न एतेभ्य' सू ७९० या सूत्रान्वयें, समासान्त 'टच्' प्रत्यय पुढें असता, जो नित्य अह्नादेश होतो त्याचेच जागी प्रकृत सूत्रानें 'अहन्' असा पाक्षिक आदेश होणे सांगितले असल्यामुळें, त्यावरून हें सिद्ध होते की, जरी 'साय' हा शब्द 'पूर्वापराधरोत्तर' सू ७१२ या सूत्रात निर्दिष्ट नाही तरी, त्या एकदेशवाचक शब्दाचा 'अहन्' या एकदेशीशी तत्पुरुषसमास होत असतो, आणि 'साय' या एकदेशवाचक शब्दाचा 'अहन्' या एकदेशीशी तत्पुरुषसमास व्हावा व इतर अवयववाचक 'मध्य' इत्यादि शब्दाचा त्या एकदेशिवाचक शब्दाशी समास होऊ नये असा भेद करण्यास कोणतेहि प्रमाण किंवा कोणतीहि युक्ति उपलब्ध नसल्यामुळें, प्रकृत सूत्रातील 'साय' या एकदेशवाचक शब्दाच्या ग्रहणानें 'सर्वोऽप्येक-

देशोऽह्ना समस्यते' हें ज्ञापित होतें. दुसरें असें कीं, 'तत्पुरुषस्याङ्गुलेः सङ्ख्याव्ययादेः' व 'अहस्सर्वैकदेशसङ्ख्यातपुण्याच्च रात्रेः' या पञ्चमाध्यायांतील दोन सूत्रांच्या लगेंच पुढें 'अह्नोऽह्न एतेभ्यः' हें सूत्र पठित असून या सूत्रांतील 'एतेभ्यः' या सर्वनामानें 'सर्व, एकदेश' इत्यादि 'अहस्सर्वैकदेश' या पूर्व सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या शब्दांचा परामर्श होत असल्यामुळें व या सूत्राचा 'सर्वेत्यादिभ्यः उत्तरस्य अहन्नित्येतस्य अह्नादेशो भवति समासान्ते टचि परे सति' असा अर्थ होत असल्यामुळें, त्यावरून देखील हें सिद्ध होतें कीं, 'अहन्' या एकदेशीचा त्याच्या एकदेशवाचक शब्दांशीं तत्पुरुषसमास होत असतो; कारण समासांतच एकदेशवाचक शब्दापुढें 'अहन्' शब्द येऊं शकतो व तशा 'अहन्' शब्दान्त सामासिक शब्दाहून तत्पुरुषसमासांतच 'राजाहस्सखिभ्यष्टच्' सू. ७८८ या सूत्रानें समासान्त 'टच्' प्रत्यय होणें सांगितलें आहे.) येथें अदन्तप्रकरण संपलें.

शब्दरत्न–एकदेशिसमास इति। तत्प्रत्याख्याने तु कर्मधारय इति बोध्यम्।

एकदेशिसमासाचें प्रत्याख्यान केल्यास, म्हणजे एकदेशिसमास होत नाहीं असें मानल्यास, ('सायमहः सायाह्नः' असा) कर्मधारयसमास मानला पाहिजे हें जाणावें. ('समुदाये दृष्टाः शब्दा अवयवेऽपि वर्तन्ते' या भाष्यवचनान्वयें एकदेशिसमासाचें प्रत्याख्यान केल्यास, प्रकृत स्थलीं कर्मधारयसमास करणें आवश्यक आहे असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा भावार्थ आहे.)

मनोरमा–हाहानिति। गन्धर्वविशेषवाचकमव्युत्पन्नं प्रातिपदिकमिदम्। कौमारास्तु–जहातीति हाहा इति क्रियाशब्दं वदन्तो विश्वपाच्द्रूपमाहुः। तन्मते प्रत्युदाहरणं तु 'अकारो वासुदेवः स्यात्' तेन सह वर्तन्त इति साः तान् सान् इति बोध्यम्॥ इत्यादन्ताः।

('आतो धातो.' सू. २४० या सूत्रावरील कौमुदींत 'हाहान्' हें जें त्या सूत्राचे प्रत्युदाहरण दिले आहे ते 'हाहा' या आकारान्त शब्दाचे द्वितीयेचे बहुवचन आहे. 'हाहान्' यातील प्रकृति) 'हाहा' हे अव्युत्पन्न प्रातिपदिक असून गन्धर्वविशेषाचे वाचक आहे. ('हाहाहूहूश्चैवमाद्या गन्धर्वास्त्रिदिवौकसाम्' हा अमरकोषातील श्लोक प्रसिद्धच आहे.) कौमार-कलापतन्त्रानुसारी-वैयाकरणाचे असे म्हणणे आहे की, 'जहाति इति हाहा' अशा रीतीनें ('ओ हाक् त्यागे' या जुहोत्यादिगणात पठित असलेल्या धातूहून) सिद्ध झालेला 'हाहा' हा क्रियावाचक शब्द, म्हणजे व्युत्पन्न प्रातिपदिक, आहे व त्याच्या मते या शब्दाच्या विभक्तींची रूपें 'विश्वपा' शब्दासारखीच होतात ('हाहा' यातील 'हा' हा प्रथम शब्द शोकव्यञ्जक उपपद मानून 'हा इति शब्द जहातीति हाहा'-नित्य आनंदी-अशा रीतीनें ते कौमार वैयाकरण 'हाहा' या शब्दाची व्युत्पत्ति सांगतात व असे म्हणतात की, 'हा' या धातूहून 'अन्येभ्योऽपि दृश्यन्ते' सू २९८० या सूत्रान्वयें 'विच्' प्रत्यय होऊन 'हाहा' हें व्युत्पन्न प्रातिपदिक सिद्ध झाले आहे वर दिलेल्या अमरकोषातील श्लोकावरील रामाश्रमीटीकेत अशाच तऱ्हेची 'हाहा' या शब्दाची व्युत्पत्ति भट्टोजि दीक्षिताचे पुत्र भानुजी दीक्षित यांनी दिली आहे) त्या कौमार वैयाकरणाच्या मते 'अकारो वासुदेव स्यात्' या कोषवचनान्वयें 'वासुदेव' या अर्थाचा वाचक जो 'अ' हा शब्द आहे त्याचा 'सह' या शब्दाशी ('एन सह वर्तते' अशा रीतीनें बहुव्रीहिसमास करून 'वोपसर्जनस्य' सू ८४९ या सूत्रानें 'सह' चे जागी 'स' असा आदेश केल्यावर 'स+अ = ) सा' असे जें आकारान्त प्रातिपदिक होतें त्याच्या द्वितीयेचे बहुवचन 'सान्' हें 'आतो धातोः' या प्रकृत सूत्राचें प्रत्युदाहरण आहे हे जाणावें. येथें आदन्त-प्रकरण संपलें.

शब्दरत्न-जहातीति। हा इति शोकव्यञ्जकशब्द मित्यादिः।

मनोरमेंतील 'जहातीति हाहा' या पदांपूर्वी 'हा इति शोकव्यञ्जकशब्दम्' हीं पदें अध्याहृत आहेत (असेंच मानून वर मनोरमेंत विवरण केलें आहे.)

मनोरमा–"आङो नाऽस्त्रियाम्" ।। पुंसीति तु नोक्तम् । अमुना कुलेनेत्यत्र यथा स्यात् । न च नुमा रूपसिद्धिः, मुत्वस्यासिद्धत्वात् । "इकोऽचि" इति नुमोऽप्राप्तेः । नादेशे तु नासिद्धत्वं "न मु ने" इति निषेधात् । न च "न मु ने" इति निषेधो नुम्यप्यस्तु ने इत्यकारस्योच्चारणार्थत्वादिति वाच्यम् । अमुष्मै कुलायेत्याद्यसिद्ध्यापत्तेः ।

'आङो नाऽस्त्रियाम्' सू. २४४ या सूत्रांत ('अस्त्रियाम्' या शब्दाचें ग्रहण केलें असून त्या शब्दाऐवजीं) 'पुंसि' हा शब्द वापरला नाहीं. त्याचें कारण हें कीं, 'अमुना कुलेन' या उदाहरणांत 'अमुना' या नपुंसकलिङ्गाच्या रूपांत 'टा' चे जागीं 'ना' हा आदेश व्हावा. नुमागम केल्यानें 'अमुना' या रूपाची सिद्धि होऊं शकते असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण मुत्व असिद्ध आहे व मुत्व केलें असतां, 'इकोऽचि विभक्तौ' सू. ३२० या सूत्रानें होणाऱ्या नुमागमाची प्राप्ति होऊं शकत नाहीं; पण 'न मु ने' सू. ४३९ हें निषेधक सूत्र असल्यामुळें, 'टा' चे जागीं 'ना' हा आदेश करतेवेळी मुत्व असिद्ध ठरत नाहीं. 'न मु ने' या सूत्रानें सांगितलेला निषेध नुमागम करतेवेळीं देखील लागू पडतो, कारण 'ने' यांतील अकार उच्चारणार्थ आहे असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण तें म्हणणें बरोबर मानल्यास, 'अमुष्मै कुलाय' इत्यादि प्रयोग सिद्ध न होण्याची आपत्ति येते. ('अदस् टा' या स्थलीं 'त्यदादीनामः' सू. २६५ या सूत्रानें 'अदस्' यांतील अन्त्यसकाराचे जागीं अकार होऊन व 'अतो गुणे' सू. १९१ या सूत्रानें पररूप एकादेश होऊन 'अद टा' अशी स्थिति झाली असतां, 'अदसोऽसे:' सू. ४१९ या प्रैषादिक सूत्रानें 'अद' यांतील 'द' चें मुत्व

होऊन 'अमु टा = अमु आ' अशी जेव्हा स्थिति होते तेव्हा 'आ' हा अजादि विभक्तिप्रत्यय पुढें असल्यामुळें 'इकोऽचि विभक्तौ' सू ३२० या सूत्रानें 'अमु' या इगन्त अङ्गाला नुमागम केल्यानें 'अमुन् आ = अमुना' असे नपुसकाचे इष्ट रूप सिद्ध होऊ शकतेच आणि म्हणून प्रकृत सूत्रात 'अस्त्रियाम्' हे पद न घालता 'पुसि' हे पद घातले असते तरी 'अमुना' हे नपुसकाचे रूप सिद्ध होऊ शकलेच असते अशी शकाकाराची शका आहे या शकेवर दीक्षित असे उत्तर देतात की, ही शका बरोबर नाही, कारण 'इकोऽचि विभक्तौ' या सापादिक सूत्राच्या दृष्टीनें 'अदसोऽसे' या त्रैपादिक सूत्रानें झालेले मुत्व, 'पूर्वत्रासिद्धम्' सू १२ या वचनान्वयें, असिद्ध ठरत असल्यामुळें, 'अमु' असे इगन्त अङ्ग आहे असे मानता येत नसून 'अद' असे अदन्तच अङ्ग आहे असे मानावे लागते त्यामुळें 'इकोऽचि विभक्तौ' या सूत्राची प्राप्तीच होत नाही व नुमागम होऊ शकत नाही परतु प्रकृत सूत्र असल्यामुळें, 'अमु टा = अमु आ' या स्थली 'आ' चे जागी 'ना' असा आदेश होतो व ता आदेश करतेवेळी 'न मु ने' सू ४३९ या निषेधक सूत्रान्वयें मुत्व असिद्ध ठरत नसल्यामुळें, 'ना' हा आदेश होऊन 'अमुना' असे इष्ट रूप सिद्ध होते सारांश प्रकृत सूत्रात 'पुसि' हे पद घातले असतें तर, 'अमुना' असे नपुसकाचे रूप सिद्ध होऊ शकले नसते तसे रूप देखील सिद्ध व्हावे याकरिता प्रकृत सूत्रात 'पुसि' हे पद न घालता 'अस्त्रियाम्' हे पद घातले आहे पुन्हा शकाकार अशी शका करतो की, 'न मु ने' हा निषेध 'टा' चे जागी नादेश करतेवेळींच लागू पडणारा नसून नुमागम करतेवेळी देखील लागू पडणारा आहे कारण त्या निषेधक सूत्रातील 'ने' हे पद जसे 'ना' या आदेशाचे सप्तमीचे एकवचन आहे तसेच 'नुम् = न्' याला अकार उच्चारणार्थ जोडल्यास 'न' असा जो नुमागमाचा वाचक शब्द होतो त्याच्या सप्तमीचे देखील 'ने' हेंच एकवचन आहे आणि त्यामुळें 'न मु ने' या सूत्राचा 'नाभावे नुमागमे च कर्तव्ये कृतेच

नुभावो नासिद्धः स्यात्' असा अर्थ होत असल्यामुळें, जसा 'ना' हा आदेश करतेवेळीं पूर्वी केलेलें मुत्व असिद्ध ठरत नाहीं त्याचप्रमाणें 'इकोऽचि विभक्तौ' या सूत्रानें नुमागम करतेवेळीं देखील मुत्व असिद्ध ठरत नाहीं. म्हणून 'अमु टा = अमु आ' या स्थलीं 'इकोऽचि विभक्तौ' या सूत्रानें नुमागम होऊन 'अमुन् आ = अमुना' असें इष्ट रूप सिद्ध होऊं शकत असल्यामुळें, प्रकृत सूत्रांत 'पुंसि' हें पद घातलें असतें तरी चालूं शकलें असतें. या शंकेवर दीक्षित असें उत्तर देतात कीं, शंकाकाराचें म्हणणें बरोबर मानल्यास जरी 'अमुना' हें नपुंसकाचें रूप सिद्ध होऊं शकतें तरी 'अमुष्मै कुलाय' इत्यादि प्रयोगांची सिद्धि न होण्याची आपत्ति येते; कारण 'अदस् ङे = अद ङे' या स्थलीं 'द'चें मुत्व करून 'अमु ङे' अशी स्थिति झाली असतां, नुमागम करतेवेळीं मुत्व सिद्ध ठरतें असें शंकाकाराच्या म्हणण्याप्रमाणें मानल्यास, 'इकोऽचि विभक्तौ' या पर सूत्रानें प्रथम नुमागम होऊन 'अमुन्' असें नकारान्त अङ्ग झाल्यावर 'सर्वनाम्नः स्मै' सू. २१५ या पूर्व सूत्रानें अदन्त सर्वनामापुढील 'ङे'चे जागीं होणारा 'स्मै' आदेश होऊं शकणार नाहीं. त्यामुळें 'अमुष्मै' असें इष्ट रूप सिद्ध न होतां, 'अमुन् ङे = अमुन् ए = अमुने' असें चतुर्थीच्या एकवचनाचें अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येईल. सारांश 'न मु ने' या सूत्रांतील 'ने' हें नुमादेशवाचक 'न' चें सप्तमीच्या एकवचनाचें देखील रूप नसून प्रकृत सूत्रानें होणाऱ्या 'ना' या आदेशाचेंच सप्तमीचें एकवचन आहे आणि तो आदेश करतेवेळींच मुत्व सिद्ध ठरत असून, नुमागम करतेवेळीं मुत्व सिद्ध ठरत नाहीं आणि त्यामुळें 'अमुना' हें नपुंसकाचें रूप सिद्ध होण्याकरितां प्रकृत सूत्रांत 'अघिप्याम्' हें पद असणें आवश्यक आहे असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे.

शब्दरत्न—नुम्यप्यसिद्धवदिति । अयं भावः—तन्त्रेण नाभावे, नकारे च कार्ये तं प्रति अन्यं प्रति च, कृते च कार्यान्तरं प्रति मुभावो नासिद्ध इति तदर्थः । एतेन मुत्वस्यासिद्धत्वेनेनादेशे, सुपे नुमादेर-

प्राप्तिरिति परास्तम् । नुम्येवास्त्विति पाठे एवकारोऽप्यर्थः । उच्चारणार्थत्वादिति । तन्त्रेणोच्चरिते द्वितीयनेशब्दे इत्यर्थः । अमुष्मै इति । "न मु ने" इति सूत्रविषये पूर्वं विभक्तिनिमित्त-कार्याप्रवृत्तौ मुत्वे तस्य नकारविषये कमपि प्रत्यसिद्धत्वाभावेन विभ-क्त्यादेशं प्रत्यसिद्धत्वेऽपि यास्य स्मैभावात्परत्वेन नुमापत्तेः । आदिना अमू कुले अमुयोरिति तयोरेत्वस्याप्रवृत्तौ मुत्वे नुमि चानिष्टं स्पष्टमेव । "नमुटादेश" इति वार्तिकस्वारस्येन नादेश इत्येव तदर्थ उचित इत्यपि बोध्यम् ।

'न मु ने इति निषेधो नुम्यप्यस्तु' असे जें मनोरमेंतील शकाग्रन्थात म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, तन्त्राचा आश्रय केल्यानें, म्हणजे 'न मु ने' या सूत्रातील 'ने' हें पद दोनदा उच्चारल्यानें व प्रथम उच्चारलेल्या त्या पदाचा 'नाभावे कर्तव्ये' असा अर्थ करून दुसऱ्यानें उच्चारलेल्या त्या पदाचा 'नुमागमे च कर्तव्ये' असा अर्थ केल्यानें, 'न मु ने' या सूत्राचा असा अर्थ होतो की, नादेश व नुमागम करतेवेळी त्या कार्यांच्या दृष्टीनें व तसेच (विभक्तिप्रत्ययसम्बन्धि इनादेश इत्यादि) जी इतर कार्यें पावली आहेत त्या कार्यांच्या दृष्टीनें आणि त्याचप्रमाणे नादेश व नुमागम केल्यावर ज्या इतर कार्यांची प्राप्ति होते त्या कार्यांच्या दृष्टीनें मुत्व असिद्ध ठरत नाही. असा त्या सूत्राचा अर्थ केल्यानें, जे कोणी म्हणतात की, मुत्व असिद्ध ठरत असल्यामुळें ('अद टा' या स्थली मुत्व न करिता अदन्त अङ्गापुढें असलेल्या 'टा'चे जागी 'टाङसिङसाम्' सू. २०१ या सूत्रानें) 'इन' असा आदेश करून ('आद्गुण' सू. ६९ या सूत्रानें) गुणादेश केला असता नुमादेशाची प्राप्तीच होत नाही, ते त्याचे म्हणणे चूक ठरते; (कारण 'अमु टा = अमु आ' या स्थली नुमागम करतेवेळीं, वरील अर्थान्वये, पूर्वी केलेले मुत्व सिद्ध ठरत असल्यामुळें, 'अमु' हें अङ्ग नुमागम-कार्याच्या दृष्टीनें इगन्त ठरून 'इकोऽचि विभक्तौ' सू. ३२० या सूत्रानें त्या इगन्त अङ्गाला नुमागम होऊं शकतो आणि नुमागम

केल्यावर 'अमुन्' असें हलन्त अङ्ग होत असल्यामुळें, 'टाङसिङ-साम्' सू. २०१ या सूत्राची प्राप्तीच होत नाहीं. त्यामुळें 'टा' चे जागीं इनादेश होण्याची व इनादेश केल्यानें 'आद्गुणः' या सूत्रानें गुणादेश होण्याची जी आपत्ति दिली आहे ती आपत्ति मुळींच येत नाहीं आणि 'अमुन् आ = अमुना' असें इष्ट रूप, प्रकृत सूत्रांत 'पुंसि' हें पद असलें तरी, सहज सिद्ध होऊं शकतें असा मनोरमेंतील त्या शंकाग्रन्थाचा आशय आहे. येथें हें लक्षांत ठेवावें कीं, शब्दरत्न-कारांनीं 'नुम्येवास्तु' असा मनोरमेचा पाठ न मानतां त्या ऐवजीं 'नुम्यप्यस्तु' असा पाठ मानून मनोरमेंतील शंकाग्रन्थाचें वरप्रमाणें व्याख्यान केलें आहे व ते पुढें म्हणतात कीं,) 'नुम्येवास्तु' असा जरी मनोरमेचा पाठ मानला तरी, त्यांतील 'एव' हा शब्द 'अपि' या अर्थाचा वाचक आहे असें समजावें. 'ने इत्यकारस्योच्चारणार्थ-त्वात्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा अर्थ हा आहे कीं, 'न मु ने' या सूत्रांतील तन्त्रानें 'ने' हें पद दोनदां उच्चारलें असतां, त्यापैकीं दुसऱ्यानें उच्चारलेल्या 'ने' यांतील अकार, म्हणजे ज्या अदन्त प्रातिपदिकाचें 'ने' हें सप्तमीचें रूप आहे त्या 'न' मधील अकार, उच्चारणार्थ आहे. (प्रथम उच्चारलेलें 'ने' हें पद 'ना' याचें सप्तमीचें एकवचन आहे व या 'ना' मधील आकार उच्चारणार्थ नसून, प्रकृत सूत्रानें 'टा' चे जागीं होणाऱ्या 'ना' या आदेशाचा जो 'ना' शब्द वाचक आहे व 'ना ङि = ना इ = ने' असें 'आद्गुणः' या सूत्रानें गुणादेश होऊन 'ने' असें 'ना' चें सप्तमीच्या एकवचनाचें रूप होतें व त्या पदाचा 'नाभावे कर्तव्ये' असा अर्थ होतो. पण दुसऱ्यानें उच्चारलेल्या 'ने' या पदाचा 'नुमागमे कर्तव्ये' असा अर्थ करणें असल्यामुळें, 'न' यांतील अकार उच्चारणार्थ आहे व 'न' हा 'नुम् = न्' चा वाचक आहे असें मानणें आवश्यक आहे व त्या 'न' चें देखील 'न ङि = न इ = ने' असेंच पूर्वी सांगितल्याप्रमाणें 'आद् गुणः' या सूत्रान्वयें सप्तमीच्या एकवचनाचें रूप होतें ) 'अमुष्मै कृत्यावेन्यायसिद्धत्वापत्तेः' असें

मनोरमेंत म्हटलें आहे त्याचे कारण हे की, 'न मु ने' या सूत्राच्या विषयात, म्हणजे ज्या ज्या ठिकाणी 'न मु ने' हे सूत्र लागू पडते त्या ठिकाणी, विभक्तिप्रत्ययनिमित्तक कार्यांची प्रवृत्ति प्रथम न करिता प्रथम मुत्व केले तर ते मुत्व, नुमागम कर्तव्य असता, कोणत्याहि कार्याच्या दृष्टीनें असिद्ध ठरत नसल्यामुळें, जरी विभक्ति-प्रत्ययाचे जागी आदेश करतेवेळी ते मुत्व त्या आदेशरूप कार्याच्या दृष्टीनें असिद्ध आहे तरी, 'स्मै' आदेश होणे या कार्याच्या मानानें नुमागमकार्य पर असल्यामुळें, नुमागम होण्याची आपत्ति येते (या या पक्तीतील 'वा' हा शब्द मैरवीत सागितल्याप्रमाणे 'अनास्थायाम्' या अर्थामध्यें वापरला आहे हे लक्षात ठेवावे 'अदस् ङे' या स्थली 'अदस्' यात सकार असल्यामुळें 'अदसोऽसे' सू ४१९ हे मुत्वविधायक सूत्र प्रवृत्त होऊ शकत नाही व जोपर्यंत मुत्व होऊन इगन्त अङ्ग होत नाही तोपर्यंत 'इकोऽचि विभक्तौ' सू ३२० या सूत्रानें होणारा नुमागम होऊ शकत नाही म्हणून नुमागम होण्या-करिता पूर्वी मुत्व झाले पाहिजे व मुत्व होण्याकरिता 'अदस्' यातील सकार नाहीसा झाला पाहिजे आणि तो सकार नाहीसा होण्याकरिता 'त्यदादीनाम' सू. २६५ व 'अतो गुणे' सू १९१ ही सूत्रें प्रथम प्रवृत्त करणे भाग आहे ती दोन सूत्रें प्रथम प्रवृत्त करून 'अदस्' यातील सकाराचे जागी अकार व नतर पररूप एकादेश केल्यावर 'अद ङे' अशी स्थिति झाली असताच, 'अदसोऽसे' हे सूत्र प्रवृत्त होऊ शकते त्यापूर्वी ते प्रवृत्त होऊ शकत नाही म्हणून 'पूर्वं विभक्तिनिमित्तकार्यप्रवृत्तौ मुत्वे' असे जें शब्दरत्नातील प्रकृत पक्तीत म्हटले आहे त्यातून 'त्यदादीनाम' या सूत्रानें होणारे विभक्तिनिमित्तककार्य व तसेच ते कार्य केल्यानें प्राप्त होणार पररूप कार्य ही दोन कार्यें वगळणे भाग आहे ही दोन कार्यें प्रथम करून 'अद ङे' अशी स्थिति झाल्यावर प्राप्त होणारे मुत्वकार्य लगेच केल्यानें 'अमु ङे' अशी स्थिति होते अशा स्थितीत 'सर्वनाम्न स्मै' सू २१५ या मापादिक सूत्राच्या दृष्टीनें

त्रैपादिक मुत्व असिद्ध असल्यामुळें, तें झालेंच नाहीं व 'अमु' असें इगन्त अङ्ग नसून 'अद' असेंच अदन्त अङ्ग आहे असें मानणें भाग आहे व त्यामुळें 'ङे' चे जागीं 'स्मै' आदेशाची प्राप्ति होते. तसेंच शंकाकाराच्या मताप्रमाणें सापादिक नुमागम कर्तव्य असतां पूर्वी झालेलें त्रैपादिक मुत्वकार्य असिद्ध ठरत नाहीं असें मानल्यास, 'अमु' या इगन्त अङ्गापुढें 'ङे = ए' हा अजादि विभक्तिप्रत्यय असल्यामुळें, 'इकोऽचि विभक्तौ' या सूत्रानें नुमागमाची देखील प्राप्ति होते. या प्राप्त होणाऱ्या दोन कार्यांपैकीं 'स्मै' आदेश पूर्व सूत्रानें होणारा असून नुमागम पर सूत्रानें होणारा असल्यामुळें, 'विप्रतिषेधे परं कार्यम्' सू. १७५ या वचनान्वयें, नुमागम प्रथम होण्याची आपत्ति येते. नुमागम प्रथम करून 'अमुन् ङे' अशी स्थिति झाली असतां अङ्ग हलन्त होत असल्यामुळें, अदन्त सर्वनामरूप अङ्गापुढील 'ङे' प्रत्ययाचे जागीं होणारा 'स्मै' आदेश या स्थलीं करतां येऊं शकत नाहीं. त्यामुळें 'अमुष्मै' असें इष्ट रूप सिद्ध न होतां 'अमुन् ङे = अमुन् ए = अमुने' असें अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येते. म्हणून 'न मु ने' या सूत्रांतील 'ने' या पदानें नुमागमाचें देखील ग्रहण होतें असें जें शंकाकाराचें म्हणणें आहे तें बरोबर मानलें असतां वर दर्शविलेली आपत्ति येत असल्यामुळें, 'ने' या पदानें नुमागमाचें ग्रहण न करितां प्रकृत सूत्रानें होणाऱ्या नादेशाचेंच ग्रहण करणें योग्य आहे असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे असें शब्दरत्नकार म्हणतात. तसें मानलें असतां, 'अदस् ङे = अद ङे = अद स्मै = अमु स्मै = अमुष्मै' असें इष्ट रूप सिद्ध होतें. मुत्व प्रथम केलें तरी, अमु ङे' या स्थलीं 'सर्वनाम्नः स्मै' या सूत्राच्या दृष्टीनें पूर्वी केलेलें मुत्व असिद्ध ठरत असल्यामुळें, 'अमु' असें इगन्त अङ्ग नसून 'अद' असेंच अदन्त अङ्ग आहे असें मानतां येतें आणि त्यामुळें 'ङे' चे जागीं 'स्मै' आदेश होण्यांत व 'अमुष्मै' हें रूप सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं.) 'अमुष्मै कुलायेत्याद्यसिद्धयापत्तेः'

या मनोरमेच्या पक्तीत जो 'आदि' शब्द घातला आहे त्यानें 'अमू वुले, अमुयो·' याचे ग्रहण होते. या दोन्ही उदाहरणात एत्वाची प्रथम प्रवृत्ति न करिता, प्रथम मुत्व करून नतर नुमागम केल्यानें अनिष्ट रूपें होतील हे अगदी स्पष्ट आहे. ('अदस् औ' या स्थली त्यदाद्यत्व व पररूप एकादेश करून आणि 'नपुसकाच्च' सू. ३१० या सूत्रानें 'औ' चे जागी 'शी = ई' आदेश करून 'अद ई' अशी स्थिति झाली असता, मुत्व केल्यानें नुमागम होऊ शकत असल्यामुळें, 'आद्गुणः' सू. ६९ या सूत्रानें गुणरूप एकादेश, म्हणजे एत्व, प्रथम न करिता त्रैपादिक मुत्व प्रथम केल्याने जेव्हा 'अमु ई' अशी स्थिति होते तेव्हा 'आद्गुणः' या सापादिक सूत्राच्या दृष्टीनें मुत्व असिद्ध असल्यामुळें व 'अद ई' अशीच स्थिति आहे असें मानावे लागत असल्यामुळें, 'आद्गुण.' या सूत्राने गुणरूप एकादेशाची प्राप्ति होते तसेच शकाकाराच्या मतान्वयें नुमागम कर्तव्य असता पूर्वी केलेले मुत्व असिद्ध ठरत नसल्यामुळें आणि अशा रीतीने इगन्त अङ्गापुढें अजादि प्रत्यय आहे असे मानता येत असल्यामुळें, 'इकोऽचि विभक्तौ' या सूत्रानें नुमागमाची देखील प्राप्ति होते हे नुमागमाचे सूत्र 'आद्गुणः' या सूत्राच्या मानानें पर सूत्र असल्यामुळें, 'पूर्वात्पर बलवत्' या न्यायान्वयें, नुमागम प्रथम केल्यास, 'अमुन् ई' अशी स्थिति होणार व अशा स्थितीत अवर्णापुढे 'ई' हा अच् येत नसून तो नकारापुढें येत असल्यामुळें, 'आद्गुण ' हे सूत्र प्रवृत्त होऊ शकत नाही व 'अदे' असे एदन्त रूप होऊं शकत नाही त्यामुळे 'अदे' असे रूप झाले असता मुत्व केल्यानें 'अमू' असे जें इष्ट रूप सिद्ध करता येते ते सिद्ध न होता 'अमुन ई अमुनी' असे अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येते त्याचप्रमाणे 'अदस् ओस् = अद ओस्' या स्थली 'ओसि च' सू २०७ या सापादिक सूत्रानें प्रथम एत्व न करिता शकाकाराच्या मते नुमागमाच्या दृष्टीनें सिद्ध ठरत असलेले मुत्व प्रथम केल्यास, नतर नुमागम केल्यावर 'अमुन् ओस् =अमुनोः'

असें अनिष्ट रूप होईल व 'अद ओस् = 'अदे ओस् = अदयोः = अमुयोः' असें इष्ट रूप सिद्ध होणार नाहीं. या सर्व आपत्ति टाळण्याकरितां, वर सांगितल्याप्रमाणें, 'न मु ने' या सूत्रांतील 'ने' या पदानें नुमागमाचें देखील ग्रहण न करितां केवळ नादेशाचेंच ग्रहण करणें योग्य आहे असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे.) 'न मु टादेशे' असें जें 'न मु ने' या सूत्रावर वार्तिककारानें वार्तिक पठित केलें आहे त्या वार्तिकाचें स्वारस्य लक्षांत घेतलें असतां, त्यावरून देखील त्या सूत्रांतील 'ने' या पदाचा 'नादेश' असाच अर्थ करणें योग्य ठरतें हें देखील जाणावें. (जर 'न मु ने' या सूत्रांतील 'ने' या पदाचा 'नादेशे नुमि च' असा अर्थ होणें इष्ट असतें तर, वार्तिककारानें 'ने' चे जागीं 'टादेशे' एवढेंच पद न घालतां 'टादेशे नुमि च' हीं पदें घातलीं असतीं. यावरून देखील हेंच सिद्ध होतें कीं, 'न मु ने' या सूत्राचा 'नाभावे नुमिच कर्तव्ये मुत्वं नासिद्धम्' असा अर्थ करणें उचित नसून, त्या सूत्राचा कौमुदींत जसा अर्थ केला आहे तसाच अर्थ करणें योग्य आहे.)

मनोरमा—"अच्च घेः" "इदुद्भ्याम्" इति "ङेः" इति "औत्" इति च पदत्रयमनुवर्तते इत्याशयेन व्याचष्टे—"इदुद्भ्यामुत्तरस्य" इत्यादिना। घेरुत्तरस्येति तु नोक्तम्। सूत्रे "घेः" इत्यस्य षष्ठ्यन्तत्वात्। तन्त्रावृत्त्यादौ च प्रमाणाभावात् "औत्" इति पूर्वसूत्रे इदुद्भ्यामुत्तरस्य, ङेरिति क्लृप्तसम्बन्धस्य त्यागायोगाच्च। औत्स्यादिति। अत्र व्याचख्युः—औतस्तित्त्वं स्वरितार्थम्। "न विभक्तौ" इतीत्संज्ञानिषेधस्तु न भवति, अनित्यत्वात्। अनित्यत्वं च "इदमस्थमुः" इति थमो मकारस्येत्संज्ञापरित्राणार्थादुदित्करणाल्लभ्यत इति तत्रैवोक्तमिति। तच्चिन्त्यम्। "न विभक्तौ" इति सूत्रे ङेरौतस्तकार उच्चारणार्थः नेत्संज्ञ इति स्वयमेवोक्तत्वेन पूर्वापरविरोधात्। युक्तं चोच्चारणार्थत्वं न तु स्वरितार्थत्वम्। "स्तीर्णे बर्हिषि समिधाने अग्नौ" इत्यादौ स्वरितत्वादर्शनात्।

"अत्" इति तपरत्वं तु युष्मदित्यादावत्वे कृते स्त्रियां टाप् मा भूद् इत्येतदर्थमित्याहुः। तदपि चिन्त्यम्। तपरग्रहणाद्धि टापा सह दीर्घो मा भूत् टाप् तु स्यादेव। लक्षणद्वयबाधे मानाभावात्। अत एव "कृन्मेजन्तः" इति सूत्रभाष्यवार्तिकयोर्विवरणे च सन्निपातपरिभाषया टाब् नेत्युक्तम्। टापा व्यवधाने हि आनन्तर्यविघातः स्यादिति। तस्माद् औन इव अतोऽपि तपरकरणमुच्चारणार्थमेवेत्यवधेयम्।

'अच्च घेः' सू. २४७ या सूत्रात 'इदुद्भ्याम्' व 'औत्' ही पूर्व सूत्रें व 'ङेराम्' या पूर्व सूत्रातील 'ङेः' हें पद अनुवृत्त होत असल्यामुळें, 'अच्च घेः' या सूत्राचा कौमुदीत 'इदुद्भ्यामुत्तरस्य ङेः औत् स्यात्, घेः अन्तादेशश्च अकारः' असा अर्थ केला आहे. 'घेः उत्तरस्य ङेः औत् स्यात्' असा (जो काशिकाकार व प्रक्रियाकौमुदीकार यानी सूत्रार्थ केला आहे तसा) सूत्रार्थ केला नाही; कारण प्रकृत सूत्रातील 'घेः' हें पद (परपञ्चमी नसून) षष्ठ्यन्त पद आहे तन्त्र, आवृत्ति इत्यादि मानण्यास, म्हणजे 'घेः' या पदाचे 'घेः उत्तरस्य ङेः' व 'घेश्च अकारादेशः' असे दोनदा उच्चारण करण्यास, काहीच प्रमाण नाही आणि तसेच 'औत्' या पूर्व सूत्रात 'इदुद्भ्यामुत्तरस्य ङे.' ही पदें परस्परान्वित अनुवृत्त होत असून 'ङे' हें पद 'इदुद्भ्यामुत्तरस्य' याशी संबद्ध होऊन जसे अनुवत्त होते तशा त्या क्लृप्तसबंधाचा प्रकृत सूत्रात त्याग करणे उचित नाही. ('घे उत्तरस्य ङेः औत् स्यात, घेरन्तादेशश्चाकारः' असा प्रक्रियाकौमुदीकारानी काशिकान्वयें प्रकृत सूत्राचा अर्थ केला आहे पण तसा अर्थ केल्यास, 'घे' हे पद दोनदा उच्चारावे लागते व प्रथम उच्चारलेले ते पद परपञ्चमी मानून दुसऱ्यानें उच्चारलेले ते पद स्थानषष्ठी मानावी लागते. तसे द्विरुच्चारण करण्यास व तसे मानण्यास काही प्रमाण नाही, म्हणजे वार्तिककार व भाष्यकार यानी तसे केले नाही. दुसरे असे की, प्रकृत सूत्रात, वर सांगितल्याप्रमाणे, 'इदुद्भ्यामुत्तरस्य ङेः' ही पदें अनुवृत्त होत

असल्यामुळें, प्रक्रियाकौमुदीकारांनीं जसा तन्त्रावृत्तीचा आश्रय करून प्रकृत सूत्राचा अर्थ केला आहे तसें करण्याची कांहीच गरज नाहीं. ) प्रकृत सूत्राचें व्याख्यान करितांना प्रकाशकारांनीं असें म्हटलें आहे की, प्रकृत सूत्रांत 'औ' हा आदेश 'औत्' अशा रीतीनें जो तित् केला आहे तो एवढ्याकरितांच कीं, ('तित्स्वरितम्' सू. ३७२९ या सूत्रानें ) स्वरित स्वर व्हावा. ( परंतु हें म्हणणें बरोबर मानल्यास, 'औत्' यांतील अन्त्य तकार उच्चारणार्थ न मानतां इत्संज्ञक मानावा लागेल. पण 'न विभक्तौ तुस्माः' सू. १९० हें इत्संज्ञेचें निषेधक सूत्र असल्यामुळें आणि विभक्तिप्रत्ययाचे जागीं आदेश झाल्यावर तो आदेश स्थानिवद्भावानें विभक्तिप्रत्यय ठरत असल्यामुळें 'औत्' यांतील तकार इत्संज्ञक मानतां येत नाहीं असें कोणी म्हटल्यास, त्यावर प्रकाशकार असें उत्तर देतात कीं, ) 'न विभक्तौ तुस्माः' हा निषेध 'औत्' या स्थलीं प्रवृत्त होत नाहीं; कारण तो अनित्य आहे व तो निषेध अनित्य आहे याला, 'इदमस्थमुः' सू. १९७२ या सूत्रानें 'थमु' या प्रत्ययांतील मकाराला इत्संज्ञा होऊं नये याकरितां त्या प्रत्ययाचें जें उदित्करण केलें आहे तें उदित्करण, प्रमाण आहे असें तेथेंच, म्हणजे 'न विभक्तौ तुस्माः' या सूत्रावरील भाष्यांतच, म्हटलें आहे. ( जरी 'विभक्तिश्च' सू. १८४ या सूत्रान्वयें 'सुप्' व 'तिङ्' प्रत्ययांनाच विभक्तिसंज्ञा आहे तरी, प्राग्दिशीयप्रकरणांत पठित असलेल्या तद्धित प्रत्ययांना देखील 'प्राग्दिशो विभक्तिः' सू. १९४७ या सूत्रान्वयें विभक्तिसंज्ञा आहे आणि 'इदमस्थमुः' हें सूत्र त्या प्रकरणांत पठित असल्यामुळें, 'थमु' हा तद्धित प्रत्यय विभक्तिसंज्ञक ठरतो. या विभक्तिसंज्ञक प्रत्ययांत जरी अन्त्य उकार उच्चारणार्थ नसता तरी, 'न विभक्तौ तुस्माः' या निषेधक सूत्रान्वयें त्या प्रत्ययांतील मकाराला 'हलन्त्यम्' सू. १ या सूत्रानें होणारी इत्संज्ञा झालीच नसती. तरी पण पाणिनीनें 'थमु' प्रत्ययांतील अन्त्य मकाराचा लोप न होतां तो मकार कायम राहावा याकरितां त्या प्रत्ययांतील

मकारापुढें उकार जोडून तो प्रत्यय उच्चारला असल्यामुळें, त्या उदित्करणावरून हे ज्ञापित होते की, 'न विभक्तौ तुस्माः' हा निषेध अनित्य आहे व त्या निषेधाच्या अनित्यत्वामुळें त्याची 'औत्' या प्रत्ययाच्या ठिकाणी प्रवृत्ति न केल्यानें, त्या 'औत्' प्रत्ययातील तकार इत्सञ्ज्ञक आहे व तो प्रत्यय स्वरित व्हावा या प्रयोजनाकरिता तो तित् केला आहे, म्हणजे त्याला इत्सञ्ज्ञक तकार जोडला आहे, असे मानता येते असा प्रकाशकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. पण दीक्षित म्हणतात की प्रकाशकाराचे) हे म्हणणे बरोबर नाही; कारण 'न विभक्तौ तुस्माः' या सूत्राचे व्याख्यान करतेवेळी 'ङे' चे जागी होणाऱ्या 'औत्' यातील तकार उच्चारणार्थ असून इत्सञ्ज्ञक नाही असे प्रकाशकारानी स्वत.च म्हटले असल्यामुळें त्याच्या पूर्वापर म्हणण्यात विरोध येतो. वास्तविक 'औत्' यातील तकार उच्चारणार्थ असून, तो 'औत्' स्वरित व्हावा याकरिता त्याला तकारानुबन्ध जोडला नाही हेंच मानणे उचित आहे, कारण 'स्तीर्णे बर्हिषि समिधाने अग्नौ' इत्यादि श्रुतीत 'अग्नौ' इत्यादि पदातील औकार स्वरित पठित नाही. ('न विभक्तौ तुस्माः' सू. १–३–४ या सूत्रावरील भाष्यात 'विभक्तौ तवर्गप्रतिषेधोऽतद्धिते' हे वार्तिक पठित करून त्या वार्तिकाचे व्याख्यान करिताना भाष्यकार म्हणतात–'विभक्तौ तवर्गप्रतिषेधोऽतद्धित इति वक्तव्यम् । इह मा भूत् । किमोऽत् । .. स तर्हि प्रतिषेधो वक्तव्यः ? । न वक्तव्य. । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न विभक्तौ तद्धिते प्रतिषेधो भवतीति यदयमिदमस्थमुः इति मकारस्येत्संज्ञापरित्राणार्थमुकारमनुबन्धं करोति ।' भाष्यकाराच्या म्हणण्याचा आशय हा आहे की, 'इदमस्थमुः' या सूत्रानें होणाऱ्या 'थमु' प्रत्ययातील मकाराला इत्सञ्ज्ञा होऊ नये व तो मकार कायम राहावा याकरिता त्या मकारापुढें इत्सञ्ज्ञक उकार हा अनुबन्ध आचार्य पाणिनीनें जोडला असल्यामुळें त्यावरून हे ज्ञापित होते की, तद्धित विभक्तिसञ्ज्ञक प्रत्ययाना 'न विभक्तौ

तुस्माः' हा प्रतिषेध लागू पडत नाहीं. या भाष्यांच्या आधारेच प्रकाशकारांनीं 'न विभक्तौ तुस्माः' या निषेध अनित्य आहे असें म्हटलें असावें व या निषेधाच्या अनित्यत्वामुळें 'अच्च घेः' या प्रकृत सूत्रानें 'ङि' प्रत्ययाचे जागीं होणाऱ्या 'औत्' या आदेशाचे ठिकाणीं तो निषेध प्रवृत्त न केल्यास, 'औ' ला जोडलेला तकारानुबन्ध इत्संज्ञक ठरतो आणि कोणत्या तरी विशिष्ट प्रयोजनाकरितां इत्संज्ञेचें विधान केलें जात असल्यामुळें, 'औ' हा आदेश 'तित्स्वरितम्' या सूत्रान्वयें स्वरित व्हावा या प्रयोजनाच्या सिद्धीकरितां त्या आदेशाला तकारानुबन्ध लावला आहे असें प्रकाशकारांचें म्हणणें आहे. यावर दीक्षित असें म्हणतात कीं, प्रकाशकारांचें म्हणणें बरोबर मानल्यास, ज्या शब्दस्वरूपांत प्रकृत सूत्रानें 'औ' आदेश झाला आहे असे श्रुतींत आढळणारे शब्द स्वरितान्त पठित असावयास पाहिजे होते; पण ते तसे पठित केलेले आढळत नसल्यामुळें, प्रकाशकारांचें म्हणणें स्वीकारतां येत नाहीं. दुसरें असें कीं, प्रकाशकारांनीं स्वतःच म्हटलें आहे कीं, प्रकृत सूत्रानें 'ङि' चे जागीं होणाऱ्या 'औत्' या आदेशांतील तकार उच्चारणार्थ असून इत्संज्ञक नाहीं. अशा रीतीनें त्यांच्या म्हणण्यांत पूर्वापर विरोध येत असल्यामूळें देखील, त्यांचें म्हणणें स्वीकारतां येत नाहीं. 'तस्य लोपः' सू. १–३–९ या सूत्रावरील भाष्यांत 'कार्यं करिष्यामीत्यनुबन्ध आसज्यते, कार्यादिन्यत् मा भूदिति लोपः' असें भाष्यकारांनीं म्हटलें असल्यामुळें, दीक्षित असें म्हणतात कीं, जेथें कांहीं विशिष्ट प्रयोजनाकरितां अनुबन्ध लावला जातो तेथेंच त्याला इत्संज्ञा होते; पण जेथें कोणत्याहि प्रयोजनाकरितां अनुबन्ध लावला जात नसून केवळ उच्चारणार्थ लावला जातो तेथें तसा उच्चारणार्थक निष्प्रयोजनक अनुबन्ध इत्संज्ञक मानतां येत नाहीं आणि ज्याअर्थी 'औत्' या आदेशाला कोणत्याहि विशिष्ट प्रयोजनाकरितां तकारानुबन्ध जोडला नसून केवळ उच्चारणार्थ–मुखसुखार्थ–जोडला आहे त्याअर्थी तो इत्संज्ञक आहे असें जें प्रकाशकारांचें

म्हणणे आहे ते चूक ठरते या विषयाचे अधिक विवरण शब्दरत्नात करण्यात येईल ) प्रकाशकारानी असे म्हटले आहे की, 'अच्च घे.' या प्रकृत सूत्रात 'अत्' असे जें तपरकरण केले आहे ते अशाकरिता केले आहे की, त्या सूत्रानें 'बुद्धो' इत्यादि उदाहरणात (इकाराचे जागी) अकारादेश केल्यावर ('अजाद्यतष्टाप्' सू. ४५४ या सूत्रानें) जो 'टाप्' हा स्त्रीप्रत्यय प्रावतो तो न व्हावा पण हे म्हणणे देखील बरोबर मानता येत नाही, कारण 'टाप्' प्रत्यय होणे टाळता येत नाही, 'टाप्' प्रत्यय झाल्यावर 'अ' हा आदेश व 'टाप् = आ' हा स्त्रीप्रत्यय या दोहोचे जागी जो ('अकः सवर्णे दीर्घः' सू ८५ या सूत्रानें) सवर्णदीर्घ एकादेश पावतो तो न व्हावा (व अकारच कायम राहावा) याकरिता 'अत्' असे तपरकरण केले आहे एवढेंच फार तर म्हणता येतें; कारण त्या तपरकरणानें दोन सूत्राचा, म्हणजे 'अजाद्यतष्टाप्' व 'अक. सवर्णे दीर्घ' या दोन सूत्राचा, बाध होतो असे मानण्यास काहीच प्रमाण नाही (म्हणून 'अजाद्यतष्टाप्' या सूत्राचा बाध न होता 'अक. सवर्णे दीर्घ' हेच सूत्र तपरकरणानें बाधित होते हें म्हणणे उचित ठरते.) म्हणूनच 'कृन्मेजन्तः' सू १-१-३९ या सूत्रावरील भाष्यात, वार्तिकात व कैयटविवरणात, सन्निपातपरिभाषा–परि. ८६–असल्यामुळें 'टाप्' प्रत्यय होत नाही, असे म्हटले आहे, कारण 'टाप्' केल्यास त्याच्या व्यवधानामुळें (निमित्तक अङ्ग व 'ङि' हा विभक्तिप्रत्यय याचे) आनन्तर्य नष्ट होण्याची आपत्ति येते. म्हणून ज्याप्रमाणे 'औत्' यातील तकार उच्चारणार्थ आहे त्याचप्रमाणे 'अत्' यातील तकार देखील उच्चारणार्थच आहे हे ध्यानात ठेवावे (प्रकाशकार व प्रसादकार या दोघाचेहि असे म्हणणे आहे की, 'बुद्धो' या स्थली प्रकृत सूत्रानें 'बुद्धि' यातील अन्त्य इकाराचे जागी अकारादेश केल्यावर 'बुद्ध' असे जें अदन्त अङ्ग होते त्याहून 'अजाद्यतष्टाप्' या सूत्रानें 'टाप्' प्रत्ययाची प्राप्ति होते व 'टाप्' प्रत्यय केल्यास 'बुद्ध टाप् = बुद्ध आ = बुद्धा' असे 'अकः सवर्णे दीर्घः' या

सूत्रान्वयें सवर्णदीर्घरूप एकादेश होऊन आबन्त रूप होत असल्या-कारणानें 'ङेराम्नद्याम्नीभ्यः' सू. २७० व 'याडापः' सू. २९० हीं सूत्रें प्रवृत्त होण्याची व 'बुद्धौ' असें इष्ट रूप सिद्ध न होतां 'बुद्धायाम्' असें अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येते. ती आपत्ति टळावी याकरितां 'अत्' असें प्रकृत सूत्रांत तपरकरण केलें आहे व त्या तपरकरणामुळें 'अजाद्यतष्टाप्' हें सूत्र प्रवृत्त होत नाहीं; कारण तें सूत्र प्रवृत्त केल्यास अङ्गाचें अदन्तत्व नाहींसें होऊन तें अङ्ग आबन्त होण्याची व तपरकरण व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते. अशा रीतीनें 'अजाद्यतष्टाप्' या सूत्राची निवृत्ति झाल्यानें 'अकः सवर्णे दीर्घः' या सूत्राची प्रवृत्ति होण्याचा प्रसंगच येत नाहीं. सारांश 'अत्' या तपकरणानें प्रकाशकार 'अजाद्यतष्टाप्' व 'अकः सवर्णे दीर्घः' या दोन्ही सूत्रांचा बाध करूं इच्छितात. यावर दीक्षितांचें असें म्हणणें आहे कीं, जर 'अकः सवर्णे दीर्घः' एवढ्या एकाच सूत्राचा बाध मानल्यानें काम भागूं शकतें व तपरकरण चरितार्थ होतें तर 'अजाद्यतष्टाप्' या सूत्राचा देखील बाध होतो असें मानण्याची गरज काय ? अकारादेश केल्यानें अदन्त अङ्ग होत असल्यामुळें 'अजाद्यतष्टाप्' या सूत्रानें जी 'टाप्' प्रत्यय होण्याची प्राप्ति होते तिचें निवारण करणें शक्य नाहीं. तपरकरणाच्या सामर्थ्यानें एवढेंच म्हणतां येऊं शकतें कीं, 'टाप् = आ' प्रत्यय केल्यावर 'अ' व 'आ' यांचे जागीं सवर्णदीर्घ एकादेश न होतां 'अ' हा अकाररूपानेंच कायम राहतो. त्यामुळें अङ्गाचें अदन्तत्व नष्ट होत नाहीं आणि 'ङेराम्' व 'याडापः' या सूत्रांची प्रवृत्ति होणें आपोआपच टळते व 'बुद्ध औ = बुद्धौ' असें इष्ट रूप 'वृद्धिरेचि' सू. ७२ या सूत्रान्वयें सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. दुसरें असें कीं, 'बुद्धौ' इत्यादि उदाहरणांत 'अजाद्यतष्टाप्' या सूत्राची वास्तविक प्रवृत्तीच होऊं शकत नाहीं; कारण 'बुद्धि ङि' या स्थलीं प्रकृत सूत्रानें 'बुद्धि' यांतील इकाराचे जागीं अकारादेश केल्यावर 'बुद्ध ङि' अशी स्थिति झाली

असता, 'वृद्ध' या अदन्त अङ्गाहून 'टाप्' प्रत्यय केल्यास घिसंज्ञक अङ्ग व 'ङि' प्रत्यय या दोहोंमध्यें 'टाप्' चे व्यवधान होऊन त्या दोहोंच्या सन्निपाताचा नाश होण्याची आपत्ति येते सारांश 'वृद्धि ङि' या सन्निपातामुळें जो इकाराचे जागी अकारादेश झाला आहे तो अकारादेश घिसंज्ञक अङ्ग व 'ङि' प्रत्यय या दोहोंच्या सन्निपाताचा नाश करणाऱ्या 'टाप्' प्रत्ययाची प्रवृत्ति होऊं देण्यास कारणीभूत होऊं शकत नाही म्हणून 'अत्' या तपरकरणानें 'अजाद्यतष्टाप्' या सूत्राची निवृत्ति होत नसून, सन्निपातपरिभाषेमुळें वास्तविक त्या सूत्राची निवृत्ति होते व त्यामुळें सवर्णदीर्घाची प्राप्तीच होत नाही म्हणून 'अत्' यातील तपरकरण कोणत्याहि विशिष्ट प्रयोजनाकरिता केले नसून केवळ उच्चारणार्थ केलें आहे हच मानणे उचित आहे असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे व ते आपल्या मताचे समर्थन करण्याकरिता 'क्रन्मेजन्त' सू १-१ ३९ या सूत्रावरील भाष्याचें प्रमाण देतात त्या भाष्यात भाष्यकार म्हणतात–'शकटी पद्धती । अत्वे कृतेऽत टाप्प्राप्नोति । सन्निपातलक्षणो विधिरनिमित्त तद्विघातस्येति दोषो न भवति ।' या भाष्यावरून हे स्पष्ट होते की, 'अत्' या तपरकरणामुळें 'अजाद्यतष्टाप्' हे सूत्र प्रवृत्त होत नाही असे नसून, वास्तविक सन्निपातपरिभाषा असल्यामुळें त्या सूत्राची प्रवृत्ति होऊं शकत नाहीं या भाष्याचे व्याख्यान करितांना कैयटानें 'विभक्तिसन्निपातकृतमत्व यदि टापो निमित्त स्याद् आनन्तर्यं विहन्येत । शास्त्रीये च कार्येऽन्तादिवद्भावो नानन्तर्ये लौकिके । टापि च सति शकटायामिति स्यात्' असे म्हटले आहे )

शब्दरत्न–नेतसंज्ञ इति । इयमपि तदुक्तिश्चिन्त्या "तस्य लोप" इति सूत्रभाष्ये उच्चारणार्थानामपीत्संज्ञकत्वस्य स्पष्टमुक्तत्वात् । स्वरितत्वादर्शनादिति । नन्वोत स्वरितत्वेऽपि नाग्नावित्यत्र स्वरितश्रवणमग्निशब्दस्यान्तोदात्तत्वेन "एकादेश उदात्तेन" इत्यनेनोदात्तत्वादिति चेन्न । वृत्तौ "अनुदात्तस्य"

इत्यस्य तत्रानुवर्तितत्वात्, शेषनिघातेनौकारस्वरितत्वमादायाग्निशब्दस्य सर्वानुदात्तत्वाच्च। स्वरि तस्य तु नोदात्तपदेन ग्रहणं "उदात्तस्वरितयोः" इत्यादौ स्वरितग्रहणात्। उच्चारणार्थानामित्संज्ञकत्वेऽपि 'प्रत्ययाप्रत्यययोः' इत्येव सिद्धे पुनः "तिति प्रत्ययग्रहणं कर्तव्यम्" इति वार्तिकेनौपदेशिकप्रत्ययत्ववत्येव तत्प्रवृत्त्या नात्र स्वरितत्वप्रवृत्तिरिति तत्त्वम्। आदेशेषु दकारस्थानिकचर्त्वनिष्पन्नतकारस्य सत्त्वेन दित्त्वात्तदप्राप्तेः। उच्चारणार्थं इत्यस्य च वर्णान्तरोच्चारणे मुखस्य क्लेशवारणार्थो नत्वन्यफलार्थं इत्यर्थः। अत एव भाष्ये औकारे ङितमाश्रित्यादिति प्रत्याख्यातम्। न हि तदा तित्त्वमस्ति। न च ङित्त्वे विंशतौ तिलोपापत्तिः। भाष्यप्रामाण्येन तस्य सप्तम्यामनभिधानादिति दिक्। अदिति। अस्य यदपीत्यादिः। दीर्घो मा भूदिति। भिन्नकालव्यावृत्त्यर्थत्वात्तपरत्वस्येति भावः। न च "ज्ञोऽविदर्थस्य" इति प्रकरणेन समासबाध इवानेन टापोऽपि बाध इति वाच्यम्। "प्रतिपदविधाना षष्ठी न समस्यते" इति वार्तिकानुरोधेन तत्र तथा कल्पनेऽपीह तथा कल्पने मानाभावात्।

'ङेरौतस्तकार उच्चारणार्थः नेत्संज्ञः' असें जें प्रकाशकारांनी 'न विभक्तौ तुस्माः' या सूत्राचें व्याख्यान करितांना म्हटलें आहे तें देखील चूक आहे; कारण 'तस्य लोपः' १-३-९ या सूत्रावरील भाष्यांत स्पष्ट म्हटलें आहे कीं, जे वर्ण (अनुबन्धरूपानें प्रत्यय आदेश इत्यादिकांना) उच्चारणार्थ लावले जात असतात ते देखील इत्संज्ञक असतात. (वास्तविक 'उच्चारणार्थानामपि इत्संज्ञकत्वम्' असें 'तस्य लोपः' या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं कोठेंहि स्पष्टपणें म्हटलें नाहीं. पण त्या भाष्यावरून कित्येक वैयाकरण असा तात्पर्यार्थ काढतात कीं, उच्चारणार्थ असलेल्या वर्णांना इत्संज्ञा नसून देखील जर उच्चारणरूप प्रयोजन त्या वर्णांनीं सिद्ध करून दिल्यावर, कोणत्याहि सूत्राच्या अभावीं, त्यांचा आपोआप लोप होऊं शकतो तर जें इत्संज्ञक अनुबन्ध कांहीं विशिष्ट प्रयोजनाकरितां

लावले जात असतात ते देखील आपले कार्य केल्यावर आपोआपच निवृत्त होतील व अशा रीतीने 'तस्य लोपः' सू. ६२ हे व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते. म्हणून ते सूत्र चरितार्थ ठरण्याकरिता हे मानणे आवश्यक आहे की, जे अनुबन्ध केवळ उच्चारणार्थ लावले जातात व तसेच जे अनुबन्ध काही विशेष प्रयोजनाकरिता लावले जातात त्या दोन्ही प्रकारच्या अनुबन्धांना इत्संज्ञा होत असून त्यांचा 'तस्य लोपः' या सूत्राने लोप होतो. साराश 'तस्य लोपः' या सूत्रातील 'तस्य' या पदाने वरील दोन्ही प्रकारच्या अनुबन्धांचा परामर्श होतो 'तस्य लोपः' सू. १–३–९ या सूत्रावरील भाष्यातील 'दिव औत्' हे प्रतीक घेऊन त्याचे व्याख्यान करिताना उद्योतकार म्हणतात– 'दिव औदिति । यद्यप्ययमुच्चारणार्थस्तथापि समभिव्याहृतवर्णोच्चारणे सहायसम्पादकतया तस्य चरितार्थ्येन विधेयविषये विशिष्टस्यापि विधेयत्वसम्भावनासत्वाद् इत्संज्ञालोपयोः प्रवृत्तयोर्बाधे मानाभावादुच्चारणार्थानामपीत्वमस्त्येव । किंच सद्भावे उच्चारितस्य निवृत्तिः कथं स्यादितिभावः । एतेनोच्चारणार्थानामित्संज्ञा नेति नव्योक्तिः परास्ता । स्तीर्णे बर्हिषि समिधानेऽग्नाविन्यादौ डेरौति स्वरितत्वाभावस्तु छान्दसत्वादिति बोध्यम् ।' उद्योतात हे जे मत प्रदर्शित केले आहे तेच शब्दरत्नातील प्रकृत पक्तीत प्रतिपादित केले आहे ) 'स्तीर्णे बर्हिषि...स्वरितत्वादर्शनात्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्यावर शकाकार असे म्हणतो की, 'औ' हा आदेश स्वरित असून देखील 'अग्नौ' या स्थली 'औ' चे ठिकाणी जें स्वरितस्वराचे श्रवण होत नाही त्याचे कारण हे की, 'अग्नि' हा शब्द अन्तोदात्त असल्यामुळें, 'एकादेश. उदात्तेनोदात्त ' सू ३६५८ या सूत्रान्वयें 'औ' हा एकादेश उदात्त होतो. (शकाकाराचे असें म्हणणे आहे की, जरी 'औत्' हा तित् आदेश स्वरित आहे तरी, 'फिषोऽन्त उदात्त ' फिट् सू १ या सूत्रान्वयें 'अग्नि' हे प्रातिपदिक अन्तोदात्त असल्यामुळें, म्हणजे त्या प्रातिपदिकातील अन्त्य इकार उदात्त असल्यामुळें. त्या इकाराचे जागी

'अच्च घेः' या प्रकृत सूत्रानें झालेला 'अ' हा आदेश 'स्थानेऽन्तरतमः' सू. ३९ या सूत्रान्वयें आन्तरतम्यानें उदात्त होतो व तो उदात्त अकार आणि त्या पुढील 'ङि' प्रत्ययाचे जागीं झालेला 'औ' हा स्वरित आदेश या दोहोंचे जागीं 'वृद्धिरेचि' सू. ७२ या सूत्रानें 'औ' असा जो वृद्धिरूप एकादेश होतो तो 'एकादेशः उदात्तेनोदात्तः' या सूत्रान्वयें उदात्त होतो आणि त्यामुळें मनोरमेंत दिलेल्या श्रुतींतील 'अग्नौ' यांतील 'औ'चे ठिकाणीं स्वरित स्वराचें श्रवण होत नाहीं. यावर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं, शंकाकाराचें) हें म्हणणें बरोबर नाहीं; कारण 'एकादेशः उदात्तेनोदात्तः' या सूत्रांत ('उदात्तस्वरितयोर्यणः स्वरितोऽनुदात्तस्य' या पूर्व सूत्रांतून) 'अनुदात्तस्य' हें पद काशिकाकारांनीं अनुवृत्त केलें आहे. ('एकादेशउदात्तेनोदात्तः' सूत्रावरील काशिकेंत 'उदात्तेन सहानुदात्तस्य य एकादेशः स उदात्तो भवति । अनुदात्तस्येति वर्तते' असें म्हटलें आहे. 'अग्नि औ' या स्थलीं पूर्वी सांगितल्याप्रमाणें 'अग्नि' यांतील अन्त्य इकार उदात्त असून त्याचे जागीं प्रकृत सूत्रानें होणारा 'अ' हा आदेश आन्तरतम्यानें उदात्त होत असल्यामुळें, तथा उदात्त 'अ' व स्वरित 'औ' यांचे जागीं झालेल्या 'औ' या वृद्धिरूप एकादेशाला काशिकेंत दिलेल्या अर्थान्वयें 'एकादेश उदात्तेनोदात्तः' हें सूत्र लागू पडत नाहीं हें उघड आहे. अनुदात्त व उदात्त यांचे जागीं झालेला एकादेशच त्या सूत्रान्वयें वृत्तिकारमतें उदात्त होतो. म्हणून प्रकृत सूत्रानें होणारा आदेश स्वरित असता तर, 'अग्नौ' या स्थलीं 'औ'चे ठिकाणीं स्वरित स्वरानें श्रवण व्हावयास पाहिजे होतें) दुसरें असें कीं, 'औत्' हा आदेश स्वरित मानल्यास, त्याच्या स्वरितत्वामुळें शेषनिघातानें, म्हणजे 'अनुदात्तं पदमेकवर्जम्' ३६५० या सूत्रान्वयें, 'अग्नि' हा शब्द सर्वानुदात्त होतो. 'एकादेश उदात्तेनोदात्तः' या सूत्रांतील 'उदात्तेन' या पदानें स्वरिताचें ग्रहण होऊं शकत नाहीं; कारण 'उदात्तस्वरितयोर्यणः'

इत्यादि सूत्रांत ( उदात्तानें ग्रहण केले असून देखील ) स्वरिताचे पृथक् ग्रहण केले आहे. ( 'अग्नि ङि = अग्न औ' या समुदायाला 'सुप्तिङन्तं पदम्' सू. २९ या सूत्रानें पदसंज्ञा होते व 'अग्न' यातील अन्त्य अकार, वर सांगितल्याप्रमाणे, जरी उदात्त आहे तरी, 'औ' हा स्वरित मानल्यास, 'यस्मिन् पदे यस्योदात्तः स्वरितो वा विधीयते तमेकमचं वर्जयित्वा शेषं तत्पदमनुदात्ताच्कं स्यात्' या अर्थाच्या वाचक 'अनुदात्तं पदमेकवर्जम्' या सूत्रान्वयें 'अग्न' यातील उदात्त अकार अनुदात्त होतो. या स्थली 'अग्न' यातील अन्त्य 'अ' जरी अनुदात्त आहे तरी त्यापुढील 'औ' हा उदात्त नसून स्वरित असल्यामुळें, येथें 'एकादेश उदात्तेनोदात्तः' या सूत्राची प्रवृत्ति मुळीच होऊं शकत नाही. या सूत्रांतील 'उदात्तेन' या पदानें स्वरिताचे देखील ग्रहण होते व 'उदात्तेन स्वरितेन वा सहानुदात्तस्य य एकादेशः स उदात्तो भवति' असा त्या सूत्राचा अर्थ होतो आणि त्या अर्थान्वयें 'अग्नौ' इत्यादि स्थली अनुदात्त व स्वरित या दोहोंचे जागी होणारा एकादेश उदात्त होत असल्यामुळें 'अग्नौ' यातील 'औ' चे ठिकाणी स्वरित स्वराचें श्रवण होत नाही असे कोणी म्हटल्यास, ते म्हणणे बरोबर नाही; कारण 'उदात्तस्वरितयोर्यणः' इत्यादि सूत्रात उदात्त व स्वरित या दोहोंचेहि पृथक् ग्रहण केले असल्यामुळें, उदात्तानें स्वरिताचे ग्रहण होत नाही हे उघड होते. जर उदात्तानें स्वरिताचे देखील ग्रहण होऊ शकले असते तर, पाणिनीनें 'उदात्तस्वरितयोर्यणः' इत्यादि सूत्रात उदात्त व स्वरित या दोहोंचेहि ग्रहण न करिता, केवळ उदात्ताचेच ग्रहण केले असते साराश अनुदात्त 'अ' व स्वरित 'औ' याचे जागी होणाऱ्या एकादेशाला 'एकादेश उदात्तेनोदात्तः' हे सूत्र लागू पडत नसल्यामुळें, 'अग्नौ' यातील 'औ' स्वरितस्वरयुक्त श्रुतीत पठित असावयास पाहिजे होता. पण ज्याअर्थी 'अग्नौ' यातील 'औ' श्रुतीत स्वरितस्वरयुक्त पठित नाही त्याअर्थी हे स्पष्ट होतें की, 'ङि' प्रत्ययाचे जागी होणारा 'औ' हा आदेश स्वरित नाही आणि म्हणून

'औत्' यांतील तकारानुबन्धाचें ग्रहण स्वरितार्थ नसून केवळ उच्चारणार्थ आहे असेंच मानणें योग्य आहे.) आणखी असें कीं, उच्चारणार्थक वर्ण जरी इत्संज्ञक होतात तरी 'प्रत्ययाप्रत्यययोः प्रत्ययस्यैव ग्रहणम्' – परि. १११ – या परिभाषान्वयें ( 'तित्स्वरितम्' सू. ३७२९ या सूत्रांतील 'तित्' या शब्दानें ) तित्-प्रत्ययाचेंच ग्रहण सिद्ध होत असून वार्तिककारानें त्या सूत्रावर 'तिति प्रत्ययग्रहणं कर्तव्यम्' असें वार्तिक पठित केलें असल्यामुळें त्यावरून हें स्पष्ट होतें कीं, ( 'तित्स्वरितम्' या सूत्रांतील 'तित्' या शब्दानें ) पाणिनीय सूत्रांत ज्यांचा प्रत्ययरूपानें उपदेश केला आहे तशाच साक्षात् पठित केलेल्या प्रत्ययांचे ठिकाणीं 'तित्स्वरितम्' या सूत्राची प्रवृत्ति होते व त्यामुळें 'औत्' हा आदेश स्वरित ठरूं शकत नाहीं हें खरें तत्त्व–कारण–आहे. ( 'आदेश प्रत्ययाचे जागीं झाल्यावर जरी त्याला स्थानिवद्भावानें प्रत्यय मानतां येतें तरी, स्थानिवद्भावानें प्रत्यय ठरणाऱ्या तशा आदेशाला 'तित्स्वरितम्' हें सूत्र लागू पडत नसून, जे अष्टाध्यायींत साक्षात् प्रत्ययरूपानें पठित आहेत त्यांनाच तें सूत्र, 'तिति प्रत्ययग्रहणं कर्तव्यम्' असें वार्तिक मुद्दाम पठित केलें असल्यामुळें, लागू पडतें. 'औत्' हा प्रत्ययरूपानें पठित नसून आदेशरूपानें पठित असल्यामुळें, तो तित् असून देखील, त्याला तें सूत्र वरील वार्तिकान्वयें लागू पडत नाहीं. म्हणून तो आदेश स्वरित ठरत नाहीं हें खरें मुख्य कारण आहे. त्यामुळें 'औत्' यांतील तकार स्वरितस्वरार्थ नसून केवळ उच्चारणार्थ आहे असेंच मानणें भाग आहे.) आणखी असें कीं, आदेशाचे ठिकाणीं जो अन्त्य तकार दिसतो तो मूळचा दकार असून त्या दकाराचे ठिकाणीं ( 'वावसाने' सू. २०६ या सूत्रानें ) तकार होत असल्यामुळें न अशा रीतीनें आदेश (तित् ठरत नसून) दित् ठरत असल्यामुळें, आदेशाच्या विषयांत 'तित्स्वरितम्' हें सूत्र प्रवृत्त होऊं शकत नाहीं. (तकारानुबन्धयुक्त दिसणारे आदेश जे [illegible] 'तित्' न मानतां 'दित्' मानले जातात

त्याप्रमाणे तकारानुबन्धयुक्त प्रत्यय देखील 'दित्' आहेत असे मात्र मानू नये; कारण तसे मानल्यास, 'तित्स्वरितम्' हें सूत्र व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते पण आदेशाचे ठिकाणी जो तकारानुबन्ध दिसतो तो मूळचा दकार असून सन्धिनियमान्वयें त्याचा तकार झाला आहे असेच मानले पाहिजे, कारण तसे न मानल्यास, 'तित्स्वरितम्' या सूत्रानें त्याचे ग्रहण होण्याचा संभव आहे व 'प्रत्ययाप्रत्ययोः' ही परिभाषा आणि तसेच 'तिति प्रत्ययग्रहण कर्तव्यम्' हें वार्तिक असल्यामुळें, तसे ग्रहण होणे इष्ट नाही असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा तात्पर्यार्थ आहे) अनुबन्ध उच्चारणार्थ आहे असे म्हटले असता, त्याचा अर्थ असा होतो की, एखादा वर्ण उच्चारतेवेळी मुखाला जे क्लेश होतात त्याचे निवारण करण्याकरिताच त्या वर्णापुढें अनुबन्ध लावला जात असून काही वेगळे स्वतंत्र कार्य त्या योगानें व्हावे या हेतूनें लावला जात नसतो. असे आहे म्हणूनच, म्हणजे 'औत्' या आदेशातील तकार स्वरितस्वर होण्याकरिता घातला नसून केवळ उच्चारणार्थ घातला असल्यामुळेंच, भाष्यकारानी 'औत्' हा आदेश डित् करून 'अच्च घेः' ७-३-११९ या सूत्रातील 'अत्' या पदाचे प्रत्याख्यान केले आहे तो आदेश अशा रीतीनें 'डित्' केला असल्यामुळें 'तित्' राहत नाही (अत्व केल्यास 'अजाद्यतष्टाप्' सू ४५४ या सूत्रानें जी 'टाप्'ची प्राप्ति होते तिचा प्रतिषेध करणे आवश्यक आहे या अर्थाचे 'अत्वे टाप्प्रतिषेधः' हे वार्तिक प्रकृत सूत्रावरील भाष्यात प्रथम पठित करून त्या वार्तिकाचे प्रत्याख्यान करणारी 'न वा सन्निपातलक्षणस्यानिमित्तत्वात्' व 'डित्करणाद्वा' ही दोन वार्तिके नंतर पठित केली आहेत त्यापैकी पहिल्या वार्तिकाचे विवरण पूर्वी केलेच आहे. द्वितीय वार्तिकाचे व्याख्यान करिताना भाष्यकार म्हणतात– 'अथवा डिदौकार करिष्यते, औडिच्च घे ।' जर 'औत्' यातील तकारानुबन्ध त्या 'औ' ला स्वरितस्वर होण्याकरिता उच्चारला असता तर, भाष्यकारानीं 'अच्च घेः' या सूत्राऐवजी 'औ डिच्च

चेः' असें सूत्र पठित केलें नसतें व 'औ' हा आदेश डित् केला नसता; कारण तो डित् केल्यामुळें त्याचें तित्व नष्ट होऊन तो स्वरित होऊं शकत नाहीं. असें असून देखील भाष्यकारांनीं तो डित् केला असल्यामुळें हें स्पष्ट होतें कीं, तो आदेश स्वरित व्हावा याकरितां त्याला पाणिनीनें तकार जोडला असें नसून त्याला तो अनुबन्ध केवळ उच्चारणार्थ लावला. तो आदेश डित् पठित केल्याचा परिणाम हा होतो कीं, 'बुद्धि ङि = बुद्धि औड्' या स्थलीं 'टेः' सू. ३१६ या सूत्रानें 'बुद्धि' यांतील 'टि'चा म्हणजे अन्त्य इकाराचा लोप होऊन 'बुद्ध् औ = बुद्धौ' असें इष्ट रूप एकदम सहज सिद्ध होतें. त्यामुळें घिसंज्ञक अङ्ग अकारान्त न झाल्याकारणानें 'टाप्' ची प्राप्ति होत नाहीं व 'टाप्' चा प्रतिषेध सांगण्याची कांहीं गरज पडत नाहीं.) 'ङि' प्रत्ययाचे जागीं होणारा आदेश 'औड्' असा डित् मानल्यास 'विंशतौ' या स्थलीं 'ति' चा लोप होण्याची आपत्ति येते असें कोणी म्हटल्यास, त्याला उत्तर हें आहे कीं, वरील प्रत्याख्यानपर प्रमाणभूत भाष्याच्या आधारें असें मानलें पाहिजे कीं, 'विंशतौ' असा सप्तमीचा प्रयोग भाषेंत होत नाहीं. ('विंशति' या शब्दाचें सप्तमीचें एकवचन करतेवेळीं 'विंशति ङि = विंशति औड्' अशी स्थिति झाली असतां, 'ति विंशतेर्डिति' सू. ८४४ या सूत्रानें 'विंशति' यांतील 'ति'चा लोप होण्याची व 'विंशतौ' असें इष्ट रूप सिद्ध न होतां 'विंशौ' असें अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येते असें शंकाकाराचें म्हणणें आहे. या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं, 'औ' हा आदेश डित् पठित केल्यास 'विंशतौ' असें रूप सिद्ध होऊं शकणार नाहीं हें सकललक्ष्यैकचक्षुष्क सर्वज्ञ भाष्यकारांना माहीत असून देखील त्यांनीं तो आदेश डित् पठित केला असल्यामुळें हेंच मानणें भाग आहे की, भाषेंत 'विंशतौ' असा प्रयोग होत नसतो. तसा प्रयोग होत असता तर भाष्यकारांनीं तो आदेश केव्हांहि डित् पठित केला नसता असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे.) 'अत्

इति तपरत्वम् ' या मनोरमेतील पदापूर्वी 'यद्यपि' ही पदें अध्याहृत आहेत. 'दीर्घो मा भूत्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, भिन्नकालिक 'अ'वर्णाची व्यावृत्ति व्हावी याकरिता प्रकृत सूत्रात 'अत्' असे तपरकरण केले आहे ('अ' व 'आ' याचे जागी 'अकः सवर्णे दीर्घः' सू ८५ या सूत्रानें 'आ' असा जो सवर्णदीर्घ एकादेश होण्याची आपत्ति येत होती तिचे निवारण करण्याकरिता व 'अ' हा ऱ्हस्वरूपानें कायम राहावा याकरिता 'तपरस्तत्कालस्य' सू १५ या सूत्रान्वयें प्रकृत सूत्रात 'अत्' असे तपरकरण केले आहे असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे असे शब्दरत्नकार म्हणतात) ज्याप्रमाणे 'ज्ञोऽविदर्थस्य' सू ६१२ या प्रकरणानें समासाचा बाध होतो त्याचप्रमाणे प्रकृत सूत्रात 'अत्' असा आदेश पठित केला असल्यामुळें त्या आदेशानें 'टाप्' चा देखील बाध होतो असे कोणी म्हटल्यास, ते म्हणणे बरोबर नाही, कारण 'ज्ञोऽविदर्थस्य' या प्रकरणात 'प्रतिपदविधाना षष्ठी न समस्यते' हे वार्तिक पठित केले असल्यामुळे, त्या वार्तिकाच्या आधारे समासाचा बाध होतो अशी जरी त्या ठिकाणी कल्पना करता येते तरी, प्रकृत स्थली ('अत्' या तपरकरणानें 'टाप्' चा बाध होतो) अशी कल्पना करण्यास कोणतेंहि प्रमाण उपलब्ध नाही (धातुविशेष किंवा कारकविशेष याचे सूत्रात साक्षात् ग्रहण करून जेथें षष्ठी होणे सांगितले जाते तशा षष्ठीला प्रतिपदविधानाषष्ठी म्हणतात 'ज्ञोऽविदर्थस्य करणे' या व या पुढील सूत्रानी जी षष्ठी होणे सांगितली आहे ती प्रतिपदविधानाषष्ठी होय या प्रकरणात जो षष्ठीसमासाचा बाध होतो ता त्या प्रकरणात पठित असलेल्या सूत्रानी होत नसून, 'प्रतिपदविधाना षष्ठी न समस्यते' असे जें वार्तिक त्या प्रकरणात पठित केले आहे त्या वार्तिकाच्या सामर्थ्यानें होतो 'अच्च घेः' या प्रकृत सूत्रानें घिसंज्ञक अङ्गाच्या अन्त्य वर्णाचे जागी अकारादेश केला असता अङ्ग अदन्त होत असल्यामुळें 'अजाद्यतष्टाप्' या सूत्रानें जी 'टाप्'ची

प्राप्ति होते तिचें निवारण करणारें कोणतेंहि पाणिनीय सूत्र नाहीं व 'अत्वे टाप्प्रतिषेधः' हें वार्तिक भाष्यकारांनीं प्रत्याख्यात केलें आहे. 'अच्च घेः' या सूत्राच्या सामर्थ्यानेंच ती आपत्ति टाळतां येते असें मुळींच म्हणतां येऊं शकत नाहीं हें पूर्वी सिद्ध केलेंच आहे. म्हणून 'टाप्' चें निवारण करण्याकरितां सन्निपातपरिभाषेचा आश्रय केला पाहिजे किंवा प्रकृत सूत्रानें होणारा 'औ' हा आदेश डित् पठित केला पाहिजे असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा भावार्थ आहे. )

मनोरमाः– " अनङ् सौ " ।। सोर्डेत्येव सिद्धे अनङ्विधान- मन्यतोऽपि स्यादिति ज्ञापनार्थम् । तेन उशनसः संबुद्धौ अनङ् सिद्ध्यतीति प्राञ्चः । तच्चिन्त्यम् । सोर्डेत्युक्ते हि "ऋदुशनस्" इत्युत्तरसूत्रेणापि डा स्यात् । ततश्च उशनेत्यत्र "सर्वनामस्थाने चासंबुद्धौ" इति दीर्घः स्यात् । पुरुदंसेत्यत्र "सान्तमहत" इति दीर्घः स्यात् । यद्वा संज्ञापूर्वको विधिरनित्य इति वा अङ्गवृत्तपरि- भाषया वा समाधानं बोध्यम् ।

प्राचीनांचें–प्रकाशकारांचें–असें म्हणणें आहे कीं, 'सोर्डा' असें सूत्र केल्यानें इष्टसिद्धि होत असून देखील 'अनङ् सौ' सू. २४८ असें सूत्र पठित करून या सूत्रांत 'अनङ्' आदेश होण्याचें जें विधान केलें आहे तें अशाकरितां कीं, तो आदेश (संबुद्धीचा विभक्तिप्रत्यय पुढें आला असतां देखील) इतर शब्दांच्या अन्त्य वर्णाचे जागीं होत असतो हें ज्ञापित व्हावें, आणि त्यामुळें 'उशनस्' शब्दाचें संबुद्धीचें रूप करितांना 'अनङ्' आदेश होतो (व 'उशनन्' असें संबुद्धीचें रूप सिद्ध होतें.) पण हें त्यांचें म्हणणें बरोबर नाहीं; कारण 'सोर्डा' असें सूत्र केलें असतें तर, 'ऋदुशनस्पुरुदंसोऽनेहसां च' सू. २७९ या उत्तर सूत्रानें देखील 'सु' प्रत्ययाचे जागीं 'डा' हा आदेश होण्याचा प्रसंग आला असता आणि त्यामुळें 'उशना' या रूपांत 'सर्वनामस्थाने चासंबुद्धौ' सू. २५० या सूत्रानें उपधा दीर्घ

होण्याची व तसेच 'पुरुदंसा' या स्थली 'सान्तमहतः संयोगस्य' सू. ३१७ या सूत्रानें उपधा दीर्घ होण्याची आपत्ति आली असती. (प्रकृत सूत्रावरील टीकेत प्रसादकारानी 'आकारे विधेये अनङ्विधानं सोर्लोपार्थम् । डादेशस्तर्हि सोर्विधेयः । एवं सिद्धे यदनङ्विधानं तदनङ एव क्वचिच्छ्रुत्यर्थम् । तेन यद्वक्ष्यति उशनसः सम्बुद्धौ वानङ्-वाच्यः इत्यारंभ्य हे उशनन् इत्येतदुपपन्नम्' असे म्हटले आहे व अशाच प्रकारचे व्याख्यान प्रकाशकारांनी केले आहे असे मनोरमेच्या प्रकृत पङ्क्तीत 'प्राञ्चः' हा बहुवचनाचा निर्देश केल्यामुळें दिसून येते. प्रसादकार व प्रकाशकार यांच्या म्हणण्याचा आशय हा आहे की, प्रकृत सूत्राऐवजी 'सोर्डा' असे सूत्र केलें असतें तरी, 'सखि सु' या स्थली त्या सूत्रानें 'सु' प्रत्ययाचे जागी 'डा = आ' असा डित् आदेश होऊन व 'टेः' सू. ३१६ या सूत्रानें 'सखि' या शब्दाच्या टिचा, म्हणजे अन्त्य इकाराचा, लोप होऊन 'सख् आ = सखा' असे इष्ट रूप सिद्ध होऊ शकलेंच असते. असे असून देखील पाणिनीनें तसें सूत्र न करिता 'अनङ् सौ' असे जें प्रकृत सूत्र केले आहे त्याचे कारण हें की, 'ऋदुशनस्' या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या क्वचित् शब्दापुढील सम्बुद्धिप्रत्ययाचे जागी देखील 'अनङ्' आदेश होतो हे ज्ञापित व्हावे, आणि त्यामुळेच प्रक्रिया-कौमुदीकारानी 'पुंसोऽसुङ्' या सूत्रावरील वृत्तीत 'सम्बुद्धौ वाऽनङ् वाच्यो नलोपश्च वा । हे उशन । हे उशनन्' असें जें म्हटले आहे ते योग्य ठरतें यावर दीक्षित असे म्हणतात की, प्रकाशकारानी केलेले व्याख्यान स्वीकारार्ह नाही, कारण 'सोर्डा' असें सूत्र केले असते तर, 'ऋदुशनस्' या उत्तर सूत्रात 'सोर्डा' या सूत्राची अनुवृत्ति होऊन त्या सूत्रात पठित असलेल्या शब्दापुढील 'सु' या सर्वनामस्थानप्रत्ययाचे जागी डादेश होण्याची आपत्ति आली असती व त्यामुळें 'उशनस् सु = उशनस् डा' अशी स्थिति होऊन व 'टे' सू ३१६ या सूत्रानें 'उशनस्' यातील 'अस्' या टिचा 'टेः' या सूत्रानें लोप होऊन 'उशन् डा = उशन् आ' अशी स्थिति

झाली असतां, 'सर्वनामस्थाने चासम्बुद्धौ' सू. २५० या सूत्रानें उपधा दीर्घ होऊन 'उशान् आ = उशाना' असें अनिष्ट रूप होण्याची आपत्ति आली असती. तसेंच 'पुरुदंसस् सु = पुरुदंसस् डा' या स्थलीं वर सांगितल्याप्रमाणें 'अस्' या टिचा लोप होऊन 'पुरुदंस् डा = पुरुदंस् आ' अशी स्थिति झाली असतां, 'पुरुदन्स्' हा शब्द सान्तसंयोगान्त असल्यामुळें, 'सान्त महतः संयोगस्य' सू. ३१७ या सूत्रानें उपधा दीर्घ होऊन 'पुरुदांस् आ = पुरुदांसा' असें अनिष्ट रूप होण्याची आपत्ति आली असती.) अथवा प्रकाशकारांच्या म्हणण्याचें समर्थन करणें असल्यास, 'संज्ञापूर्वको विधिरनित्यः'–परि. ९४– या परिभाषेच्या आधारें किंवा "अङ्गवृत्ते पुनर्वृत्तावविधिः'–परि. ९३ या परिभाषेच्या आधारें समर्थन करावें. ('सर्वनामस्थाने चासम्बुद्धौ' व 'सान्त महतः संयोगस्य' या दोन्ही अङ्गाधिकारांत पठित असलेल्या सूत्रांत 'नोपधायाः' हें पूर्व सूत्र अनुवृत्त होत असून 'ढ्लोपे पूर्वस्य दीर्घोऽणः' या पूर्व सूत्रांतून 'दीर्घः' या पदाची अनुवृत्ति होते. या दोन्ही सूत्रांनीं जें उपधादीर्घकार्य होण्याचें विधान केलें आहे त्या विधानांत 'अलोऽन्त्यात्पूर्व उपधा' सू. २४९ या सूत्रान्वयें संज्ञावाचक ठरणाऱ्या 'उपधा' या शब्दाचें ग्रहण केलें असल्यामुळें, 'संज्ञापूर्वको विधिरनित्यः' या परिभाषान्वयें तें उपधादीर्घविधान अनित्य ठरतें व त्या विधानाच्या अनित्यत्वाचा आश्रय करून वरील दोन्ही उदाहरणांत उपधादीर्घकार्य न केल्यानें इष्ट रूपांची सिद्धि करता येऊं शकते. तसेंच वरील दोन्ही सूत्रें व प्रकृत सूत्र हीं तीन्ही सूत्रें अङ्गाधिकारांत पठित असल्यामुळें, 'अनङ् सौ' या सूत्राऐवजीं पठित केलेलें 'सोर्डा' हें सूत्र वरील दोन्ही उदाहरणांत प्रवृत्त केल्यावर 'सर्वनामस्थाने चासम्बुद्धौ' किंवा 'सान्त महतः संयोगस्य' हीं अङ्गाधिकारोक्त सूत्रें, 'अङ्गवृत्ते' या परिभाषान्वयें, त्या उदाहरणांत नंतर प्रवृत्त होऊं शकत नाहींत व त्यामुळें उपधा दीर्घ होण्याची आपत्ति आपोआपच टळते. अशा रीतीनें प्रकाश-

काराच्या म्हणण्याचे समर्थन करता येऊ शकते असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे.)

शब्दरत्न—अनङ् सिध्यतीति । वैकल्पिकत्वमात्रं तु वाचनिकमिति तद्भावः । संज्ञापूर्वक इत्यस्य भाष्यास्पृष्टत्वादाह—अङ्गवृत्तेति । इयमगतिकगतिः । सोर्डेति न्यासे लाघवाभावश्च डित्वसामर्थ्याट्टिलोपकल्पने गौरवं च । तस्मादुशनसोऽनङ् तद्वैकल्पिकत्वं च चिन्त्यमेव भाष्यानुक्तत्वादिति प्रामाणिकाः ।

'उशनसः सम्बुद्धौ अनङ् सिद्धयति' असे जें प्रकाशकारानी म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, ('अस्य सम्बुद्धौ वाऽनङ् नलोपश्च वा वाच्य'–सू ४३६ वरील वार्तिक–या वार्तिकात 'अनङ्' आदेश होण्याचे वास्तविक विधान केले नसून) तो आदेश विकल्पेंकरून व्हावा एवढेंच विधान त्या वार्तिकानें केले आहे; (कारण 'ऋदुशनस्' सू. २७६ या सूत्रानें 'सु' प्रत्यय पुढें असता 'उशनस्' या स्थली 'अनङ्' आदेश होऊ शकतोच. पण तो आदेश विकल्पेंकरून व्हावा असे त्या सूत्रात विधान केले नसल्यामुळे, वैकल्पिक विधानाकरिताच ते वार्तिक केले आहे असे मानले पाहिजे. तसे मानले असता, 'उशनस्' या शब्दाच्या सबुद्धीची 'उशनन्' व 'उशन' अशी पाक्षिक रूपें होतात व नकारलोप केल्यास 'उशन' असे देखील सबुद्धीचे तिसरे रूप होते ) 'सज्ञापूर्वको विधिरनित्य' ही परिभाषा भाष्यात कोठेंहि पठित नसल्यामुळें (व अशा रीतीनें ती अप्रमाण ठरत असल्यामुळें) 'अङ्गवृत्तपरिभाषया वा' असे मनोरमेंत म्हटले आहे, व ती परिभाषा प्रवृत्त करून इष्ट रूपाची सिद्धि करावी असे जें दीक्षितानीं सुचविले आहे ते अगतिकगतिन्यायानें, म्हणजे गत्यन्तर नसल्यामुळें, सुचविले आहे. 'सोर्डा' असे सूत्र करण्यात लाघव नसून उलट डित्वाच्या सामर्थ्यानें टिलोप करण्यात गौरव आहे. ('अनङ् सौ' व 'सोर्डा' या दोन्ही स्थली सारख्याच मात्रा असून पदाची सख्या

देखील सारखीच आहे. 'अनङ् सौ' हें सूत्र मानल्यानें टिलोपाची गरज पडत नाहीं. म्हणून तें यथापठित सूत्र मानण्यांतच लाघव असून, 'सोर्डा' हें सूत्र मानण्यांत गौरव आहे असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे.) म्हणून प्रामाणिक, म्हणजे भाष्यानुसारि, वैयाकरणांचें असें म्हणणें आहे कीं, भाष्यांत 'उशनस्' या शब्दाला संबुद्धीचा 'सु' प्रत्यय पुढें असतां 'अनङ्' आदेश करावा व तो विकल्पेंकरून करावा असें कोठेंहि म्हटलें नसल्यामुळें, 'उशनस्' शब्दाचीं संबुद्धीचीं 'उशनन्' व 'उशन' अशीं पाक्षिक रूपें होतात हें म्हणणें बरोबर नाहीं. (कारण 'अनङ्' आदेश होणें जो सांगितला आहे तो केवळ असम्बुद्धि सर्वनामस्थान 'सु' प्रत्यय पुढें असतांच होणें सांगितलें आहे व भाष्यकारांनीं वार्तिकरूपानें वरील वचन भाष्यांत कोठेंहि पठित केलें नसल्यामुळें, त्या वचनान्वयें होणारीं 'उशनस्' शब्दाचीं संबुद्धीचीं पाक्षिक रूपें अशुद्धच मानलीं पाहिजेत असें भाष्यानुसारि वैयाकरणांचें म्हणणें आहे.)

मनोरमा--"हल्ङ्याब्भ्यो" ।। दीर्घादित्येतत् ङ्यापोरेव विशेषणं न तु हलोऽसंभवात् इत्याह--दीर्घाविति । परमिति । न त्विदं विहितविशेषणं या, सा, का इत्यादावव्याप्तेः । न च तत्र हलन्ताद्विहितत्वेन निर्वाहः, यः, स इत्यादावतिव्याप्तेः, कर्तेत्यादावव्याप्तेश्चेति भावः । हलिति । तस्य च सुतिसीत्येवंरूपत्वमेकदेशविकृतन्यायेन बोध्यम् । लुप्यत इति । यद्यपीह "लोपो व्योः" इत्यतो लोप इत्यनुवर्तते । तच्च तत्र भावसाधनं तथाऽपीह कर्मसाधनं हलिति प्रथमान्तेन सामानाधिकरण्यादिति भावः । दीर्घग्रहणं किम् अतिखट्वः, निष्कौशाम्बिः । ननु इह समस्तस्य ङ्याबन्तत्वं नास्ति । न च 'स्त्रीप्रत्यये तदादिनियमो नास्ति' इति वाच्यम् । अनुपसर्जने हि तथा । इह तूपसर्जनत्वात् तदादिनियमोऽस्त्येव । सत्यम् । तथाऽपि उत्तरपदस्य ङ्याबन्तत्वेन सोस्ततः परत्वानपायात् । न हीदं विहितविशेषणमित्यवोचाम । अत एव बहुश्रेयसीत्यत्र सुलोपः ।।

प्रत्यय होऊं शकत नाहीं. म्हणून 'त्यदादीनामः' व 'अजाद्यतष्टाप्' या सूत्रांची प्रवृत्ति होण्याकरितां 'यद्' शब्दाहूनच प्रथम 'सु' प्रत्यय केला पाहिजे आणि त्यदाद्यत्व व पररूप करून 'य सु' अशी स्थिति झाली असतां, 'य' या अदन्त प्रातिपदिकाला 'टाप् = आ' हा प्रत्यय होऊन 'य आ सु = या सु' अशी स्थिति होते. येथें विहितविशेषणपक्ष मानल्यास, 'सु' हा प्रत्यय 'या' या आवन्ताहून झाला नसल्यामुळें, प्रकृत सूत्रांतील 'ङ्याब्भ्यो दीर्घात्' या अंशानें त्या 'सु' प्रत्ययाचा लोप होऊं शकत नाहीं व 'याः' असें प्रथमेच्या एकवचनाचें अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येते. परंतु 'हल्ङ्याब्भ्यः' ही विहितपञ्चमी न मानतां परपञ्चमी मानल्यानें ती आपत्ति टळते; कारण जरी येथें 'यद्' या शब्दाहून 'सु' प्रत्यय झाला असून 'या' या आवन्ताहून तो प्रत्यय झाला नाहीं तरी, अकारादेश, पररूप, 'टाप्' प्रत्यय व सवर्णदीर्घ होऊन 'या' असें आवन्त रूप झालें असतां, तो 'सु' प्रत्यय त्या आवन्त अङ्गापुढें येत असल्यामुळें, त्या 'सु' प्रत्ययाचा प्रकृत सूत्रानें लोप होऊन 'या' असें इष्ट रूप सिद्ध होतें. 'यद्' या हलन्त शब्दाहून 'सु' प्रत्यय होत असल्यामुळें, विहितविशेषणपक्ष मानला तरी, प्रकृत सूत्रांतील 'हलन्तात्' या अंशानें 'या' असें इष्ट रूप सिद्ध होऊं शकतें असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण तें म्हणणें बरोबर मानल्यास, 'यः' असें पुल्लिङ्गाचें इष्ट रूप सिद्ध होणार नाहीं व 'सु' प्रत्ययाचा लोप होऊन 'य' असें अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येईल; कारण येथें देखील 'यद्' या हलन्ताहूनच 'सु' प्रत्यय झाला आहे. परंतु 'हलन्तात्, आवन्तात्' या विहितपञ्चमी न मानतां परपञ्चमी मानल्यानेंच वर दर्शविलेली आपत्ति टळते; कारण 'यद् सु = य अ सु = य सु' अशी स्थिति झाल्यावर 'सु' प्रत्यय हलन्त अङ्गापुढें येत नसून अदन्त अङ्गापुढें येत असल्यामुळें, त्या प्रत्ययाचा लोप न होतां 'यः' असें इष्ट रूप सिद्ध होतें व तसेंच वर सांगितल्याप्रमाणें 'यद्' शब्दाहून 'सु'

प्रत्यय करून 'टाप्' प्रत्यय केल्यावर 'या सु' अशी स्थिति झाली असतां, 'या' या आबन्त अङ्गापुढें 'सु' प्रत्यय येत असल्यामुळे, प्रकृत सूत्रानें त्या प्रत्ययाचा लोप होऊन 'या' असे इष्ट रूप सिद्ध होतें. त्याचप्रमाणे 'कर्तृ सु' या स्थली 'कर्तृ' या अजन्त शब्दाहून 'सु' प्रत्यय केला असता, 'ऋदुशनस्' सू. २७६ या सूत्रानें ऋकाराचे जागी 'अनङ्' आदेश होऊन व 'सर्वनामस्थाने चासम्बुद्धौ' सू. २५० या सूत्रानें उपधा दीर्घ होऊन 'कर्तान्' अशी स्थिति होते. येथें 'सु' प्रत्यय हलन्त अङ्गाहून झाला नसून अजन्त अङ्गाहून झाला असल्यामुळें, विहितविशेषणपक्ष मानल्यास, त्या 'सु' प्रत्ययाचा लोप होऊ शकत नाही. परंतु 'हलन्तात्' ही परपञ्चमी मानल्यानें व 'सु' प्रत्यय 'कर्तान्' या हलन्त अङ्गापुढें असल्यामुळे, त्या 'सु' प्रत्ययाचा लोप होऊन व 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' सू. २३६ या सूत्रानें अन्त्य नकाराचा लोप होऊन 'कर्ता' असे इष्ट रूप सिद्ध होते. साराश सर्व इष्ट रूपाची सिद्धि होण्याकरिता 'हल्ङ्याब्भ्यः' ही विहितपञ्चमी न मानता परपञ्चमीच मानणे आवश्यक आहे असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे.) प्रकृत सूत्रात 'सु ति सि अपृक्त हल्' असे जें म्हटले आहे ते असे मानून म्हटले आहे की, 'सु ति सि' या एकदेशविकृत शब्दानी 'स् त् स्' या अपृक्त हलाचे ('एकदेशविकृतमनन्यवत्'-परि ३७-या परिभाषान्वयें) ग्रहण होतें. ('सु' प्रत्ययातील उकार उच्चारणार्थ आहे आणि म्हणून 'सु = स्' हा अपृक्त हल् आहे हे अगदी उघड आहे. पण 'ति, सि' हे समुदाय अपृक्त हल् नाहीत 'इतश्च' सू २२०७ या सूत्रानें जेव्हा त्या दोन प्रत्ययातील इकाराचा लोप होऊन त्याचे 'त्, स्' असे रूप होते तेव्हाच ते अपृक्त हल् होतात आणि तशाच स्थितीत त्याना प्रकृत सूत्र लागू पडते.) 'लोपो व्योर्वलि' या पूर्व सूत्रातून प्रकृत सूत्रात 'लोप.' या पदाची अनुवृत्ति होते. पण तो शब्द त्या पूर्व सूत्रात ('लुप्' या धातूहून 'भावे' सू. ३१८४ या

सूत्रानें) 'भावे' या अर्थामध्यें म्हणजे क्रियार्थक 'घञ्' प्रत्यय होऊन सिद्ध झाला आहे. म्हणून प्रकृत सूत्रांतील द्वितीय 'हल्' या प्रथमान्त शब्दाशीं सामानाधिकरण्य होण्याकरितां 'लोपः' हा शब्द ('अकर्तरि च कारके संज्ञायाम्' सू. ३१८६ या सूत्रान्वयें) कर्मणि घञ्प्रत्ययान्त मानून त्याचें कौमुदींत 'लुप्यते' असें व्याख्यान केलें आहे. (प्रकृत सूत्रांतील 'हल्' हें शेवटचें पद लुप्तषष्ठीक मानलें असतें तरच, 'हलः लोपः स्यात्' असा अन्वय करतां आला असता. पण तें पद वास्तविक प्रथमान्त असल्यामुळें व त्या प्रथमान्त पदाचें 'लोपः' या पदाशीं सामानाधिकरण्य होत नसल्यामुळें, 'लोपः' हें अनुवृत्त पद 'लुप्यते इति लोपः' असें कर्मणि घञ्प्रत्ययान्त मानून व त्या पदाचा 'लुप्यते' असा अर्थ करून 'हल् लुप्यते' असें कौमुदींत व्याख्यान केलें आहे.) प्रकृत सूत्रांत 'दीर्घात्' या पदाचें ग्रहण अशाकरितां केलें आहे कीं, 'अतिखट्वः, निष्कौशाम्बिः' या उदाहरणांत 'सु' प्रत्ययाचा लोप होऊं नये. ('खट्वामतिक्रान्तः अतिखट्वः' या स्थलीं 'अत्यादयः क्रान्ताद्यर्थे द्वितीयया' या वार्तिकानें द्वितीयातत्पुरुष झाला आहे व 'निष्क्रान्तः कौशाम्ब्याः निष्कौशाम्बिः' या स्थलीं 'निरादयः क्रान्ताद्यर्थे पञ्चम्या' या वार्तिकानें पञ्चमीतत्पुरुष झाला आहे. या दोन्ही उदाहरणांत 'खट्वा' हा आबन्त शब्द व 'कौशाम्बी' हा ङीबन्त शब्द उपसर्जन–अप्रधान–झाले असल्यामुळें, 'गोस्त्रियोरुपसर्जनस्य' सू. ६५६ या सूत्रानें 'टाप् = आ' व 'ङीप् = ई' या स्त्रीप्रत्ययांचा ऱ्हस्व झाला आहे. अशा रीतीनें 'सु' प्रत्यय दीर्घ 'टाप्' व दीर्घ 'ङीप्' यांच्यापुढें येत नसून ऱ्हस्वान्त अङ्गापुढें येत असल्यामुळें, त्या 'सु' प्रत्ययाचा प्रकृत सूत्रानें लोप होत नाहीं.) आतां येथें शंकाकार अशी शंका करतो कीं, 'अतिखट्वः' व 'निष्कौशाम्बिः' हीं सामासिक पदें अनुक्रमें टाबन्त व ङीबन्त मानतां येऊं शकत नाहींत. हे दोन्ही सामासिक शब्द स्त्रीप्रत्ययान्त असल्यामुळें त्यांना तदादिनियम लागू पडत नाही

असे कोणी म्हटल्यास, त्यावर शकाकार असे उत्तर देतो की, ('स्त्रीप्रत्यये चानुपसर्जने न'–परि २६–ही परिभाषा असल्यामुळें) जेथें स्त्रीप्रत्ययान्त शब्द प्रधान असतो तेथेंच तदादिनियम लागू पडत नाही. पण वरील दोन्ही उदाहरणात 'खट्वा' व 'कौशाम्बी' हे स्त्रीप्रत्ययान्त शब्द उपसर्जन झाले असल्यामुळें, येथें तदादिनियम लागू पडतोच (शकाकाराचे असे म्हणणे आहे की, 'अतिखट्व' व 'निष्कौशाम्बि' या स्थली सामासिक शब्दाहून 'टाप्' किंवा 'ङीप्' प्रत्यय झाला नसून केवळ 'खट्व' या अदन्त चरमावयवाहून 'अजाद्यतष्टाप्' या सूत्रानें 'टाप्' प्रत्यय झाला आहे व तसेच केवळ 'कौशाम्ब' या अण्प्रत्ययान्त शब्दाहून 'टिड्ढाणञ्' सू ४७० या सूत्रानें 'ङीप्' प्रत्यय झाला आहे व या दोन्ही सामासिक शब्दात अतिक्रान्त होणारा अन्यपदार्थ प्रधान असून 'खट्वा' व 'कौशाम्बी' हे स्त्रीप्रत्ययान्त शब्द त्या अन्यपदार्थाचे उपसर्जन झाले असल्यामुळें, येथें तदादिनियम लागू पडतो, म्हणजे ज्या 'खट्व' व 'कौशाम्ब' शब्दाहून स्त्रीप्रत्यय झाले आहेत तेवढ्याच तदादितदन्त शब्दाना 'स्त्रीप्रत्यये चानुपसर्जने न' या परिभाषान्वयें स्त्रीप्रत्ययान्त मानता येते व त्याच्या पूर्वी 'अति' व 'निस' हे जे शब्द आहेत त्याच्यासह सपूर्ण सामासिक शब्दसमुदायाना स्त्रीप्रत्ययान्त मानता येत नाही जर वरील दोन उदाहरणात समासाचे चरमावयव स्त्रीप्रत्ययान्त शब्द प्रधान असते तरच ते दोन सपूर्ण सामासिक शब्द स्त्रीप्रत्ययान्त मानता आले असते या विषयाचे विस्तृत विवेचन परिभाषेन्दुशेखराच्या मराठी भाषान्तरात पान ९०–९२ मध्यें केले आहे व ते वाचले असता, शकाकाराचे म्हणण उत्तम रीतीनें ध्यानात येईल सराश शकाकाराच्या म्हणण्याचा भावार्थ हा आहे की, जेथें समासातील चरमावयव आबन्त किंवा ङीबन्त शब्द उपसर्जन होतो तेथें 'गोस्त्रियोरुपसर्जनस्य' सू ६५६ या सूत्रानें तो नित्य ऱ्हस्व होत असल्यामुळें व तसेच ज्या सपूर्ण सामासिक शब्दाहून 'सु' प्रत्यय होतो तो वरील परिभाषान्वयें स्त्रीप्रत्ययान्त

मानतां येत नसल्यामुळें, प्रकृत सूत्रांत 'दीर्घात्' हें पद असण्याची कांहींच गरज नाहीं, व तें पद प्रकृत सूत्रांत नसलें तरी, वरील दोन्ही उदाहरणांत 'सु' लोपाची प्राप्तीच होत नाहीं. या शंकेवर दीक्षित असें उत्तर देतात कीं,) वरील दोन उदाहरणांत तदादिनियम लागू पडतो व संपूर्ण सामासिक शब्द स्त्रीप्रत्ययान्त मानतां येत नाहींत हें जें शंकाकाराचें म्हणणें आहे तें बरोबर आहे. तथापि वरील दोन्ही उदाहरणांत समासांतील उत्तर पद अनुक्रमें आबन्त व ङीबन्त असल्यामुळें, 'टाप्' व 'ङीप्' यांच्या लगेंच पुढें 'सु' प्रत्यय आहे हें म्हणणें कोणत्याहि रीतीनें बाधित होत नाहीं. 'ङ्यावन्तात्' ही (परपञ्चमी असून) विहित-पञ्चमी नाहीं हे आम्हीं पूर्वी सांगितलेंच आहे. ('अति खट्वा अम् सु, निस् कौशाम्बी ङसि सु' या दोन्ही स्थलीं 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' सू. ६५० या सूत्रानें 'अम्' व 'ङसि' या अन्तर्वर्ति-विभक्तिप्रत्ययांचा लुक् होऊन 'अति खट्वा सु, निस् कौशाम्बी सु' अशी स्थिति झाल्यावर 'गोस्त्रियोरुपसर्जनस्य' या सूत्रानें हे दोन्ही शब्द ऱ्हस्व झाले असतां जरी त्यांचें ङ्याबन्तत्व नष्ट होत नाहीं तरी, ते ऱ्हस्व झाल्यानें त्यांचें दीर्घत्व नष्ट होत असून त्यांच्या पुढें 'सु' प्रत्यय येत असल्यामुळें, प्रकृत सूत्रांत 'दीर्घात्' हें पद नसल्यास, 'सु' प्रत्ययाचा लोप होण्याची जी आपत्ति येते ती टळते व अशा रीतीनें प्रकृत सूत्रांतील 'दीर्घात्' या पदाचें ग्रहण चरितार्थ ठरतें.) असें आहे म्हणूनच 'बहुश्रेयसी' या स्थलीं 'सु' प्रत्ययाचा लोप होतो. ('बह्व्यः श्रेयस्यः यस्य सः बहुश्रेयसी' या अन्य पदार्थ-प्रधानबहुव्रीहिसमासांतील 'श्रेयसी' हें ङीप्प्रत्ययान्त उत्तर पद उपसर्जन आहे. 'प्रशस्य' या शब्दाहून 'द्विवचनविभज्योपपदे' सू. २००५ या सूत्रानें 'ईयसुन् = ईयस्' प्रत्यय झाला असतां, 'प्रशस्यस्य श्रः' सू. २००९ या सूत्रानें 'प्रशस्य' या शब्दानें जागीं 'श्र' असा आदेश होऊन 'श्र ईयस्' अशा स्थितींत 'आद्गुणः' सू. ६९ या सूत्रानें गुणरूप एकादेश होऊन 'श्रेयस्' असें जें रूप

होते त्याहून 'उगितश्च' सू. ४५५ या सूत्रानें 'ङीप्' प्रत्यय होऊन 'श्रेयसी' असे ङीप्प्रत्ययान्त रूप होते. 'बहुश्रेयसी' या बहुव्रीहि-समासात जरी 'श्रेयसी' हा ङीप्प्रत्ययान्त शब्द अन्यपदार्थाचे उपसर्जन झाला असल्यामुळें 'गोस्त्रियोरुपसर्जनस्य' या सूत्रानें त्याला ऱ्हस्वाची प्राप्ति होते तरी, 'इयसो बहुव्रीहेर्न'–सू. ८९४ वरील वार्तिक–हे निषेधक वार्तिक असल्यामुळें, त्याला ऱ्हस्वकार्य होत नाही. 'बहुश्रेयसी सु' या स्थली जरी समासातील चरमावयव 'श्रेयसी' हा शब्द उपसर्जन झाला असल्यामुळें 'स्त्रीप्रत्यये चानुपसर्जने न' या परिभाषान्वयें 'बहुश्रेयसी' हा संपूर्ण सामासिक शब्द स्त्रीप्रत्ययान्त ठरत नाही व जो 'सु' प्रत्यय झाला आहे तो जरी 'श्रेयसी' या ङीबन्त शब्दाहून झाला नसून 'बहुश्रेयसी' या संपूर्ण सामासिक शब्दाहून झाला आहे तरी, तो 'सु' प्रत्यय ङीप्प्रत्ययान्त 'श्रेयसी' शब्दाच्या लगेंच पुढें असल्यामुळें व येथें 'ङीप्' प्रत्यय ऱ्हस्व झाला नसून त्याचे दीर्घत्व कायम असल्यामुळें व अशा रीतीनें दीर्घ ङीबन्त शब्दापुढें 'सु' प्रत्यय येत असल्यामुळें, प्रकृत सूत्रानें त्या 'सु' प्रत्ययाचा लोप होतो, व अशा रीतीनें प्रकृत सूत्रातील 'दीर्घात्' या पदाचे ग्रहण चरितार्थ व आवश्यक ठरतें. 'हल्ङ्याब्भ्य' ही परपञ्चमी न मानता विहितपञ्चमी मानली असती तर, वरील उदाहरणात 'श्रेयसी' शब्दाहून 'सु' प्रत्यय झाला नसून संपूर्ण सामासिक शब्दाहून तो प्रत्यय झाला असल्यामुळें, त्या 'सु' प्रत्ययाचा लोप न होण्याची आपत्ति आली असती व 'बहुश्रेयसी.' असे अनिष्ट रूप झाले असतें )

शब्दरत्न–चेतीति । "तस्मादित्युत्तरस्य" इति जाग्रति विहितविशेषणासम्भवप्रदर्शनार्थः । एकदेशविकृतन्यायेनेति स्थानि-वत्त्वस्योपलक्षणमिदम् । अर्द्धाधिकविनाशेन प्रत्यभिज्ञाभावाच्छ्वपु-च्छवद्दृष्टान्तमूलकन्यायस्याप्राप्तेरिति बोध्यम् । प्रथमान्तेनेति । यद्यपि "तस्मादित्युत्तरस्य" इत्युक्तेः षष्ठ्यन्ततापि सम्भवति तथापि बहुषु परेषु विभक्तिविपरिणामकल्पनापेक्षयाऽऽगन्तुक-

लोपशब्दे एवार्थान्तरकल्पनमुचितमिति भावः। ननु सुतिसीति प्रत्ययैः 'यस्मात्स विहितस्तदादेः' इत्युपस्थित्या तस्य हल्ङ्याब्भ्य इति विशेषणमिति हल्ङ्याबन्तात्तदादेः परस्येत्यर्थेन प्रकृत्याक्षेपादुपसर्जनस्त्रीप्रत्यये तदादिनियमसत्त्वात् च प्रकृतेर्ङ्याबन्तत्वाभावेन नात्र दोष इत्यत आह–अत एवेति। एतत्सिध्यर्थं "येन विधि" इति परिभाषया शब्दरूपं विशेष्यमादाय तदन्तविधौ ततः प्रत्ययग्रहणपरिभाषयोक्तं विशेष्यमादाय पुनस्तदन्तविधौ "टिड्ढाणञ्" इति सूत्रेऽणन्तान्तादितिवद् ङ्याबन्तान्तादित्यर्थस्यावश्यकत्वेनात्र दोषः। मालेत्यादौ तु व्यपदेशिवद्भावेन सिद्धिरिति भावः। श्रविष्ठासु जातः श्रविष्ठ इत्यादौ तद्धितलुकि, स्त्रीप्रत्ययलुकि च प्रत्ययलक्षणेन, टाबन्तत्वादतिव्याप्तिवारणार्थं दीर्घग्रहणमित्यपि बोध्यम्।

'तस्मादित्युत्तरस्य' सू. ४१ हें सूत्र जागृत, म्हणजे विद्यमान, असतां, प्रकृत सूत्रांतील 'हल्ङ्याब्भ्यः' हें पद विहितविशेषण मानणें असंभवनीय आहे, म्हणजे तें पद विहितविशेषण मानतां येऊं शकत नाहीं, असा 'अव्याप्तेश्चेति भावः' या मनोरमेच्या पंक्तींतील 'च' या पदाचा अर्थ आहे. ('तस्मादित्युत्तरस्य' हें सूत्र साक्षात् पठित असल्यामुळें, त्या सूत्रान्वयें प्रकृत सूत्रांतील 'हल्ङ्याब्भ्यः' या पञ्चम्यन्त पदाचा 'हल्ङ्याब्भ्यः परस्य' असाच अर्थ करणें योग्य असून त्या सूत्राविरुद्ध 'हल्ङ्याब्भ्यः विहितस्य' असा अर्थ करणें योग्य नाहीं.) 'एकदेशविकृतन्यायेन बोध्यम्' या मनोरमेच्या पंक्तींतील 'एकदेशविकृतन्यायेन' हें पद स्थानिवद्भावाचें उपलक्षण आहे; कारण येथें अत्यन्त अधिक विकार झाला असल्यामुळें, विकृत रूप हें मूळ स्वरूप आहे असें ओळखूं शकत नाहीं व त्यामुळें 'छिन्ने पुच्छे च श्वा श्वैव न चाश्वो न च गर्दभः' या लौकिक न्यायान्वये सिद्ध होणारी 'एकदेशविकृतमनन्यवत्'—परि. ३७—ही परिभाषा येथें लागू पडत नाहीं. ('नु' प्रत्ययांतील उकार उच्चारणार्थ

आहे हे पूर्वी सांगितलेच आहे त्यामुळें प्रकृत सूत्रातील 'सु' या शब्दानें 'सु = स्' या अपृक्त हल् प्रत्ययाचे ग्रहण होते हे एकदम लक्षात येऊ शकते पण या सूत्रात 'ति, सि' या ज्या शब्दाचे ग्रहण केले आहे त्याच्या संबधानें असे म्हणता येऊ शकत नाही 'ति, सि' या प्रत्ययातील इकाराचा 'इतश्च' सू. २२०७ या सूत्रानें लोप होऊन 'त्, स्' असे जें विकृत रूप होतें त्या रूपात एक मात्रा नाहींशी होऊन अर्धमात्राच अवशिष्ट राहते व जेथें अर्धे किंवा अर्ध्याहून अधिक शब्दस्वरूप बदलून गेले आहे त्या ठिकाणी 'एकदेशविकृतमनन्यवत्' ही परिभाषा लागत नसून 'स्थानिवदादेश' हे सूत्र लागू पडत असे परिभाषेन्दुशेखरात सांगितले असल्यामुळें,—पहा परिभाषेन्दुशेखराचे मराठी भाषान्तर पान १३३—मनोरमेंतील 'एकदेशविकृतन्यायेन' या पदाचा 'स्थानिवद्भावेन' असा अर्थ करणे योग्य आहे असे शब्दरत्नकार म्हणतात 'ति, सि' हे अनेकाल् स्थानी असल्यामुळें, येथें 'अनल्विधौ' हा प्रतिषेध लागू पडत नाही व 'ति, सि' यातील अन्त्य इकाराचा लोप होऊन त्याचे 'त्, स्' असे जें विकृत रूप होते ते स्थानिवद्भावानें 'ति, सि' च आहे असे मानता येते ) 'हलिति प्रथमान्तेन सामानाधिकरण्यात्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, जरी 'तस्मादित्युत्तरस्य' असे सूत्र असल्यामुळें (या सूत्रातील 'उत्तरस्य' या षष्ठ्यन्त पदाच्या आधारे 'सु ति सि अपृक्त हल्' या पदाचा 'सुतिसीनामपृक्तस्य हल्' असा षष्ठीविभक्तीत विपरिणाम करून) षष्ठ्यन्त अर्थ करता येऊ शकतो (व तसा अर्थ केल्यानें, प्रकृत सूत्रांत अनुवृत्त असलेल्या 'लोप' या पदाशी त्या पदांचा अन्वय होऊ शकतो) तरी, अनेक पदाच्या विभक्ति बदलण्यापेक्षा, म्हणजे 'सुतिसीनामपृक्तस्य हल् लोपः स्यात्' असे विभक्तिविपरिणाम करून वाक्य तयार करण्यापेक्षा, प्रकृत सूत्रातील पदें जशीचीं तशीच कायम ठेवून, 'लोप' या प्रकृत सूत्रात अनुवृत्त होणाऱ्या आगंतुक

पदाचें 'लुप्यते' असें अर्थान्तर करणें योग्य आहे. प्रकृत सूत्रांत 'सु, ति, सि' या प्रत्ययांचें ग्रहण केलें असल्यामुळें 'यस्मात्स विहितस्तदादेः' या (प्रत्ययग्रहणपरिभाषेंतील) तदादि अंशाची उपस्थिति होऊन व त्या तदादि अंशाचें 'हल्ङ्याब्भ्यः' हें विशेषण होऊन 'हल्ङ्याबन्तात्तदादेः परस्य' असा अर्थ होत असल्यामुळें व अशा रीतीनें ज्या प्रकृतीहून 'सु, ति, सि' हे प्रत्यय झाले आहेत त्या प्रकृतीचा आक्षेप होत असल्यामुळें आणि जेथें स्त्रीप्रत्यय उपसर्जन झाला आहे त्या ठिकाणीं तदादि नियम लागू पडत असल्यामुळें आणि 'अतिखट्वः' व 'निष्कौशाम्बिः' या उदाहरणांत ज्या प्रकृतीहून 'सु' प्रत्यय झाला आहे ती संपूर्ण प्रकृति आबन्त किंवा ङीबन्त ठरत नसल्यामुळें, त्या दोन उदाहरणांत ('हल्ङ्याब्भ्यः' ही विहितपञ्चमी मानल्यानें देखील) कांहीं दोष येत नाहीं, म्हणजे 'सु' प्रत्ययाच्या लोपाची प्राप्तीच होत नाहीं, अशी कोणी शंका केल्यास, ती शंका मनांत धरून तिचें निवारण करण्याकरितां दीक्षितांनीं मनोरमेंत 'अत एव बहुश्रेयसीत्यत्र सुलोपः' असें म्हटलें आहे. ('अतिखट्वः, निष्कौशाम्बिः' या दोन्ही उदाहरणांत जो 'सु' प्रत्यय झाला आहे तो संपूर्ण सामासिक शब्दांहून झाला असून 'खट्वा' किंवा 'कौशाम्बी' या ङ्याबन्त शब्दांहून झाला नसल्यामुळें, 'हल्ङ्याब्भ्यः' ही विहितपञ्चमी मानली तरी, त्या 'सु' प्रत्ययाचा प्रकृत सूत्रान्वयें लोप पावतच नाहीं व तीं रूपें सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं हें जरी खरें आहे तरी, 'हल्ङ्याब्भ्यः' ही विहितपञ्चमी मानल्यानें, 'बहुश्रेयसी' हें इष्ट रूप सिद्ध होऊं शकत नाहीं; कारण या उदाहरणांत देखील 'श्रेयसी' या ङीबन्त शब्दाहून 'सु' प्रत्यय झाला नसून 'बहुश्रेयसी' या संपूर्ण सामासिक शब्दाहून तो प्रत्यय झाला आहे व या सामासिक अङ्गांतील 'श्रेयसी' हा ङीप् प्रत्ययान्त चरमावयव उपसर्जन झाला असल्यामुळें, 'बहुश्रेयसी' हा संपूर्ण सामासिक शब्द ङीप्प्रत्ययान्त अङ्ग मानतां येत नाहीं व त्यामुळें

'सु' लोप न होण्याची आपत्ति येते. परन्तु 'हल्ङ्याब्भ्य.' ही विहितपञ्चमी न मानता परपञ्चमी मानल्यानें ती आपत्ति टळते, कारण येथें 'श्रेयसी' या दीर्घ ङीवन्त शब्दाच्या लगेंच पुढें 'सु' प्रत्यय आला असल्यामुळें, त्या प्रत्ययाचा प्रकृत सूत्रानें लोप होऊन 'बहुश्रेयसी' असे इष्ट रूप सिद्ध होते ) ज्याप्रमाणे 'टिड्ढाणञ्' सू. ४७० या सूत्रातील 'अण्' इत्यादि प्रत्ययाचा 'अणन्तात्' असा प्रकारे (प्रत्ययग्रहणपरिभाषान्वयें) अर्थ केला जातो त्याचप्रमाणे, 'बहुश्रेयसी' हे रूप सिद्ध करण्याकरिता, प्रकृत सूत्रात निर्दिष्ट असलेल्या 'ङीप्, आप्' या प्रत्ययांचा प्रत्ययग्रहणपरिभाषान्वयें 'ङ्यन्त, आबन्त' असा अर्थ करून व नंतर 'येन विधिस्तदन्तस्य' सू २६ या सूत्रान्वयें 'ङ्यन्त, आबन्त' हे शब्द शब्दस्वरूपाचे विशेषण मानून, ङ्यन्त, आबन्त शब्द ज्या शब्दस्वरूपाच्या अन्ती आहेत अशा शब्द-स्वरूपाच्या लगेंच पुढें असणाऱ्या 'सु' प्रत्ययाचा लोप होतो असा प्रकृत सूत्राचा अर्थ करणे आवश्यक आहे व तसा अर्थ केल्यानें, 'अतिखट्व, निष्कौशाम्बि' या उदाहरणात दोष येतो, म्हणजे 'सु'लोप होण्याची आपत्ति येते असा दीक्षिताच्या म्हणण्याचा भावार्थ आहे. ('अत्र प्रत्ययग्रहणपरिभाषयोक्त विशेष्यमादाय तदन्तविधौ, पुनर्येन विधि इति परिभाषया शब्दस्वरूपविशेष्यमादाय तदन्तविधिरिति योजना बोध्या। क्वचित्त्वेवमेव पाठ ।' असे प्रकृत पक्तीसंबधानें भैरवीत म्हटले आहे व प्रकृत पक्तीचा अक्षरार्थ न करिता भैरवीला अनुसरून या पक्तीचा वरप्रमाणे अर्थ केला आहे प्रकृत सूत्राचा वर जसा अर्थ केला आहे तसा अर्थ केल्याने, 'बहुश्रेयसी' या शब्दस्वरूपात 'श्रेयसी' हा दीर्घ ङीवन्त शब्द अन्ती असून त्यापुढें 'सु' प्रत्यय असल्यामुळें, त्या प्रत्ययाचा लोप होतो व 'बहुश्रेयसी' असे इष्ट रूप सिद्ध होते पण त्या अर्थान्वयें 'अतिखट्व', निष्कौशाम्बि' या स्थली दोष येतो, कारण या दोन्ही शब्द-स्वरूपात आबन्त व ङीवन्त शब्द अन्ती असून त्याच्या पुढें 'सु' प्रत्यय आला असल्यामुळें, त्या प्रत्ययाचा लोप होण्याची आपत्ति

येते. तथापि प्रकृत सूत्रांत 'दीर्घात्' या पदाचें ग्रहण केलें असल्या-मुळें व वरील दोन्ही उदाहरणांत आवन्त डीबन्त शब्द उपसर्जन झाल्याकारणानें 'गोस्त्रियोः' सू. ६५६ या सूत्रानें ऱ्हस्व झालें असल्यामुळें, ती आपत्ति टळते असा 'अत एव बहुश्रेयसीत्यत्र सुलोपः' असें जें दीक्षितांनीं मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा आशय आहे असें शब्दरत्नकार म्हणतात. 'अतिखट्वः, निष्कौशाम्बिः' या दोन्ही सामासिक शब्दांत–आवन्त व ङीवन्त शब्द अनुक्रमें समासाचे चरमावयव आहेत असें जें वर म्हटलें आहे त्याचें कारण हें कीं, दीर्घ आवन्त व ङीवन्त शब्दांचे जागीं 'गोस्त्रियोः' या सूत्रानें ऱ्हस्वकार्य झालें असल्यामुळें ते ऱ्हस्व झालेले शब्द दीर्घ शब्दच आहेत असें 'स्थानिवदादेशः' सू. ४९ या सूत्रानें स्थानिवद्भावानें मानतां येतें. येथें 'अनल्विधौ' हा प्रतिषेध आड येत नाहीं; कारण दीर्घ 'आ, ई' यांचे जागीं झालेले ऱ्हस्व 'अ, इ' हे वर्ण दीर्घच आहेत असें स्थानिवद्भावानें मानणें नसून, दीर्घान्त 'खट्वा, कौशाम्बी' यांचे जागीं झालेले ऱ्हस्वान्त 'खट्व, कौशाम्बि' हे शब्द दीर्घान्तच आहेत असें स्थानिवद्भावानें मानणें आहे व तसें मानणें अल्विधि ठरत नसून अनल्विधि ठरतो हें उघड आहे. 'स्थानिवदादेशः' १–१–५६ या सूत्रावरील भाष्यांत 'ङ्याब्ग्रहणेऽदीर्घः' हें वार्तिक पठित करून त्या वार्तिकाचें व्याख्यान करितांना भाष्यकारांनीं 'ङ्याब्ग्रहणेऽदीर्घ आदेशो न स्थानिवदिति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् ? । निष्कौशाम्बिः अतिखट्वः । ङ्याब्ग्रहणेन ग्रहणात्सुलोपो मा भूदिति ।' असें म्हटलें आहे. या भाष्याचा अर्थ हा आहे कीं, 'ङी' आणि 'आप्' यांचें सूत्रांत ग्रहण करून त्यांना सांगितलेलें कार्य कर्तव्य असतां, त्यांचे जागीं झालेला ऱ्हस्व आदेश याला स्थानिवद्भाव होत नाहीं असें वचन पठित करणें आवश्यक आहे व तसें वचन पठित करण्याचें प्रयोजन हें कीं, 'निष्कौशाम्बिः, अतिखट्वः' या उदाहरणांमध्यें 'ङी, आप्' यांचे जागीं 'गोस्त्रियोः' या सूत्रानें झालेला ऱ्हस्व आदेश स्थानि-वद्भावानें दीर्घ 'ङी' व 'आप्' च आहे असें मानलें असतां,

'हल्ङ्याब्भ्य' या सूत्रानें जो 'सु' प्रत्ययाचा लोप होण्याची आपत्ति येते ती टळावी या भाष्यावरून हे स्पष्ट होते की, वरील दोन्ही उदाहरणात दीर्घाचे जागी झालेला ऱ्हस्व आदेश दीर्घच आहे असे स्थानिवद्भावानें मानता येते या भाष्यातील 'अतिखट्व' हे प्रतीक घेऊन उद्योतकारानी 'न चात्र ऱ्हस्व आबाश्रयेति तद्गतमात्वमल्विधिरिति वाच्यम्। गोस्त्रियोरित्यस्य स्त्रीप्रत्ययान्तप्रातिपदिकान्त्यस्य ऱ्हस्व इत्यर्थः' असे म्हटले आहे, व यावरून हा अल्विधि होत नाही हे स्पष्ट होते ) वर सांगितल्याप्रमाणे प्रकृत सूत्राचा अर्थ घेतल्यानें, 'माला' इत्यादि स्थली व्यपदेशिवद्भावानें 'सु' लोपाची सिद्धि होते ('माला' या शब्दापूर्वी दुसरा कोणताहि शब्द नसल्यामुळें, 'माला' हे असे शब्दस्वरूप ठरत नाही की, ज्याच्या अन्ती 'माला' हा आबन्त शब्द आहे तरी पण 'व्यपदेशिवदेकस्मिन्'–परि ३०–या परिभाषान्वयें 'माला' हे मालान्त शब्दस्वरूप आहे असे व्यपदेशिवद्भावानें मानता येते आणि त्यामुळें प्रकृत सूत्राचा तदन्तविधीनें जसा अर्थ वर केला आहे त्या अर्थान्वयें देखील 'माला' या शब्दापुढील 'सु' प्रत्ययाचा प्रकृत सूत्रानें लोप होण्यात काही अडचण येत नाही ) 'श्रविष्ठासु जात श्रविष्ठ' इत्यादि स्थली तद्धित प्रत्ययाचा व स्त्रीप्रत्ययाचा लुक् झाला असता, 'श्रविष्ठ' इत्यादि शब्द प्रत्ययलक्षणानें, म्हणजे स्थानिवद्भावानें, टाबन्त आहेत असे मानल्यानें जो अतिव्याप्तिरूप दोष येतो, म्हणजे 'सु' प्रत्ययाचा लोप होण्याची आपत्ति येते, त्या दोषाचे निवारण होण्याकरिता प्रकृत सूत्रात 'दीर्घात्' या पदाचे ग्रहण केले आहे हे देखील जाणावे ('श्रविष्ठासु जात श्रविष्ठ' या उदाहरणात 'सन्धिवेलाद्यृतु' सू १३८७ या सूत्रानें 'तत्र जात' या अर्थामध्यें जो 'अण्' प्रत्यय होतो त्याचा 'श्रविष्ठाफल्गुन्यनुराधास्वाति' सू १४०७ या सूत्रानें लुक् झाल्यावर 'लुक् तद्धितलुकि' सू १४०८ या सूत्रानें उपसर्जन स्त्रीप्रत्ययाचा देखील लुक् होऊन 'श्रविष्ठ' असे रूप होते या

'श्रविष्ठ' शब्दाहून 'सु' प्रत्यय केला असतां, ज्या 'टाप्' प्रत्ययाचा लुक् झाला आहे तो 'टाप्' प्रत्यय 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' सू. २६२ या सूत्रान्वयें प्रत्ययलक्षणानें विद्यमान आहे असें मानल्यास, त्यापुढील 'सु' प्रत्ययाचा प्रकृत सूत्रानें लोप होण्याची आपत्ति येते. परंतु प्रकृत सूत्रांत 'दीर्घात्' या पदाचें ग्रहण केलें असल्यामुळें व दीर्घ आबन्त 'श्रविष्ठा' हा शब्द 'श्रविष्ठ' असा ऱ्हस्व अदन्त झाला असल्यामुळें, ती आपत्ति टळते व 'श्रविष्ठः' असें इष्ट रूप सिद्ध होतें आणि अशा रीतीनें देखील प्रकृत सूत्रांतील 'दीर्घात्' या पदाचें ग्रहण चरितार्थ ठरतें असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे.)

मनोरमा—स्यादेतत् । गङ्गीयतेः क्विप् । गङ्गीः । इहेकारस्य स्थानीवद्भावेनाप्त्वाद्दीर्घत्वाच्चातिव्याप्तिरिति चेत् । सत्यम् । ङी ई, आ आप्, इति प्रश्लिष्य दीर्घग्रहणस्य प्रत्याख्यानान्न कश्चिद्दोषः । सुतिसीति किम् । भेत्ता तासेस्तकारस्य लोपो मा भूत् । न चैवमपि अभैत्सीत् इत्यादौ सिचो लोपापत्तिः । सुतिभ्यां साहचर्येण विभक्तेरेव ग्रहणात् । अपृक्तं किम् । भिनत्ति छिनत्तीति प्रत्युदाहरन्ति । तच्चिन्त्यम् । विशिष्टस्याहल्त्वात् । सुतिसीनां हलिति विशिष्टं व्याख्यायातिप्रसङ्गापादनस्यानुचितत्वात् । यदप्याहुः—सुरां सुनोतीति सुरासुत् तमाचष्टे सुरासयति ततः क्विप् सुराः सुरासौ सुरासः । इह सुनोतेरवयवस्य सस्य लोपं व्यावर्तयितुं अपृक्तग्रहणमिति । तदपि न । परस्परसाहचर्येण सुतिसीनां विभक्तिनामेव ग्रहणात् । अन्यथा सिचो लोपापत्तेरुक्तत्वात् । प्रत्ययाप्रत्यययोः प्रत्ययस्यैव ग्रहणाच्च । हल् किम् । बिभेद ।

'गङ्गीय' या क्यजन्त नामधातूहून क्विप् प्रत्यय केल्यावर 'गङ्गी' असें जें रूप होतें त्यांतील ईकार हा स्थानिवद्भावानें 'आप्'च आहे असें मानलें असतां, तो दीर्घ देखील असल्यामुळें, येथें अतिव्याप्तिरूप दोष येतो, म्हणजे 'गङ्गी' शब्दाहून 'सु' प्रत्यय

केला असता त्या 'सु' प्रत्ययाचा लोप होण्याची आपत्ति येते व 'गङ्गीः' असे इष्ट रूप सिद्ध होऊ शकत नाही, अशी कोणी शंका केल्यास, ती शंका यथार्थ आहे. पण प्रकृत सूत्रातील 'ङ्याप्' या पदात 'ङी ई, आ आप्' असा प्रश्लेष करून 'दीर्घात्' या पदाचे प्रत्याख्यान केल्यानें काही दोष येत नाही. ('गङ्गामिवाचरति गङ्गीयति' या स्थली 'उपमानादाचारे' सू. २६६४ या सूत्रानें 'गङ्गा' शब्दाहून 'क्यच् = य' प्रत्यय करून व 'क्यचि च' सू. २६५८ या सूत्रानें 'गङ्गा' यातील आकाराचा ईकार करून 'गङ्गीय' असा जो क्यजन्त शब्द होतो त्याला 'सनाद्यन्ता धातवः' सू. २३०४ या सूत्रानें धातुसंज्ञा होते या नामधातूहून 'क्विप् च' सू २९८३ या सूत्रानें क्विप् प्रत्यय केला असता, 'अतो लोपः' सू. २३०८ या सूत्रानें 'य' यातील अन्त्य अकाराचा लोप होऊन व 'लोपो व्योर्वलि' सू. ८७३ या सूत्रानें अवशिष्ट यकाराचा लोप होऊन आणि 'वेरपृक्तस्य' सू ३७५ या सूत्रानें 'क्विप् = व्' या अपृक्त प्रत्ययाचा लोप होऊन 'गङ्गी' असे कृदन्त प्रातिपदिक होते. या प्रातिपदिकाहून 'सु' प्रत्यय केल्यास, शंकाकार असे म्हणतो की, 'आप्'चे जागी झालेला ईकार स्थानिवद्भावानें 'आप्'च आहे असे मानतां येत असल्यामुळें व तो दीर्घहि असल्यामुळें, म्हणजे 'गङ्गी' हा दीर्घ ईदन्त शब्द 'गङ्गा' असा दीर्घ आबन्त शब्द आहे असे स्थानिवद्भावानें मानता येत असल्यामुळें व असा स्थानिवद्भाव करणे हा अल्विधि ठरत नसल्यामुळें, प्रकृत सूत्रानें 'सु' प्रत्ययाचा लोप होण्याची व 'गङ्गीः' असे इष्ट रूप सिद्ध न होता 'गङ्गी' असे प्रथमेच्या एकवचनाचे अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येते या शंकेवर दीक्षित असे उत्तर देतात की, ही शंका योग्य आहे व शंकाकारानें दाखविलेली आपत्ति टाळण्याकरिता प्रकृत सूत्रातील 'ङ्याप्' या पदात 'ङी ई, आ आप्' असा प्रश्लेष करावा आणि असा प्रश्लेष केल्यानें सूत्रार्थ असा होतो की, जेथें 'आप्' आकाररूपानें विद्यमान असतो व 'ङीप्' 'ई' या

रूपानें विद्यमान असतो तशाच स्थलीं त्या 'आप्' व 'ङीप्' पुढील 'सु' प्रत्ययाचा लोप होतो. असें मानलें असतां, प्रकृत सूत्रांत 'दीर्घात्' या पदाचें ग्रहण करण्याची कांहींच गरज राहत नाहीं. 'गङ्गी सु' या वरील उदाहरणांत 'गङ्गा' यांतील 'आप्' आकाररूपानें विद्यमान नसून त्याचें 'ई' असें रूपान्तर झालें असल्यामुळें व अशा रीतीनें 'सु' प्रत्यय 'आरूप आप्' च्या पुढें येत नसल्यामुळें, वरील अर्थान्वयें त्याचा लोप होत नाहीं व 'गङ्गीः' असें इष्ट रूप सिद्ध होतें. 'स्थानिवदादेशः' या सूत्रावरील भाष्यांत 'ङ्याब्ग्रहणेऽदीर्घः' हें वार्तिक पठित करून भाष्यकार म्हणतात— 'ङ्याब्ग्रहणेऽदीर्घ आदेशो न स्थानिवदिति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् ? । निष्कौशाम्बिः अतिखट्वः । ङ्याब्ग्रहणेन ग्रहणात्सुलोपो मा भूदिति । ननु च दीर्घादित्युच्यते । तत्र वक्तव्यं भवति । किं पुनरत्र ज्यायः । स्थानिवत्प्रतिषेध एव ज्यायान् ……… तर्हि वक्तव्यम् ? । न वक्तव्यम् । प्रश्लिष्टनिर्देशात्सिद्धम् । प्रश्लिष्टनिर्देशोऽयम् । ङी ई ईकारान्तात्, आ आप् आकारान्तादिति ।' या भाष्याच्या वन्याच भागाचा अर्थ पूर्वी सांगितलाच आहे. या भाष्याच्या आधारेंच दीक्षितांनीं मनोरमेंतील प्रकृत पंक्ति लिहिली आहे. 'गङ्गी सु' या स्थलीं पञ्चमीसमासपक्ष मानल्यास, 'गङ्गीय' यांतील ज्या अन्त्य अकाराचा 'अतो लोपः' या सूत्रानें लोप झाला आहे त्या पुढील 'सु' प्रत्ययाचा प्रकृत सूत्रानें लोप कर्तव्य असतां, 'अचः परस्मिन्' सू. ५० या सूत्रानें अकारलोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव मानतां येतो व तसें मानलें असतां स्थानिवद्भावानें आवन्त ठरणारें अङ्ग व 'सु' प्रत्यय या दोहोंमध्यें अकाराचें व्यवधान आहे असें मानतां येत असल्यामुळें 'सु' लोप होण्याची आपत्ति टळते असें कोणी म्हटल्यास, त्याला उत्तर हें आहे कीं, पञ्चमीसमासपक्ष अनित्य असल्यामुळें त्याचा स्वीकार न केल्यानें, वरील आपत्ति कायम राहतेच. म्हणून त्या आपत्तीचें निवारण करण्याकरितां दीक्षितांनीं भाष्यानुसार जो प्रश्लेष सुचविला आहे तो

केल्यानें सर्व इष्ट रूपांची सिद्धि होते व प्रकृत सूत्रांतून 'दीर्घात्' हें पद देखील गाळतां येते आणि तसे करण्यात लाघव आहे हे उघड आहे. ) प्रकृत सूत्रात 'सु ति सि' याचे ग्रहण अशाकरिता केले आहे की, 'भेत्ता' या स्थली 'तास्' या विकरणातील तकाराचा लोप न व्हावा. ('भिद्' धातूचे लुटाचे प्रथमपुरुषाचे एकवचनाचे रूप करिताना 'स्यतासी लृलुटोः' सू २१८६ या सूत्रानें 'तास्' हे विकरण होऊन 'भिद् तास् तिप्' अशी स्थिति झाली असता, 'पुगन्तलघूपधस्य च' सू. २१८९ या सूत्रानें 'भिद्' यातील उपधा भूत इकाराचा गुण होऊन व 'लुटः प्रथमस्य डारौरसः' सू. २१८८ या सूत्रानें 'तिप्' प्रत्ययाचे जागी 'डा=आ' असा आदेश होऊन आणि 'डा' हा प्रत्यय डित् असल्यामुळें 'अभस्यापि टेर्लोपो डिति' या वचनान्वयें 'तास्' यातील 'आस्' या टिचा लोप होऊन 'भेद् त् आ' अशी स्थिति होते. येथें 'तास्' या विकरणाचा जो अवशिष्ट तकार तो 'भेद्' या हलन्त अङ्गापुढें आला असून देखील त्याचा प्रकृत सूत्रानें लोप होत नाही; कारण तो 'ति' प्रत्ययाचा तकार नसून 'तास्' या विकरणाचा तकार आहे. प्रकृत सूत्रात 'ति' चे ग्रहण केले नसते तर, त्या तकाराचा लोप होण्याची आपत्ति आली असती ) प्रकृत सूत्रात 'सु ति सि' याचे ग्रहण केले असून देखील 'अभैत्सीत्' इत्यादि स्थली 'सिच्=स्' चा लोप होण्याची आपत्ति येते असे कोणी म्हटल्यास, ते म्हणणे बरोबर नाही, कारण 'सि' ला 'सु, ति' याचे साहचर्य असल्यामुळें 'सि' नें विभक्ति-प्रत्ययाचेच ग्रहण करता येते. ('भिद्' धातूचे लुङाचे प्रथमपुरुषाचे एकवचनाचे रूप करिताना 'च्लेः सिच्' सू. २२२२ या सूत्रानें 'च्लि' चे जागी 'सिच् = स्' हा आदेश होऊन 'अ भिद् सिच् तिप्' अशी स्थिति झाली असता, 'वदव्रजहलन्तस्याचः' सू २२६७ या सूत्रानें हलन्तलक्षणा वृद्धि होऊन व 'इतश्च' सू २२०७ या सूत्रानें 'ति' प्रत्ययातील इकाराचा लोप होऊन व 'अस्तिसिचोऽपृक्ते' सू. २२२५ या सूत्रानें तकाराला ईडागम होऊन आणि

'खरि च' सू. १२१ या सूत्रानें 'भिद्' धातूंतील दकाराचा तकार होऊन 'अभैत् स् ईत्' अशी स्थिति होते. या स्थितींत 'अभैत्' या हलन्त अङ्गापुढें सकार येतो. पण तो 'सि' या विभक्ति-प्रत्ययाचा सकार नसून 'सिच्' या विकरणाचा सकार असल्यामुळें, त्याचा प्रकृत सूत्रानें लोप होत नाहीं व 'अभैत्सीत्' असें इष्ट रूप सिद्ध होतें. येथें हें लक्षांत ठेवावें कीं, 'विभक्ति श्च' सू. १८४ या सूत्रान्वयें 'सुप्' व 'तिङ्' प्रत्यय यांनाच विभक्ति-संज्ञा होत असून 'तास्, सिच्' इत्यादि विकरणांना ती संज्ञा होत नाहीं. प्रकृत सूत्रांतील 'सि' नें 'सिच्' च्या सकाराचें ग्रहण करतां येत नाहीं. याचें कारण हें कीं, या सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या त्या 'सि' ला 'सु' व 'ति' या विभक्तिप्रत्ययांचें साहचर्य आहे व 'सहचरितासहचरितयोः सहचरितस्यैव ग्रहणम्' परि. ११२–हा न्याय असल्यामुळें, 'सि' नें विभक्तिप्रत्यय नसलेल्या 'सिच्' च्या सकाराचें ग्रहण न होतां 'सि' या विभक्तिप्रत्ययाच्याच सकाराचें ग्रहण होतें.) प्रकृत सूत्रांत 'अपृक्तम्' हें पद घालण्याचें प्रयोजन सांगतांना प्रकाशकारांनीं 'भिनत्ति, छिनत्ति' हीं प्रत्युदाहरणें दिलीं आहेत. पण हीं प्रत्युदाहरणें बरोबर नाहींत; कारण या दोन उदाहरणांत जो इकारसहित तकार, म्हणजे 'ति' प्रत्यय, आहे त्याला हल् म्हणतां येत नाहीं. 'सु ति सि' यांच्या हल्चा लोप होतो असें क्लिष्ट व्याख्यान करून 'भिनत्ति, छिनत्ति' या उदाहरणांत तकारलोपाची आपत्ति दाखविणें (व अशा रीतीनें 'अपृक्तम्' या पदाची चरितार्थता सिद्ध करणें) अयोग्य आहे. (प्रकृत सूत्रातील 'सुतिसि' हें समाहारद्वन्द्वाचें सामासिक प्रथमान्त पद असून त्याचें 'अपृक्तं हल्' या प्रथमान्त पदांशीं सामानाधिकरण्य आहे. असें असून देखील 'सुतिसि' हें पद षष्ठी मानून 'सुतिसी-नामपृक्तं हल्' असा वैयधिकरण्यानें अन्वय करणें हें 'सम्भवति सामानाधिकरण्ये वैयधिकरण्यमन्याय्यम्', या न्यायाच्या विरुद्ध आहे असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे. 'भिनत्ति, छिनत्ति' या

उदाहरणात 'भिनत्, छिनत्' या हलन्त अङ्गापुढें 'ति' हा समुदाय-रूप प्रत्यय असून केवळ हल् नसल्यामुळें, त्या प्रत्ययातील तकाराचा प्रकृत सूत्रानें लोप पावतच नाही आणि म्हणून ती दोन उदाहरणे योग्य प्रत्युदाहरणे ठरत नाहीत असे दीक्षिताचे म्हणणे आहे) प्रकाशकार असेहि म्हणतात की, 'सुरा सुनोतीति सुरासुत् तमाचष्टे सुरासयति' याहून क्विप् प्रत्यय केला असता, 'सुराः सुरासौ सुरासः' अशी प्रथमेची रूपें होतात व येथें 'सुरास्' या शब्दा-मध्यें जो अन्त्य सकार 'सु' धातूचा अवयव आहे त्याचा लोप न व्हावा याकरिता देखील प्रकृत सूत्रात 'अपृक्तम्' या पदाचे ग्रहण केले आहे. पण हें म्हणणे देखील बरोबर नाही; कारण 'सु ति सि' यांच्या परस्परसाहचर्यामुळें, 'सु ति ति' या शब्दांनी त्या विभक्तिप्रत्ययाचेच ग्रहण होते. तसें न मानल्यास 'सिच् = स्' चा लोप होण्याची आपत्ति येते हे वर सांगितलेच आहे आणखी असे की, 'प्रत्ययाप्रत्यययोः प्रत्ययस्यैव ग्रहणम्'–परि. १११– या परिभाषान्वयें 'सु ति सि' या शब्दांनी प्रत्ययाचेच ग्रहण करता येते ('सुरा सुनोतीति सुरासुत्' या स्थली 'सु' धातूहून क्विप् प्रत्यय केला असता, 'ह्रस्वस्य पिति कृति तुक्' सू. २८५८ या सूत्राने ह्रस्व 'सु' ला तुगागम झाला आहे. प्रातिपदि-काद्धात्वर्थे बहुलमिष्ठवच्च' या गणसूत्रान्वयें 'सुरासुत्' या प्रातिपदि-काहून 'तमाचष्टे' या अर्थामध्यें 'णिच्' प्रत्यय केल्यास, इष्ठवद्भा-वानें टिलोप होऊन 'सुरासि' असे णिजन्त रूप होतें या णिजन्त धातूहून 'क्विप् च' सू. २९८३ या सूत्रानें क्विप् प्रत्यय केल्यास, 'णेरनिटि' या सूत्रानें 'सुरासि' यांतील 'णि=इ' चा लोप होऊन व 'वेरपृक्तस्य' सू. ३७५ या सूत्रानें 'क्विप्=व्' या अपृक्त प्रत्ययाचा लोप होऊन 'सुरास्' असे कृदन्त प्रातिपदिक होतें या हलन्त प्राति-पदिकाहून प्रथमेच्या एकवचनाचा 'सु' प्रत्यय केला असता, प्रकृत सूत्रानें त्या प्रत्ययाचा लोप होऊन 'सुरास' असे जें प्रथमेच्या एक-वचनाचे रूप होतें त्यांत 'सुरा' या आद्यापुढें सकार असल्यामुळें

त्या सकाराचा प्रकृत सूत्रानें लोप कां होऊं नये अशीं शंका उपस्थित करून प्रकाशकार असें उत्तर देतात कीं, 'अपृक्त एकाल् प्रत्ययः' सू. २५१ या सूत्रानें एकाल् प्रत्ययाला अपृक्त ही संज्ञा असल्यामुळें आणि 'सुरास्' या स्थलीं जो अन्त्य सकार आहे तो 'सु' धातूचा सकार असून अपृक्त प्रत्यय नसल्यामुळें, प्रकृत सूत्रांतील 'अपृक्तम्' या पदानें त्या सकाराचें ग्रहण होत नाहीं व त्यामुळें त्या सकाराचा लोप होत नाहीं आणि अशा रीतीनें 'अपृक्तम्' या पदाचें ग्रहण चरितार्थ ठरतें. यावर दीक्षित असें उत्तर देतात कीं, साहचर्यन्याय–परि. ११२–असल्यामुळें, 'सु ति सि' यांच्या परस्परसाहचर्यानें विभक्तिप्रत्ययांचेंच ग्रहण होतें आणि त्यामुळें 'सुरास्' यांतील अन्त्य सकार 'सु' धातूचा सकार असून 'सु' या विभक्तिप्रत्ययाचा सकार नसल्यामुळें, प्रकृत सूत्रानें त्याच्या लोपाची प्राप्तीच होत नाहीं. दुसरें असें कीं, प्रकृत सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या, 'सु' नें विभक्तिप्रत्ययांतील सकाराचेंच ग्रहण न करितां इतर सकाराचें देखील ग्रहण केलें तर, पूर्वी सांगितल्याप्रमाणें, 'अभैत्सीत्' इत्यादि स्थलीं 'सिच् = स्' चा लोप होण्याची व इष्ट रूप सिद्ध न होण्याची आपत्ति येते. तिसरें असें कीं, सूत्रांत जर एखादा असा शब्द उच्चारला असेल कीं, जो प्रत्ययाचा व तसेंच प्रत्ययभिन्नाचा वाचक आहे, तर तद्या ठिकाणीं त्या शब्दानें प्रत्ययाचेंच ग्रहण करावें व प्रत्ययभिन्नाचें ग्रहण करूं नये या अर्थाची 'प्रत्ययाप्रत्यययोः प्रत्ययस्यैव ग्रहणम्' ही परिभाषा असल्यामुळें, प्रकृत सूत्रांतील 'सु' या शब्दानें प्रत्ययाचेंच ग्रहण करतां येतें व 'सुरास्' यांतील अन्त्य सकार वर सांगितल्याप्रमाणें प्रत्ययाचा सकार नसल्यामुळें, तो जरी 'सुरा' या आपन्न शब्दापुढें आहे तरी, त्याचा प्रकृत सूत्रानें लोप पावत नाहीं. म्हणून 'सुरास्' हें 'अपृक्तम्' या पदाचें योग्य प्रत्युदाहरण ठरत नाहीं असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे.) प्रकृत सूत्रांत द्वितीय 'हल्' पदाचें ग्रहण [illegible] आहे

की, 'बिभेद' या उदाहरणातील अन्त्य अकाराचा लोप होण्याची आपत्ति न यावी. ('भिदिर्' या रुधादिगणातील धातूचे लिटाचे परस्मैपदाचे प्रथम पुरुषाच्या एकवचनाचे रूप करिताना 'तिप्' प्रत्ययाचे जागी 'परस्मैपदाना णलतुस्' सू २१७३ या सूत्रानें 'णल् = अ' असा आदेश होऊन व उपधागुण व अभ्यासकार्यें होऊन 'बिभेद् अ' अशी स्थिति झाली असता, 'बिभेद्' या हलन्त अङ्गापुढें 'णल् = अ' हा 'अपृक्त एकाल् प्रत्यय' सू २५१ या सूत्रान्वयें अपृक्त ठरणारा प्रत्यय येतो. प्रकृत सूत्रात जर द्वितीय 'हल्' पदाचे ग्रहण नसतें तर, त्या 'अ' चा लोप होण्याची आपत्ति आली असती. पण तो अपृक्त हल् नसून अच् असल्यामुळें, त्याचा लोप होण्याची आपत्ति टळते व अशा रीतीनें प्रकृत सूत्रातील द्वितीय 'हल्' पदाचे ग्रहण चरितार्थ ठरतें.)

शब्दरत्न—अतिव्याप्तिरिति । अस्य स्त्री ई देवदत्तस्य ई देवदत्तैरित्यावावपि रोति बोध्यम् । प्रत्याख्यानाविति । दीर्घग्रहणे-नोपस्थितत्वादीकाररूपस्यैव दीर्घस्य ग्रहणाच्चेत्यपि बोध्यम् । सुरासयतीति । न च "णौ चङि" इति सूत्रस्थभाष्यप्रामाण्येन इदुदुपधेभ्यो णिङ्नास्तीति सिद्धान्तात्कथमत्र णिजिति वाच्यम् । तद्धात्वस्य तेषा लुङि प्रयोगाभावकल्पनेनोपपत्तेः सर्वथा तदभाव-कल्पनमप्रामाणिकमित्यभिमानात् । ग्रहणाच्चेति । सावनुनासिको-च्चारपाठाच्चेत्यपि बोध्यम् । एव चापृक्तग्रहणं चिन्त्यप्रयोजनम् । वस्तुतो गङ्गीः सुरा इत्यादेरभिधाने दृढ मान चिन्त्यम् ।

मनोरमेंत 'गङ्गीयते क्विप् । गङ्गी' असे जें अतिव्याप्तीचे उदाहरण दिले आहे त्याखेरीज 'अस्य स्त्री ई देवदत्तस्य ई देवदत्तैः' इत्यादि उदाहरणात देखील अतिव्याप्तिरूप दोष येतो हे जाणावे. ('अस्य स्त्री ई' या स्थली 'पुयोगादाख्यायाम्' सू. ५०४ या सूत्रानें, कोणत्या तरी पुरुषाच्या नावाच्या बोधक विश्व विष्णु-वाचक 'अ' या प्रातिपदिकाला 'ङीप्' प्रत्यय होऊन व

'यस्येति च' सू. ३११ या सूत्रानें 'अ' चा लोप होऊन 'ई' असें रूप होतें. 'देवदत्तस्य ई देवदत्ते' या स्थलीं 'आद्गुणः' या सूत्रानें गुणरूप एकादेश केल्यानें 'देवदत्ते' असें जें एदन्त सामासिक प्रातिपदिक होतें त्याहून 'सु' प्रत्यय केला असतां, त्या उदाहरणांत गुणरूप एकादेश 'ए' हा पूर्वान्तवद्भावानें 'ङी = ई' च आहे असें मानतां येतें तरी, 'देवदत्ते' या शब्दस्वरूपाच्या अन्तीं 'ङीप्' हा ईकाररूपानें कायम राहत नसून त्याचें 'ए' असें रूपान्तर होत असल्यामुळें व तो 'ए' दीर्घ वर्ण आहे तरी, तो दीर्घ 'ङी = ई' वर्ण नसल्यामुळें, त्यापुढील 'सु' प्रत्ययाचा प्रकृत सूत्रानें लोप होत नाहीं व त्या 'सु' प्रत्ययाचें रुत्व व विसर्ग होऊन 'देवदत्तेः' असें प्रथमेच्या एकवचनाचें इष्ट रूप सिद्ध होतें, आणि अशा प्रकारचीं इष्ट रूपें सिद्ध होणें हें देखील भाष्यांत व मनोरमेंत सुचविलेल्या 'ङ्याप्' यांतील प्रश्लेषाचें फल मानतां येतें असें शब्दरत्नकार म्हणतात.) 'दीर्घग्रहणस्य प्रत्याख्यानान्न कश्चिद्दोषः' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्या-खेरीज असें देखील म्हणतां येतें कीं, प्रकृत सूत्रांतील 'ङ्याप्' या पदामध्यें जें दीर्घ 'ङी=ई'चें व 'आप्=आ' चें ग्रहण केलें आहे त्यामुळें दीर्घ ईकाराची व आकाराची उपस्थिति होत असल्यामुळें, तसा दीर्घ (आकाराचें व) ईकाराचेंच (प्रत्ययग्रहिणन्यायानें) ग्रहण करतां येतें आणि त्यामुळें देखील कांहीं दोष येत नाहीं हें जाणावें. (म्हणजे 'ङ्याप्' या पदानें 'ङी' रूप जो ईकार व 'आप्' रूप जो आकार यांची प्रथम उपस्थिति होत असल्यामुळें, तमाम दीर्घ ईकार किंवा आकार ज्या शब्दस्वरूपाच्या अन्तीं आहे व त्या दीर्घ ईकाराचें किंवा आकाराचें रूपान्तर झालें नाहीं तसाच शब्दस्वरूपापुढील 'सु' प्रत्ययाचा प्रकृत सूत्रानें लोप होतो. 'लक्ष्मीः' या शब्दस्वरूपांत आद्यन्त शब्दरूपाशीं ईकार शब्दस्वरूपामध्यें रूपान्तर झालें नसून व 'आ' हा आद्रूपानें कायम नसून ईकाररूपानें रूपान्तर पावला आहे. त्यामुळें 'लक्ष्मी' या प्रातिपदिकापुढील 'सु' प्रत्ययाचा लोप न होतां त्याचे

रुत्व व विसर्ग होऊन 'गड्ढीः' असे रूप होते. त्याचप्रमाणे 'देवदत्ते' या उदाहरणात जो 'डी=ई' प्रथम उपस्थित आहे तो सामासिक शब्दस्वरूपाच्या अन्ती ईकाररूपानें कायम राहत नसून गुणरूप एकादेशानें त्याचे 'ए' असे रूपान्तर होत असल्यामुळें, त्यापुढील 'सु' प्रत्ययाचा देखील वर सांगितल्याप्रमाणे लोप होऊ शकत नाही.) ज्या शब्दस्वरूपाच्या उपधेंत ईकार किंवा उकार आहे त्याहून 'णिच्' प्रत्यय होत नाही असा सिद्धान्त 'णौचङ्युपधाया ह्रस्व.' सू ७-४-१ या सूत्रावरील प्रमाणभूत भाष्यावरून निघत असल्यामुळें ( व 'सुरासुत्' या शब्दात उपधेमध्यें उकार असल्यामुळें, 'तमाचष्टे' या अर्थामध्यें) 'सुरासुत्' या शब्दाहून 'णिच्' प्रत्यय होऊ शकत नाही अशी कोणी शंका केल्यास, ती शंका बरोबर नाही; कारण ज्याच्या उपधेंत ह्रस्व इकार किंवा उकार आहे अशा इदुदुपध शब्दाहून ( 'तमाचष्टे' या अर्थामध्यें ) णिच् केल्यास तशा णिजन्त धातूचे लुङाचे रूप होत नाही असे मानल्यानें त्या भाष्याची उपपत्ति लागू शकत असल्यामुळें, त्या भाष्याच्या आधारें इदुदुपध शब्दाहून णिच् प्रत्यय मुळीच होत नाही हे मानणे प्रमाणास धरून नाही, म्हणजे तसे मानण्यास काही प्रमाण नाही व तसे मानणे अयोग्य आहे, असे मानून प्रकाशकारानी 'सुरासुत्' या उदुपध शब्दाहून णिच् प्रत्यय केला आहे. ( त्या भाष्यात भाष्यकारानी 'नाग्लोपि' सू २५७२ या सूत्रातील 'अक्' प्रत्याहाराचा निर्देश 'वृद्धेर्लोपो-बलीयान्' या सिद्धान्ताचा ज्ञापक मानला आहे आणि कैयटाचे असे म्हणणे आहे की, इदुदुपध शब्दाहून णिच् प्रत्यय मुळीच होत नाही असे मानले तरच भाष्यकारांनी दिलेले ज्ञापक सुसङ्गत ठरते आणि म्हणून त्या भाष्यावरील वृत्तीत कैयटानें 'अनभिधानाण्णिजत्र नास्तीति भाष्यकारस्याऽभिप्रायः' असे म्हटले आहे. शब्दरत्नकार म्हणतात की, कैयटाचे हे म्हणणे प्रकाशकारांना मान्य नाही व प्रकाशकाराचे मत असे आहे की, इदुदुपध प्रातिपदिकाहून 'तमाचष्टे' या अर्थामध्यें णिच् प्रत्यय होण्याचे अभिधान नाही असे नसून, तशा

णिजन्त नामधातूचें लुङाचें रूप होण्याचें वास्तविक अभिधान नाहीं असा भाष्यकारांच्या म्हणण्याचा आशय आहे आणि त्यांचें असें मत असल्यामुळें, त्यांनीं 'सुरासुत्' या शब्दामध्यें उकार उपघेंत असून देखील त्या शब्दाहून णिच् व नंतर क्विप् प्रत्यय केला आहे. उद्योतकारांनीं त्या भाष्याच्या वृत्तींत 'लुङ्येवैषामनभिधान-मित्यन्ये' जें असें म्हटलें आहे तें बहुधा प्रकाशकारांच्या मताला अनुलक्षून म्हटलें आहे. सारांश इदुदुपध प्रातिपदिकाहून णिच् प्रत्यय होऊं शकतो; पण तशा णिजन्त नामधातूचा लुङामध्यें प्रयोग होत नाहीं असा प्रकाशकारांच्या मतें भाष्यकारीय सिद्धान्त असल्यामुळें, ते कैयटाचें म्हणणें अप्रमाण मानतात असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे. या पंक्तींत 'इत्य-भिमानात्' हीं अरुचिप्रदर्शक पदें घातलीं असल्यामुळें, शब्दरत्न-कारांना प्रकाशकारांचें मत मान्य नसून कैयटाचेंच मत मान्य आहे हें ध्वनित होतें आणि त्यांनी 'वस्तुतो…दृढं मानं चिन्त्यम्' या पुढील पंक्तींत आपलें मत व्यक्त केलें आहे.) 'प्रत्ययाप्रत्यययोः प्रत्यय-स्यैव ग्रहणाच्च' असें ('सुरास्' या स्थलीं 'सुरा' या आबन्त शब्दापुढील सकाराचा प्रकृत सूत्रानें लोप होत नाहीं याचें) जें मनोरमेंत कारण दिलें आहे त्याखेरीज 'सावनुनासिकोकार-पाठाच्च', म्हणजे 'सु' या विभक्तिप्रत्ययांत 'उ' हा अनुनासिकरूपानें पठित आहे, हें देखील कारण देता येतें हें जाणावें. (प्रथमेच्या एकवचनाच्या 'सु' प्रत्ययांत 'उ' हा अनुनासिकरूपानें पठित असल्यामुळें, त्याला 'उपदेशेऽजनुनासिक इत्' सू. ३ या सूत्रानें इत्संज्ञा होऊन, 'तस्य लोपः' सू. ६२ या सूत्रानें त्याचा लोप होतो व त्या 'सु' प्रत्ययाचेंच प्रकृत सूत्रांत ग्रहण केलें आहे. त्यामुळें तथा 'सु' प्रत्ययानें 'सु' धातूंतील सकाराचें ग्रहण होऊं शकत नाहीं; कारण 'सु' धातूंतील उकार अनुनासिकरूपानें पठित नाहीं व इत्संज्ञक नाहीं. म्हणून 'सु' धातूंतील सकार जो 'सुरास्' या उदाहरणांत 'सुरा' या आबन्त शब्दापुढें आला आहे तो 'सु'

प्रत्ययाचा सकार नसल्यामुळें त्याचा प्रकृत सूत्रानें लोप होऊं शकत नाही असे जें मनोरमेंत कारण दिले आहे त्याखेरीज असेहि कारण देता येते कीं, ज्या 'सु' मधील उकार अनुनासिक व इत्संज्ञक आहे तशा 'सु' चा तो सकार अवयव नसल्यामुळें त्याचा प्रकृत सूत्रानें लोप होऊ शकत नाही असे शब्दरत्नकार म्हणतात. ) साराश प्रकृत सूत्रात 'अपृक्तम्' हे जें पद घातले आहे त्याचे प्रयोजन चिन्त्य आहे, म्हणजे ते पद निष्प्रयोजनक व व्यर्थ असून त्याचे प्रत्याख्यान करता येते ( कारण 'ति सि' या प्रकृत सूत्रात निर्दिष्ट असलेल्या प्रत्ययाच्या साहचर्यानें 'सु' प्रत्ययाचेच ग्रहण होऊ शकत असल्यामुळें व 'सु' धातूच्या सकाराचे वर सांगितलेल्या कारणामुळें ग्रहण होऊ शकत नसल्यामुळें, प्रकृत सूत्रातून 'अपृक्तम्' हे पद गाळले तरी काही दोष उद्भवत नाही. ) वास्तविक 'गड्डीः, सुराः' इत्यादि प्रयोग भाषेंत होतात असे मानण्यास कोणतेहि सबळ प्रमाण नाही ( आणि म्हणून तशा रूपांची सिद्धि करण्याची खटपट करणें व्यर्थ आहे. )

मनोरमा— ननु प्रथमहल्ग्रहणं व्यर्थम् । हलन्तात्परेषां संयोगान्तलोपसम्भवात् । अत्राहुः —

संयोगान्तस्य लोपे हि नलोपादिर्न सिध्यति ।
रात्तु तेनैव लोपः स्याद्धलस्तस्माद्विधीयते ।।

तथा हि । सलेत्यत्र नलोपो न स्यात् संयोगान्तलोपस्यासिद्धत्वात् । स्यादेतत् । संयोगान्तलोपो नासिद्धः । "न ङिसम्बुद्ध्योः" इति सूत्रे संबुद्धिग्रहणाज्ज्ञापकात् । न चैवं गोमानित्यादावपि नलोपापत्तिः ज्ञापकस्य विशेषविषयत्वात् । यत्र हि नकारविभक्त्योरानन्तर्यं तत्रैव सिद्धत्वं व्याख्यानात् । यत्त्वाहुः—हे ब्रह्मन्निति नपुंसकार्थत्वाद् नैतज्ज्ञापकमिति । तन्न । लुका लुप्ते प्रत्ययलक्षणाभावेन "संबुद्धौ वा नपुंसकानाम्—" इत्यस्यावश्यकतया च सम्बुद्धिग्रहणस्य नपुंसकविषयत्वासम्भवेनोक्तज्ञापकस्य सुस्थत्वात् । तस्मान्नलोपो न प्रयोजनमिति चेत् । इह तर्हि अभिनोऽत्रेत्यत्र रोरुत्वं न

स्यात् । तदिदमुक्तं नलोपादिरिति । तथा अबिभर्भवान् इत्यत्र तिलोपो न स्यात् । "रात्सस्य" इति नियमात् ।।

येथें अशी शंका करण्यांत येते कीं, प्रकृत सूत्रांत प्रथम 'हल्' या पदाचें, म्हणजे 'हल्ङ्याब्भ्यः' यांतील 'हल्' या पदाचें, जें ग्रहण केलें आहे तें व्यर्थ आहे; कारण हलन्त अङ्गापुढें 'स्, त्, स्' हे प्रत्ययरूप हल् आल्यास, 'संयोगान्तस्य लोपः' सू. ५४ या सूत्रानें त्यांचा लोप होऊं शकतोच. या विषयसंबंधानें काशिकाकारांनीं प्रकृत सूत्रावरील वृत्तींत 'संयोगान्तस्य लोपे हि नलोपादिर्न सिध्यति । रात्तु तेनैव लोपः स्याद्धलस्तस्माद्विधीयते ।।' अशी कारिका पठित केली आहे. (या कारिकेचा असा भावार्थ आहे कीं, प्रकृत सूत्रांतील 'हल्ङ्याब्भ्यः' या पदांतील 'हल्' या पदाचें प्रत्याख्यान केल्यास व हलन्त अङ्गापुढील 'स्, त्, स्' या प्रत्ययांचा 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानें लोप केल्यास, नकारलोप इत्यादि कार्यें सिद्ध होऊं शकणार नाहींत आणि तसेंच रकारान्त अङ्गापुढें 'त्' प्रत्यय आल्यास, 'रात्सस्य' सू. २८० हें नियामक सूत्र असल्यामुळें, त्या 'त्' प्रत्ययाचा लोप होऊं शकणार नाहीं. म्हणून हलन्त अङ्गापुढें 'स्, त्, स्' हे प्रत्यय आल्यास त्या प्रत्ययांचा लोप होतो असा प्रकारचें विधान प्रकृत सूत्रांत करणें भाग पडलें आणि अशा रीतीनें प्रकृत सूत्रांतील प्रथम 'हल्' या पदाचें ग्रहण आवश्यक ठरतें.) उदाहरणार्थ 'सखा' या उदाहरणांत नकाराचा लोप होऊं शकणार नाहीं; कारण संयोगान्त लोप असिद्ध आहे. ('सखि सु' या स्थलीं 'अनङ् सौ' सू. २४८ या सूत्रानें 'सखि' यांतील अन्त्य इकाराचे जागीं 'अनङ्=अन्' असा आदेश होऊन 'सखन्' अशी स्थिति झाली असतां, 'सखन्' हें अङ्ग नाम असल्यामुळें 'सर्वनामस्थाने चासंबुद्धौ' सू. २५० या सूत्रानें उपधा दीर्घ होऊन 'सखान् सु=सखान्स्' असें रूप झाल्यावर 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानें अन्त्य सकाराचा लोप केल्यावर, तो लोप त्रैपादिक परसूत्रानें होणारा असल्यामुळें, 'पूर्वत्रासिद्धम्' सू. १२ या वचनान्वयें, तो लोप 'न लोपः प्राति-

पदिकान्तस्य' या त्रैपादिक पूर्व सूत्राच्या दृष्टीनें असिद्ध ठरतो, म्हणजे तो लोप झालाच नाहीं व पदाच्या अन्ती सकार कायम असून नकार पदान्ती नाहीं असे मानावे लागते, व त्यामुळें 'सखान्' यातील नकाराचा लोप होऊ शकत नाही व 'सखा' असे इष्ट रूप सिद्ध न होण्याची आपत्ति येते ) येथें शकाकार अशी शका करतो की, ('हल्ङ्याब्भ्य:' यातील 'हल्' या पदाचे प्रत्याख्यान केले तरी, 'न लोप. प्रातिपदिकान्तस्य या त्रैपादिक पूर्व सूत्राच्या दृष्टीनें 'सयोगान्तस्य लोप.' या त्रैपादिक उत्तर सूत्रानें होणारा) सयोगान्त लोप असिद्ध ठरत नाही व 'न ङिसम्बुद्धयो' सू ३५२ या सूत्रातील 'सम्बुद्धि' या पदाचे ग्रहण तो असिद्ध ठरत नाही याचे ज्ञापक आहे. ('हे राजन् सु = हे राजन् स्' या स्थली 'सयोगान्तस्य लोप' या सूत्रानें अन्त्य सकारचा लोप केल्यास जर तो लोप असिद्ध मानला तर, म्हणजे सकाराचा लोप झालाच नाही असे मानले तर, 'न लोप प्रातिपदिकान्तस्य' या सूत्रानें 'राजन्' यातील अन्त्य नकाराच्या लोपाची प्राप्तीच होत नाही, कारण नकार पदान्ती ठरत नसून सकार पदान्ती ठरतो असे असून देखील 'न ङिसम्बुद्धयो' या सूत्रात ज्याअर्थी पाणिनीनें 'सम्बुद्धि' या पदाचे ग्रहण केले आहे व सबुद्धीचा प्रत्यय पुढे असता नकारलोप होत नाही असे त्या सूत्रात विधान केल आहे व 'प्राप्तस्यैव निषेध' असा न्याय आहे त्याअर्थी हें सिद्ध होते की, 'न लोप प्रातिपदिकान्तस्य' या सूत्राच्या दृष्टीनें 'सयोगान्तस्य लोप' या सूत्रानें होणारा सबुद्धीच्या 'सु=स्' प्रत्ययाचा लोप असिद्ध ठरत नाही व तो असिद्ध ठरत नसल्यामुळें 'राजन्' यातील अन्त्य नकाराचा लोप होण्याची जी आपत्ति येत होती तिचे निवारण करण्याकरिता 'न ङिसम्बुद्धयो' या सूत्रात पाणिनीला 'सम्बुद्धि' या पदाचे ग्रहण मुद्दाम करावे लागले व अशा रीतीनें तें पद सयोगान्त लोप नलोपकार्याच्या दृष्टीनें सिद्ध आहे याच ज्ञापक ठरत ) पण सयोगान्त लोप नलोपकार्याच्या दृष्टीनें सिद्ध ठरतो असे मानले तर 'गोमान्' इत्यादि स्थली देखील नकारलोप होण्याची

आपत्ति येते असें कोणी म्हटल्यास, त्यावर (शंकाकाराचें) हें उत्तर आहे कीं, वर दिलेलें ज्ञापक विशेष स्थलींच लागू पडणारें विशेषापेक्ष ज्ञापक आहे (व सर्वत्र लागू पडणारें सामान्यापेक्ष ज्ञापक नाहीं;) कारण जेथें नकाराच्या लगेच पुढें विभक्तिप्रत्यय आला असून त्या विभक्तिप्रत्ययाचा 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानें लोप केला जातो तशाच ठिकाणीं तो संयोगान्त लोप 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' या सूत्रानें होणाऱ्या नकारलोपाच्या दृष्टीनें सिद्ध ठरतो असें व्याख्यान केलें आहे. ('गोमत् सु' या स्थलीं 'अत्वसन्तस्य चाधातोः' सू. ४२५ या सूत्रानें उपधा दीर्घ होऊन व नंतर 'उगिदचां सर्वनामस्थाने' सू. ३६१ या सूत्रानें नुमागम होऊन 'गोमान्त् स्' अशी स्थिति झाली असतां, 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानें प्रथम सकाराचा व नंतर त्याच सूत्रानें लक्ष्यभेदामुळें तकाराचा लोप केल्यावर तो सकारलोप व तकारलोप सिद्ध मानल्यास, म्हणजे नलोपकार्याच्या दृष्टीनें तो लोप झाला आहे असें मानल्यास, 'गोमान्' यांतील अन्त्य नकार पदान्तीं येत असल्यामुळें, त्याचा लोप होण्याची आपत्ति येते असें कोणी म्हटल्यास, त्यावर शंकाकार असें उत्तर देतो कीं, 'गोमान्त् स्' या उदाहरणांत नकाराच्या लगेच पुढें 'सु = स्' हा विभक्तिप्रत्यय नसून त्या दोहोंमध्यें विभक्तिप्रत्यय नसणाऱ्या तकाराचें व्यवधान असल्यामुळें, 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानें होणारा तकारलोप नलोपकार्याच्या दृष्टीनें सिद्ध ठरत नाहीं, म्हणजे झाला आहे असें मानतां येत नाहीं. त्यामुळें 'गोमान्' यांतील नकार पदान्तीं आहे असें ठरत नसल्यामुळें, त्या नकाराचा लोप होत नाहीं व 'गोमान्' असें इष्ट रूप सिद्ध होतें. प्रकृत सूत्रावरील भाष्यांत—६–१–६८—भाष्यकार म्हणतात :—'हलन्ताद-पृक्तलोपः संयोगान्तलोपश्चैव नलोपाभावः, राजा तक्षा । संयोगान्तलोपस्यासिद्धत्वान्नलोपो न प्राप्नोति......नैष दोषः । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति सिद्धः संयोगान्तलोपो नलोपे इति, यदयं न ङिसम्बुद्ध्योरिति सम्बुद्धौ प्रतिषेधं शास्ति । यदि हि प्राप्नोति–

पचन् यजन् । तुल्यजातीयस्य ज्ञापकं भवति । कश्च तुल्यजातीयः? । यः सम्बुद्धावनन्तरः ।' यावर कैयटानें 'पचन्नित्यत्र नकारस्तकारेण व्यवहितः' असे म्हटले असून, उद्योतकारानी 'यः सम्बुद्धावनन्तर इति भाष्येण विभक्तिः संयोगान्तलोप उपलक्ष्यते इति बोध्यम्' असे म्हटले आहे. उद्योतकाराच्या या विवरणावरून हे स्पष्ट होते की, 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानें संयोगाच्या अन्ती असणाऱ्या विभक्तिप्रत्ययाचा लोप केल्यास, तसाच लोप नलोपकार्याच्या दृष्टीनें सिद्ध ठरत असून इतर वर्णाचा लोप सिद्ध ठरत नाही. साराश शकाकाराचे म्हणणे वरील भाष्याला धरून आहे ) यावर प्रकाशकार असे म्हणतात की, 'हे ब्रह्मन्' हे नपुंसकाचे संबुद्धीचे रूप सिद्ध होण्याकरिता 'न ङिसम्बुद्धयोः' या सूत्रात 'सम्बुद्धि' या पदाचे ग्रहण केले असल्यामुळें, ते पद संयोगान्त लोप नलोपाच्या दृष्टीनें सिद्ध ठरतो याचे ज्ञापक मानता येत नाहीं, पण (शकाकार म्हणतो की,) हे म्हणणे बरोबर नाही; कारण प्रत्यय लुक्नें लुप्त झाला असता तो लुप्त प्रत्यय विद्यमान आहे असे प्रत्ययलक्षणानें मानता येत नाही व नकारान्त नपुंसकलिङ्गी प्रातिपदिकाचे संबुद्धीचे रूप सिद्ध करण्याकरिता 'सम्बुद्धौ नपुंसकानां नलोपो वा वाच्य'—सू ३३८ वरील वार्तिक—हे वार्तिक असणे आवश्यक असल्यामुळें व 'न ङिसम्बुद्धयो.' या सूत्रातील 'सम्बुद्धौ' या पदाचे ग्रहण नान्त नपुंसक प्रातिपदिकाच्या संबुद्धीचे नान्त रूप सिद्ध करण्याकरिता उपयोगी पडू शकत नसल्यामुळें, त्या सूत्रातील 'सम्बुद्धि' या पदाचे ग्रहण वर सांगितल्याप्रमाणे ज्ञापक ठरते म्हणून ('राजा, सखा' इत्यादि स्थली) नलोप व्हावा या प्रयोजनाकरिता 'हल्ङ्याब्भ्य' या प्रकृत सूत्रातील पदात 'हल्' याचे ग्रहण केले आहे हे म्हणणे बरोबर मानता येत नाही (अशी शकाकाराची शका आहे 'हे ब्रह्मन् सु' या स्थली 'स्वमोर्नपुंसकात्' सू ३१९ या सूत्रानें 'सु' प्रत्ययाचा लुक् झाला असता, 'ब्रह्मन्' यातील नकार पदान्ती आहे असे मानावे लागत

असल्यामुळें, त्या नकाराचा लोप होण्याची आपत्ति येते व 'ब्रह्मन्' असें इष्ट नपुंसकाचें संबुद्धीचें रूप सिद्ध होऊं शकत नाहीं. तें रूप सिद्ध होण्याकरितां 'न ङिसम्बुद्ध्योः' या सूत्रांत 'सम्बुद्धि' या पदाचें ग्रहण केलें आहे व अशा रीतीनें तें ग्रहण आवश्यक व चरितार्थ ठरत असल्यामुळें, नलोपाच्या दृष्टीनें संयोगान्त लोप सिद्ध ठरतो याचें तें ज्ञापक मानतां येत नाहीं असें प्रकाशकारांचें म्हणणें आहे. यावर शंकाकार असें उत्तर देतो कीं, 'सम्बुद्धौ नपुंसकानां नलोपो वा वाच्यः' हें वार्तिक नान्त नपुंसक प्रातिपदिकांचीं संबुद्धीचीं इष्ट रूपें सिद्ध होण्याकरितां मुद्दाम केलें असल्यामुळें, त्या वार्तिकानेंच तीं रूपें सिद्ध होतात व तीं रूपें सिद्ध करण्याकरितां 'न ङिसम्बुद्ध्योः' हें सूत्र प्रवृत्त करण्याची मुळींच गरज नाहीं. एवढेंच नव्हे तर तें सूत्र नान्त नपुंसक प्रातिपदिकाचीं संबुद्धीचीं रूपें करतेवेळीं प्रवृत्त होऊं शकत नाहीं; कारण 'हे ब्रह्मन् सु' या स्थलीं 'स्वमोर्नपुंसकात्' या सूत्रानें 'सु' प्रत्ययाचा लुक् केला असतां, 'न लुमताङ्गस्य' सू. २६३ हा निषेध असल्यामुळें, तो लुप्त संबुद्धीचा 'सु' प्रत्यय विद्यमान् आहे असें प्रत्ययलक्षणानें मानतां येत नाहीं. त्यामुळें 'ब्रह्मन्' हें पद संबुद्धिप्रत्ययपरक ठरत नसल्यामुळें, संबुद्धिप्रत्यय पुढें असतांना प्रवृत्त होणारें 'न ङिसम्बुद्ध्योः' हें निषेधक सूत्र येथें मुळींच प्रवृत्त होऊं शकत नाहीं व त्यामुळें नित्य नलोप होण्याची आपत्ति येते. ती टळावी व विकल्पेंकरून नलोप व्हावा आणि 'ब्रह्मन्, ब्रह्म' अशीं पाक्षिक संबुद्धीचीं रूपें सिद्ध व्हावीं याकरितांच वरील वार्तिक मुद्दाम केलें आहे. म्हणून 'न ङिसम्बुद्ध्योः' या सूत्रांत 'सम्बुद्धि' या पदाचें ग्रहण नान्त नपुंसक प्रातिपदिकाचें सम्बुद्धीचें इष्ट रूप होण्याकरितां केलें आहे असें जें प्रकाशकारांचें म्हणणें आहे तें चूक ठरतें. सारांश 'न ङिसम्बुद्ध्योः' या सूत्रांतील 'सम्बुद्धि' या पदाचें ग्रहण 'हे ब्रह्मन्' इत्यादि रूपें सिद्ध करण्याकरितां आवश्यक व

उपयोगी पडत नसल्यामुळें, तें ग्रहण नलोप करतेवेळी संयोगान्त लोप सिद्ध ठरतो याचें वर सांगितल्याप्रमाणें ज्ञापक ठरतें व त्यामुळें 'हल्ङ्याब्भ्यः' यातील 'हल्' हें पद गाळलें तरी सर्व इष्ट रूपांची सिद्धि होऊं शकत असल्यामुळें, त्या पदाचें ग्रहण व्यर्थ ठरतें असा शकाकाराच्या म्हणण्याचा भावार्थ आहे यावर दीक्षित असें उत्तर देतात की, शकाकाराचें हे म्हणणें बरोबर मानल्यास ) 'अभिनोऽत्र' या उदाहरणात 'रु' चें उत्व न होण्याची आपत्ति येते आणि म्हणूनच ('संयोगान्तस्य लोपे हि नलोपादिर्न सिध्यति' या काशिकेंत दिलेल्या कारिकेतील) 'नलोपादि.' या पदात 'आदि' हें पद घातले आहे ( व शकाकाराचें म्हणणें बरोबर मानल्यास ज्याप्रमाणें 'अभिनोऽत्र' या स्थली 'रु' चें उत्व न होण्याची आपत्ति येते ) त्याचप्रमाणें 'अविभर्भवान्' या उदाहरणात देखील 'ति' लोप, म्हणजे सकाराचा लोप न होण्याची आपत्ति येते, कारण 'रात्सस्य' सू २८० हें नियमार्थक सूत्र आहे. ( रुधादिगणात पठित असलेल्या 'भिद्' धातूचें लङाचे मध्यमपुरुषाचें एकवचनाचें रूप करिताना 'श्नम् = न' हे विकरण लागून व अडागम होऊन 'अ भिनद् सिप्' अशी स्थिति झाली असता, 'इतश्च' सू. २२०७ या सूत्रानें 'सि' प्रत्ययातील इकाराचा लोप होऊन व 'भिनद्' यातील दकाराचें 'दश्च' सू २४६८ या सूत्रानें रुत्व होऊन 'अ भिनर् स्' अशी स्थिति होते अशा स्थितीत 'अभिनर्' या हलन्त अङ्गापुढील 'स्' या अपृक्त प्रत्ययाचा प्रकृत सूत्रानें लोप न करिता 'संयोगान्तस्य लोप' या सूत्रानें त्या सकाराचा लोप केल्यास 'अभिनर्' असें जें रूप होतें त्यापुढें 'अत्र' हें पद आलें असता, 'अतो रोरप्लुतादप्लुते' सू १६३ या सापादिक सूत्राच्या दृष्टीनें त्रैपादिक सूत्रानें झालेला संयोगान्त लोप असिद्ध ठरत असल्यामुळें सकारलोप झालाच नाही व 'अभिनर्' या स्थली दकाराचे जागीं जो 'रु' झाला आहे त्याच्या लगेच पुढें 'अत्र' यातील अकार नसून दोहो-मध्यें सकाराचें व्यवधान आहे असें मानणें भाग पडतें व त्यामुळें,

'रु' चें उत्व न होण्याची व 'अभिनोऽत्र' असा इष्ट प्रयोग सिद्ध न होण्याची आपत्ति येते. पण 'हल्ङ्याब्भ्यः' या सूत्रानें 'अभिनर्' या हलन्त अङ्गापुढें असणाऱ्या 'स्' या अपृक्त प्रत्ययाचा लोप केल्यास, सपादिक सूत्रानें होणारा तो लोप सपादिक उत्वकार्य करतेवेळीं सिद्ध ठरतो. त्यामुळें 'रु' च्या लगेंच पुढें 'अत्र' यांतील अकार आहे असें मानतां येत असल्यामुळें, 'अतो रोः' या सूत्रानें 'रु' चें उत्व होऊन व 'अ' आणि 'उ' या दोहोंचे जागीं 'आद्गुणः' सू. ६९ या सूत्रानें 'ओ' असा गुणरूप एकादेश होऊन 'अभिनोऽत्र' असा इष्ट प्रयोग सिद्ध होतो. त्याचप्रमाणें जुहोत्यादिगणांतील 'भृ' धातूचें लङाचें प्रथमपुरुषाचें एकवचनाचें रूप करितांना अडागम, अभ्यासकार्य व 'सार्वधातुकार्धधातुकयोः' सू. २१६८ या सूत्रानें 'भृ' धातूंतील अन्त्य ऋकाराचा गुण आणि 'इतश्च' सू. २२०७ या सूत्रानें 'ति' प्रत्ययांतील इकाराचा लोप केल्यावर 'अ बिभर् त्' अशी स्थिति झाली असतां, 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानें तकाराचा लोप होऊं शकत नाहीं; कारण 'रात्सस्य' या नियामक सूत्रान्वयें रकारापुढें जर सकार असला तरच त्या सकाराचा 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानें होणारा लोप होतो व रकारापुढें सकार खेरीज करून इतर वर्ण आल्यास, तशा वर्णाचा त्या नियामक सूत्रान्वयें लोप होऊं शकत नाहीं. पण 'हल्ङ्याब्भ्यः' या सूत्रानें त्या अपृक्त 'त्' प्रत्ययाचा लोप होण्यास कांहींच अडचण येत नाहीं; कारण 'रात्सस्य' हें त्रैपादिक सूत्र 'संयोगान्तस्य लोपः' या त्रैपादिक सूत्राचें नियामक सूत्र असून 'हल्ङ्याब्भ्यः' या सपादिक सूत्रानें होणाऱ्या लोपाचें तें सूत्र नियामक नाहीं. म्हणून 'अबिभर् त्' या स्थलीं 'त्' प्रत्ययाचा लोप होण्याकरितां देखील 'हल्ङ्याब्भ्यः' या सूत्रांतील प्रथम 'हल्' या पदाचें ग्रहण आवश्यक ठरतें. सारांश हलन्त अङ्गापुढील 'सु ति सि' या अपृक्त प्रत्ययांचा 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानें लोप केल्यानें वर दर्शविलेल्या अनेक आपत्ति येत असल्यामुळें, त्या

सूत्रानें त्या अपृक्त प्रत्ययांचा लोप न करितां प्रकृत सूत्रानेंच त्यांचा लोप करणें योग्य आहे व त्या लोपाच्या सिद्धीकरिता प्रकृत सूत्रांतील 'हल्ङ्याब्भ्यः' या पदात 'हल्' चे ग्रहण असणें आवश्यक आहे, आणि या विरुद्ध शाकाकाराचें जें म्हणणें आहे कीं, संयोगान्त लोप केल्यानें सर्व इष्ट रुपाची सिद्धि होऊं शकते व प्रकृत सूत्रांत प्रथम हल् पद अगण्याची काही गरज नाही तें म्हणणें चूक ठरतें असा दिक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे )

शब्दरत्न– विभक्त्योरानन्तर्यमिति । एवं च विभक्तिसंयोगान्तलोपस्य सिद्धत्वं लभ्यत इति तात्पर्यम् । गोमानित्यादौ लक्ष्यभेदाद्वारं वारं संयोगान्तलोपः । नपुंसकार्यत्वादिति । "स्वमोः" इति हि तत्र लुगिति तत्र नलोप नियेधस्यावश्यकत्वादिति भावः । लुका लुप्ते इति । "ङिसंबुध्योः" इति सप्तमीति भावः । आवश्यकतया चेति । "ङिसंबुध्योः" इत्यस्य षष्ठ्यन्तत्वपक्षेऽपि विकल्पार्थमावश्यकतया चेत्यर्थः । यद्यपि 'वा नपुंसकानाम्' इत्येवं भाष्ये पठितं सम्बुद्धिग्रहणं च सूत्रादेव लभ्यत इति तदर्थं सच्चरितार्थं तथाऽप्यत्र पाठेनोक्तार्थज्ञापकताऽपि । सम्बुद्धिग्रहणं भाष्ये प्रत्याख्यातमिति तु न भ्रमितव्यम् । सूत्रस्थङिग्रहणस्य "ङिसंबुध्योरनुत्तर" इति वार्तिकस्थसंबुद्धिग्रहणस्य च प्रत्याख्यानेऽपि सूत्रस्थस्याप्रत्याख्यानादिति भावः ।

जेथें नकाराच्या लगेंच पुढें असणाऱ्या विभक्तीप्रत्ययाचा 'संयोगान्तस्य लोप' या सूत्रानें लोप झाला असेल तशाच ठिकाणी नलोपकार्याच्या दृष्टीनें तो संयोगान्त लोप सिद्ध ठरतो हे ज्ञापित होते असे 'यत्र हि नकारविभक्त्योरानन्तर्यं तत्रैव सिद्धत्वम्' या मनोरमेच्या पक्तीचे तात्पर्य आहे. 'गोमान्त् स्=गोमान्' इत्यादि स्थली ज्याचा संयोगान्त लोप करणे आहे ती ( 'त्, स्' अशी) भिन्न लक्ष्यें असल्यामुळें (व 'तल्लक्ष्ये तल्लक्षणस्य सकृदेव प्रवृत्तिः', म्हणजे पाणिनीय सूत्र एका लक्ष्याचे ठिकाणी एकदाच प्रवृत्त होत असते पण अनेक भिन्न लक्ष्यें एखाद्या उदाहरणात विद्यमान असल्यास

प्रत्येक लक्ष्याचे ठिकाणीं त्या एकाच सूत्राची प्रवृत्ति करतां येते या अर्थाचा 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्तिः' हा न्याय असल्यामुळें) 'संयोगान्तस्य लोपः' हें सूत्र दोनदां प्रवृत्त होऊन प्रथम सकाराचा व नंतर तकाराचा लोप होतो. (याचें विवरण मनोरमेंत पूर्वी केलेंच आहे.) 'हे ब्रह्मन्निति नपुंसकार्थत्वाद् नैतज्ज्ञापकम्' असें जें प्रकाशकारांनीं म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, 'हे ब्रह्मन् सु' या उदाहरणांत 'स्वमोर्नपुंसकात' सू. ३१९ या सूत्रानें 'सु' प्रत्ययाचा लुक् होत असल्यामुळें, 'ब्रह्मन्' या नपुंसक अङ्गांतील अन्त्य नकाराचा ('न लोपः प्रातिपदिकान्तस्य' या सूत्रानें पावलेला) लोप न व्हावा याकरितां 'न ङिसम्बुद्धयोः' सू. ३५२ या सूत्रांत 'सम्बुद्धि' या पदाचें ग्रहण आवश्यक आहे. 'लुका लुप्ते प्रत्ययलक्षणाभावेन' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, 'न ङिसम्बुद्धयोः' या सूत्रांतील 'ङिसम्बुद्धयोः' हें (षष्ठयन्त पद नसून वास्तविक) सप्तम्यन्त पद आहे. 'आवश्यकतया च' य मनोरमेंतील पदांचा, 'ङिसम्बुद्धयोः' हें षष्ठयन्त पद आहे हा पक्ष मानला तरी देखील संबुद्धीचीं पाक्षिक रूपें सिद्ध व्हावीं याकरितां 'सम्बुद्धौ वा नपुंसकानाम्' हें वार्तिक असणें आवश्यक आहे, असा अर्थ आहे. ('हे ब्रह्मन् सु' या स्थलीं 'ब्रह्मन्' या नपुंसक अङ्गापुढील 'सु' प्रत्ययाचा 'स्वमोर्नपुंसकात्' या सूत्रानें लुक् होत असल्यामुळें व 'न लुमताङ्गस्य' या निषेधान्वयें तो 'सु' प्रत्यय विद्यमान आहे असें प्रत्ययलक्षणानें मानतां येत नसल्यामुळें, 'न ङिसम्बुद्धयोः' या सूत्रांतील 'ङिसम्बुद्धयोः' हें पद सप्तम्यन्त मानल्यास, सम्बुद्धिप्रत्यय पुढें असतांना नकारलोप होत नाहीं असा त्या सूत्राचा अर्थ होत असल्यामुळें व 'ब्रह्मन्' हें पद संबुद्धिप्रत्ययपरक ठरत नसल्यामुळें, तें निषेधक सूत्र प्रवृत्त न होण्याची व 'ब्रह्मन्' यांतील अन्त्य नकाराचा 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' या सूत्रानें लोप होण्याची जी आपत्ति येते ती टाळण्याकरितां प्रकाशकारांनीं 'ङिसम्बुद्धयोः' हें पद षष्ठयन्त मानलें आहे व 'ङयन्तस्य सम्बु-

द्धयन्तस्य च पदस्य नलोपो न स्यात्' असा त्या सूत्राचा अर्थ केला आहे असे दिसते. या अर्थान्वयें ते निषेधक सूत्र प्रवृत्त होण्याकरिता नान्त अङ्ग सबुद्धिप्रत्ययपरक असण्याची काही आवश्यकता नाही. सबुद्धिप्रत्ययाचा लुक् झाला तरी ते अङ्ग जसे सुबन्त व पदसंज्ञक मानता येते तसेच सबुद्धयन्त देखील मानता येते व तसे मानतेवेळी 'न लुमताङ्गस्य' हा निषेध आड येत नाही अशा रीतीनें 'ङिसम्बुद्धयोः' हें पद षष्ठ्यन्त मानले असता 'हे ब्रह्मन्' इत्यादि स्थली अन्त्य नकाराचा लोप न व्हावा याकरिता 'न ङिसम्बुद्धयोः' या सूत्रात 'सम्बुद्धि' हे पद असणे आवश्यक ठरते आणि अशा रीतीनें ते पद आवश्यक व चरितार्थ ठरत असल्यामुळें, नलोपकार्याच्या दृष्टीनें सयोगान्त लोप सिद्ध ठरतो याचे ते पद ज्ञापक मानता येत नाही असा प्रकाशकाराच्या म्हणण्याचा आशय आहे पण शकाकार 'ङिसम्बुद्धयो' हें पद षष्ठ्यन्त न मानता सप्तम्यन्त मानतो व 'ङौ सम्बुद्धौ च परे सति नलोपो न स्यात्' असा त्या सूत्राचा अर्थ करितो व दीक्षितानी देखील कौमुदीत तसाच अर्थ केला आहे त्यामुळें 'हे ब्रह्मन् सु' या स्थली वर सागितल्याप्रमाणे 'सु' प्रत्ययाचा लुक् झाला असता तो प्रत्यय विद्यमान आहे असे प्रत्ययलक्षणानें मानता येत नसल्यामुळें, 'न ङिसम्बुद्धयो' हे निषेधक सूत्र प्रवृत्त होऊ शकत नाही व 'ब्रह्मन्' यातील नकाराचा 'न लोप प्रातिपदिकान्तस्य' सू २३६ या सूत्रानें अवश्य लोप होण्याची आणि 'ब्रह्म' असे एकच सबुद्धीचे रूप होण्याची आपत्ति येते. ती टाळण्याकरिता व 'ब्रह्मन्, ब्रह्म' अशी सबुद्धीची पाक्षिक रूपें सिद्ध होण्याकरिता 'सम्बुद्धौ नपुसकाना नलोपो वा वाच्य' हें वार्तिक असणे आवश्यक आहे सारांश नान्त नपुसक प्रातिपदिकाची सबुद्धीची पाक्षिक रूपें वरील वार्तिकान्वयेंच सिद्ध होऊ शकत असल्यामुळें व त्या रूपाची सिद्धि होण्याकरिता 'न ङिसम्बुद्धयो' या सूत्रात 'सम्बुद्धि' या पदाचे ग्रहण असणे आवश्यक नसल्यामुळें,

नलोपाच्या दृष्टीनें संयोगान्त लोप सिद्ध ठरतो याचें तें अनावश्यक व अचरितार्थ पद ज्ञापक मानतां येतें असा शंकाकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. पुन्हा शंकाकार असें म्हणतो कीं, 'ङिसम्बुद्धचोः' हें पद प्रकाशकारांच्या म्हणण्याप्रमाणें षष्ठ्यन्त मानलें तरी देखील, 'हे ब्रह्म' हें संबुद्धीचें पाक्षिक इष्ट रूप सिद्ध होण्याकरितां वरील वार्तिक मानणें आवश्यकच आहे; कारण तें वार्तिक न मानल्यास, नित्य नकारलोप न होतां 'ब्रह्मन्' असेंच संबुद्धीचें रूप सिद्ध होईल व 'ब्रह्म' असें पाक्षिक इष्ट रूप सिद्ध होणार नाहीं. सारांश सप्तमीपक्ष मानल्यास असें वरील वार्तिक मानणें आवश्यक आहे तसेंच षष्ठीपक्ष मानल्यास देखील तें वार्तिक असणें आवश्यक आहे असें शंकाकाराचें म्हणणें आहे.) जरी 'न ङिसम्बुद्धचोः' सू. ८–२–८ या सूत्रावरील भाष्यांत 'वा नपुंसकानाम्' अशा शब्दांत वरील वार्तिक पठित केलें आहे व त्या वार्तिकांत 'न ङिसम्बुद्धचोः' या सूत्रांतूनच 'सम्बुद्धौ' हें पद अनुवृत्त केलें आहे आणि अशा रीतीनें तें सूत्रस्थ पद वार्तिकांत अनुवृत्त होण्याकरितां आवश्यक व चरितार्थ ठरतें तरी, त्या सूत्रांत तें पद अनावश्यक असून देखील त्याचा या सूत्रांत पाठ केला असल्यामुळें, तें पद वर सांगितल्याप्रमाणें ज्ञापक देखील मानतां येतें. त्या सूत्रांतून भाष्यकारांनीं 'सम्बुद्धि' या पदाचें प्रत्याख्यान केलें आहे असा चुकीचा समज करून घेऊं नये; कारण जरी भाष्यकारांनीं 'न ङिसम्बुद्धचोः' या सूत्रांतील 'ङि' या पदाचें व तसेंच 'न ङिसम्बुद्धचोरनुत्तरपदे' या वार्तिकांतील 'सम्बुद्धि' या पदाचें प्रत्याख्यान केलें आहे तरी, त्यांनीं 'न ङिसम्बुद्धचोः' या सूत्रांतील 'सम्बुद्धि' या पदाचें मुळींच प्रत्याख्यान केलें नाहीं असा मनोरमेंतील शंकाग्रन्थाचा भावार्थ आहे. (प्रतिशंकाकाराचें असें म्हणणें आहे कीं, 'वा नपुंसकानाम्' या वार्तिकांत 'सम्बुद्धौ' या पदाची अनुवृत्ति व्हावी याकरितां 'न ङिसम्बुद्धचोः' या सूत्रांत 'सम्बुद्धि' पदाचें ग्रहण असणें आवश्यक असल्यामुळें व अशा रीतीनें तें ग्रहण चरितार्थ ठरत असल्या-

मुळें, नलोपाच्या दृष्टीनें सयोगान्त लोप सिद्ध ठरतो याचे ते पद ज्ञापक मानता येत नाहीं या प्रतिशंकेवर शंकाकार असे उत्तर देतो की, 'वा नपुंसकानाम्' या वार्तिकात अनुवृत्ति होण्याकरिता जरी ते पद आवश्यक मानले तरी, 'न ङिसम्बुद्धयो' या सूत्रात ते पद असणें आवश्यक नाही असे असून देखील पाणिनीनें त्या सूत्रांत त्या अनावश्यक पदाचे ग्रहण केले असल्यामुळें हे ज्ञापित होत की, तसे करण्यात पाणिनीचा, 'यत्किञ्चित्प्रयो' या न्यायान्वयें, काही तरी विशिष्ट हेतु होता व तो हेतु हाच की, नलोपाच्या दृष्टीनें सयोगान्त लोप असिद्ध ठरत नाही हे त्या पदाच्या ग्रहणानें ज्ञापित व्हावे पण त्या पदाचे त्या सूत्रातून भाष्यकारानी प्रत्याख्यान केले असल्यामुळें व अशा रीतीनें ते पद त्या सूत्रात विद्यमानच नाही असे मानणे भाग पडत असल्यामुळें ते पद वरील विषयाचे ज्ञापक मानता येत नाही असे कोणी म्हटल्यास, त्यावर शंकाकार असे म्हणतो की, भाष्यकारानी त्या सूत्रातून जरी 'ङि' या पदाचे प्रत्याख्यान केले आहे तरी, 'सम्बुद्धि' या पदाचे प्रत्याख्यान मुळींच केले नाही व त्या पदाचे जें प्रत्याख्यान केले आहे ते त्या सूत्रातून केलेले नसून त्या सूत्रावरील वार्तिकांत पठित असलेल्या त्या पदाचे प्रत्याख्यान केले आहे त्या भाष्यात भाष्यकार म्हणतात–'न ङिसम्बुद्धयोरित्युच्यते, न चात्रङिसम्बुद्धी पश्याम । प्रत्ययलक्षणेन । न लुमता तस्मिन्निति प्रत्ययलक्षण-प्रतिषेध । न क्वचिन्ङिर्लोपिन लुप्यते, सर्वत्र लुमतैव । एव तर्हि ज्ञापयति तावत्रार्थ । ङौ प्रतिषेधोऽनर्थक । किं कारणम ? । भत्वात । भसञ्ज्ञाऽत्र भविष्यति । यदि तर्हि भसञ्ज्ञाऽत्र भवति रथन्तरे सामन्नित्यत्र अल्लोपोऽन इत्यल्लोप प्राप्नोति । नैप दोप । उभयसञ्ज्ञान्यपि छन्दासि दृश्यन्ते तस्मादाचार्यो ङिग्रहणेन ।' या भाष्यावरून हे स्पष्ट होत की, भाष्यकारांनी 'न ङिसम्बुद्धयो' ८–२–८ या सूत्रातून 'सम्बुद्धि' या पदाचे प्रत्याख्यान न करितां केवळ 'ङि' या पदाचे प्रत्याख्यान केले आहे 'सम्बुद्धग्रहणेन चाऽपि नार्थ'

इत्यादि जें 'सम्बुद्धि' या पदाचें प्रत्याख्यान करणारें भाष्य पुढें आहे तें 'न ङिसम्बुद्धयोः' या सूत्रांतील 'सम्बुद्धि' पदाचें प्रत्याख्यान करणारें भाष्य नसून 'न ङिसम्बुद्धयोरनुत्तरपदे' या वार्तिकांतील 'सम्बुद्धि' पदाचें प्रत्याख्यान करणारें भाष्य आहे हें तें भाष्य वाचल्यानें स्पष्ट होतें, व त्या भाष्यांत 'वा नपुंसकनामित्येतद्वक्तव्यमेव' असें भाष्यकारांनीं अखेरीस म्हटलें आहे. सारांश 'न ङिसम्बुद्धयोः' या सूत्रांतून भाष्यकारांनीं 'सम्बुद्धि' या पदाचें प्रत्याख्यान केलें नसल्यामुळें, नलोपाच्या दृष्टीनें संयोगान्त लोप सिद्ध ठरतो याचें तें पद ज्ञापक मानतां येतें असा शंकाकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. येथें हें लक्षांत ठेवावें कीं, 'न लुमताङ्गस्य' हा निषेध अनित्य मानला असल्यामुळें त्याची प्रवृत्ति न केल्यास, नान्त नपुंसक प्रातिपदिकापुढील संबुद्धीच्या 'सु' प्रत्ययाचा 'स्वमोर्नपुंसकात्' या सूत्रानें लुक् केल्यावर देखील तो 'सु' प्रत्यय विद्यमान आहे असें प्रत्ययलक्षणानें मानतां येतें व तसें मानलें असतां, 'न ङिसम्बुद्धयोः' हें निषेधक सूत्र प्रवृत्त होऊन नकाराचा लोप होत नाहीं व संबुद्धीचें नान्त रूप सिद्ध होतें. 'न लुमताङ्गस्य' हा निषेध प्रवृत्त केला तर नान्त नपुंसक अङ्गापुढें संबुद्धीचा 'सु' प्रत्यय विद्यमान आहे असें प्रत्ययलक्षणानें मानतां येत नसल्यामुळें, 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' या सूत्रानें अन्त्य नकाराचा लोप होऊन द्वितीय पाक्षिक रूप देखील सिद्ध होऊं शकतें व हीं पाक्षिक रूपें सिद्ध होण्याकरितां 'वा नपुंसकानाम्' हें वार्तिक मानण्याची कांहीं गरज राहत नाहीं. अशा रीतीनें नान्त नपुंसक प्रातिपदिकाचीं संबुद्धीचीं दोन रूपें सिद्ध करण्याकरितां 'न ङिसम्बुद्धयोः' या सूत्रांत 'सम्बुद्धि' या पदाचें ग्रहण असणें आवश्यक आहे व अशा रीतीनें त्या पदाचें ग्रहण आवश्यक व चरितार्थ ठरत असल्यामुळें, नलोपाच्या दृष्टीनें संयोगान्त लोप सिद्ध ठरतो याचें तें पद ज्ञापक मानतां येत नाहीं. प्रकृत सूत्रावरील उद्योतांत या विषयासंबंधानें 'न लुमतेति निषेध-

स्थानिवत्वेनैव नपुंसकनान्ते रूपद्वयस्य सिद्धतया, वा नपुंसकानामिति न वाचनिकम्। एवं च नपुंसके निषेधाय सम्बुद्धिग्रहणस्यावश्यकत्वेन ज्ञापकं दुरुपपादम्।' असे म्हटले आहे या मतान्वयें 'नपुंसकार्थत्वाद् नैतज्ज्ञापकम्' हे प्रकाशकाराचे म्हणणेच बरोबर ठरते आणि भावप्रकाशकारानी देखील 'एवं च प्रकाशो युक्त इति गूढाकूतं स्फुटीभविष्यति चाग्रे' असेच म्हटले आहे )

मनोरमा—अत्रेदमवधेयम्। ङ्याब्ग्रहणं सोरेव विशेषणं न तु तिस्योः व्याख्यानात्। अस्मिन्नेव सूत्रे 'दीर्घहल्पृक्तग्रहणं तिस्योश्च ग्रहणं न कर्तव्यं भवति' इति भाष्यं चेह प्रमाणम्। यदि हि ङ्याब्ग्रहणं तिस्योरपि विशेषणं स्यात् तर्हि कथं तिस्योर्ग्रहणस्याकर्तव्यतां ब्रूयात्। यत्तु ङ्याब्भ्यां तिस्योरसम्भव एवेति। तत्र ङ्यन्तादसम्भव इति सत्यम्। आबन्तात्तु आचारक्विबन्तात्लङः तिप्सिपौस्त एव। अगङ्गात् अगङ्गाः इति यथा। न च शपा व्यवधानम्, एकादेशस्य पूर्वान्तत्वेन ग्रहणात्। न च स्थानिवद्भावः। अपूर्वविधित्वात्॥

येथें हे ध्यानात ठेविले पाहिजे की, 'हल्ङ्याब्भ्यः' या प्रकृत सूत्रातील 'ङी' व 'आप्' ही 'सु' चीच विशेषणे होतात, 'ति, सि' याची विशेषणे होत नाहीत हे व्याख्यानावरून स्पष्ट होते (प्रकृत सूत्रात निर्दिष्ट असलेल्या 'सु, ति, सि' या तीन प्रत्ययांपैकी 'ति, सि' हे प्रत्यय ङ्यन्त व आबन्त अङ्गापुढे येऊच शकत नाहीत, कारण धातुपुढे येणारे ते प्रत्यय आहेत 'सु' हा अवशिष्ट प्रथमेच्या एकवचनाचा प्रत्ययच ङ्यन्त व आबन्त अङ्गापुढे येऊ शकतो म्हणून 'ङ्यन्तात् आबन्तात्पर सुर्लुप्यते' असाच अन्वय होऊ शकतो, 'ङ्यन्तात् आबन्तात्पर सु ति सि अपृक्त हल् लुप्यते' असा अन्वय होऊ शकत नाही ) वर जें सांगितले आहे त्याला प्रकृत सूत्रावरील भाष्यातच 'दीर्घहल्पृक्तग्रहणं तिस्योश्च ग्रहणं न कर्तव्यं भवति' हे जें वचन आहे ते प्रमाण आहे जर 'ङ्याप्' हे 'ति सि' याचे देखील विशेषण होत असते तर, 'ति सि' याचे प्रकृत सूत्रात ग्रहण करण्याची आवश्यकता राहत नाही असे भाष्यात करो म्हटले असते ?

(प्रकृत सूत्रावरील भाष्यांत –६–१–६८– भाष्यकार म्हणतात–'यदि पुनरयमपृक्तलोपः संयोगान्तलोपो विज्ञायेत ? । किं कृतं भवति ? । द्विहल्पृक्तग्रहणं तिस्योश्चग्रहणं न कर्तव्यं भवति ।' या भाष्याचा अर्थ हा आहे कीं, 'सु ति सि' या अपृक्त हलांचा 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानेंच लोप होऊं शकतो असें मानलें तर, प्रकृत सूत्रांत दोन्ही 'हल्' पदांचें व 'अपृक्तम्' या पदाचें आणि तसेंच 'ति, सि' या पदांचें ग्रहण करण्याची कांहीं आवश्यकता राहत नाहीं व 'ङ्याप्भ्यो दीर्घात्सोः' एवढेंच सूत्र मानल्यानें काम भागतें. 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानें केवळ हलन्त अङ्गापुढील अपृक्त प्रत्ययाचा लोप होणें शक्य असल्यामुळें, त्या सूत्रानें हलन्त अङ्गापुढील अपृक्त सूत्रनिर्दिष्ट प्रत्ययांचा लोप केला तरी, प्रकृत सूत्रांत ङ्याप्-ग्रहण कायम ठेवलेंच पाहिजे व त्याबरोबरच सूत्रनिर्दिष्ट तीन प्रत्ययांपैकीं जे प्रत्यय ङ्यावन्त अङ्गापुढें येणें शक्य आहे त्यांचेंहि ग्रहण प्रकृत सूत्रांत कायम ठेवणें भाग आहे. म्हणून जर ङ्याबन्त अङ्गापुढें 'ति, सि' प्रत्यय येणें संभवनीय असतें तर, भाष्यकारांनीं वरील भाष्यांत 'ति, सि' प्रत्ययांचें ग्रहण करण्याची कांहीं आवश्यकता राहत नाहीं असें म्हटलें नसतें.) ङ्यन्त व आबन्त अङ्गाहून 'ति, सि' प्रत्यय होणें असंभवनीय आहे, म्हणजे ते प्रत्यय होऊंच शकत नाहींत, असें जें वर म्हटलें आहे त्यांपैकीं ङ्यन्त अङ्गाहून ते प्रत्यय उत्पन्न होऊं शकत नाहींत हें म्हणणें खरें आहे; पण आबन्त शब्दाहून आचारार्थक क्विप् प्रत्यय केला असतां, तशा क्विबन्त नामधातूचें लङचें रूप करतेवेळीं 'तिप्, सिप् = त्, स्' हे अपृक्त प्रत्यय होऊं शकतातच. उदाहरणार्थ 'अगङ्गात्, अगङ्गाः' या वरील दोन उदाहरणांत आबन्त अङ्ग व 'ति, सि' प्रत्यय या दोहोंमध्यें 'शप् = अ' चें व्यवधान होतें हें म्हणणें बरोबर नाहीं; कारण आबन्त अङ्गांतील अन्त्य 'आ' व 'शप् = अ' या दोहोंचें जागीं ('अकः सवर्णे दीर्घः' सू. ८५ या सूत्रानें) जो सवर्णदीर्घ एकादेश होतो तो पूर्वान्तवद्भावानें आबन्त

अङ्गाचा अन्त मानतां येतो ( व अशा रीतीनें आबन्त अङ्गाच्या लगेंच पुढें 'ति, सि = त् स्' प्रत्यय येतात व दोहोंमध्यें 'शप्' चे व्यवधान होत नाही असे म्हणतां येते ) या उदाहरणात स्थानिवद्भाव करता येत नाही; कारण येथें पूर्व वर्णाला विधि-कार्य-करणे नाही. ('सर्वप्रातिपदिकेभ्यः क्विब्वा वक्तव्यः'–सू. २६६५ वरील वार्तिक–या वार्तिकान्वयें 'गङ्गा' या आबन्त शब्दाहून आचारार्थक क्विप् प्रत्यय केला असता, 'वेरपृक्तस्य' सू. ३७५ या सूत्रानें 'क्विप् = व्' या अपृक्त प्रत्ययाचा लोप होऊन 'गङ्गा' असा क्विप्प्रत्ययान्त आबन्त नामधातु होतो व अशा आबन्त नाम-धातूचीं लङाचीं रूपें करतेवेळीं 'ति, सि' प्रत्ययांतील इकाराचा 'इतश्च' सू. २२०७ या सूत्रानें लोप होऊन 'त्, स्' हे अपृक्त प्रत्यय त्या आबन्त अङ्गापुढें येतात व 'अगङ्गात्, अगङ्गाः' अशी अनुक्रमें प्रथमपुरुषाच्या व मध्यमपुरुषाच्या एकवचनाचीं रूपें होतात. येथें आबन्त अङ्गापुढें असणाऱ्या 'स्, त्' या अपृक्त प्रत्ययाचा यथापठित प्रकृत सूत्रानें लोप पावला आहे. परंतु 'ङ्याप्' हे केवळ 'सु' चे विशेषण मानले असून 'ति, सि' चें विशेषण मानले नसल्यामुळें व अशा रीतीनें ङ्याबन्त अङ्गापुढें प्रथमाविभक्तीचा 'सु' प्रत्यय आला असता त्याचाच लोप होतो व 'ति, सि = त् स्' हे प्रत्यय पुढें आले असता त्याचा लोप होत नाहीं असे व्याख्यान केले असल्यामुळें, वरील उदाहरणात 'गङ्गा' या आबन्त अङ्गापुढें असलेल्या 'त्, स्' या प्रत्ययांचा लोप न होता 'अगङ्गात्, अगङ्गाः' अशी रूपें सिद्ध होतात. ही लङाचीं रूपें करतेवेळीं जरी 'गङ्गा' या क्विबन्त नामधातूला 'शप् = अ' हे विकरण लागते तरी, 'गङ्गा' यातील अन्त्य 'आ' व ते विकरण या दोहोंचे जागी 'अकः सवर्णे दीर्घः' या सूत्रानें जो 'आ' असा सवर्णदीर्घ एकादेश होतो त्या एकादेशानें ते विकरण नाहींसे होते व त्यामुळें आबन्त अङ्ग व 'त्, स्' प्रत्यय या दोहोंमध्यें त्या विकरणाचे व्यवधान राहत नाही आणि 'आ' हा एकादेश पूर्वान्तवद्भावानें आबन्त

अङ्गाचा अन्त मानल्यानें, त्याच्या लगेंच पुढें 'त्,स्' हे प्रत्यय आहेत असें मानतां येतें. एकादेशाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव केल्यानें, म्हणजे एकादेश 'आ' हा 'आ+अ' आहे असें मानल्यानें, आबन्त अङ्ग व 'त्,स्' प्रत्यय या दोहोंमध्यें 'शप्= अ' चें व्यवधान आहे असें मानतां येतें व त्यामुळें वरील दोन उदाहरणें प्रकृत सूत्राचा विषयच होऊं शकत नाहींत असें कोणी म्हटल्यास, त्यावर दीक्षित असें उत्तर देतात कीं, 'अचः परस्मिन्' सू. ५० या सूत्रानें 'आ' या एकादेशाचें ठिकाणीं स्थानिवद्भाव करतां येत नाहीं; कारण वरील उदाहरणांत स्थानीच्या पूर्वी असणाऱ्या वर्णाला कार्य करणें नसून स्थानीच्या पुढें असणाऱ्या 'त्, स्' या अपृक्त प्रत्ययांना लोपरूप कार्य करणें असल्यामुळें, 'पूर्वविधौ' हा षष्ठीसमास मानला असतां, स्थानिवद्भाव होऊं शकत नाहीं. 'पूर्वविधौ' हा पञ्चमीसमास मानल्यास, 'अचः परस्मिन्' हें सूत्र प्रवृत्त होऊं शकतें. परंतु पञ्चमीसमासपक्ष अनित्य असल्यामुळें व त्या अनित्य पक्षाचा आश्रय न करितां येथें इष्टरूपसिद्धि होत असल्यामुळें, तो पक्ष या स्थलीं स्वीकारतां येत नाहीं.)

शब्दरत्न–भाव्यमिति । 'यदि पुनरयमपृक्तलोपः संयोगान्तलोपो विज्ञायेत' इत्युपक्रम्य तद्भाष्यं प्रवृत्तम् । पूर्वान्तत्वेनेति । न चैवं वृद्धावित्यादौ संनिपातपरिभाषया टाब्नेति भाष्यविरोध इति वाच्यम् । दीर्घप्रवृत्त्युत्तरमन्तादिवद्भावप्रवृत्तावपि टाबुत्पत्तिकालिकानन्तर्यविघातस्य तेन वारयितुमशक्यत्वात् । अशास्त्रीयत्वाल्लंनिपातस्यान्तवद्भावेनातिदेष्टुमशक्यत्वाच्च । अत्राबन्तास्त्विति तुनाऽरुचिर्बोधिता । पञ्चमीसमासाश्रयणे स्थानिवद्भावोऽस्ति । अस्याभिधाने च न दृढं मानम् । आबन्तेभ्य आचारक्विबेव नास्ति "आतो धातोः" इति सूत्रस्थभाष्यप्रामाण्यात् । तत्र वार्तिककृता 'आतोऽनाप' इत्युक्तमिति तद्बीजम् । आचारक्विबन्ताद्यङ्लुक्तु नास्त्येव । तेन कस्य स्त्री की कीशब्दादिभ्य आचारक्विबन्तेभ्यो यङ्लुकि लङि अचेकेदित्यादौ ङ्यन्तादपि सम्भव इत्यपास्तम् । ईकाररूपत्वाभावाच्च ।

'हलङ्याब्भ्यः' या सूत्रावरील भाष्यात 'यदि पुनरयमपृक्तलोपः संयोगान्तलोपो विज्ञायेत' असा उपक्रम करून भाष्यकारांनी मनोरमेत दिलेली भाष्यपंक्ति लिहिली आहे 'बुद्धौ' इत्यादि स्थली, सन्निपातपरिभाषान्वयें 'टाप्' प्रत्यय होत नाही असे जें भाष्यात म्हटले आहे त्याशी 'एकदेशस्य पूर्वान्तत्वेन ग्रहणात्' हे जें मनोरमेंत म्हटले आहे याचा विरोध येतो असे कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाही, कारण सवर्णदीर्घरूप एकादेश केल्यावर जरी तो एकादेश पूर्वान्तवद्भावानें 'बुद्ध' या शब्दाचा अन्तावयव मानता येतो तरी, 'बुद्ध' शब्दाहून 'टाप्' प्रत्यय करतेवेळी 'बुद्धि ङि = बुद्ध औ' याचे जें 'आनन्तर्य होते ते त्या 'टाप्' प्रत्ययामुळें नष्ट झाले नाही असे म्हणता येऊ शकत नाही आणखी असें की, सन्निपात हा अशास्त्रीय असल्यामुळें, पूर्वान्तवद्भावानें त्याचा अतिदेश करता येऊ शकत नाही, म्हणजे शास्त्रीय पूर्वान्तवद्भाव करून अशास्त्रीय सन्निपात कायम आहे असे मानता येऊ शकत नाही. ('अगङ्गा आप् त् = अगङ्गात्' या स्थलीं 'अगङ्गा' यातील 'आप्' व 'आप् = अ' याचा 'आ' असा जो एकादेश होतो त्याला दीक्षितांनी पूर्वान्तवद्भावानें 'गङ्गा' याचा अन्तावयव मानून 'गङ्गा' हें आबन्त अङ्ग मानले आहे यावर शंकाकार म्हणतो की, अशा रीतीनें पूर्वान्तवद्भाव करून 'गङ्गा' हे आबन्त अङ्ग मानणे भाष्यविरुद्ध ठरतें, कारण 'बुद्धि ङि' या स्थली 'अच्च घेः' सू २४७ या सूत्रानें 'बुद्ध औ' अशी स्थिति झाल्यावर 'बुद्ध' असे जें अदन्त अङ्ग होतें त्या अदन्त अङ्गाहून 'अजाद्यतष्टाप्' सू. ४५८ या सूत्रानें प्राप्त होणारा 'टाप्' प्रत्यय सन्निपातपरिभाषा असल्यामुळें होऊ शकत नाही असे 'औत्' सू ७-३-११८ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारांनी म्हटले आहे त्या भाष्यात भाष्यकार म्हणतात– 'अत्वे टापः प्रतिषेधो वक्तव्यः । खट्वौ पद्धतौ धेनौ । अत्वे कृते टाप् प्राप्नोति । न वा सन्निपातलक्षणत्वादनिमित्तत्वात् । न वा वक्तव्यः । किं कारणम्? । सन्निपातलक्षणत्वादनिमित्तत्वात् ।

सन्निपातलक्षणो विधिरनिमित्तं तद्विघातस्येत्येवं न भविष्यति ।' या भाष्याचें विवरण मागें केलेंच आहे. जर 'वृद्ध' यांतील अन्त्य अकार व 'टाप् = आ' यांचा 'आ' हा एकादेश पूर्वान्तवद्भावानें 'वृद्ध' याचा अन्तावयव आहे व अशा रीतीनें सन्निपात नष्ट झाला नाहीं असें मानतां आलें असतें तर, भाष्यकारांनीं त्या उदाहरणांत सन्निपातपरिभाषा प्रवृत्त करून 'टाप्' चें निवारण केलें नसतें. म्हणून 'अगङ्गात्' या स्थलीं एकादेशाचे ठिकाणीं पूर्वान्तवद्भाव मानणें वरील भाष्याच्या विरुद्ध ठरतें. त्यामुळें 'गङ्गा' या आवन्त अङ्गाच्या लगेंच पुढें 'त्' प्रत्यय आहे असें मानतां येऊं शकत नाहीं आणि म्हणून वरील उदाहरण प्रकृत सूत्राचा विषयच होऊं शकत नाहीं असा शंकाकाराच्या म्हणण्याचा तात्पर्यार्थ आहे. या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं, ज्या भाष्याच्या आधारावर शंकाकारानें वरील शंका केली आहे त्या भाष्याचा असा मुळींच आशय नाहीं कीं, 'वृद्ध औ' या स्थलीं 'वृद्ध' या अदन्त अङ्गाला 'टाप्' प्रत्यय करून एकादेश केल्यावर तो एकादेश 'वृद्ध' याचा अन्तावयव मानतां येत नाहीं. त्या भाष्याचा एवढाच आशय आहे कीं, जरी एकादेश 'वृद्ध' याचा पूर्वान्तवद्भावानें अन्तावयव मानतां येऊं शकतो तरी, 'टाप्' प्रत्यय होतेवेळीं सन्निपाताचा विनाश होत असल्यामुळें, त्या परिभाषान्वयें 'टाप्' प्रत्यय होऊं शकत नाहीं. दुसरें असें कीं, सन्निपात अशास्त्रीय असल्यामुळें, म्हणजे पाणिनीय सूत्रांत सन्निपाताचें लक्षण कोठेंहि सांगितलें नसल्यामुळें, 'अन्तादिवच्च' सू. ७५ हें पाणिनीय शास्त्र प्रवृत्त करून पूर्वान्तवद्भावरूप शास्त्रीय कार्य केल्यानें अशास्त्रीय सन्निपात कायम राहतो असें म्हणणें बरोबर नाहीं, म्हणजे अशास्त्रीय कार्य करतेवेळीं तशा अशास्त्रीय कार्याकरितां शास्त्रीय कार्याची मदत घेतां येत नाहीं. सारांश 'वृद्ध औ' या स्थलीं 'टाप्' प्रत्यय केल्यावर एकादेश केला असतां, तो एकादेश 'वृद्ध' या शब्दाचा अन्तावयव आहे असें मानतां येतें व अशा रीतीनें

सन्निपात कायम आहे असे म्हणता येते तरी, 'टाप्' प्रत्यय करतेवेळी सन्निपाताचा विनाश होत नाही असे म्हणता येत नाही व त्यामुळें त्या स्थली सन्निपातपरिभाषा प्रवृत्त होऊन 'टाप्' प्रत्यय होऊ देत नाही. वर सांगितल्याप्रमाणे वरील भाष्याचा आशय असल्यामुळें, दीक्षितानी 'अगङ्गात्' या उदाहरणात 'आ' या एकादेशाला पूर्वान्तवद्भावानें 'गङ्गा' याचा अन्तावयव मानून 'अगङ्गा' या आबन्त अङ्गापुढें 'त्' प्रत्यय आहे असे जें म्हटले आहे तें भाष्यविरुद्ध ठरत नाही असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे ) 'आबन्तात्तु आचारक्विबन्तात्' या मनोरमेंतील पक्तीत 'तु' या अरुचिप्रदर्शक पदाचे ग्रहण केले असल्यामुळें, आबन्ताहून आचारक्विप् होतो हे दीक्षिताना समत नाही असे बोधित होते. 'अच परस्मिन् पूर्वविधौ' सू. ५० या सूत्रातील 'पूर्वविधौ' हा पञ्चमीसमास मानल्यास, स्थानिवद्भाव करता येतो (याचे विवरण मनोरमेंत केलेच आहे) 'अगङ्गात्, अगङ्गा.' इत्यादि रूपें साधेत होतात याला कोणतेहि सबळ प्रमाण नाहीं. उलट आबन्ताहून आचारक्विप् मुळींच होत नाहीं याला 'आतो धातो.' सू. ६–४–१४० या सूत्रावरील भाष्य प्रमाण आहे त्या सूत्राऐवजी 'आतोऽनाप' असे सूत्र पठित करावे असे जें वार्तिककारानें सुचविले आहे त्याचे कारण हेच आहे की, आबन्ताहून क्विप् प्रत्यय मुळीच होत नाही ('आतो धातो' सू. ६–४–१४० या सूत्रावरील भाष्यात 'आतोऽनापः' हें वार्तिक पठित करून भाष्यकार म्हणतात– 'आतोऽनाप इति वक्तव्यम्। इहापि यथा स्यात्, समासेऽनञ्पूर्वे क्त्वो ल्यपिति।' या भाष्याचा आशय हा आहे कीं, 'समासेऽनञ्पूर्वे क्त्वो ल्यप्' सू. ३३३२, 'हल इन शानज्झौ' सू २५५७ इत्यादि सूत्रात 'क्त्वा, श्ना' या आबन्त नसणाऱ्या आकारान्त शब्दाची जी पाणिनीनें षष्ठीची रूपें केली आहेत ती सिद्ध व्हावी याकरिता 'आतो धातोः' या सूत्रातील 'धातोः' या पदाचे जागी 'अनाप.' हे पद पठित करावे असे

वार्तिककारानें सुचविलें आहे; कारण 'क्त्वा, स्ना' हे जरी आकारान्त शब्द आहेत तरी धात्वन्त नाहींत. आवन्त प्रातिपदिकाहून आचारक्विप् प्रत्यय होतो असें मानलें तर, तसा क्विबन्त शब्द 'सनाद्यन्ता धातवः' सू. २३०४ या सूत्रान्वयें धातुसंज्ञक ठरून त्याहून पुन्हा कृदन्त रूप करण्याकरितां क्विप् प्रत्यय केला असतां, तशा आवन्त क्विबन्त प्रातिपदिकाचीं, 'आतो धातोः' असें सूत्र मानल्यास, आकारलोप होऊन एक प्रकारचीं रूपें होतील व 'आतोऽनापः' असें सूत्र मानल्यास, आकारलोप न होतां भिन्न प्रकारचीं रूपें होतील. अशा प्रकारें रूपांत फरक न पडण्याकरितां आवन्त प्रातिपदिकाहून आचारक्विप् होत नाहीं हें मानणें आवश्यक आहे असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे.) आचारक्विबन्त नामधातूहून यङ्लुक् तर मुळींच होत नाहीं. त्यामुळें 'कस्य स्त्री की' इत्यादि ङीबन्त शब्दांहून आचारक्विप् प्रत्यय केल्यानंतर यङ्लुक् केल्यास यङ्लुकाचीं लङाचीं 'अचेकेत्' इत्यादि जीं रूपें होतात त्या रूपांमध्यें ङीवन्तापुढें देखील 'त्, स्' हे अपृक्त प्रत्यय येऊं शकतात असें जें कित्येकाचें म्हणणें आहे तें चूक ठरतें. दुसरें असें कीं, 'अचेकेत्' इत्यादि रूपांमध्यें 'ङीप्' हा ईकाररूपानें कायम राहत नाहीं. (त्याचें 'ए' असें रूपान्तर होतें व त्यामुळें प्रकृत सूत्रांतील 'ङ्याप्' या पदांत जसा पूर्वी सांगितल्याप्रमाणें प्रश्लेष केला आहे त्या प्रश्लेषान्वयें 'अचेकेत्' इत्यादि उदाहरणांत 'हल्ङ्याब्भ्यः' या प्रकृत सूत्राची प्राप्तीच होत नाहीं.)

मनोरमा–अत्रायं निष्कर्षः। ङ्यापः सोरित्येव सूत्रमुचितम्। न च गुरोः गुरावी इत्यादौ धातोः सकारेऽतिप्रसङ्गः। ङ्याबन्त्यां साहचर्यात्, 'प्रत्ययाप्रत्ययोः' इति परिभाषया च प्रत्ययस्यैव ग्रहणात्। राजेत्यादौ नलोपस्तु "न ङिसंबुद्ध्योः" इति ज्ञापकेन सिद्ध एव। किं चाभिनोऽत्रेति उत्त्वमपि सूपपादम्। 'संयोगान्तलोपो रोरुत्वे' इति सिद्धकाण्डे पाठात्। सुष्ट्यो भेदिनं इयेति यथा। अर्थभेदात् इत्यत्रापि न दोषः। "राजमय" इत्यत्र

तकारस्यापि प्रश्लेषेण ससस्येति च्छेदात् । ननु उखास्रदित्यादौ सयोगादिलोपः स्यादिति चेत् न, दत्वे कृते तदप्राप्तेः । असिद्धं दत्वमिति चेन्न । सिद्धकाण्डे 'वस्वादिषु दत्वम्' इति पाठात् । नन्वपदान्तत्वाद् दत्व न स्यादिति चेन्न । सावपि पद भवतीति पक्षाश्रयणात् । तद्बीजन्तु "असर्वनामस्थाने यचि" इति च्छित्वा यजादौ सर्वनामस्थाने पद नेति व्याख्यानम् ॥

आतापर्यंत 'हल्ङ्याब्भ्यः' या प्रकृत सूत्राचे जें व्याख्यान केले आहे त्यावरून असा निष्कर्ष निघतो की, प्रकृत सूत्राऐवजी 'ङ्यापः सो' असेच सूत्र करणे उचित आहे असे सूत्र केल्यानें 'सुराः', सुराशौ' इत्यादि स्थली 'सु' धातूच्या सकाराचा लोप होण्याची आपत्ति येत नाही; कारण 'ङी, आप्' या प्रत्ययाच्या साहचर्यामुळें व तसेच 'प्रत्ययाप्रत्यययो प्रत्ययस्यैव ग्रहणम्'–परि १११–ही परिभाषा असल्यामुळें, 'ङ्याप सो' यातील 'सोः' मानें 'सु' प्रत्ययाचेच ग्रहण होऊ शकते (धातूच्या सकाराचे ग्रहण होऊ शकत नाही. 'ङ्याप सो' असे सूत्र पठित केल्यास व हलन्त अङ्गापुढील 'स्, त्, स्' या अपृक्त प्रत्ययाचा 'सयोगान्तस्य लोप' सू ५४ या सूत्रानें लोप केल्यास काशिकेत जे चार दोष दाखविले आहेत त्या सर्व दोषाचा परिहार कोणत्या रीतीनें करता येतो हे दीक्षित पुढील पक्तीत सागतात पुढील पक्तीचे विवरण करण्यापूर्वी काशिकेत कोणते दोष दाखविले आहेत हें सागणे इष्ट आहे प्रकृत सूत्रावरील वृत्तीत काशिकाकार म्हणतात–'अथ किमर्थं हल्न्तात्सुतिसीना लोपो विधीयते, सयोगान्तलोपेनैव सिद्धम् । न सिद्धयति । राजा तक्षेत्यत्र सयोगान्तलोपस्यासिद्धत्वान्नलोपो न स्यात् । उखास्रत् पर्णध्वदित्यत्रापदान्तत्वाद्दत्व च न स्यात् । अभिनोऽत्रेत्यत्रातो रोरप्लुतादप्लुत इत्युत्व न स्यात् । अबिभर्भवानित्यत्र तु रात्सस्येति नियमाल्लोप एव न स्यात् ।' वरील काशिकेत जो प्रथम दोष दाखविला आहे त्या दोषासबधानें दीक्षित असें म्हणतात की,) 'राजा' इत्यादि उदाहरणात नकारलोप "न ङिसम्बुद्धयो' या

ज्ञापकाच्या आधारें सावलाच आहे. ('न लोपः प्रातिपदिकान्तस्य' या त्रैपादिक पूर्व सूत्राच्या दृष्टीनें 'संयोगान्तस्य लोपः' या त्रैपादिक पर सूत्रानें होणारा संयोगान्त लोप सिद्ध ठरतो याचें 'न ङिसम्बुद्ध्योः' या सूत्रांतील 'सम्बुद्धि' या पदाचें ग्रहण ज्ञापक आहे हें पूर्वी सिद्ध करून दाखविलेंच आहे आणि त्यामुळें 'राजन् सु = राजान् स्' या स्थलीं 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानें अन्त्य सकाराचा लोप केला असतां, तो सकारलोप नलोपकार्याच्या दृष्टीनें सिद्ध ठरत असल्यामुळें, 'राजान्' यांतील अन्त्य नकाराचा लोप होण्यांत व 'राजा' असें इष्ट रूप सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं आणि अशा रीतीनें काशिकेंत दाखविलेल्या प्रथम दोषाचा परिहार करितां येतो असें दीक्षितांचें म्हणणें आहे. आतां काशिकेंत दाखविलेल्या तृतीय दोषासंबंधानें दीक्षित असें म्हणतात कीं,) 'अभिनोऽत्र' या स्थलीं उत्वाची देखील उपपत्ति सहज लावतां येते; कारण 'संयोगान्तलोपो रोरुत्वे (सिद्धो वक्तव्यः)' असें वार्तिक सिद्धकाण्डांत पठित केलें आहे व त्यामुळें 'हरिवो मेदिनं त्वा' हा वैदिक प्रयोग जसा सिद्ध होतो त्याचप्रमाणें 'अभिनोऽत्र' हा प्रयोग देखील सहज सिद्ध करतां येऊं शकतो. (प्रकृत सूत्रावरील भाष्यांत 'रोरुत्वं च' हें वार्तिक पठित करून भाष्यकार म्हणतात 'रोरुत्वं च वक्तव्यम् । अभिनोऽत्र । अच्छिनोऽत्र । संयोगान्तलोपस्यासिद्धत्वादतोऽतीत्युत्वं न प्राप्नोति । न वा संयोगान्तलोपस्योत्वे सिद्धत्वात् । न वा वक्तव्यम् । किं कारणम् ? । संयोगान्तलोपस्योत्वे सिद्धत्वात् । संयोगान्तलोप उत्त्वे सिद्धो भवति । यथा हरिवो मेदिनमिति । तद्यथा–हरिवो मेदिनं त्वेत्यत्र संयोगान्तलोप उत्वे सिद्धो भवति ।-' 'अभिनद् सि' या स्थलीं पूर्वी सांगितल्याप्रमाणें 'सि' या प्रत्ययांतील इकाराचा 'इतश्च' सू. २२०७ या सूत्रानें लोप होऊन व 'दश्च' सू. २४६८ या सूत्रानें 'अभिनद्' यांतील अन्त्य दकाराचें रुत्व होऊन 'अभिनर् स्' अशी स्थिति झाली असतां, 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानें अन्त्य सकाराचा लोप

केला तर, 'अभिनर् अत्र' या स्थली 'अतो रो.' सू. १६३ या सूत्रानें 'र' चे उत्व होऊ शकत नाही, कारण त्या सापादिक सूत्राच्या दृष्टीनें 'सयोगान्तस्य लोपः' या त्रैपादिक सूत्राने झालेला सकारलोप असिद्ध ठरतो व तो झालाच नाही आणि 'र' व 'अत्र' यातील 'अ' या दोहोमध्यें सकाराचे व्यवधान आहे असे मानावे लागते व त्यामुळें 'र' चे उत्व व गुणरूप एकादेश होऊ शकत नाही आणि 'अभिनोऽत्र' हा प्रयोग सिद्ध होऊ शकत नाही असे शंकाकाराचे म्हणणे आहे यावर दीक्षित असे उत्तर देतात की, 'अतो रोः' य सापादिक सूत्रानें होणाऱ्या उत्वकार्याच्या दृष्टीनें 'सयोगान्तस्य लोप' या त्रैपादिक सूत्रानें होणारा सयोगान्त लोप सिद्ध ठरतो असे प्रकृत सापादिक सूत्रावर पठित असलेल्या 'सयोगान्तलोपस्यैतत्वे सिद्धत्वात्' या वार्तिकात सांगितले आहे. त्यामुळें उत्वाच्या दृष्टीनें सकारलोप सिद्ध ठरतो आणि 'र' चे उत्व होऊन व पूर्व 'अ' आणि त्या पुढील 'र' चे जागी झालेला 'उ' याचे जागी 'आद् गुण' या सूत्रानें गुणरूप एकादेश होऊन व 'एङः पदान्तादति' सू ८६ या सूत्रानें पूर्वरूप एकादेश होऊन 'अभिनोऽत्र' हा इष्ट प्रयोग सिद्ध होऊ शक्तो आणि अशा रीतीनें काशिकेत दिलेल्या तृतीय दोषाचा परिहार करता येतो आता काशिकेत दिलेल्या चतुर्थ दोषाचा देखील कसा परिहार करता येतो हे दीक्षित पुढील पक्तीत सांगतात.) 'अबिभर्भवान्' हा प्रयोग देखील सिद्ध करण्यात काही अडचण येत नाही, कारण 'रात्सस्य' सू २८० या सूत्रात तकाराचा देखील प्रश्लेष केल्यानें 'रात्स्सस्य' असा पदच्छेद करता येतो. (प्रकृत सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात– 'रात्तस्य लोपो वक्तव्यः । अबिभर्भवान् । अजागर्भवान् । किं पुनः कारणं न सिध्यति ? । नियमवचनात् । रात्सस्येत्येतस्मान्नियमान्न प्राप्नोति । नैष दोषः । रात्सस्येत्यत्र तकारोपि निर्दिश्यते ।.' अशा रीतीनें तकाराचा प्रश्लेष करून भाष्यकारांनीं सांगितल्याप्रमाणे 'रात् स्सस्य' असे सूत्र पठित केले असतां, त्या सूत्राचा असा अर्थ होतो की, रकारापुढें सकार किंवा

तकार आल्यास त्या सकाराचा किंवा तकाराचा 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानें होणारा संयोगान्त लोप होतो व या अर्थान्वयें 'अबिभर् त्' या उदाहरणांत रकारापुढील तकाराचा लोप केल्यानें 'अबिभर्भ-वान्' हा प्रयोग सिद्ध होऊं शकतो आणि अशा रीतीनें काशिकेंत दिलेल्या चवथ्या दोषाचा देखील परिहार करतां येतो. आतां काशिकेंत दिलेल्या अवशिष्ट द्वितीय दोषाचा कसा परिहार करतां येतो हें दीक्षित पुढील पंक्तींत सांगतात. 'ङ्यापः सोः' एवढेंच सूत्र जर प्रकृत सूत्राऐवजीं पठित केलें तर) 'उखास्रत्' इत्यादि उदाहरणांत संयोगादि लोप होण्याची आपत्ति येते असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण दत्व प्रथम केल्यानें संयोगादिलोपाची प्राप्ति होत नाहीं. दत्व असिद्ध आहे असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण 'वस्वादिषु दत्वम्' हें वार्तिक सिद्धकाण्डांत पठित केलें आहे. सकार पदान्तीं नसल्यामुळें त्याचें दत्व होऊं शकत नाहीं असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण 'सु' हा (प्रथमेच्या एकवचनाचा) विभक्तिप्रत्यय पुढें असतांना देखील त्याच्या अङ्गाला पदसंज्ञा होते या पक्षाचा आश्रय केल्यानें, वरील शंकेचें निवारण करतां येतें. 'असर्वनामस्थाने यचि' असा योगविभाग करून 'यजादौ सर्वनामस्थाने पदं न' असें जें व्याख्यान केलें आहे तें 'सावपि पदं भवति' हा पक्ष मानण्यास प्रमाण आहे. ('उखायाः स्रंसते इति उखास्रस्' या उदाहरणांत 'स्रंस्' धातूहून क्विप् प्रत्यय केल्यावर 'अनिदितां हल उपधायाः' सू. ४१५ या सूत्रानें 'स्रंस्' धातूंतील नकाराचा लोप होऊन 'उखास्रस्' असें जें रूप होतें त्याहून प्रथमेचा 'सु=स्' प्रत्यय केल्यावर 'उखास्रस् स्' अशी स्थिति झाली असतां, जरी 'संयोगान्तस्य लोपः' हें पूर्व त्रैपादिक सूत्र असून 'स्कोः संयोगाद्योः' सू. ३८० हें संयोगादि-लोपाचें सूत्र पर त्रैपादिक सूत्र आहे व 'पूर्वत्रासिद्धम्' सू. १२ हें वचन आहे तरी, संयोगादिलोपाचें सूत्र संयोगान्त लोपाचें

अपवादक असल्यामुळें, 'परोऽपि ह्यपवादो वचनप्रामाण्यादुत्सर्गे कर्तव्ये नासिद्धो भवति' या कैयट्वृत्तीत दिलेल्या न्यायान्वयें, संयोगादिलोपरूप अपवादक शास्त्र प्रथम प्रवृत्त झाल्यानें, अखेरीस असलेल्या दोन सकारांपैकी प्रथम सकाराचा, म्हणजे धातूचा अवयव जो सकार त्याचा, लोप पावतो पण त्या सकाराचा लोप केल्यास पदाच्या अन्ती संयोग राहत नसल्यामुळें, उत्तर सकाराचा लोप होऊं शकत नाही व तो उत्तर सकार धातूचा सकार नसल्यामुळें व 'वसुस्रंसु' सू ३३४ या सूत्रानें धातूच्या अन्त्य सकाराचा दकार होणें सांगितलें असल्यामुळें त्या प्रत्ययरूप उत्तर सकाराचें दत्व होऊं शकत नाही व त्यामुळें 'उखास्रद्' असें इष्ट रूप न होण्याची आपत्ति येते यथापठित प्रकृत सूत्र असलें तर, 'उखास्रस्' या हलन्त अङ्गापुढील 'सु' प्रत्ययाचा प्रथम लोप करुन नंतर 'स्रस्' यांतील सकार जो धातूचा सकार आहे त्याचें दत्व केल्यानें 'उखास्रद्' असें रूप सिद्ध होऊं शकतें असें शंकाकाराचें म्हणणें आहे या शंकेवर दीक्षित असं उत्तर देतात की, धातूतील सकाराचें प्रथम दत्व केल्यानें सकार संयोगाचा आदि राहत नसून दकार संयोगाचा आदि होत असल्यामुळें, 'स्कोः संयोगाद्योः' या सूत्राची प्राप्तीच होत नाही व अशा रीतीनें धातूच्या सकाराचा लोप होण्याची आपत्ति टळते यावर शंकाकार असें म्हणतो की, 'वसुस्रंसु' हें दत्वविधायक त्रैपादिक सूत्र 'स्कोः संयोगाद्योः' सू ३८० या त्रैपादिक सूत्राच्या मानानें पर सूत्र असल्यामुळें, तें सूत्र 'पूर्वत्रासिद्धम्' या वचनान्वयें 'स्कोः संयोगाद्योः' या सूत्राच्या दृष्टीनें असिद्ध ठरतें व त्यामुळें दत्व प्रथम करतां येत नाही आणि 'स्कोः संयोगाद्योः' हें सूत्र प्रथम प्रवृत्त झाल्यानें त्या सूत्रानें धातूतील सकाराचा लोप होण्याची व दत्व न होण्याची आपत्ति जशीची तशीच कायम राहते या शंकेवर दीक्षित असं उत्तर देतात की, 'वसुस्रंसु' या त्रैपादिक सूत्रानें होणारें दत्व सिद्धान्ताच्या दृष्टीनें सिद्ध समजावें या अर्थाच

'वस्वादिषु दत्वं सिद्धं वाच्यम्' हें वार्तिक प्रकृत सूत्रावरील भाष्यांत पठित केलें असल्यामुळें, त्या वार्तिकाच्या आधारें संयोगादि-लोपाचा बाध होऊन दत्व प्रथम होतें व त्यामुळें शंकाकारानें वर दाखविलेली आपत्ति येत नाहीं; कारण दत्व प्रथम केल्यानें सकार संयोगाचा आदि राहत नाहीं व त्यामुळें 'स्कोः' सू. ३८० या सूत्राची प्राप्तीच होत नाहीं. यावर पुन्हा शंकाकार असें म्हणतो कीं, 'वसुस्रंसु' या सूत्रानें पदान्तीं असलेल्या 'स्रंस्' धातूंतील अन्त्य सकाराचा दकार होणें सांगितलें आहे व 'उखास्रस् स्' या समुदायाला जरी 'सुप्तिङन्तं पदम्' सू. २९ या सूत्रानें पदसंज्ञा होते तरी, 'सु' प्रत्ययापूर्वी असलेल्या 'उखास्रस्' या अङ्गाला पदसंज्ञा होत नाहीं; कारण 'सु' हा सर्वनामस्थान-प्रत्यय आहे व सर्वनामस्थानप्रत्यय पुढें असतां अङ्गाला पदसंज्ञा होत नाहीं हें 'स्वादिष्वसर्वनामस्थाने' सू. २३० या सूत्रावरून स्पष्ट होतें. म्हणून 'उखास्रस्' यांतील अन्त्य सकार पदान्तीं नसल्यामुळें, 'वसुस्रंसु' या सूत्रानें त्या सकाराचा दकार होऊं शकत नाहीं. या शंकेवर दीक्षित असें उत्तर देतात कीं, 'स्वादिष्व-सर्वनामस्थाने' व 'यचि भम्' या दोन सूत्रांचा दण्डपाठ करून 'स्वादिष्वसर्वनामस्थानेऽयचि' असा योगविभाग केल्यानें त्या योगविभागाचा 'अयचि सर्वनामस्थाने परे सति अङ्गं पदसंज्ञकं भवति' असा अर्थ होतो व 'सु' हा जरी सर्वनामस्थानप्रत्यय आहे तरी तो यजादि–यकारानें किंवा अचानें सुरू होणारा–प्रत्यय नसल्यामुळें त्याच्या अङ्गाला पदसंज्ञा होते. त्यामुळें 'उखास्रस् सु' यांतील 'उखास्रस्' हें अङ्ग पदसंज्ञक ठरून त्यांतील 'स्रंस्' धातूच्या अन्त्य सकाराचा 'वसुस्रंसु' या सूत्रानें दकार करतां येतो व 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानें 'सु = स्' या प्रत्ययाचा लोप करतां येतो आणि 'वाऽवसाने' सू. २०६ या सूत्रानें दकाराचें वैकल्पिक चर्त्व केल्यास 'उखास्रद्, उखास्रत्' अशीं पाक्षिक रूपें सिद्ध होतात व अशा रीतीनें कारिकेंत दिलेल्या द्वितीय दोषाचा

परिहार करता येतो. प्रकृत सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात :–'वस्वादिषु दत्व न सिध्यति । उखास्रत्, पर्णध्वत् । किं कारणम् ? । सयोगादिलोपबलीयस्त्वात् । सयोगान्तलोपात् सयोगादिलोपो बलीयान् । - ननु च दत्वे कृते न भविष्यति । असिद्ध दत्व, तस्यासिद्धत्वात् प्राप्नोति । सिद्धकाण्डे पठितं वस्वादिषु दत्व सौ दीर्घत्वे इति । तत्र सौ दीर्घत्वग्रहण न करिष्यते । वस्वादिषु दत्वमित्येव । एवमप्यपदान्तत्वान्न प्राप्नोति । अथ सावपि पद भवति ।' या भाष्याचाच अनुवाद वरील मनोरमेंत केला आहे 'सावपि पद भवति' असे जें या भाष्यात म्हटले आहे ते 'स्वादिष्वसर्वनामस्थाने' सू. १–४–१७ या सूत्रावरील भाष्यात सांगितले आहे. त्या भाष्यात भाष्यकार म्हणतात–' अथवा योगविभागः करिष्यते । स्वादिषु पूर्वं पदसंज्ञं भवति । ततः सर्वनामस्थानेऽपि च । पूर्वं पदसंज्ञ भवति । ततो भम् । भसंज्ञ च भवति यजादावसर्वनामस्थाने इति ।' सारांश प्रकृत सूत्रातून दोन्ही 'हल्' पदाचे प्रत्याख्यान करून हलन्त अङ्गापुढील *'स्, त्, स्' या अपृक्त प्रत्ययाचा 'संयोगान्तस्य लोपः'* या सूत्रानें लोप केल्यास काशिकेत जे चार दोष दाखविले आहेत ते प्रकृत सूत्रावरील भाष्यात दाखविले असून भाष्यकारानी त्या दोषांचा मनोरमेंत दर्शविल्याप्रमाणे परिहार देखील केला आहे. पण तसा परिहार करून देखील असेरीस भाष्यकारानी 'तस्मादसयोऽपृक्तलोप संयोगान्तलोपो विज्ञातुम् । न चेद्विज्ञायते ? । द्विहल्पृक्तग्रहण तिरयोश्च ग्रहण कर्तव्यमेव ।' असेच म्हटले आहे या भाष्यावरून हे स्पष्ट होते की, भाष्यकाराना 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानें हलन्त अङ्गापुढील अपृक्त प्रत्ययाचा लोप करणे मान्य नसून त्याना यथापठित प्रकृत सूत्र असणे हेच मान्य आहे, व त्याचे कारण त्यांनी दोन ठिकाणी 'उभयत पाशारज्जुः', म्हणजे इकडे आड तिकडे विहीर, असा दोष येतो हे दिले आहे असे असून देखील दीक्षित असे म्हणतात की, प्रकृत लाघलचक सूत्राऐवजी 'ङ्याप्-सो.' असे लहानसे सूत्र पठित केल्यानें कोणतीहि आपत्ति येत नाहीं व सर्व इष्ट रूपें

सिद्ध होऊं शकतात आणि तसें लहानसें सूत्र पठित करण्यांत लाघव असल्यामुळें, तसेंच सूत्र पठित करणें योग्य आहे. या विषयाचें अधिक विवरण शब्दरत्नांत पुढें करण्यांत येईल. )

शब्दरत्न— उत्वमपीति । अपिना पूर्वरूपम् । रोरुत्वे इति । कर्त्तव्ये कृते चेति शेषः । " न मु ने " इतिवत् । हरिव इति । हरिशब्दान्मतुपि " छन्दसीरः " इति वत्वे नुमि संयोगान्तलोपे " मतुवसोः " इति रुत्वे उत्वे गुणः छेदादीति । कीर्त्तयतेः क्विब्विचावेव न स्तः, वृतेर्यङ्लुकि लङि ईडभावे तिप्सिपोः प्रयोग एव नास्ति । 'यथालक्षणमप्रयुक्ते' इत्यत्रैव भाष्योक्तेः । अप्रयुक्ते लक्षणप्रवृत्त्यभावस्यैव योग्यतेत्यर्थः । प्रयुक्तानामिदमन्वाख्यानमिति सिद्धान्तात् । नेति व्याख्यानमिति । उपपादितं चेदं रामशब्दान्ते ।

'अभिनोऽत्रेति उत्वमपि सूपपादम्' या मनोरमेच्या पंक्तींतील 'अपि' या शब्दानें पूर्वरूपाचें, म्हणजे 'एङः पदान्तादति' सू. ८६ या सूत्रानें होणाऱ्या पूर्वरूप एकादेशाचें ग्रहण होतें. ('अभिनोऽत्र' या रूपाची सिद्धि करितांना पूर्वी मनोरमेंत हें सांगितलेंच आहे. उत्व व गुणरूप एकादेश करून 'अभिनो अत्र' अशी स्थिति झाली असतां, 'एङः पदान्तादति' या सूत्रानें पूर्वरूप एकादेश केल्यानेंच 'अभिनोऽत्र' हा प्रयोग सिद्ध होतो.) 'संयोगान्तलोपो रोरुत्वे' या मनोरमेंतील पंक्तीपुढें 'कर्तव्ये कृते च' हीं पदें अध्याहृत आहेत. 'न मु ने' सू. ४३९ या सूत्राचा ('नाभावे कर्तव्ये कृते च मुभावो नासिद्धः' असा) ज्याप्रमाणें अर्थ होतो त्याचप्रमाणें 'संयोगान्तलोपो रोरुत्वे' याचा देखील ('रोरुत्वे कर्तव्ये कृते च संयोगान्तलोपः सिद्धः' असा) अर्थ होतो. 'हरि' या शब्दापुढें 'मतुप्' प्रत्यय केला असतां, 'छन्दसीरः' सू. ३६०० या सूत्रानें वत्व होऊन व नंतर नुमागम व संयोगान्तलोप होऊन आणि 'मतुवसो रु' सू. ३६२६ या सूत्रानें रुत्व व नंतर उत्व आणि गुण होऊन 'हरिवो मे दिनं त्वा' या वैदिक प्रयोगांतील

'हरिवो' हे रूप सिद्ध होते. ('तदस्यास्त्यस्मिन्निति मतुप्' सू. १८९४ या सूत्रानें 'हरि' शब्दाहून 'मतुप्' प्रत्यय केला असता, 'मतुप्=मत्' प्रत्ययातील मकार 'हरि' यातील अन्त्य 'इ' या वर्णापुढें येत असल्यामुळे, 'छन्दसीरः' या सूत्रानें त्या मकाराचे जागी वकार होऊन 'हरिवत्' अशी स्थिति होते. या शब्दाहून सबुद्धीचा 'सु' प्रत्यय केला असता, 'उगिदचां सर्वनामस्थाने' सू ३६१ या सूत्रानें नुमागम होऊन 'हरिवन्त् स्' अशी स्थिति होते व अशा स्थितीत 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानें 'सु = स्' प्रत्ययाचा लोप केल्यानें व पुन्हा त्याच सूत्रानें पूर्व तकाराचा, लक्ष्यभेद असल्यामुळें, लोप केल्यानें 'हरिवन्' अशी स्थिति झाली असता, 'मतुवसो रुः सम्बुद्धौ छन्दसि' सू. ३६२८ या सूत्रानें अन्त्य नकाराचे रुत्व होऊन 'हरिवर्' अशी स्थिति होते या शब्दापुढें मकार या 'हश्' नें सुरू होणारा 'मे' हा शब्द असल्यामुळें, 'हशि च' सू. १६६ या सापादिक सूत्रानें 'रु' चे उत्व पावले आहे. 'संयोगान्तस्य लोपः' या त्रैपादिक सूत्रानें झालेला तकाराचा लोप असिद्ध, म्हणजे झालाच नाही, असे मानल्यास, 'रू' व मकार या दोहोंमध्यें तकाराचे व्यवधान होत असल्यामुळें, 'हशि च' या सूत्रानें उत्व न होण्याची व 'हरिवो' असे वैदिक प्रयोगातील रूप सिद्ध न होण्याची आपत्ति येते परतु 'हशि च' या सापादिक सूत्रानें होणाऱ्या उत्वकार्याच्या दृष्टीनें त्रैपादिक संयोगान्त लोप सिद्ध मानल्यानें, म्हणजे प्रकृत स्थली तकाराचा लोप झाला आहे व त्याचे व्यवधान नाहीं असे मानल्यानें, 'हशि च' या सूत्रानें 'रु' चे उत्व होऊन व 'आद्गुण' या सूत्रानें गुणरूप एकादेश होऊन 'हरिवो मे दिन त्वा' या वैदिक प्रयोगातील 'हरिवो' हे रूप सिद्ध होते हे वैदिक रूप सिद्ध होण्याकरिता 'रोरुत्वे कर्तव्ये कृते च संयोगान्तलोप सिद्धो वाच्यः' हें वचन मानणे भाग आहे आणि हें वचन मानल्यानें 'अभिनोऽत्र' या प्रयोगाची देखील सिद्धि होते ) 'कृत् संशब्दने' या चुरादिगणांत पठित असलेल्या धातूहून 'क्विप्' किंवा 'विच्' प्रत्यय

होतच नाहीं. त्याचप्रमाणें 'वृतु वर्तने' या भ्वादिगणांत पठित असलेल्या धातूच्या यङ्लुकाच्या लङाच्या रूपांत ईडागमरहित 'तिप्, सिप्=त्, स्' या प्रत्ययांचा प्रयोग मुळींच होत नाहीं; कारण 'यथालक्षणमप्रयुक्ते' असें प्रकृत सूत्रावरील भाष्यांतच भाष्यकारांनी म्हटलें आहे. त्या भाष्यवचनाचा 'अप्रयुक्ते लक्षणप्रवृत्त्यभावस्यैव योग्यता', म्हणजे ज्या रूपांचा भाषेंत कोठेंहि प्रयोग होत नाहीं अशीं रूपें सिद्ध करण्याकरितां पाणिनीय सूत्रांची प्रवृत्ति न करणेंच योग्य आहे, असा अर्थ आहे व भाष्यकारांनीं असें म्हणण्याचें कारण हें आहे कीं, ज्या रूपांचा भाषेंत प्रयोग होतो अशा रूपांचें अन्वाख्यान करण्याकरितां, म्हणजे तीं रूपें व्याकरणशास्त्रानें कशीं सिद्ध होतात हें दाखविण्याकरितांच, पाणिनीनें व्याकरणशास्त्र रचलें आहे असा सिद्धान्त आहे. ( प्रकृत सूत्रावरील भाष्यांत 'रात्सस्येत्यत्र तकारोपि निर्दिश्यते', म्हणजे 'रात्सस्य' या सूत्रांत तकाराचा प्रश्लेष केल्यानें तकार देखील निर्दिष्ट आहे व रकारापुढें तकार आल्यास तकाराचा देखील लोप होतो असें मानतां येतें असें सांगून, तसें मानलें असतां कोणती आपत्ति येते हें सांगतांना भाष्यकार म्हणतात–'यद्येवं कीर्तयतेरप्रत्ययः कीरिति प्राप्नोति । कीर्त इति चेष्यते । यथालक्षणमप्रयुक्ते ।' या भाष्याचा भावार्थ हा आहे कीं, 'कृत्' धातूहून 'नित्यमश्रूयमाणत्वात् अविद्यमानः प्रत्ययः क्विबादिः' असा 'अप्रत्यय' केल्यास, म्हणजे 'क्विप् = व्, विच् = व्' इत्यादि अपृक्त प्रत्ययाचा 'वेरपृक्तस्य' सू. ३७५ या सूत्रानें लोप होऊन प्रत्यय नाहींसा होत असल्यामुळें तशा प्रकारचा नाहींसा होत असणारा 'क्विप्' किंवा 'विच्' प्रत्यय केल्यास, 'उपधायाश्च' सू. २५७१ या सूत्रानें त्या धातूच्या उपधेंतील 'ऋ' चा इकार होऊन व 'उरण्रपरः' सू. ७० या सूत्रानें तो इकार रपर होऊन व 'उपधायां च' सू. २२६५ या सूत्रानें इकार दीर्घ होऊन आणि 'वेरपृक्तस्य' या सूत्रानें प्रत्यय नाहींसा होऊन 'कीर्त्' अशी स्थिति झाली असतां, 'रात् सस्य' असें

तकारप्रश्लेप करून सूत्र पठित केल्यानें. वरील उदाहरणात रकारापुढें तकार आला असल्यामुळें, त्या तकाराचा लोप होऊन 'कीर् = की' असे 'कृत्' धातूचे क्विप्प्रत्ययान्त किंवा क्विप्रत्ययान्त रूप होऊं पाहते वास्तविक 'कीर्त' असे रूप होणे इष्ट आहे असे सांगून 'यथालक्षणमप्रयुक्ते' असे भाष्यकार म्हणतात. या भाष्यवचनाचा कैयटानें दोन प्रकारे अर्थ केला आहे प्रथम 'यथाऽलक्षणमप्रयुक्ते' असा पाठ मानून व 'लक्षणस्य अभाव अलक्षणम्' असा 'अर्थाभावे अव्ययीभाव' समास करून आणि पुढें 'अलक्षणमनतिक्रम्य यथाऽलक्षणम्' असा अव्ययीभावसमास करून, 'अप्रयुक्ते, क्वापि व्यवहाराविषये, लक्ष्ये लक्षणाभावस्यैव योग्यता, लक्षण नैव प्रवर्तते । प्रयोग एव तस्य न भवति' असा अर्थ केला आहे अकारप्रश्लेप करण्यास काही प्रमाण नसल्यामुळें तसा प्रश्लेप न करिता 'यथालक्षणमप्रयुक्ते' असा यथाश्रुत पाठ मानून व 'लक्षणमनतिक्रम्य यथालक्षणम्' असा अव्ययीभावसमास करून 'अप्रयुक्ते लक्षणेन यथा प्राप्नोति तथा कर्तव्यम्' असे द्वितीय व्याख्यान केले आहे वरील शब्दरत्नाच्या पक्षतीत शब्दरत्नकारांनी प्रथम व्याख्यान स्वीकारले आहे या दोन प्रकारे व्याख्यान करून कैयटानें जे दोन भिन्न अर्थ केले आहेत त्या अर्थांमध्यें फरक हा आहे की, ज्या रूपाचा भाषेत प्रयोग होत नाही अशा रूपाची पाणिनीय सूत्रें प्रवृत्त करून सिद्धि करू नये असा प्रथम व्याख्यानाचा तात्पर्यार्थ आहे व ज्या रूपांचा भाषेत प्रयोग होत नाही तशा रूपाची सिद्धि पाणिनीय सूत्रान्वयें करणे असल्यास, पाणिनीय सूत्रें प्रवृत्त केल्यानें ज्या प्रकारचीं रूपें सिद्ध होतील तशीच रूपें ग्राह्य मानलीं पाहिजेत असा कैयटाच्या द्वितीय व्याख्यानाचा तात्पर्यार्थ आहे जर क्विप् प्रत्ययान्त 'कृत्' धातूचा भाषेत प्रयोग आढळत नाहीं तर, प्रथम व्याख्यानान्वयें पाणिनीय सूत्रें प्रवृत्त करून तसे रूप सिद्ध करण्याची मुळींच खटपट करू नये द्वितीय व्याख्यानान्वयें,

तसें रूप सिद्ध करण्याची इच्छा असेल तर पाणिनीय सूत्र–'रात् ल्सस्य' हें सूत्र–प्रवृत्त करून 'कीः' असें जें रूप होतें तेंच ग्राह्य मानलें पाहिजे, व 'कीर्त' असें जें रूप होणें इष्ट वाटतें पण जें पाणिनीय सूत्र प्रवृत्त केल्यानें सिद्ध होऊं शकत नाहीं तें रूप अस्वीकारार्हच–त्याज्यच–मानलें पाहिजे. यङ्लुकाचीं लङाचीं रूपें करितांना सार्वधातुक हलादि पित् प्रत्ययांना 'यङो वा' सू. २६५१ या सूत्रानें विकल्पेंकरून ईडागम होणें सांगितलें आहे. 'तिप्' प्रत्ययांतील इकाराचा लङलकारांत 'इतश्च' सू. २२०७ या सूत्रानें लोप केल्यावर 'त्' असा जो हलादि पित् अपृक्त प्रत्यय अवशिष्ट राहतो त्याला विकल्पेंकरून ईडागम न केल्यास 'वृत्' धातूचीं यङ्लुकाचीं लङाचीं प्रथमपुरुषाच्या एकवचनाचीं, कौमुदींत यङ्लुक्प्रकरणांत 'रुग्रिकौ च लुकि' सू. २६५३ या सूत्रावरील वृत्तींत सांगितल्याप्रमाणें, 'अवर्वर्त, अवरिवर्त, अवरीवर्त' अशीं तीन पाक्षिक रूपें होतात. या तीन्ही रूपांत रकारापुढें तकार आला असल्यामुळें, 'रात् ल्सस्य' असें सूत्र पठित केलें तर, तकाराचा लोप होण्याची व 'अवर्वः, अवरिवः, अवरीवः' अशीं रूपें होण्याची आपत्ति येते. वास्तविक 'वृत्' धातूचीं यङ्लुकाच्या लङाचीं प्रथमपुरुषाच्या एकवचनाचीं ईडागमरहित रूपें भाषेंत मुळींच आढळत नाहींत. म्हणून 'यथालक्षणमप्रयुक्ते' या भाष्यवचनाचा जो प्रथम अर्थ केला आहे त्या अर्थान्वयें तशीं रूपें सिद्ध करण्याची खटपट करणेंच अयोग्य आहे व जर तशीं रूपें सिद्ध करण्याचा आग्रहच असेल तर, पाणिनीय सूत्रान्वयें, म्हणजे भाष्यकारांनीं सांगितल्याप्रमाणें 'रात् ल्सस्य' असें सूत्र मानल्यानें, जीं रूपें सिद्ध होतात तीं, इष्ट वाटत नसलीं तरी, ग्राह्य मानणें भाग आहे. म्हणजे कौमुदींत दिलेलीं 'अवर्वर्त, अवरिवर्त, अवरीवर्त' हीं जीं तीन रूपें सिद्ध होणें इष्ट वाटतें तीं रूपें न स्वीकारतां 'रात् ल्सस्य' या सूत्रान्वयें होणारीं 'अवर्वः' अवरिवः, अवरीवः' हीं तीन रूपें स्वीकारणें भाग आहे. पण तदस्वस्वकार म्हणतात कीं, जीं रूपें भाषेंत

आढळत नाहीत तशी रूपें सिद्ध करण्याच्या भरीस पडू नये व त्याचे कारण हे की, जी रूपें भाषेंत प्रचलित आहेत ती रूपें व्याकरण-रीत्या कशी सिद्ध होतात याचे स्पष्टीकरण करण्याकरिताच पाणि-नीय व्याकरणशास्त्र रचले आहे व जी रूपें भाषेंत प्रचलित नाहीत तशी रूपे सिद्ध करण्याकरिता ते शास्त्र रचले नाही असा भाष्य-कारीय सिद्धान्त आहे ) 'यजादौ सर्वनामस्थाने पदं न' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचे विवरण 'राम' शब्दाची रूपें सिद्ध करतेवेळी अखेरीस पूर्वी केले आहे

मनोरमा—न चैवं राजेत्यादौ नलोपे कृते सो रुत्वविसर्गौ स्याता-मिति वाच्यम् । "इतोऽत्" इति सिद्धे "पथिमथि" इत्याकार-विधानेन प्रथमं सुलोपस्य ज्ञापनात् । ननु नैतज् ज्ञापकं संबुद्धौ चरितार्थत्वात् हे पन्थाः मन्थाः ऋभुक्षाः । तत्र हि दीर्घः "असंबुद्धौ" इति पर्युदस्तः नलोपश्च निषिद्ध इति चेत् । एवं तर्हि नलोपात् प्राक् संयोगान्तलोप इत्यर्थे "न ङिसंबुध्योः" इति सूत्रमेव ज्ञापकमस्तु । तथा हि— "ङिसम्बुध्योः" इति षष्ठी न तु सप्तमी ङेर्लुका लुप्ततया प्रत्ययलक्षणाभावात्, ङ्यन्तस्य च प्रातिपदिकस्येति सामानाधिकरण्येनान्वयः न च प्रथमं संयोगान्तलोपं विना सम्बुध्यन्तं प्रातिपदिकं लभ्यते । तस्मात् ङ्याप: सोरिति न्यासे न किंचिद् बाधकम् । यदि तु 'वस्वादिषु वत्वम्' इति वार्तिकं प्रत्याख्यायते । अधातुग्रहणेनैवोखास्रदित्यादौ दीर्घाभावसिद्धेः । तर्हि हल्ङ्याप: सोरित्येव सूत्रमस्तु । यत्तु यथाश्रुतं सूत्रं प्राचा व्याख्यातम् ङ्यन्तादाबन्ताद् दीर्घाच्चेति । तन्न । ङ्यापौ हि दीर्घौ न तु तदन्तमपि । न च दीर्घाद् ङ्यन्तादित्यादेर्दीर्घो यो ङी तदन्तादित्यादिरर्थो लभ्यते । दीर्घात् इति पञ्चम्या अनन्वयात् । समासे उपसर्जनयोङ्याबोर्विशेषणायोगात् । उक्तं हि भाष्ये-"सविशेषणानां वृत्तिर्न" "वृत्तस्य वा विशेषणयोगो न" इति । एतेन अनदीसज्ञं ह्रस्वम् इउवर्णान्तमित्यपि प्राचो वृत्तिः प्रत्युक्ता ।

प्रथमेच्या एकवचनाचा 'सु' प्रत्यय पुढें असतां अङ्गाला पद-संज्ञा होते हा जो पक्ष वर मनोरमेंत सांगितला आहे तो स्वीकारल्यास व 'ङ्यापः सोः' असें प्रकृत सूत्र मानल्यास, 'राजा' इत्यादि उदाहरणांत नकाराचा लोप केला असतां, 'सु' प्रत्ययाचें रुत्व व विसर्ग होण्याची आपत्ति येते असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण 'इतोऽत्सर्वनामस्थाने' सू. ३६६ या सूत्रानेंच इष्ट रूपांची सिद्धि होत असून देखील 'पथिमथ्यृभुक्षामात्' सू. ३६५ या सूत्रानें जो आकारादेश होण्याचें विधान केलें आहे त्यावरून हें ज्ञापित होतें कीं, 'सु' लोप प्रथम होतो. ( शंकाकाराचें असें म्हणणें आहे कीं, 'सावपि पदं भवति' हा पक्ष स्वीकारल्यास, 'राजन् सु' या स्थलीं 'सर्वनामस्थाने चासम्बुद्धौ' सू. २५० या सूत्रानें उपधा दीर्घ होऊन 'राजान् सु' अशी स्थिति झाली असतां, 'राजान्' या नान्त अङ्गापुढें 'सु' हा प्रत्यय असल्यामुळें 'राजान्' याला पदसंज्ञा होते व 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' सू. २३६ हें त्रैपादिक सूत्र 'संयोगान्तस्य लोपः' सू. ५४ या त्रैपादिक सूत्राच्या मानानें पूर्व सूत्र असल्यामुळें, 'सु = स्' प्रत्ययाचा 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानें लोप होण्यापूर्वी नकाराचा लोप प्रथम होऊन 'राजा स्' अशी स्थिति होते. अशा स्थितींत पदाच्या अन्तीं संयोग नसल्यामुळें, 'स्' प्रत्ययाचा, म्हणजे सकाराचा, लोप होऊं शकत नाही. त्यामुळें 'ससजुषो रुः' सू. १६२ या सूत्रानें 'सु' प्रत्ययाचें रुत्व होऊन व 'खरवसानयोर्विसर्जनीयः' सू. ७६ या सूत्रानें रेफाचा विसर्ग होऊन 'राजाः' असें अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येते. म्हणून 'सावपि पदं भवति' हा पक्ष मानणें व तसेंच प्रकृत सूत्राऐवजीं 'ङ्यापः सोः' एवढेंच सूत्र मानणें अयोग्य आहे असा शंकाकाराच्या म्हणण्याचा तात्पर्यार्थ आहे. या शंकेवर दीक्षित असें उत्तर देतात कीं, 'राजान् सु = राजान् स्' या स्थलीं नकार-लोप प्रथम न करितां 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानें संयोगान्त सकाराचा लोप प्रथम करून नंतर नकारलोप केल्यास, शंकाकारानें

दर्शविलेली आपत्ति येत नाही. पण वर सांगितल्याप्रमाणे 'संयोगान्तस्य लोपः' हे पर त्रैपादिक शास्त्र असल्यामुळें व 'पूर्वत्रासिद्धम्' सू. १२ हे वचन असल्यामुळें, ते सूत्र 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' या त्रैपादिक पूर्व सूत्रापूर्वी कसे प्रवृत्त होऊं शकणार व सकारलोप त्या सूत्रानें कसा प्रथम करता येणार ? या प्रश्नाचे दीक्षित असे उत्तर देतात की, नलोप पूर्व त्रैपादिक सूत्रानें होणारा असून संयोगान्त सकाराचा लोप उत्तर त्रैपादिक सूत्रानें जरी होणारा आहे तरी, तो प्रथम करता येतो व 'पथिमथि' सू. ३६५ या सूत्रातील 'आत्' या पदाचे ग्रहण याचे ज्ञापक आहे. 'पथिन् सु' या स्थली 'इतोऽत्सर्वनामस्थाने' सू. ३६६ या सूत्रानें 'पथिन्' यातील इकाराचे जागी अकारादेश करून 'पथन् सु' अशी स्थिति झाली असता, 'सर्वनामस्थाने चासम्बुद्धौ' सू २५० या सूत्रानें उपधा दीर्घ होऊन व 'थो न्थः' सू. ३६७ या सूत्रानें थकाराचे जागी 'न्थ्' असा आदेश होऊन 'पन्थान् सु' अशी स्थिति झाल्यावर, 'सु' प्रत्यय पुढें असल्यामुळें 'पन्थान्' या नान्त अङ्गाला पदसंज्ञा होते असा पक्ष मानल्यास, 'संयोगान्तस्य लोपः' या त्रैपादिक सूत्राच्या मानानें 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' हें त्रैपादिक पूर्व सूत्र असल्यामुळें, त्या पूर्व त्रैपादिक सूत्रानें नकारलोप प्रथम करून नतर 'सु' प्रत्ययाचे रुत्व करून विसर्ग केला असता, 'पन्थाः' असे इष्ट रूप सिद्ध होऊ शकतेंच. मग तें रूप सिद्ध करण्याकरिता पाणिनीनें 'पथिमथि' सू. ३६५ हें सूत्र का केले ? ते सूत्र व्यर्थ ठरू पाहते. ते व्यर्थ न ठरावे यावरिता हें मानणे आवश्यक आहे की, नकारान्त शब्दापुढें 'सु' प्रत्यय आला असता, नकारलोप प्रथम न होता 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानें 'सु' प्रत्ययाचा लोप प्रथम होतो. त्यामुळें 'पथिन् सु = पथन् सु = पथान् सु = पन्थान् सु' या स्थितीत 'सु' लोप प्रथम पावतो व तो प्रथम केल्यास 'पन्था.' असे इष्ट रूप सिद्ध न होता, नकारलोप नतर केल्यानें 'पन्था' असे अनिष्ट रूप होण्याची

आपत्ति येते. ती आपत्ति टाळण्याकरितां पाणिनीला 'पथिमथि' हें सूत्र मुद्दाम करावें लागलें. तें सूत्र केलें असल्यामुळें, 'पथिन् सु = पथन् सु' अशा स्थितींत 'पथन्' यांतील अन्त्य नकाराचे जागीं आकारादेश होऊन व 'अक: सवर्णे दीर्घः' सू. ८५ या सूत्रानें सवर्ण-दीर्घ एकादेश होऊन आणि 'थो न्थ:' या सूत्रानें थकाराचे जागीं 'न्थ्' असा आदेश होऊन 'पन्था सु = पन्था स्' अशी स्थिति झाली असतां, 'सु = स्' हा प्रत्यय संयोगान्त नसल्यामुळें त्याचा लोप पावत नाहीं आणि त्याचें रुत्व व विसर्ग होऊन 'पन्थाः' असें इष्ट रूप सिद्ध होतें. सारांश नकारान्त शब्दापुढें 'सु' प्रत्यय आला असतां नकारलोप प्रथम न होतां 'संयोगान्तस्य लोप:' या सूत्रानें 'सु' लोप प्रथम होतो याचें 'पथिमथि' हें सूत्र ज्ञापक आहे. या ज्ञापकान्वयें 'राजन् सु = राजान् सु' या स्थलीं नान्त अङ्गापुढें असणाऱ्या 'सु' प्रत्ययाचा लोप प्रथम केल्यास व नंतर 'राजान्' या प्रातिपदिकसंज्ञक पदांतील अन्त्य नकाराचा लोप केल्यास, 'राजा' असें इष्ट रूप सिद्ध होण्यांत कांही अडचण येत नाहीं असें दीक्षितांचें म्हणणें आहे. यावर शंकाकार असें म्हणतो कीं, नान्त अङ्गापुढील 'सु' प्रत्ययाचा 'संयोगान्तस्य लोप:' या सूत्रानें प्रथम लोप होऊन नंतर त्या अङ्गांतील अन्त्य नकाराचा 'न लोप: प्रातिपदिकान्तस्य' या सूत्रानें लोप होतो याचें) 'पथिमथि' हें सूत्र ज्ञापक मानतां येत नाहीं; कारण 'हे पन्थाः मन्थाः ऋभुक्षा:' हीं संबुद्धीचीं रूपें सिद्ध होण्याकरितां तें सूत्र (आवश्यक आहे व अशा रीतीनें तें सूत्र) चरितार्थ ठरतें. हीं वरील संबुद्धीचीं रूपें सिद्ध करितांना उपधा दीर्घ होऊं शकत नाहीं; कारण ('सर्वनामस्थाने चासम्बुद्धौ' सू. २५० या सूत्रांत) 'असम्बुद्धौ' असा पर्युदास आहे आणि तसेंच (संबुद्धीचा प्रत्यय पुढें असतां 'न ङिसम्बुद्ध्योः' सू. ३५२ या सूत्रानें) नकारलोप होण्याचा निषेध केला आहे. (त्यामुळें 'हे पथिन् सु = हे पथन् सु = हे पन्थन् सु' या स्थलीं संबुद्धीचा 'सु' प्रत्यय नान्त अङ्गापुढें असल्यामुळें उपधा दीर्घ होऊं शकत नाहीं व तसेंच

त्या अङ्गातील अन्त्य नकाराचा लोपहि होऊ शकत नाही आणि म्हणून पाणिनीला 'पथिमथि' हे सूत्र मुद्दाम करावे लागले. त्या सूत्राने 'हे पथिन् सु = हे पथन् सु = हे पन्थन् सु' या स्थली 'पन्थन्' यातील अन्त्य नकाराचे जागी आकारादेश होत असल्यामुळें, उपधा दीर्घ होण्याची गरज राहत नाही व नकारलोप होण्याचाहि प्रसंग येत नाही आणि 'सु = स्' हा प्रत्यय संयोगान्त राहत नसल्यामुळें, त्याचा लोप न होता रुत्व व विसर्ग होऊन 'पन्थाः' इत्यादि सम्बुद्धीची इष्ट रूपें सिद्ध होतात. अशा रीतीनें ती संबुद्धीची रूपें सिद्ध होण्याकरिता 'पथिमथि' हे सूत्र आवश्यक असल्यामुळें, नान्त अङ्गापुढील 'सु' प्रत्ययाचा नकारलोप होण्यापूर्वी 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानें प्रथम लोप होतो याचे ते सूत्र ज्ञापक मानता येत नाही असे शंकाकाराच्या म्हणण्याचे तात्पर्य आहे. शंकाकाराचे हे म्हणणे यथार्थ मानून दीक्षित असे उत्तर देतात की,) असे जर शंकाकाराचे म्हणणे आहे तर मग नलोप होण्यापूर्वी संयोगान्तलोप होतो या विषयाचे 'न ङिसम्बुद्धयोः' हेच सूत्र ज्ञापक मानावे, व ते सूत्र तसे ज्ञापक मानले असता, त्या सूत्रातील 'ङिसम्बुद्धयोः' हे पद सप्तम्यन्त न मानता षष्ठ्यन्त मानले पाहिजे, कारण ते पद सप्तम्यन्त मानल्यास, 'ङि' या सप्तमीच्या एकवचनाच्या प्रत्ययाचा ('सुपां सुलुक्' सू. ३५६१ या सूत्रानें) लुक् होत असल्यामुळें (व 'न लुमताङ्गस्य' सू. २६३ हा निषेध असल्यामुळें) येथें प्रत्ययलक्षण होऊ शकत नाही, म्हणजे लुकानें लुप्त झालेला 'ङि' हा प्रत्यय प्रत्ययलक्षणानें विद्यमान आहे असे मानता येऊ शकत नाही (पण 'ङिसम्बुद्धयोः' हे पद षष्ठ्यन्त मानल्यानें व प्रत्ययग्रहणपरिभाषान्वयें प्रत्ययानें प्रत्ययान्ताचे ग्रहण होत असल्यामुळें) 'ड्यन्तस्य' (व 'सम्बुद्ध्यन्तस्य') या पदाचा 'प्रातिपदिकस्य' या (अनुवृत्त होणाऱ्या) पदाशी सामानाधिकरण्यानें अन्वय होऊ शकतो व 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानें संबुद्धीच्या 'सु' प्रत्ययाचा लोप प्रथम केल्याशिवाय

संबुद्धयन्त प्रातिपदिक मिळूंच शकत नाहीं. ('न ङिसम्बुद्धचौ' सू. ३५२ या सूत्रांतील 'ङिसम्बुद्धचोः' हें पद सप्तम्यन्त मानलें तर, 'ङि' प्रत्यय व संबुद्धिप्रत्यय हीं नकारलोप न होण्याचीं निमित्तें ठरतात व 'परमे व्योमन्' इत्यादि वैदिक प्रयोगांत 'व्योमन्' शब्दापुढील 'ङि' प्रत्ययाचा 'सुपां सुलुक्' सू. ३५६१ या सूत्रानें लुक् झाला असतां, ङिप्रत्ययनिमित्तक नकारलोपनिषेध-रूप कार्यं करतेवेळीं 'ङि' प्रत्यय विद्यमान आहे असें, 'न लुमताङ्गस्य' या निषेधान्वयें, प्रत्ययलक्षणानें मानतां येऊं शकत नाहीं आणि त्यामुळें 'व्योमन्' यांतील अन्त्य नकाराचा 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' या सूत्रानें लोप होण्याची आपत्ति टाळतां येणें अशक्य आहे. परंतु 'ङिसम्बुद्धचोः' हें षष्ठयन्त पद मानलें तर, 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' या पूर्व सूत्रांतून 'प्रातिपदिकस्य' या षष्ठ्यन्त पदाची त्या सूत्रांत अनुवृत्ति केल्यानें 'ङ्यन्तस्य सम्बुद्धयन्तस्य च प्रातिपदिकस्य नलोपो न स्यात्' असा त्या सूत्राचा अर्थ होतो व तसा सूत्रार्थ केल्यानें 'व्योमन्' हें पद प्रत्ययलक्षणानें ङ्यन्त प्रातिपदिक–प्रातिपदिकान्त पद–आहे असें मानतां येतें; कारण येथें ङिप्रत्ययनिमित्तक कोणतेंहि कार्य अङ्गाला करणें नसून ङ्यन्त कार्यीं प्रत्ययलक्षणानें विद्यमान आहे असें मानून त्याचे ठिकाणीं नलोपाचा निषेध करणें आहे. त्यामुळें 'न लुमताङ्गस्य' हा निषेध येथें लागू पडत नाहीं व 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' या सूत्रान्वयें 'व्योमन्' हें ङ्यन्त पद मानतां येतें आणि तें प्रातिपदिक देखील असल्यामुळें, 'न ङिसम्बुद्धचोः' हा निषेध 'व्योमन्' या स्थलीं लागू पडतो व त्यांतील नकारलोप होण्याची आपत्ति टळते. आतां संबुद्धयन्त प्रातिपदिक होण्याकरितां संबुद्धीच्या 'सु' प्रत्ययाचा लोप होणें आवश्यक आहे असें जें दीक्षितांनीं म्हटलें आहे त्याचें कारण हें कीं, जोपर्यंत संबुद्धीचा 'सु' प्रत्यय विद्यमान आहे तोपर्यंत 'सु' प्रत्ययान्तालाच, म्हणजे 'हे राजन् सु' या समुदायालाच, संबुद्धयन्त म्हणतां येतें व तो समुदाय प्रत्ययान्त असल्यामुळें व 'अर्थवदधातुरप्रत्ययः प्राति-

पदिकम्' सू. १७८ या सूत्रात 'अप्रत्ययः' असा पर्युदास असल्या-मुळें, त्याला प्रातिपदिकसंज्ञा होत नाही. पण 'संयोगान्तस्य लोप.' या सूत्रानें 'सु = स्' या संबुद्धीच्या प्रत्ययाचा लोप केल्यावर 'राजन्' हें प्रातिपदिक प्रत्ययलक्षणानें संबुद्धयन्त मानता येते आणि 'नान्तस्य सम्बुद्धयन्तस्य प्रातिपदिकस्य नलोपो न स्यात्' असा निषेध मानल्यानें, 'हे राजन्' यातील नकाराचा लोप न होता 'हे राजन्' असे संबुद्धीचे इष्ट रूप सिद्ध होते. सारांश 'न ङिसम्बुद्धयोः' या सूत्रातील 'ङि' हे पद षष्ठयन्त मानावे लागत असल्यामुळें, 'ङिसम्बुद्धयोः' या इतरेतरयोगद्वन्द्व समासातील 'सम्बुद्धि' हें पद देखील षष्ठयन्तच मानले पाहिजे आणि संबुद्धयन्त प्रातिपदिकरूप नलोपाच्या कार्यी मिळण्याकरिता संबुद्धीच्या 'सु' प्रत्ययाचा, वर सांगितल्याप्रमाणे, प्रथम लोप होणे आवश्यक असल्यामुळें त्यायव्हनच हे सिद्ध होते की, नकारलोप होण्यापूर्वी 'सु' प्रत्ययाचा लोप प्रथम होतो व अशा रीतीनें त्या सूत्रातील 'सम्बुद्धि' पदाचे ग्रहण नलोपापूर्वी 'सु' लोप होतो याचे ज्ञापक ठरतें. त्यामुळें 'राजन् सु = राजान् सु' या स्थली 'सु = स्' या प्रत्ययाचा 'संयोगान्तस्य लोप' या सूत्रानें प्रथम लोप होऊन व नंतर 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' या सूत्रानें नकारलोप होऊन 'राजा' असे प्रथमेच्या एकवचनाचे इष्ट रूप सिद्ध होण्यात काहीं अडचण येत नाही. येथें हें लक्षात ठेवावें की, 'न ङिसम्बुद्धयो.' या सूत्रा-तील 'सम्बुद्धि' या पदाचे ग्रहण संबुद्धिप्रत्ययापुरतेंच विशेषापेक्ष ज्ञापक न मानतां सामान्यापेक्ष ज्ञापक मानले आहे. तें विशेषापेक्ष ज्ञापक मानले तर, 'राजन् सु = राजान् सु' या स्थली नकारलोपा-पूर्वी प्रथमेच्या 'सु' प्रत्ययाचा लोप करतां येणार नाहीं.) म्हणून (वरील विवेचनावरून हें स्पष्ट होते कीं, प्रश्न सूत्राऐवजीं) 'ड्माप सो' पृथक्च सूत्र मानल्यानें कोणत्याहि प्रकारचा दोष उद्भवत नाहीं. 'अत्वसन्तस्य चाधातो' सू. ४२५ या सूत्रात 'अधातोः' या पदाचे ग्रहण केले असल्यामुळें, 'उखास्रत्' इत्यादि उदाहरणांत

उपधादीर्घकार्याची प्राप्तीच होत नाहीं व त्यामुळें 'वस्वादिषु दत्वं सौ दीर्घत्वे' हें वार्तिक असण्याची कांहीं गरज नाहीं असें मानून त्या वार्तिकाचें प्रत्याख्यान केलें तर, 'हल्ङ्याप: सोः' असें सूत्र मानणें भाग आहे. ('उखाया: स्रंसते इति उखास्रस्' या स्थलीं जरी असन्त अङ्ग आहे तरी तें धात्वन्त असल्यामुळें व 'अत्वसन्तस्य' या सूत्रांत 'अधातोः' असा निषेध असल्यामुळें, या उदाहरणांत उपधा-दीर्घकार्याची प्राप्तीच होत नाहीं व त्यामुळें दत्वाची सिद्धि होण्या-करितां 'वस्वादिषु दत्वम्' हें वार्तिक मानण्याची कांहींच गरज राहत नाहीं व 'हल्ङ्याप: सोः' असें सूत्र पठित केल्यास, 'उखा-स्रस् सु' या स्थलीं हलन्त अङ्गापुढें 'सु' प्रत्यय आला असल्यामुळें त्याचा प्रकृत सूत्रानें प्रथम लोप केला असतां, 'उखास्रस्' हें अङ्ग प्रत्ययलक्षणानें पदसंज्ञक ठरतें व त्यांतील अन्त्य सकाराचें 'वसुस्रंसु' सू. ३३४ या त्रैपादिक सूत्रानें नंतर दत्व केल्यानें 'उखास्रद्' असें इष्ट रूप सिद्ध होऊं शकतें.) प्रक्रियाकौमुदीकारांनीं यथापठित प्रकृत सूत्राचें व्याख्यान करितांना 'ङ्यन्तादावन्ताद् दीर्घाच्च' असें जें म्हटलें आहे तें बरोबर नाहीं; कारण 'ङी, आप्' हे दीर्घ आहेत तरी, ङ्यन्त व आबन्त हे कांहीं दीर्घ नाहींत. ('दीर्घ' हा शब्दाचा धर्म नसून केवळ अचाचा धर्म असल्यामुळें, 'दीर्घात्' हें 'ङी=ई' व 'आप्=आ' या अचांचेंच विशेषण होऊं शकतें. ङ्यन्त व आबन्त शब्दांचें 'दीर्घात्' हें पद विशेषण होऊं शकत नाहीं असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे.) 'दीर्घात् ङ्यन्तात्, दीर्घात् आबन्तात्' यांचा 'दीर्घो यो ङी, दीर्घो य आप् तदन्तात्' असा अर्थ होऊं शकत नाहीं; कारण 'दीर्घात्' या पञ्चम्यन्त विशेषणाचा ('हल्ङ्याब्भ्य:' या सामासिक पदांतील अवयव जे) 'ङी, आप्' त्यांशीं अन्वय होऊं शकत नाहीं. ('ङ्यन्त, आबन्त' या अन्यपदार्थप्रधान बहुव्रीहि) समासांत 'ङी, आप्' हे उपसर्जन झाले असल्यामुळें, 'दीर्घात्' हें पद त्यांचें विशेषण होऊं शकत नाहीं. ('समर्थ: पदविधि:' सू. २-१-१ या सूत्रावरील) भाष्यांत

'सविशेषणा वृत्तिर्न, वृत्तस्य वा विशेषणयोगो न' असे म्हटले आहे ( व या भाष्यवचनाचा अर्थ असा आहे की, जें पद वाक्यातील विशेषणरूप पृथक् पदाशी विशेष्यरूपानें अन्वित आहे त्याचा वाक्यातील इतर पदाशी समास होऊ शकत नाही आणि त्याचप्रमाणे जो शब्द समासाचा अवयव आहे त्याचे वाक्यातील पृथक् पद विशेषण होऊ शकत नाही या वचनान्वयें 'हल्ङ्याब्भ्य' या सामासिक पदातील 'ङी, आप्' या अवयवाचे 'दीर्घात्' हे सौत्र वाक्यातील पृथक् पद विशेषण होऊ शकत नाही ) अशी भाष्यवचनें असल्यामुळें ( 'शेषो घ्यसखि' सू १–४–७ या सूत्राचें व्याख्यान करिताना ) प्रक्रियाकौमुदीकारानी 'अनदीसंज्ञं ह्रस्वम् इउवर्णान्तम्' असे जें म्हटले आहे ते देखील चूक ठरते ( प्रक्रियाकौमुदीकारानी 'शेषो घ्यसखि' या सूत्राचे 'अनदीसंज्ञं ह्रस्वमिउवर्णान्तं सखिवर्जं घिसंज्ञं स्यात्' असं व्याख्यान केले आहे या वाक्यात 'इउवर्णान्तम्' हे सामासिक पद आहे व या अन्यपदार्थप्रधान बहुव्रीहिसमासात 'इउवर्ण' हें पद त्या समासाचे पूर्वावयव असून उपसर्जन असल्यामुळें, वरील वाक्यातील 'ह्रस्वम्' हें पृथक् पद त्या समासावयवाचे, म्हणजे 'इउवर्ण' याचे, विशेषण होऊ शकत नाही व 'ह्रस्वयुवर्णान्तम्' असे प्रक्रियाकौमुदीकारानी वरील वाक्यात म्हणावयास पाहिजे होते असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे )

शब्दरत्न– नलोपे कृते इति । संयोगान्तलोपस्यासिद्धत्वादिति भाव । नलोपात्प्रागिति । विभक्तिसंयोगान्तलोपस्य नलोपविषयेऽसिद्धत्वाभावज्ञापनद्वारेति शेष । एतेन राजेधते, चम्रघय, राजाच्छत्रमित्यादौ वृद्धियण्तुगादिकं न स्यात्संयोगान्तलोपस्यासिद्धत्वात् । किं च कर्त्र्येत्यादावेकमेव यण्शास्त्रं पूर्वपरविषयभेदाद्भिन्नमिति शब्दपरविप्रतिषेधात्परयणादेश इति "अचः परस्मिन्" इत्यत्र भाष्यकैयटयोः स्पष्टम् । विषयगतपौर्वापर्यस्य लक्षणे आरोप इति तदाशयस्तेन धीमानित्यादौ सुविषयसंयोगान्तलोपशास्त्रस्य तलोपविषये तत्र पूर्वस्मिन्नसिद्धत्वेन तलोपो न स्यादित्यपास्तम् । सार्थपि पदमिति पक्षेतुअदो-

षाच्च । आरोपे मनाभावाच्च । षष्ठीति । अत एव ङौ नलोपनिषेधः सार्थकस्तदाह–ङेरिति । न च "न लुमता" इति निषेधानित्यत्वान्न दोषः । तदपेक्षया षष्ठ्यन्ततया व्याख्यानस्यैव लघुत्वात् । सम्बुध्यन्तेति । संबुद्ध्यन्तप्रातिपदिकान्तनस्य लोपो नेत्यर्थः । इतिसूत्रमस्त्विति । अत एव सुपीरित्यादिसिद्धिः । अन्यथा पदान्ते संयोगादिलोपस्य संयोगान्तलोपापवादत्वात्तत्प्रवृत्तौ "र्वोः" इति दीर्घो न स्यात् । "तिप्यनस्तेः" "सिपि धातो" इति सूत्राभ्यां धातुसम्बन्धिपदान्तसस्य दत्वरुत्वविधायकाभ्यां, कसाहचर्येण च प्रकृतिप्रत्ययसम्बन्धिवर्णसंयोगमाश्रित्य सस्य पदान्ते संयोगादिलोपाप्रवृत्तिकल्पने तु न किंचिल्लाघवम् । किं च "न ङिसंबुध्योः" इति सप्तम्येव युक्ता । ङिग्रहणाच्च "न लुमता" इत्यस्यैतद्विषये ऽनित्यत्वम् । एतन्मूलकमेव "वा नपुंसकानाम्" इति वार्त्तिकम् । एवं च ब्रह्मन्नाद्यर्थं सम्बुद्धिग्रहणस्यावश्यकत्वेन ज्ञापकत्वासम्भवः । अपूर्ववचनकरणेन सिद्धप्रत्याख्यानन्तु न युक्तम् । इदमेवाभिप्रेत्य सूत्रशेषे भाष्ये "तस्मादशक्यो हलपृक्तलोपः संयोगान्तलोपो विज्ञातुम् । न चेद्विज्ञायते द्विहल्पृक्तग्रहणं तिस्योश्च ग्रहणं कर्त्तव्यम्" इत्युक्तम । इति सूत्रमित्युपलक्षणम् । हल्ङ्याब्भ्यः सुतिसि हलिति सूत्रमस्त्वित्याशयात् । अत एवाविभा राज्यमित्यादौ "ढ्लोप" इति दीर्घसिद्धिरिति दिक् । दीर्घाच्चेति । हलन्तादित्यपेक्षश्चकार इति तद्व्याख्यातारः । न तु तदन्तमपीति । तस्याज्झल्समुदायरूपत्वादिति भावः । प्रत्युक्तेति । इउवर्णान्तस्य ह्रस्वत्वासंभवादिउवर्णयोरेकदेशत्वेन तद्विशेषणासम्भवाच्चेति भावः ।

'न चैवं राजेत्यादौ नलोपे कृते' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, नलोपकार्याच्या दृष्टीनें संयोगान्तलोप असिद्ध असल्यामुळें, नलोप प्रथम होतो. 'नलोपात् प्राक् संयोगान्तलोपः' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्यापुढें 'विभक्तिसंयोगान्तलोपस्य नलोपविषयेऽसिद्धत्वाभावज्ञापनद्वारा' हीं पदें अध्याहृत आहेत (व त्यामुळें अध्याहृत पदांसहित त्या समग्र

पवतीचा असा अर्थ होतो की, नलोपाच्या विषयात, म्हणजे नलोप-रूप कार्य कर्तव्य असता, संयोगाच्या अन्ती असणाऱ्या विभक्ति-प्रत्ययाचा '*संयोगान्तस्य लोप.*' या सूत्रानें जो लोप केला जातो तो नलोपकार्याच्या दृष्टीनें असिद्ध ठरत नाही हे 'न ङिसम्बुद्धयोः' या सूत्रातील 'सम्बुद्धि' या पदानें ज्ञापित होत असल्यामुळें, नलोपाच्या दृष्टीनें संयोगान्त लोप सिद्ध ठरतो याचे ते सूत्र ज्ञापक ठरते व भैरवीत सांगितल्याप्रमाणे त्या सामान्यापेक्ष ज्ञापकाच्या द्वारा 'एतेन यत्र लोपस्य प्राप्तिस्तत्र तस्मिन् कर्तव्ये कृते च तस्मिन्नन्य-शास्त्रदृष्ट्याऽप्यसिद्धत्वेति फलितम्' असा सिद्धान्त फलित होतो असे असून देखील, कित्येक वैयाकरण अशी शंका करतात की, ) 'राजैधते, चत्रचत्र, राजाऽच्छत्रम्' इत्यादि उदाहरणात, संयोगान्त-लोप असिद्ध असल्यामुळें, वृद्धिकार्य, यण्कार्य, तुगागमकार्य इत्यादि कार्यें होऊ शकत नाहीत. तसेच 'कर्म्यो' इत्यादि स्थली ( जेथें एकाच उदाहरणात दोन यण् कार्यांची प्राप्ति आहे तशा स्थली 'इको यणचि' सू ४७ हे ) एकच यण्कार्यविधायक शास्त्र, पूर्व पर अशी भिन्न लक्ष्यें असल्यामुळें, भिन्न होते, म्हणजे एकच शास्त्र दोन भिन्न शास्त्रें आहेत असे ठरते त्यामुळें एकाच उदाहरणात त्या उदाहरणा-तील वर्णक्रमानुसार परलक्ष्याचे ठिकाणीं प्राप्त होणारे तें शास्त्र पर शास्त्र ठरत असल्यामुळें ( व 'विप्रतिषेधे परं कार्यम्' सू १७५ हे वचन असल्यामुळें ) 'कर्म्यो' या स्थली पर यणादेश प्रथम होतो असें 'अथ परस्मिन्' सू १-१-५७ या सूत्रावरील भाष्यात व कैय-टाच्या वृत्तीत स्पष्ट सांगितले आहे त्या भाष्याचा आशय हा आहे की, एकाच उदाहरणात पूर्व व पर लक्ष्याची सिद्धि करण्याकरिता प्रवृत्त होणाऱ्या एकाच शास्त्राचे ठिकाणीं लक्ष्यगत पूर्वपरक्रमानुसार पूर्वपरभावाचा आरोप केला जातो, म्हणजे एकाच उदाहरणांतील वर्णक्रमानुसार पूर्व लक्ष्याचे ठिकाणी प्राप्त होणारें एकच शास्त्र पूर्व शास्त्र मानले जात असून पर लक्ष्याचे ठिकाणीं प्राप्त होणारे तेंच शास्त्र पर शास्त्र मानले जातें त्यामुळें 'धीमान्' इत्यादि उदाहर-

णांत 'सु' या प्रत्ययाचा व त्यापूर्वी असलेल्या तकाराचा लोप करण्याकरितां प्रवृत्त झालेल्या 'संयोगान्तस्य लोपः' या एकाच शास्त्राचे ठिकाणीं लक्ष्यगत पूर्वपरक्रमानुसार पूर्वपरभाव मानतां येत असल्यामुळें, तकारलोप करतेवेळीं पूर्वी झालेला 'सु' प्रत्ययाचा लोप ('पूर्वत्रासिद्धम्' सू. १२ या वचनान्वयें) असिद्ध ठरतो व त्यामुळें तकारलोप होऊं शकत नाहीं. ('राजैधते चक्रचत्र ...... तलोपो न स्यात्' हा संपूर्ण शंकाग्रन्थ आहे. यावर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं, 'नलोपे कर्तव्ये कृते च संयोगान्तलोपः सिद्धः स्यात्' असा वर सिद्धान्त सांगितला असल्यामुळें, आणि तसेंच 'नलोपः सुप्स्वरसंज्ञातुग्विधिषु कृति' सू. ३५३ या सूत्रान्वयें त्या सूत्रांत सांगितलेलीं कार्यें करतवेळींच नलोप असिद्ध ठरत असून इतर कार्यें करतेवेळीं तो सिद्ध ठरत असल्यामुळें) मनोरमेंतील विवेचनान्वयें शंकाकाराची शंका चूक ठरते. दुसरें असें कीं, 'सु' प्रत्यय पुढें असतांना अङ्गाला पदसंज्ञा होते हा पक्ष मानल्यास, 'धीमान्' या शेवटच्या उदाहरणांत कांहींच दोष येत नाहीं. आणखी असें कीं, लक्ष्यगत पूर्वपरक्रमानुसार एकाच सूत्राचे ठिकाणीं पूर्वपरभावाचा आरोप करण्यास कोणतेंहि प्रमाण उपलब्ध नाहीं. ('न लोपः प्रातिपदिकान्तस्य' या पूर्व त्रैपादिक सूत्रानें नकारलोप करतेवेळीं 'संयोगान्तस्य लोपः' या उत्तर त्रैपादिक सूत्रानें केलेला संयोगान्त 'सु = स्' या विभक्तिप्रत्ययाचा लोप सिद्ध समजावा एवढेंच जर मानलें तर, 'राजन् सु एधते = राजान् स् एधते' या स्थलीं जरी 'राजान्' यांतील अन्त्य नकाराचा लोप करतेवेळीं 'संयोगान्तस्य लोपः' या उत्तर त्रैपादिक सूत्रानें प्रथम केलेला 'सु' या विभक्तिप्रत्ययाचा लोप सिद्ध मानतां येतो व त्यामुळें 'राजान्' यांतील अन्त्य नकाराचा लोप करतां येतो आणि 'राजा' असें इष्ट रूप सिद्ध होऊं शकतें तरी, 'राजा' व 'एधते' या दोन पदांनें 'वृद्धिरेचि' सू. ७२ या सूत्रानें वृद्धिरूप सन्धिकार्य करतेवेळीं जर पूर्वी झालेला 'सु' प्रत्ययाचा लोप सिद्ध मानला

नाही व 'सु' प्रत्यय कायमच आहे असे मानले तर, वरील दोन पदात 'सु' प्रत्ययाचे व्यवधान आहे असे मानावे लागेल व त्यामुळें वृद्धिरूप एकादेश होऊ शकणार नाही आणि 'राजैधते' असा इष्ट प्रयोग सिद्ध न होण्याची आपत्ति येईल. 'नलोपः सुप्स्वर' सू ३५३ हे नियामक सूत्र असल्यामुळें, 'वृद्धिरेचि' या सापादिक सूत्राच्या दृष्टीनें नकारलोप सिद्ध ठरतो. परतु 'सु' लोपासवधानें तसे कोणतेहि सूत्र नसल्यामुळें, 'वृद्धिरेचि' या सापादिक सूत्राच्या दृष्टीनें 'सयोगान्तस्य लोपः' या त्रैपादिक सूत्रानें होणारा 'सु' लोप कसा सिद्ध ठरावा ? म्हणून 'नलोपे कर्तव्ये सयोगान्तलोपः सिद्धः' एवढेंच न मानता, त्याखेरीज हे देखील मानणें आवश्यक आहे की, 'नलोपे कृते च यद् यद् अन्यत् शास्त्र प्राप्नोति तस्यापि दृष्ट्या सयोगान्तलोपः सिद्धः.' व वरील ज्ञापकाच्या द्वारा असे मानता येत असल्यामुळें, 'राजा एधते' या स्थली 'सयोगान्तस्य लोप.' या सूत्रानें झालेला 'सु' लोप सिद्ध ठरून वृद्धिरूप एकादेश होण्यात व 'राजैधते' असे इष्ट रूप सिद्ध होण्यात काही अडचण येत नाही. तसेच 'चक्रिन् सु अत्र' या स्थली 'सौ च' सू. ३५७ या सूत्रानें उपधा दीर्घ होऊन व नतर 'सयोगान्तस्य लोप' या सूत्राने 'सु' प्रत्ययाचा लोप होऊन आणि त्यानतर, नकारलोप करतेवेळी सयोगान्त लोप सिद्ध ठरत असल्यामुळें, 'न लोप प्रातिपदिकान्तस्य' या सूत्रानें नकार-लोप होऊन 'चक्री अत्र' अशी स्थिति झाली असता, 'इको यणचि' या सापादिक सूत्राची उपस्थिति होते व त्या शास्त्राच्या दृष्टीनें जरी नलोप सिद्ध ठरतो तरी, पूर्वी झालेला 'सु' लोप यण्कार्य करते वेळी सिद्ध न मानल्यास व 'सु' प्रत्यय विद्यमानच आहे असे मानल्यास, 'इको यणचि' या सूत्रानें यणादेश होऊं शकणार नाहीं पण नलोप केल्यावर यणादेशाची प्राप्ति झाली असता, त्या सापादिक कार्याच्या दृष्टीनें देखील पूर्वी झालेला 'सु' लोप सिद्ध ठरतो असे मानले तरच व असे मानता येत असल्यामुळें, यणादेश होण्यात काही अडचण येत नाही. त्याचप्रमाणे 'राजा

छत्रं गृह्णाति' यास्थलीं 'राजन् सु' अशा स्थितींत पूर्वी सांगितल्याप्रमाणें उपधा दीर्घ करून व नंतर 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानें 'सु' लोप करून आणि नंतर नलोप करून 'राजा' असें प्रथमेच्या एकवचनाचें रूप सिद्ध झाल्यावर 'पदान्ताद्वा' सू. १४९ या सूत्रानें 'राजा' यांतील अन्त्य आकाराला तुगागमाची प्राप्ति झाली असतां, त्या सापादिक सूत्राच्या दृष्टीनें पूर्वी झालेला 'सु' लोप असिद्ध मानला तर, 'राजा' या दीर्घ आकारान्त पदापुढें 'छत्रम्' यांतील छकार नसून दोहोंमध्यें 'सु' प्रत्ययाचें व्यवधान आहे असें मानावें लागेल व त्यामुळें 'राजा' यांतील अन्त्य आकाराला वैकल्पिक तुगागम होऊं शकणार नाहीं व 'राजाच्छत्रं गृह्णाति' असा पाक्षिक इष्ट प्रयोग सिद्ध होऊं शकणार नाहीं. परंतु नलोप केल्यावर 'पदान्ताद्वा' हें सापादिक सूत्र प्रवृत्त करतेवेळीं त्या सूत्राच्या दृष्टीनें देखील पूर्वी झालेला 'सु' लोप सिद्ध ठरतो असें मानलें तरच व असें मानतां येत असल्यामुळें, तुगागम होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. सारांश 'न ङिसम्बुद्धयोः' या सूत्रांतील 'सम्बुद्धि' या पदाचें ग्रहण नलोपाच्या दृष्टीनें संयोगान्त 'सु' लोप सिद्ध ठरतो एवढ्याचेंच ज्ञापक न मानतां, 'सु' लोप व नलोप केल्यावर जीं जीं इतर सापादिक किंवा पूर्वत्रैपादिक शास्त्रांनीं होणारीं कार्यें प्राप्त होतात त्या सर्व शास्त्रांच्या दृष्टीनें 'सु' लोप सिद्ध ठरतो याचें तें ज्ञापक मानलें पाहिजे व तसें मानलें असतां, शंकाकाराची शंका व्यर्थ ठरून वरील तीन्ही प्रयोग सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे. आतां 'कर्तृ' या शब्दाहून 'ऋन्नेभ्यो ङीप्' सू. ३०६ या सूत्रानें 'ङीप्'प्रत्यय करून व नंतर त्याहून तृतीयेच्या एकवचनाचा 'टा = आ' प्रत्यय करून 'कर्तृ ङीप् टा = कर्तृ ई आ' अशी स्थिति झाली असतां, 'इको यणचि' या सूत्रानें दोन यणादेशकार्यांची प्राप्ति होते. 'अचः परस्मिन्' सू. १-१-५७ या सूत्रावरील भाष्यांत 'आरम्यमाणे नित्योऽसौ परश्चान्तो व्यवस्थया' हें वचन पठित करून

भाष्यकार म्हणतात—'आरभ्यमाणे त्वस्मिन् योगे नित्यः पूर्वयणादेश.। कृतेऽपि परयणादेशे प्राप्नोति अकृतेऽपि । परयणादेशोऽपि नित्यः। कृतेऽपि पूर्वयणादेशे प्राप्नोति अकृतेऽपि । व्यवस्थया चासौ परः।' या भाष्याचा साराश हा आहे की, जरी दोन्ही यणादेशकार्ये नित्य आहेत तरी द्वितीय यणादेश वर्णक्रमानुसार पर असल्यामुळें, 'विप्रतिषेधे परं कार्यम्' सू. १७५ या वचनान्वयें परयणादेशाची प्रथम प्राप्ति होते. या भाष्यावर टीका करिताना कैयटानें 'एकमपि यण्लक्षणं पूर्वपरविषयभेदाद्भिद्यते । एकस्य च कार्यित्वनिमित्तत्वयोर्विरोधात् परत्वेन व्यवस्था ।' असे म्हटले असून, उद्योतकारानी 'विषयगत पौर्वापर्य तदवच्छिन्ने लक्षणे आरोप्यते इत्यत्र तात्पर्यम्' असे म्हटले आहे. यावरून हे सिद्ध होते की, जेथें एकाच शब्दस्वरूपात एकाच सूत्रानें दोन कार्यांची युगपत् प्राप्ति होते तशा ठिकाणी देखील लक्ष्यगत पूर्वपरवर्णक्रमानुसार त्या एकाच सूत्राचे ठिकाणी पूर्वपरभाव मानता येतो, म्हणजे पूर्व लक्ष्याचे ठिकाणी प्रवृत्त होणारे एकच सूत्र पूर्व सूत्र मानता येत असून पर लक्ष्याचे ठिकाणी प्रवृत्त होणारे तेंच सूत्र पर सूत्र मानता येते. असे मानले असता, 'विप्रतिषेधे परं कार्यम्' या वचनान्वयें ते सूत्र पर लक्ष्याचे ठिकाणी प्रथम प्रवृत्त झाले पाहिजे. हीच व्यवस्था 'पूर्वत्रासिद्धम्' सू. १२ या वचनाला देखील लागू केल्यास, 'धीमत् सु' या स्थली 'अत्वसन्तस्य चाधातोः' सू. ४२५ या सूत्रानें उपधा दीर्घ करून व 'उगिदचाम्' सू. ३६१ या सूत्रानें नुमागम करून 'धीमान्त् स्' अशी स्थिति झाली असता, 'सयोगान्तस्य लोपः' या त्रैपादिक सूत्रानें सकाराचा व त्याचप्रमाणे तकाराचा वरील उदाहरणांत लोप पावतो. पर सकाराचा लोप करतेवेळी 'सयोगान्तस्य लोपः' हें परसूत्र ठरतें व पूर्व तकाराचा लोप करतेवेळी तेच सूत्र पूर्व सूत्र ठरते व 'पूर्वत्रासिद्धम्' या वचनान्वयें त्रिपादीतील पूर्व सूत्राच्या दृष्टीनें पर सूत्र असिद्ध ठरत असल्यामुळें, पूर्व सूत्रानें होणारा तकारलोप करतेवेळी पर सूत्रानें झालेला सकारलोप असिद्ध ठरतो व त्यामुळें सयोगाच्या

अन्तीं तकार आहे असें मानतां येऊं शकत नाहीं आणि त्यामुळें तकारलोप न होण्याची, व सुलोप व तलोप हे दोन्ही सिद्ध मानल्यास, नलोप होण्याची व 'धीमान्' असें इष्ट रूप सिद्ध न होण्याची आपत्ति येते अशी शंकाकाराची शंका आहे. या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं, संयोगान्त सुलोप व तलोप केल्यावर नलोप करतेवेळीं 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानें होणारा संयोगान्त-विभक्तिप्रत्ययाचा लोप सिद्ध ठरतो, पण संयोगान्त इतर वर्णाचा लोप सिद्ध ठरत नाहीं. त्यामुळें 'धीमान्त् स्' या स्थलीं नकारलोप करतेवेळीं जरी 'सु' लोप सिद्ध ठरतो तरी, तकार हा विभक्ति-प्रत्यय नसल्यामुळें, नकारलोप करतेवेळीं त्या तकाराचा लोप असिद्ध ठरतोच व त्यामुळें नकार पदान्तीं आहे असें मानतां येऊं शकत नाहीं आणि म्हणून नकारलोप न होतां 'धीमान्' असें इष्ट रूप सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. दुसरें असें कीं, 'धीमान्त स्' या स्थलीं 'सु' प्रत्यय पुढें असल्यामुळें 'सावपि पदं भवति' हा पक्ष मानल्यास, 'धीमान्त्' याला पदसंज्ञा होते व 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानें अन्त्य तकाराचा व नंतर त्याच सूत्रानें सकाराचा लोप होतो. पण वर सांगितल्याप्रमाणें नकारलोप करतेवेळीं तकारलोप असिद्ध ठरत असल्यामुळें, नकारलोप न होतां 'धीमान्' असें इष्ट रूप सिद्ध होतें. तिसरें असें कीं, लक्ष्यगत पूर्वपरवर्णक्रमानुसार एकाच सूत्राचे ठिकाणीं पूर्वपरभाव कल्पिला येतो असें जें शंकाकाराचें म्हणणें आहे तें बरोबर मानण्यास कांहीं प्रमाण नाहीं. ज्या भाष्याचा शंकाकारानें आपल्या शंकेचें समर्थन करण्याकरितां आधार दिला आहे तें सिद्धान्तभाष्य नसून पूर्वपक्षीची केवळ शंकोक्ति असल्यामुळें, तें भाष्य प्रमाण मानतां येत नाहीं. वास्तविक सिद्धान्त हाच आहे कीं, अष्टाध्यायीपाठक्रमानुसारच सूत्रानें पूर्वपरत्व ठरविलें जातें आणि उद्योतकारांनी देखील वरील भाष्यावरील उद्योतांत 'एवं च शब्दतः परत्वमादाय विप्रतिषेधसूत्रस्य नैव प्रवृत्तिरिति तात्पर्यम्' असें म्हटलें आहे. त्यामुळें शंकाकारानें

'धीमान्' या रूपासबंधानें जी शंका केली आहे ती व्यर्थ ठरते व 'कर्तृ ई आ' या उदाहरणात पूर्व यणादेशाचे निमित्त प्रथमोपस्थित असून पर यणादेशाचे निमित्त पुढें उपस्थित असल्यामुळें व 'पूर्वोपस्थितनिमित्तकमन्तरङ्गं परोपस्थितनिमित्तकं बहिरङ्गम्' असा न्याय असल्यामुळें, पूर्व यणादेशाच्या मानानें पर यणादेश बहिरङ्ग ठरतो आणि 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे'–परि. ५०–या परिभाषान्वयें पर यणादेश असिद्ध ठरून तो प्रथम न होता, पूर्व यणादेश प्रथम होत असून नंतर पर यणादेश होत असल्यामुळें, 'कर्तृ ई आ = कर्त्री आ = कर्त्र्या' असे इष्ट रूप सिद्ध होते. असे इष्ट रूप सिद्ध होण्याचे 'बहिरङ्गेण सिध्यति' हेंच कारण वरील भाष्यात दिले आहे.) 'न ङिसम्बुद्धयोः' सू. ३५२ या सूत्रातील 'ङिसम्बुद्धयोः' हें पद षष्ठ्यन्त मानल्यानेंच, 'ङि' प्रत्यय पुढें असताना जो नलोप होण्याचा निषेध सांगितला आहे तो सार्थक ठरतो. ('ङिसम्बुद्धयोः' हे पद सप्तम्यन्त मानले तर 'ङि' ही निमित्तसप्तमी ठरून सूत्रार्थ असा होतो की, 'ङि' प्रत्यय पुढें असताना नकारान्त अङ्गाच्या अन्त्य नकाराचा लोप होत नाही. पण 'ङि' प्रत्यय पुढें आला असता अङ्गाला पदसंज्ञा न होता 'यचि भम्' या सूत्रानें भसंज्ञा होत असल्यामुळें व 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' या सूत्रानें पदान्ती असलेल्या नकाराचा लोप होणे सांगितले असल्यामुळें, 'परमे व्योमन्' इत्यादि वैदिक उदाहरणात 'व्योमन्' या भसंज्ञक अङ्गाच्या अन्त्य नकाराचा लोप पावतच नाही आणि 'प्राप्तस्यैव निषेध.' असा न्याय असल्यामुळें, 'न ङिसम्बुद्धयोः' या सूत्रानें 'ङि' प्रत्यय पुढें असताना नलोपाचा निषेध सांगितला आहे असे मानल्यास, म्हणजेच 'ङिसम्बुद्धयो.' हे सप्तम्यन्त पद मानल्यास, तो निषेध व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते त्या सूत्रावरील भाष्यात–८–२–८–भाष्यकार म्हणतात 'ङौ प्रतिषेधोऽनर्थकः। किं कारणम्? भत्वात्। भसंज्ञाऽत्र भवति।' परंतु 'ङिसम्बुद्धयोः' हें षष्ठ्यन्त पद मानले तर, 'ङि' या प्रत्ययाचा प्रत्ययग्रहण परिभाषान्वयें 'ङ्य-

न्तस्य ' असा अर्थ होऊन सूत्रार्थ असा होतो कीं, नकारान्त ङ्यन्त पदाच्या अन्त्य नकाराचा लोप होत नाहीं. 'व्योमन्' हें प्रत्यय-लक्षणानें ङ्यन्त पद ठरत असल्यामुळें, त्यांतील अन्त्य नकाराचा 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' या सूत्रानें जो लोप पावतो तो न व्हावा याकरितां 'न ङिसम्बुद्धयोः' या सूत्रांत केलेलें ङि या षष्ठ्यन्ताचें ग्रहण चरितार्थ .ठरतें. ) 'न लुमताङ्गस्य' सू. २६३ हा निषेध अनित्य असल्यामुळें कांहीं दोष येत नाहीं असें कोणी म्हटल्यास त्याला उत्तर हें आहे कीं, तो निषेध अनित्य मानण्यापेक्षां 'न ङिसम्बुद्धयोः' या सूत्रांतील 'ङिसम्बुद्धयोः' हें पद षष्ठ्यन्त मानून त्या सूत्राचें व्याख्यान करण्यांतच लाघव आहे. ( शंकाकार असें म्हणतों कीं, 'न ङिसम्बुद्धयोः' या सूत्रांतील 'ङिसम्बुद्धयोः' हें पद सप्तम्यन्त मानलें तरी, 'न लुमताङ्गस्य' हा निषेध अनित्य असल्यामुळें, 'व्योमन्' या स्थलीं 'सुपां सुलुक्' सू. ३५६१ या सूत्रानें 'ङि' प्रत्ययाचा जरी लुक् होतो तरी, 'ङि' प्रत्यय विद्यमान आहे असें प्रत्ययलक्षणानें मानतां येतें व त्यामुळें 'न ङिसम्बुद्धयोः' हें नलोपाचें निषेधक सूत्र प्रवृत्त होऊं शकतें व 'व्योमन्' यांतील अन्त्य नकाराचा लोप होण्याची आपत्ति येत नाहीं. या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं, 'ङिसम्बुद्धयोः' हें जसें सप्तमीच्या द्विवचनाचें रूप आहे तसेंच तें षष्ठीच्या द्विवचनाचें देखील रूप असल्यामुळें, तें षष्ठीच्या द्विवच-नाचें रूप मानल्यानें जर सर्व इष्ट रूपांची सिद्धि होऊं शकते तर, 'न लुमताङ्गस्य' हें मुद्दाम रचलेलें पाणिनीय सूत्र अनित्य मानून तें पद सप्तम्यन्त मानण्याची गरज काय ? तसें मानण्यांत गौरव असून 'न लुमताङ्गस्य' हा निषेध नित्य मानून 'ङिसम्बुद्धयोः' हें पद षष्ठ्यन्त मानण्यांतच लाघव आहे आणि म्हणून प्रकाशकारांनीं तें जें पद षष्ठ्यन्त मानलें आहे तें त्यांचें करणें योग्य आहे अशा रीतीनें त्यांच्या मताचें समर्थन करतां येतें. 'न ङिसम्बुद्धयोः' या सूत्रांतील 'ङिसम्बुद्धयोः' हें पद षष्ठ्यन्त मानल्यानें व 'न लोपः

प्रातिपदिकान्तस्य' या पूर्वं सूत्रातून त्या सूत्रात 'प्रातिपदिकान्तस्य' हें पद अनुवृत्त करून त्या अनुवृत्त पदाचे 'सम्बुद्धेः = सम्बुद्धयन्तस्य' हें पद विशेषण मानल्याने ) त्या सूत्राचा 'सम्बुद्धयन्तप्रातिपदिकान्तनस्य लोपो न' असा अर्थ होतो (व नान्त सम्बुद्धयन्त प्रातिपदिकान्त पदाच्या अन्त्य नकाराचा लोप होत नाही असा वर सांगितल्याप्रमाणे त्या सूत्राचा अर्थ होत असल्यामुळें, सबुद्धयन्त नकारान्त पदाला प्रातिपदिकसंज्ञा देखील होण्याकरिता 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानें सबुद्धीच्या 'सु' प्रत्ययाचा लोप प्रथम करणे आवश्यक ठरते असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे असे शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचे तात्पर्य आहे.) 'तर्हि हल्ङ्याप. सोरित्येव सूत्रमस्तु' असें मनोरमेंत म्हटले असल्यामुळेंच, 'सुपी.' इत्यादि रूपाची सिद्धि होते तसें सूत्र पठित न केल्यास, (व 'ङ्याप सो' एवढेंच सूत्र पठित केल्यास) पदान्त संयोगान्त लोपाचा संयोगादिलोप अपवाद असल्यामुळें, संयोगादिलोपाचें सूत्र प्रवृत्त होऊन 'र्वोरुपधाया दीर्घ इक' सू ४३० या सूत्रानें होणारे उपधादीर्घकार्य होऊ शकणार नाही. ('सुष्ठु पेसतीति सुपी = सु पिस् विप् सु' या स्थली 'वेरपृक्तस्य' सू ३७५ या सूत्रानें 'विप्=व्' या अपृक्त प्रत्ययाचा लोप होऊन 'सु पिस् स्' अशी स्थिति झाली असता, येथें पदान्ती संयोग असल्यामुळें व संयोगांतील आद्य वर्ण सकार असल्यामुळें, 'स्को संयोगाद्योः' सू. ३८० व तसेच 'संयोगान्तस्य लोप' सू ५४ या दोन्ही त्रैपादिक सूत्राची प्राप्ति होते या दोन सूत्रांपैकी 'संयोगान्तस्य लोप' हे जरी पूर्व त्रैपादिक सूत्र आहे तरी, 'स्को संयोगाद्यो' हे सूत्र जेथें जेथें प्रवृत्त होऊं पाहते तेथें तेथें 'संयोगान्तस्य लोप' या सूत्राची अवश्य प्राप्ति होत असल्यामुळें, 'स्को संयोगाद्यो' हें सूत्र अनवकाश ठरून 'येन नाप्राप्ते'—परि. ५८—या न्यायान्वयें तें सूत्र 'संयोगान्तस्य लोप' या सूत्राचे अपवादक सूत्र ठरते आणि म्हणूनच 'स्वरितो वाऽनुदात्ते पदादौ' सू. ८–२–६ या सूत्रावरील भाष्यांत "संयोगादि-

लोपः संयोगान्तलोपे' हें वार्तिक पठित करून त्या वार्तिकाचें प्रत्याख्यान करितांना भाष्यकार म्हणतात–'संयोगादिलोपः संयोगान्तस्य लोपे सिद्धो वक्तव्यः। काष्ठतट् कूटतट्। संयोगादिलोपस्यासिद्धत्वात्संयोगान्तलोपः प्राप्नोति। नैष दोषः। उक्तमेतत्, अपवादो वचनप्रामाण्यादिति।', आणि 'परनित्यान्तरङ्गापवादानामुत्तरोत्तरं बलीयः'–परि. ३८–या परिभाषान्वयें अपवाद सर्वापेक्षां बलवत्तर ठरत असल्यामुळें, 'स्कोः संयोगाद्योः' हें अपवादक सूत्र प्रथम प्रवृत्त झाल्यानें, 'पिस्' धातूंतील सकाराचा लोप होण्याची आपत्ति येते; तो लोप केल्यानें 'सु पि सु' अशी स्थिति झाली असतां, 'पिस्' धातु रकारान्त होऊं शकत नसल्यामुळें, 'र्वोरुपधायाः' सू. ४३० या सूत्रानें होणारें उपधादीर्घकार्य न होण्याची व 'सुपिः' असें अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येते. पण 'ङ्यापः सोः' असें प्रकृत सूत्र न मानतां 'हल्ङ्यापः सोः' असें प्रकृत सूत्र मानल्यानें, 'सुपिस् सु' या स्थलीं 'सुपिस्' या हलन्त अङ्गापुढें असणाऱ्या 'सु' प्रत्ययाचा त्या सापादिक सूत्रानेंच लोप होऊन 'सुपिस्' अशी स्थिति झाली असतां, 'सुपिस्' या पदांतील धातूच्या अन्त्य सकाराचें 'ससजुषो रुः' सू. १६२ या सूत्रानें रुत्व होऊन 'सुपिर्' अशी स्थिति झाल्यानें धातु रेफान्त होत असल्यामुळें, 'र्वोरुपधायाः' या सूत्रानें उपधा दीर्घ होऊन 'सुपीः' असें इष्ट रूप सिद्ध होऊं शकतें. म्हणून 'सुपीः' इत्यादि इष्ट रूपांची सिद्धि होण्याकरितां 'ङ्यापः सोः' असें प्रकृत सूत्र पठित न करितां हल्ङ्यापः सोः' असें तें सूत्र पठित करणें आवश्यक आहे असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे.) धातूचा अवयव सकार पदान्तीं असल्यास त्या सकाराचा, अपृक्त 'तिप् = त्' प्रत्यय पुढें आला असतां, दकार होतो व अपृक्त 'सिप् – स्' प्रत्यय पुढें आला असतां, त्या सकाराचा विकल्पेंकरून दकार किंवा 'रु' होतो असें विधान करणाऱ्या 'तिप्यनस्तेः' सू. २४८४ व 'सिपि धातो रुर्वा' सू. २४८५ या सूत्रांवरून आणि तसेंच 'स्कोः संयोगाद्योः' या सूत्रांतील 'स्कोः' या पदांत सकाराला

ककाराचे साहचर्य असल्यामुळें त्याच्या सामर्थ्यावरून हे सिद्ध होते की, प्रकृतीचा अन्त्य वर्ण ककार किंवा सकार असून त्यापुढें अपृक्त हल्‌रूप प्रत्यय आला असता त्या दोहोंच्या बनलेल्या पदान्ती असणाऱ्या संयोगाला 'स्कोः संयोगाद्योः' हे सूत्र लागू पडत नाहीं अशा प्रकारची विस्पष्ट कल्पना करण्यात मुळीच लाघव नाहीं (प्रकृत सूत्रातून प्रथम 'हल्' या पदाचे प्रत्याख्यान केल्यास 'सुपी' हे इष्ट रूप सिद्ध होऊ शकत नाही असे जें शब्दरत्नकारानी वर म्हटले आहे त्यावर शकाकार असें म्हणतो की, प्रकृत सूत्रातून प्रथम 'हल्' पद गाळले व प्रकृत सूत्राऐवजी 'ङ्याप् सो' एवढेंच सूत्र पठित केले तरी, 'सुपी' हे रूप सिद्ध करता येऊ शकते 'स्कोः संयोगाद्यो' हें सूत्र प्रथम प्रवृत्त होत असल्यामुळें 'सुपी' हें रूप सिद्ध होऊ शकत नाही असे जें शब्दरत्नकारानी म्हटले आहे तें म्हणणे बरोबर नाही असे शकाकाराचे म्हणणे आहे त्याच्या म्हणण्याप्रमाणे 'सुपी' या उदाहरणात 'स्कोः संयोगाद्यो' या सूत्राची प्रवृत्तीच होऊ शकत नाही त्याच्या मते ते सूत्र अशाच ठिकाणी प्रवृत्त होते की, जेथें पदान्ती असणारा संयोग प्रकृतीतील अन्त्य वर्ण व त्यापुढील प्रत्यय याचा संयोग नसून केवळ प्रकृतीच्या वर्णांचाच पदान्ती असणारा संयोग आहे असे म्हणण्याचे कारण तो हे सांगतो की, सकारान्त धातूपुढें 'तिप, सिप्, सु' हे तीनच अपृक्त हल्‌रूप प्रत्यय येऊ शकतात 'तिप्, सिप्=त्, स्' हे अपृक्त प्रत्यय सकारान्त धातूपुढें आले असता, जर 'स्को संयोगाद्यो' या सूत्रानें धातूच्या अन्त्य सकाराचा, तो संयोगाचा आदि वर्ण असल्यामुळें, लोप केला तर धातु सकारान्त राहत नसल्यामुळें 'तिप्यनस्ते' व 'सिपि धातो' हीं सूत्रें प्रवृत्त होण्यास कोणतेंहि उदाहरण मिळणार नाही व अशा रीतीनें ती सूत्रें निरवकाश व व्यर्थ ठरण्याची आपत्ति येईल तो आपत्ति टाळण्याकरिता हे मानणे आवश्यक आहे की, सकारान्त धातूपुढें 'त्' किंवा 'स्' हा अपृक्त हल्‌रूप प्रत्यय आला असता, संयोगादिलोप न होता संयोगान्तलोपच होतो आता

राहिला 'सु = स्' हा प्रथमेच्या एकवचनाचा प्रत्यय. 'शक्' धातूहून 'शक्नोतीति शक्' या अर्थामध्यें कर्तरि क्विप् प्रत्यय करून त्याहून 'सु' प्रत्यय केल्यास 'शक् क्विप् सु' अशा स्थितींत क्विप् प्रत्ययाचा लोप होऊन ककारान्त क्विबन्त धात्वन्त 'शक्' या अङ्गापुढें 'सु = स्' प्रत्यय आला असून देखील ज्याप्रमाणें 'स्कोः संयोगाद्योः' या सूत्रानें धातूंतील संयोगादि ककाराचा लोप होत नाहीं व 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानें 'सु = स्' या प्रत्ययाचा लोप होतो व त्यामुळेंच 'शक्' असें प्रथमेच्या एकवचनाचें रूप सिद्ध होतें त्याचप्रमाणें 'स्कोः' यांतील ककारसाहचर्याच्या सामर्थ्यामुळें हें देखील म्हणतां येतें कीं, 'पिस्' इत्यादि सकारान्त क्विबन्त धात्वन्त अङ्गापुढें 'सु' प्रत्यय आल्यास 'स्कोः संयोगाद्योः' या सूत्रानें धातूंतील संयोगादि सकाराचा लोप न होतां 'संयोगान्तस्य लोपः' या सूत्रानें संयोगान्त सकाराचा, म्हणजे 'सु' प्रत्ययाचा, प्रथम लोप होतो. असें मानल्यानें, 'सुपिस् सु = सुपिस् = सुपिर् = सुपीर् = सुपीः' असें इष्ट रूप सिद्ध होण्यांत कोणतीहि अडचण येत नाहीं असा शंकाकाराच्या म्हणण्याचा तात्पर्यार्थ आहे. या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं, शंकाकारानें आपल्या मताचें समर्थन करण्याकरितां ज्या अनेक क्लिष्ट कल्पना केल्या आहेत तशा कल्पना करण्यांत कांहींच लाघव नसून प्रकृत सूत्रांतील प्रथम 'हल्' पद न गाळतां 'हल्ङ्याप: सोः' असें तें सूत्र पठित करण्यांतच लाघव आहे. तसें प्रकृत सूत्र पठित केल्यानें हलन्त अङ्गापुढील 'सु' प्रत्ययाचा प्रकृत सापादिक सूत्रानेंच लोप होऊन 'स्कोः संयोगाद्योः' किंवा 'संयोगान्तस्य लोपः' हीं त्रैपादिक सूत्रें, 'सुपीः' इत्यादि रूपें सिद्ध करतेवेळीं, प्रवृत्त करण्याचा प्रसङ्गच येत नाहीं.) वास्तविक पाहिलें असतां, 'न ङिसम्बुद्ध्योः' सू. ३५२ या सूत्रांतील 'ङिसम्बुद्ध्योः' हें पद सप्तम्यन्तच मानणें योग्य आहे व त्या सूत्रांत 'ङि' या प्रत्ययाचें ग्रहण केलें असल्यामुळें, त्या सूत्राच्या विषयांत 'न लुमताङ्गस्य' हा निषेध अनित्य मानणें भाग आहे. हा निषेध अनित्य

मानूनच 'वा नपुंसकानाम्' हें वार्तिक पठित केले आहे म्हणून 'हे ब्रह्मन्' इत्यादि नपुंसकलिङ्गाची सम्बुद्धीची रूपें सिद्ध करण्याकरिता 'न ङिसम्बुद्धयो' या सूत्रात 'सम्बुद्धि' या पदाचे ग्रहण आवश्यक असल्यामुळें, (नलोप कार्याच्या दृष्टीनें 'संयोगान्तस्य लोप' या सूत्रानें पूर्वी केलेला 'सु' प्रत्ययाचा लोप सिद्ध ठरतो याचे) ते पद ज्ञापक मानता येत नाही 'वा नपुंसकानाम्' हे अपूर्व वचन–वार्तिक–मानून प्रकृत सूत्रातील 'हल्' इत्यादि पदाचे प्रत्याख्यान करणे योग्य नाही, (कारण तसे केल्यास, नलोप, उपधादीर्घ इत्यादि कार्ये वर सांगितल्याप्रमाणे सिद्ध होऊ शकत नाहीत आणि) हा आशय मनात धरूनच प्रकृत सूत्रावरील भाष्याच्या अखेरीस भाष्यकार म्हणतात 'तस्माद्दशयो हल्पृक्तलोप संयोगान्तलोपो विज्ञातुम् । न चेद्विज्ञायते द्विहल्पृक्तग्रहण तिस्योश्च ग्रहण कर्तव्यम्', म्हणजे वर सांगितलेल्या कारणामुळें प्रकृत सूत्रानें होणारा अपृक्त हल्रूप प्रत्ययाचा लोप 'संयोगान्तस्य लोप' या सूत्रानें करता येणे अशक्य असल्यामुळें व त्या सूत्रानें संयोगान्त लोप केल्यानें इष्ट सिद्धि होत नसल्यामुळें, प्रकृत सूत्रात दोन्ही 'हल्' पदाचे, तसेच 'अपृक्तम्' या पदाचे आणि त्याचप्रमाणे 'ति, सि' या पदाचे ग्रहण असणे आवश्यक आहे ('न ङिसम्बुद्धयो' या सूत्रातील 'ङिसम्बुद्धयो' हें पद षष्ठयन्त मानल्यानें व 'वा नपुंसकानाम्' हें वार्तिक मानल्यानें इष्ट रूपें सिद्ध होऊ शकतात तरी, तसे केल्यानें प्रकृत सूत्रातील अनेक पदाचे प्रत्याख्यान करावे लागत व त्याबरोबर वरील वार्तिक देखील मानावे लागत तसे करण्यापेक्षा 'ङिसम्बुद्धयो' हें पद सप्तम्यन्त मानणे व 'न लुमताङ्गस्य' हा निषेध अनित्य मानणे अधिक योग्य व श्रेयस्कर आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे 'ङिसम्बुद्धयो' हें पद सप्तम्यन्त मानल्यानें जरी 'न लुमताङ्गस्य' हा निषेध अनित्य मानावा लागतो तरी तो निषेध अनित्य मानल्याशिवाय अनेक इष्ट रूपांची सिद्धि होऊ शकत

नसल्यामुळें व भाष्यकारांनीं देखील ठिकठिकाणीं तो निषेध अनित्य मानून इष्ट रूपांची सिद्धि केली असल्यामुळें, तसें करण्यांत कांहीं दोष येत नाहीं. तो निषेध अनित्य आहे याचें केवळ अनुवाद करणारेंच 'वा नपुंसकानाम्' हें वार्तिक आहे; कारण 'हे ब्रह्मन् सु' या स्थलीं 'स्वमोर्नपुंसकात्' सू. ३१९ या सूत्रानें संबुद्धीच्या 'सु' प्रत्ययाचा लुक् झाला असतां, तो प्रत्यय प्रत्ययलक्षणानें विद्यमान आहे असें मानल्यानें 'ब्रह्मन्' यांतील नकाराचा लोप होऊं शकत नाहीं व 'न लुमताङ्गस्य' हा निषेध प्रवृत्त करून 'सु' प्रत्यय विद्यमान नाहीं असें मानल्यानें 'ब्रह्मन्' यांतील नकाराचा लोप होऊं शकतो व अशा रीतीनें 'न लुमताङ्गस्य' हा निषेध अनित्य मानल्यानेंच 'हे ब्रह्मन्, हे ब्रह्म' हीं नपुंसकाचीं पाक्षिक रूपें सहज सिद्ध होऊं शकतात. म्हणून वरील वार्तिक मानण्याची कांहीं गरज नाहीं व तें वार्तिक अपूर्वविधायक वचन मानून प्रकृत पाणिनीय सूत्रांतील अनेक पदांचें प्रत्याख्यान करण्यापेक्षां, भाष्यकारांनीं प्रकृत सूत्रावरील भाष्यांत अखेरीस म्हटल्याप्रमाणें, प्रकृत सूत्रांतील कोणतेंहि पद न गाळतां प्रकृत सूत्र जसेंचें तसेंच कायम ठेवणें हेंच अधिक योग्य व इष्ट आहे. या विषयाची विस्तृत चर्चा पूर्वीं केलीच आहे.) 'हल्ङ्याप: सोः इत्येव सूत्रमस्तु' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे तें उपलक्षण असून त्या म्हणण्याचा आशय हा आहे कीं, 'हल्ङ्याप: सुतिसिहल्' असें सूत्र मानावें व तसें सूत्र मानलें असतांच, 'अबिभा राज्यम्' इत्यादि उदाहरणांत 'ढ्लोपे पूर्वस्य दीर्घोऽणः' सू. १७४ या सूत्रानें दीर्घसिद्धि करतां येते. ('अ बिभृत् राज्यम्' या स्थलीं 'सार्वधातुकार्धधातुकयोः' सू. २१६८ या सूत्रानें 'भृ' धातूंतील अन्त्य ऋकाराचा गुण होऊन व द्विर्वचन आणि अभ्यासकार्य होऊन 'अबिभर् त् राज्यम्' अशी स्थिति झाली असतां, 'रात् ‌सस्य' अना तकारप्रश्लेष करून पठित केलेल्या औपादिक सूत्रानें जर संयोगान्त तकाराचा लोप केला तर, जरी तो लोप 'रो रि'

सू १७३ या त्रैपादिक उत्तर सूत्राच्या दृष्टीनें सिद्ध असल्यामुळें 'रो री' या सूत्राची प्रवृत्ति होऊन पूर्व रकाराचा लोप होतो आणि 'ढ्लोपे' या सापादिक सूत्रात त्रैपादिक सूत्रानी होणाऱ्या ढकाराच्या व रकाराच्या लोपाचें ग्रहण करून ते सूत्र केले असल्यामुळें त्या सापादिक सूत्राच्या दृष्टीनें देखील रकारलोप सिद्ध ठरतो तरी, त्या सापादिक सूत्राच्या दृष्टीनें 'रात् सस्य' या त्रैपादिक सूत्रानें होणारा संयोगान्त तकाराचा लोप सिद्ध ठरत नसल्यामुळें आणि अशा रीतीनें भकारापुढील 'अ' व 'राज्यम्' यातील आद्य रकार या दोहोंमध्यें तकाराचें व्यवधान आहे असे मानणे भाग पडत असल्यामुळें 'ढ्लोपे' हे सूत्र प्रवृत्त होऊ शकत नाही व अकाराचा दीर्घ आकार होऊ शकत नाही व 'अविभा राज्यम्' असा इष्ट प्रयोग सिद्ध होऊ शकत नाही परन्तु यथापठित प्रकृत सूत्र मानल्यानें, 'अबिभर्' या हलन्त अङ्गापुढें असलेल्या 'त' या अपृक्त प्रत्ययाचा त्या सापादिक सूत्रानें लोप होऊन तो लोप सिद्ध ठरत असल्यामुळें, 'ढ्लोपे' या सूत्रानें अकाराचा दीर्घ होऊन 'अविभा राज्यम्' असा इष्ट प्रयोग सिद्ध होतो म्हणून सर्व बाहेनें पूर्ण विचार करून आचार्य पाणिनीनें रचलेल्या प्रकृत सूत्रातून कोणतेहि पद न गाळता तें सूत्र जसेंचे तसेंच कायम ठेवणे आवश्यक आहे असे शब्दरत्नकाराचे म्हणणे आहे) प्रक्रियाकौमुदीकारानी प्रकृत सूत्राचे व्याख्यान करितांना 'ङ्यन्तादावन्ताद्दीर्घाच्च' असं जें म्हटले आहे त्यातील 'च' या पदानें 'हल्न्तात्' या पदाचें ग्रहण होते असं प्रकाशकारानी म्हटले आहे 'ङ्याप्भ्यो हि दीर्घा न तु तदन्तमपि' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, ङ्यन्त किंवा आबन्त शब्द हा अच् व हल् यांचा समुदाय असतो (व दीर्घत्व हा केवळ अचाचे ठिकाणी असणारा धर्म आहे याचे विवरण पूर्वी मनोरमेंत केलेच आहे) 'प्राप्तो मुक्ति प्रत्युक्ता' असें जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, इकवर्णान्त अङ्ग (अच् व हल् यांचा समुदाय असून केवळ अच् नसल्यामुळें) याचे 'ङ्यन्त' हें पद विशेषण होऊ

शकत नाहीं आणि 'इ,उ' हे वर्ण 'इउवर्णान्त' या सामासिक पदाचे अवयव असल्यामुळें तशा अवयवाचें ('वृत्तस्य वा विशेषणयोगो न' या भाष्यवचनान्वयें) 'ह्रस्व' हें पद विशेषण होऊं शकत नाहीं. (याचें विस्तृत विवरण पूर्वी मनोरमेंत केलेंच आहे.)

मनोरमा– "सख्युरसंबुद्धौ" ॥ इह "इतोऽत्सर्वनामस्थाने" इत्यतः "सर्वनामस्थाने" इत्यनुवर्तते तत् "असंबुद्धौ" इत्यनेन विशेष्यते। "गोतो णित्" इति सूत्राद् 'णित्' इत्यनुवृत्तं तत्सामानाधिकरण्येन सप्तम्याः प्रथमा कल्प्यत इत्याह– सम्बुद्धिवर्जं सर्वनामस्थानमिति। सख्युरसंबुद्धिरित्येव तु सूत्रं युक्तम्।

'सख्युरसम्बुद्धौ' सू. २५३ या प्रकृत सूत्रांत 'इतोऽत्सर्वनामस्थाने' या पूर्व सूत्रांतून 'सर्वनामस्थाने' हें पद अनुवृत्त होतें व तें पद प्रकृत सूत्रांतील 'असम्बुद्धौ' या पदाचें विशेष्य होतें. तसेंच 'गोतो णित्' या पूर्व सूत्रांतून प्रकृत सूत्रांत 'णित्' हें पद अनुवृत्त होत असल्यामुळें त्या प्रथमान्त पदाशीं सामानाधिकरण्य होण्याकरितां 'असम्बुद्धौ सर्वनामस्थाने' हीं प्रकृत सूत्रांतील सप्तम्यन्त पदें विभक्तिपरिणामानें प्रथमान्त कल्पावीं लागतात (व तसेंच प्रकृत सूत्र अङ्गाधिकारांत पठित असल्यामुळें त्या सूत्रांत अनुवृत्त होणारें 'अङ्गस्य' हें पद 'सख्युः' या प्रकृत सूत्रांतील षष्ठ्यन्त पदाशीं सामानाधिकरण्य होण्याकरितां पञ्चम्यन्त कल्पावें लागतें.) आणि म्हणूनच कौमुदींत 'सख्युरङ्गात्परं सम्बुद्धिवर्जं सर्वनामस्थानं णिद्वत्स्यात्' असें प्रकृत सूत्राचें व्याख्यान केलें आहे. 'सख्युरसम्बुद्धिः' असें सूत्र पठित करणें योग्य झालें असतें. (तसें सूत्र पठित केलें असतें तर, प्रकृत सूत्रांत अनुवृत्त होणाऱ्या 'णित्' या प्रथमान्त पदाचें 'असम्बुद्धिः = सम्बुद्धिवर्जम्' हें पद विशेषण होण्याकरितां त्या पदाला विभक्तिविपरिणाम करण्याची कांहीं गरज पडली नसती.)

शब्दरत्न– युक्तमिति। "अनङ् सौ" इत्यत्र विभक्तिविपरिणामः कार्यः। "सर्वनामस्थाने" इत्यस्य "गोतो णित्" इत्यत्र प्रथमान्ततया अनुवृत्त्यास्तु नतिवृत्तिरित्यभिमानः।

'सख्युरसम्बुद्धि' असे सूत्र पठित केल्यास, 'अनङ् सौ' या उत्तर सूत्रात ('असम्बुद्धि' हें प्रथमान्त पद अनुवृत्त झाल्यावर, 'सौ' या पदाशी सामानाधिकरण्य होण्याकरिता) त्या पदाचा पुन्हा सप्तमीविभक्तींत विपरिणाम करावा लागेल 'सख्युरसम्बुद्धिरित्येव तु सूत्र सुवचनम्' असे जें दीक्षितानी मनोरमेंत म्हटले आहे ते असा आशय मनात धरून म्हटले आहे की, ('इतोऽत्सर्वनामस्थाने' या पूर्व सूत्रातून) 'गोतो णित्' या उत्तर सूत्रात अनुवृत्त होणारें 'सर्व-नामस्थाने' हे सप्तम्यन्त पद ('णित्' या प्रथमान्त पदाशी सामानाधिकरण्य होण्याकरिता) प्रथमान्त कल्पावे लागत असल्या-मुळें, म्हणजे त्या पदाचा प्रथमाविभक्तीत विपरिणाम करावा लागत असल्यामुळें, ('सख्युरसम्बुद्धि' असे प्रकृत सूत्र पठित केल्यासच) त्या प्रथमान्त 'असर्वनामस्थानम्' या पदाची प्रकृत सूत्रात निवृत्ति होत नाही, म्हणजे अनुवृत्ति होते (अष्टा-ध्यायीत 'इतोऽत्सर्वनामस्थाने' हे सूत्र पूर्वी पठित असून त्यापुढें तीन सूत्रानंतर 'गोतो णित्' हें सूत्र पठित आहे व त्याच्या लगेंच पुढें 'णलुत्तमो वा, सख्युरसम्बुद्धौ, अनङ् सौ' ही सूत्रें पठित आहेत 'गोतो णित्' या सूत्रात 'इतोऽत्सर्वनामस्थाने' या सूत्रातून 'सर्वनामस्थाने' हें पद अनुवृत्त होऊन विभक्तिविपरिणामानें प्रथमान्त होते तें पद 'णलुत्तमो वा' या त्यांच पुढें असलेल्या सूत्रात अनुवृत्त होत नाही व 'सख्युरसम्बुद्धौ' या पुढील सूत्रात, विभक्ति-विपरिणामानें प्रथमान्त झालेले तें पद मण्डूकप्लुतीनें अनुवृत्त होण्या करिता 'सख्युरसम्बुद्धि' असे सूत्र पठित करणे इष्ट आहे असे दीक्षिताचे म्हणणे आहे परंतु शब्दरत्नकार असे म्हणतात की, 'सख्युरसम्बुद्धि' असे जरी प्रकृत सूत्र पठित केले तरी, 'अनङ् सौ' या उत्तर सूत्रात 'असम्बुद्धि' हे पद अनुवृत्त झाल्यावर 'सौ' या पदाशी 'असम्बुद्धौ सौ' असे सामानाधिकरण्य होण्याकरिता ते अनुवृत्त पद पुन्हा सप्तम्यन्त कल्पावे लागणारच मग प्रकृत सूत्रात 'असम्बुद्धि' असे प्रथमान्त पद पठित करून फायदा काय? दुसरे

असें कीं, 'इतोऽत्सर्वनामस्थाने' या ज्या पूर्वसूत्रांतून उत्तर सूत्रामध्यें 'सर्वनामस्थाने' या पदाची अनुवृत्ति होते त्या पूर्व सूत्रांत 'सर्वनामस्थाने' असें सप्तम्यन्त पद पठित केलें असल्यामुळें, प्रकृत सूत्रांत 'असम्बुद्धौ' असें सप्तम्यन्त पद पठित असलें तरच, त्या पदाच्या सामर्थ्यानें 'सर्वनामस्थाने' हें सप्तम्यन्त पद प्रकृत सूत्रांत अनुवृत्त करतां येतें; नाहीं तर 'णलुत्तमो वा' या मधील सूत्रांत तें पद अनुवृत्त होत नसल्यामुळें, प्रकृत सूत्रांत 'असम्बुद्धिः' असें भिन्न-विभक्तिक पद पठित केल्यानें, 'असर्वनामस्थाने' या पदाची प्रकृत सूत्रांत अनुवृत्ति करतां येऊं शकणार नाहीं. म्हणून पाणिनीनें जसें प्रकृत सूत्र पठित केलें आहे तसेंच तें सूत्र असणें इष्ट आहे असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे आणि म्हणूनच त्यांनीं प्रकृत पंक्तींत 'इत्यभिमानः' हीं अरुचिप्रदर्शक पदें घातलीं आहेत व 'भावप्रकाशकार म्हणतात—'अत्रारुचिबीजं तु भिन्नविभक्तिकत्वात् णलुत्तमोवेति विच्छेदाच्च सर्वनामस्थाने इत्यस्य निवृत्तिरेव स्यादिति यथान्यासमेवोचितमिति । अत एवासम्बुद्धाविति पर्युदासः, तद्वलात्तेन मध्ये विच्छिन्नमपि सदिहाकृष्यते इति प्रकाशोक्तिः संगच्छते ।')

मनोरमा— "ख्यत्यात्परस्य" ॥ कृतयणादेशयोः खिखीशब्दयोरनुकरणं "ख्य" इति । एवं तितीशब्दयोः "त्य" इति । उभयत्राप्यकार उच्चारणार्थः । न तु मुख्यापत्यादिशब्दैकदेशानुकरणमिदम् । "सख्युर्यः" "पत्युर्नः" । "संख्यायाः संवत्सरसंख्यस्य च" । "आपत्यस्य च तद्धिते" इत्यादिनिर्देशात् इत्यभिप्रेत्याह—खितिशब्दाभ्यामित्यादि । परस्येतिग्रहणं "एकः पूर्वपरयोः" इत्यधिकारनिवृत्त्यर्थम् ॥

('खि' किंवा 'खी' यांच्या पुढें विभक्तिप्रत्ययाचा अकार आला असतां) यणादेश होऊन 'ख्य्' असें जें रूप होतें त्याचें 'ख्यत्यात्परस्य' सू. २५५ या प्रकृत सूत्रांतील 'ख्य' हा शब्द अनुकरण आहे. त्याचप्रमाणें ('ति' किंवा 'ती' यांच्या पुढें विभक्ति-

प्रत्ययाचा अकार आला असता) यणादेश होऊन 'त्य' असे जें रूप होते त्याचे प्रकृत सूत्रातील 'त्य' हा शब्द अनुकरण आहे 'ख्य' व 'त्य' या दोन्ही स्थली जो अकार घातला आहे तो केवळ उच्चारणार्थ आहे 'मुख्य, आपत्य' इत्यादि शब्दात जे अन्त्य 'ख्य' व 'त्य' हे एकदेश आढळतात त्याचे प्रकृत सूत्रातील 'ख्य' व 'त्य' हे शब्द अनुकरण नव्हत हे 'सख्युर्यः' सू १७९१ 'पत्युर्नो यज्ञसंयोगे', सू ४९० 'सख्याया सवत्सरसख्यस्य च' सू १७५२ व 'आपत्यस्य च तद्धिते' सू १०८२ इत्यादि निर्देशावरून सिद्ध होते (जर प्रकृत सूत्रात 'ख्य' व 'त्य' असे मूळचे अकारान्त शब्द विवक्षित असते व यणादेश करून झालेले 'ख्य्, त्य्' विवक्षित नसते तर, 'सखि, पति' या शब्दाची पञ्चमीच्या व षष्ठीच्या एकवचनाची 'सख्यु, पत्यु' अशी इष्ट रूपें न होता 'सख्य, पत्य' अशी अनिष्ट रूपे झाली असती व 'सख्युर्यः, पत्युर्नो यज्ञसंयोगे' या सूत्रातील 'सख्यु, पत्यु' हे निर्देश असङ्गत ठरण्याची आपत्ति आली असती, आणि तसेच सवत्सरसङ्ख्यस्य, आपत्यस्य' अशी षष्ठीच्या एकवचनाची रूपें न होता त्याच्यापुढील षष्ठीच्या विभक्तिप्रत्ययातील अकाराचे उत्व होऊन अनिष्ट रूपें झाली असती व वरील पाणिनीय सूत्रातील ते निर्देश चूक ठरण्याची आपत्ति आली असती) हे सव मनात धरूनच कौमुदीत प्रकृत सूत्राचे 'खितिशब्दाभ्या खीतीशब्दाभ्या कृतयणादेशाभ्या परस्य ङसिङसोरत उत्स्यात्' असे व्याख्यान केले आहे प्रकृत सूत्रात 'परस्य' या पदाचे ग्रहण अशाकरिता केले आहे की, 'एक पूर्वपरयो' या अधिकारसूत्राची निवृत्ति व्हावी (प्रकृत सूत्रातील 'ख्यत्यात्' हे पद पञ्चमी असल्यामुळें, 'तस्मादित्युत्तरस्य' सू ४१ या सूत्रान्वयें पराला कार्य झालेच असते व 'आदे परस्य' सू ४४ या सूत्रान्वये ते कार्य पुढें येणाऱ्या 'ङसि, ङस्' या प्रत्ययाच्या आद्य वर्णास, म्हणजे अकारास, झालेच असते साराश पराला कार्य व्हावे याकरिता 'परस्य' हा शब्द प्रकृत सूत्रात घातला नसून, 'एक

पूर्वपरयोः' हा अधिकार प्रकृत सूत्रापर्यंतच चालू राहावा व तेथून त्याची निवृत्ति व्हावी याकरितां तो शब्द प्रकृत सूत्रांत घातला आहे. त्यामुळें दोहोंचे जागीं एकादेश होत नसून प्रकृत सूत्रानें सांगितलेलें कार्य पुढील शब्दांतील आद्य वर्णाला होतें हें स्पष्ट होतें.)

मनोरमा— " औत् " ।। एतच्च नदीसंज्ञकेषु " इदुद्भ्याम् " इति पूर्वसूत्रेण बाध्यते । घिसंज्ञकेषु " अच्च घेः " इत्युत्तरसूत्रेण । तस्मात्संज्ञाद्वयशून्योऽस्य विषयः । न च तादृश उकारोऽस्ति । अत आह–उकारेति । यत्तु प्राचा घिनदीसंज्ञावर्जिताभ्यामिदुद्भ्यां परस्येत्युक्तम् । तन्न । तादृशोकारस्याप्रसिद्धेः समुदायस्येति । न च पर्युदासेऽपि पर्युदस्यमानसमर्पके सखिशब्दे तदन्तग्राहकत्वं शङ्क्यम्, विशेष्यासन्निधानात् । यस्त्विह ग्रहणवतेत्याद्युपन्यस्तं हरदत्तेन, यच्च एयत्यास्सूत्रे कैयटेन, तत्र तस्य प्रत्ययविधिविषयत्वात् ।

गौणत्वेऽप्येति । अस्थ्याद्यनङ्वदिति भावः । तथा च " येन विधिः " इति सूत्रे परमसखायाविति बहुव्रीहिः । तत्पुरुषे हि टचा भाव्यमिति कैयटः । तथा " द्वितीया श्रित " इति सूत्रे सोमसखेति प्रतीकमुपादाय बहुव्रीहित्वान्न समासान्त इति कैयटः । " मिदचोऽन्त्यात् " सूत्रे तृज्वत्क्रोष्टुः " " स्त्रियां च " इति सूत्रे च भाष्यकैयटयोः स्पाधात्तौ माधवग्रन्थे च स्फुटमेतत् । 'अनुद्युक्षो वरुण इन्द्रसखा' 'आग्नेया हि मरुत्सखा' 'तीव्रं सोमं पिबति गोसखायम्' इत्यादिप्रयोगाश्चैवमेव सङ्गच्छन्ते । तत्र बहुव्रीहिप्रयुक्तस्य पूर्वपदप्रकृतिस्वरस्य दर्शनेन गौणत्वात् । एतेन घिसंज्ञासूत्रे शोभनः सखा यस्य सुसखिरित्युदाहरन्तौ हरदत्तन्यासकारौ तदनुगामिनश्चान्ये उपेक्ष्याः ।

'औत' सू. २५६ हें प्रकृत सूत्र (नदीसंज्ञक शब्दांना लागू पडत नाहीं; कारण तें) नदीसंज्ञक शब्दांच्या विषयांत 'इदुद्भ्याम्' या पूर्व सूत्रानें बाधित होतें. तसेंच घिसंज्ञक शब्दांच्या विषयांत (प्रकृत सूत्र लागू पडत नाहीं; कारण तें) 'अच्च घेः' या उत्तर सूत्रानें

बाधित होते. म्हणून जे शब्द घिसंज्ञक किंवा नदीसंज्ञक नाहीत असेच शब्द प्रकृत सूत्राचे विषय होत, म्हणजे अशाच शब्दांना प्रकृत सूत्र लागू पडते. दोन्ही संज्ञांचे विषय नसणारे शब्द उकारान्त नाहीत ('सखि, पति' हे जे दोन्ही संज्ञांचे विषय नसणारे शब्द आहेत ते इकारान्त आहेत. म्हणून नदीसंज्ञा व घिसंज्ञा ज्यांना नाही अशा शब्दांनाच लागू पडणारे प्रकृत सूत्र असल्यामुळें व तसे शब्द उकारान्त नसून तसे 'पति, सखि' हे इकारान्तच शब्द असल्यामुळें, 'इदुद्भ्याम्' या पूर्व सूत्रातून प्रकृत सूत्रात केवळ इकाराची अनुवृत्ति करावयास पाहिजे होती व उकाराची अनुवृत्ति करण्याची काहीच गरज नव्हती असे कोणी म्हटल्यास, त्याच्या उत्तरादाखल) प्रकृत सूत्रावरील कौमुदीत 'उकारानुवृत्तिरुत्तरार्था', म्हणजे 'अच्च घे.' या उत्तर सूत्रात उकारानुवृत्ति व्हावी याकरिता प्रकृत सूत्रात उकाराचीहि अनुवृत्ति केली आहे, असे म्हटले आहे (प्रकृत सूत्रात उकारानुवृत्ति केली नसती तर, 'अच्च घेः' या उत्तर सूत्रात ती अनुवृत्ति मण्डूकप्लुतीने करावी लागली असती व तसे करणे हा दोष आहे हे मागें अनेक वेळा सांगितलेच आहे) प्रक्रियाकौमुदीकारांनी प्रकृत सूत्राचे व्याख्यान करिताना 'घिनदीसंज्ञावर्जिताभ्यामिदुद्भ्यां परस्य ङेः औत्स्यात्' असे जें म्हटले आहे ते बरोबर नाही, कारण ज्याला घिसंज्ञा व नदीसंज्ञा नाही असा कोणताहि उकारान्त शब्द आढळत नाही. 'समुदायस्य सखिरूपत्वाभावात् असखि इति निषेधाप्रवृत्तेर्घिसंज्ञा' असे जें प्रकृत सूत्रावरील कौमुदीत म्हटले आहे त्यावर, 'शेषो घ्यसखि' सू २४३ या सूत्रात 'असखि' हा जरी पर्युदास आहे तरी त्या पर्युदासांतील 'सखि' या शब्दानें तदन्ताचे ग्रहण करता येते, असा कोणी शंका केल्यास, ती शंका बरोबर नाही; कारण त्या सूत्रात कोणत्याहि विशेष्याचे संनिधान नाही, म्हणजे कोणतेहि विशेष्य साक्षात् पठित किंवा अनुवृत्त नाही. (शंकाकाराची अशी शंका आहे की, 'असखि' हा प्रसज्यप्रतिषेध नसून पर्युदास असल्यामुळें व 'सुसखि' हा शब्द 'सखि' या शब्दाहून

भिन्न असल्यामुळें जरी 'असखि' या पर्युदासानें 'सुसखि' या शब्दाचें ग्रहण करतां येत नाहीं तरी, 'येन विधिस्तदन्तस्य' सू. २६ या सूत्रानें तदन्तविधि केल्यानें, 'असखि' या पर्युदासाचा 'सखिशब्दान्तभिन्न' असा अर्थ होऊन त्या अर्थान्वयें सखिशब्दान्त 'सुसखि' या शब्दाचें ग्रहण करतां येतें व त्यामुळें 'सुसखि' या शब्दाला देखील घिसंज्ञा होत नाहीं व त्या शब्दापुढील 'टा' प्रत्ययाचे जागीं नादेश करतां येत नाहीं. या शंकेवर दीक्षित असें उत्तर देतात कीं, 'येन विधिस्तदन्तस्य' सू. २६ या सूत्रानें विशेषणालाच तदन्तसंज्ञा होते. परंतु 'शेषो घ्यसखि' या सूत्रांत कोणत्याहि विशेष्याचा साक्षात् निर्देश नसल्यामुळें व तसें विशेष्य त्या सूत्रांतून अनुवृत्त देखील होत नसल्यामुळें, 'सखि' हा शब्द विशेषण मानतां येत नाहीं व त्यामुळें त्याहून तदन्तविधि करतां येत नाहीं. तसेंच 'शेषो घ्यसखि' हें सूत्र अङ्गाधिकारांत किंवा पदाधिकारांत पठित नसून तें संज्ञासूत्र प्रथमाध्यायांत पठित असल्यामुळें, त्या सूत्राला 'पदाङ्गाधिकारे तस्य च तदन्तस्य च' – परि. २९– ही परिभाषा लागू पडत नाहीं. त्यामुळें देखील 'सखि' शब्दानें तदन्ताचें ग्रहण होत नाहीं हें उघड आहे. ) 'ग्रहणवता प्रातिपदिकेन तदन्तविधिर्नास्ति' – परि. ३१ – ही जी परिभाषा हरदत्तानें प्रकृत स्थलीं लावली आहे व तसेंच 'स्यत्यासपरस्य' सू. ६–१–११२ या सूत्रावरील भाष्याच्या वृत्तींत कैयटानें या संबंधानें जें म्हटलें आहे तें बरोबर नाहीं; कारण ती परिभाषा अशाच सूत्रांना लागू पडते कीं, ज्यांत प्रत्यय होण्याचें विधान केलें आहे. ( 'शेषो घ्यसखि' या सूत्रावरील पदमञ्जरींत हरदत्तानें 'इह शोभनः सखा अस्य सुसखिः, सुसखेरागच्छतीति घिसंज्ञा सिद्धा भवति, न ह्ययं समुदायः सखिशब्दः, तदन्तविधिश्च ग्रहणवता प्रातिपदिकेन प्रतिषिद्धः' असें म्हटलें आहे. याचा भावार्थ हा आहे कीं, 'सुसखि' हा शब्द 'सखि' शब्दाहून भिन्न असल्यामुळें, 'शेषो घ्यसखि' या सूत्रांतील 'असखि' हा पर्युदास 'सुसखि' या समुदायाला लागू पडतो व त्यामुळें

'सुसखि' या समुदायाला घिसंज्ञा होते आणि त्या शब्दाचे 'सुसख्यु.' असे षष्ठीचे एकवचन न होता 'सुसखे.' असे षष्ठीचे एकवचन होते. 'शेषो घ्यसखि' या सूत्रात 'सखि' या प्रातिपदिकाचे ग्रहण केले असल्यामुळें व 'ग्रहणवता प्रातिपदिकेन' ही परिभाषा असल्यामुळे, येथें तदन्तविधि करता येत नाही तसेच 'स्यत्यात्परस्य' या सूत्रावरील भाष्याच्या वृत्तीत कैयटानें 'अतिसखेरित्यत्रासखीति घिसंज्ञाप्रतिषेधो न भवति । ग्रहणवता प्रातिपदिकेन तदन्तविधिप्रतिषेधात् । केवलस्यैव सखिशब्दस्य प्रतिषेधविज्ञानात्' असे म्हटले आहे. यावर दीक्षित असे म्हणतात की, 'शेषो घ्यसखि' या सूत्रात प्रत्यय होण्याचे विधान केले नसून ते केवळ संज्ञासूत्र असल्यामुळें व ज्या सूत्रात प्रत्यय होण्याचे विधान केले आहे अशाच सूत्रांना 'ग्रहणवता प्रातिपदिकेन' ही परिभाषा लागू पडत असल्यामुळें, ती परिभाषा 'शेषो घ्यसखि' या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या 'सखि' या प्रातिपदिकाला लागू पडत नाही परिभाषेन्दुशेखरात देखील या परिभाषेसंबधानें 'अत एवाय प्रत्ययविधिविषय एव' असेच म्हटले आहे व या विषयाचे विस्तृत विवरण परिभाषेन्दुशेखराच्या मराठी भाषांतरात पान ११८ मध्यें केले आहे ) 'गौणत्वेऽप्यनङ्णित्वे प्रवर्तेते' असें जें प्रकृत सूत्रावरील कौमुदीत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, ('अस्थिदधिसक्थ्य' सू ३२२ या सूत्रानें समासात उपसर्जन झालेल्या) 'अस्थि, दधि' इत्यादि शब्दाना जसा 'अनङ्' आदेश होतो त्याप्रमाणे समासात उपसर्जन झालेल्या 'सखि' शब्दाला देखील 'अनङ्' आदेश होतो. त्यामुळेंच 'येन विधि' सू १-१-७२ या सूत्रावरील भाष्यात 'परमसखायौ' असे बहुव्रीहिसमासाचे रूप दिले आहे व त्या भाष्याच्या वृत्तीत कैयटानें असे म्हटले आहे की, जर तो तत्पुरुषसमास असता तर समासान्त 'टच्' प्रत्यय झाला असता. (त्या सूत्रावरील भाष्यात त्या सूत्राचे प्रयोजन सांगतांना भाष्यकारांनी 'सुपथिसखिपथुनोमतिवत्पुरनड्डुनिग्रहणम्' हे वार्तिक पठित केले आहे व त्या वार्तिकाचा अर्थ हा आहे की, पथि-

नीय सूत्रांत पठित असलेल्या 'दिव्, पथिन्, मथिन्' इत्यादि शब्दांनी त्यांचें स्वतःचें व तदन्त शब्दांचें देखील ग्रहण व्हावें हेंहि 'येन विधिः' या सूत्राचें एक प्रयोजन आहे व त्या वार्तिकांत निर्दिष्ट असलेल्या 'सखि' या शब्दाचें भाष्यकारांनीं 'परमसखा, परमसखायौ परमसखायः' असें उदाहरण दिलें आहे व यावर कैयटानें 'परम-सखायाविति बहुव्रीहिः । तत्पुरुषे तु टचा भाव्यम्' असें म्हटले आहे. यावरून हें स्पष्ट होतें कीं, भाष्यकारांनीं 'परमसखा' इत्यादि बहुव्रीहिसमासाचीं उदाहरणें दिलीं आहेत. या अन्यपदार्थप्रधान बहुव्रीहिसमासांत 'सखि' शब्द उपसर्जन असून देखील, अनङादेश व णित्व केलें आहे. हें भाष्य व कैयटवृत्ति 'गौणत्वेऽप्यनङ्णित्वे' असें जें कौमुदींत म्हटलें आहे त्याला प्रमाण आहे.) तसेंच 'द्वितीया-श्रितातीत' सू. २–१–२४ या सूत्रावरील भाष्यांतील 'सोमसखा' हें प्रतीक घेऊन, हा बहुव्रीहिसमास असल्यामुळें समासान्त 'टच्' प्रत्यय झाला नाहीं असें कैयटानें आपल्या वृत्तींत म्हटलें आहे. (त्या भाष्यांत भाष्यकारांनीं 'उभयं खल्वपीष्यते । स्वस्ति सोमसखा पुनरेहि । गवांसख इति ।', म्हणजे दोन्ही तऱ्हा इष्टच आहेत व जशी विवक्षा असेल त्याप्रमाणें तत्पुरुषहि होतो व बहुव्रीहिहि होतो. उदाहरणार्थ 'स्वस्ति सोमसखा पुनरेहि । गवांसखः ।', असें म्हटलें आहे, व या भाष्याच्या वृत्तींत कैयटानें 'सोमसखेति । बहु-व्रीहित्वात् समासान्ताभावः । गवांसख इति । तत्पुरुषत्वात् समा-सान्तः, तत्पुरुषे कृति बहुलमिति, षष्ठ्या आक्रोशे इति वा षष्ठ्याः अलुक्' असें म्हटलें आहे. या कैयटवृत्तीवरून हें स्पष्ट होतें कीं, भाष्यांतील 'सोमसखा, परमसखा' हीं उदाहरणें बहुव्रीहिसमासाचीं असून त्यांत 'सखि' हा शब्द जरी उपसर्जन आहे तरी त्याला 'अनङ्' आदेश केला आहे.) त्याचप्रमाणें 'मिदचोऽन्त्यात्परः' सू. १–१–४७, 'तृज्वत्क्रोष्टुः' सू. ७–१–९५ व 'स्त्रियां च' सू. ७–१–९६ या सूत्रांवरील भाष्यांवरून व कैयटवृत्तींवरून आणि तसेंच माधवाच्या धातुवृत्तींत 'ख्या' धातूचें व्याख्यान करितांना जें म्हटलें आहे

त्यावरून देखील हेच स्पष्ट होते, म्हणजे 'सखि' शब्द समासात उपसर्जन झाला असला तरी त्याला 'अनङ्' आदेश होतो व णिद्वत् कार्य होते. असे मानले असताच, 'अनुद्युक्तो वरुण इन्द्रसखा, आग्नेया हि मरुत्सखा, तीव्रं सोमं पिबति गोसखायम्' इत्यादि वैदिक प्रयोग सुसङ्गत ठरतात, म्हणजे त्या वैदिक प्रयोगातील 'इन्द्रसखा, मरुत्सखा, गोसखा' ही बहुव्रीहिसमासाची रूपें साधु ठरतात. या वरील सर्व वैदिक उदाहरणात 'बहुव्रीहौ प्रकृत्या पूर्वपदम्' सू. ३७३५ या सूत्रानें बहुव्रीहिसमासात होणारा पूर्वपद-प्रकृतिस्वर वेदात दिलेला आढळत असल्यामुळें ही सर्व बहुव्रीहि-समासाची उदाहरणे असून यात 'सखि' हा शब्द गौण आहे हें स्पष्ट होते. ('पदाङ्गाधिकारे तस्य च तदन्तस्य च' ही परिभाषा असल्यामुळें आणि 'सख्युरसम्बुद्धौ, अनङ् सौ' ही सूत्रें अङ्गाधिकारात पठित असल्यामुळें, त्या सूत्रांनी सांगितलेली कार्ये जशी केवळ 'सखि' शब्दाहून होतात तशीच तो सख्यन्त शब्दाहून देखील होतात. 'गौणमुख्ययो मुख्ये कार्यसम्प्रत्ययः'–परि. १५–या परिभाषान्वयें मुख्याला–प्रधानाला–जें कार्य होणे सांगितले आहे ते कार्य गौणाला–अप्रधानाला–होत नाही व म्हणून जेथें समासात 'सखि' हा शब्द गौण–अप्रधान किंवा उपसर्जन–झाला आहे तशा ठिकाणी वरील सूत्रात सांगितलेली कार्ये तशा उपसर्जनीभूत सख्यन्त शब्दाहून करता येऊ शकत नाहीत असे कोणी म्हटल्यास, त्याला उत्तर हे आहे की, 'गौणमुख्ययोः' या परिभाषेतील 'गौण' या शब्दाचा, परिभाषेन्दुशेखरात सांगितल्याप्रमाणे, 'गौणलाक्षणिक' व 'अप्रसिद्ध' असा अर्थ असून 'उपसर्जन' असा अर्थ नसल्यामुळें व ती परिभाषा प्रातिपदिककार्य करतेवेळीं लागू पडत नसून पदकार्य करतेवेळी लागू पडत असल्यामुळें आणि प्रकृत स्थली पदकार्य करणे नसून प्रातिपदिककार्य करणे असल्यामुळें, ती परिभाषा येथें लागू पडत नाही. या विषयाचे विस्तृत विवरण परिभाषेन्दुशेखराच्या मराठी भाषान्तरात पान ५३–५५ व ६०–६१ मध्यें केले आहे व ते वाच-

त्यास वरील विषय नीट ध्यानांत येईल. ) समासांत 'सखि' शब्द गौण असला तरी 'अनङ्' आदेश व णिद्वत्कार्य करतां येऊं शकत असल्यामुळें, हरदत्त, न्यासकार व त्यांचे अनुयायी यांनीं 'शेषो घ्यसखि' या घिसंज्ञाविधायक सूत्रावरील वृत्तींत 'शोभनः सखा यस्य सः सुसखिः' असें जें उदाहरण दिलें आहे तें उपेक्षार्ह--चूक--आहे. (या बहुव्रीहिसमासांत जरी 'सखि' हा शब्द उपसर्जन आहे तरी, 'अनङ् सौ' या सूत्रानें त्याला अनङादेश करतां येतो व त्यामुळें 'सुसखिः' असें रूप न होतां 'सुसखा' असेंच प्रथमेच्या एकवचनाचें रूप होऊं शकतें असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे.)

शब्दरत्न– विशेष्यासन्निधानादिति । शब्दस्वरूपं विशेष्यं स्वव्यावर्तकम् । किं च सत्यपि विशेष्ये सखिशब्दभिन्नान्तस्यैवेव स्यात्र तु सख्यन्तभिन्नस्येति । नञ्कार्थाभावापन्नस्याप्यन्त्रान्वयायोगादिति भावः । तस्य प्रत्ययविधीति । एवं च हरदत्तानुरोधेनेदं सर्वमिति भावः । तथा द्वितीयेति । तत्पुरुषविषये बहुव्रीहिर्नेति उपक्रम्योभयं खल्वपीष्यते सोमसखा गवांसख इति भाष्यम् । अन्ये "षष्ठ्या आक्रोशे" इत्यलुक् ।

'विशेष्यासन्निधानात्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, 'शब्दस्वरूप' हें अव्यावर्तक, म्हणजे सर्वत्र लागू पडणारें, विशेष्य आहे (कारण पाणिनीय शास्त्रांत जीं जीं विधानें केलीं आहेत तीं सर्व शब्दस्वरूपासंबंधानेंच केलीं असल्यामुळें, 'शब्दस्वरूप' हें सर्वत्र विशेष्य मानतां येतें. अशा सार्वत्रिक सामान्य विशेष्याचें 'असखि' हा शब्द विशेषण मानून त्याहून 'येन विधिः' या सूत्रानें होणारा तदन्तविधि करतां येत नाहीं. पाणिनीय सूत्रांत साक्षात् निर्दिष्ट किंवा अनुवृत्त असलेला शब्द विशेष्य असल्यास, तद्या विशिष्ट विशेष्याच्या सूत्रनिर्दिष्ट विशेषणाहून 'येन विधिः' या सूत्रानें तदन्तविधि करतां येतो. म्हणून 'शेषो घ्यसखि' या सूत्रांत कोणतेंहि विशेष्य साक्षात् निर्दिष्ट किंवा अनुवृत्त नसल्यामुळें, त्या सूत्रांतील 'असखि' हा शब्द, विशेष्याच्या अभावीं, विशेषण

मानता येत नाही व त्याहून तदन्तविधि करता येत नाही यावर शंकाकार अशी शंका करतो की, घिसंज्ञक अङ्गाहून विभक्तिप्रत्यय होण्याचे विधान करणारी सूत्रें अङ्गाधिकारात पठित असल्यामुळें, त्यापैकी कोणत्याहि सूत्रानें, उदाहरणार्थ 'आङो नाऽस्त्रियाम्' सू २२४ या सूत्रानें, कार्य करतेवेळी, कार्यकालपक्षात त्या कार्यविधायक सूत्राजवळ 'शेषो घ्यसखि' हे संज्ञासूत्र उपस्थित झाले असता, अङ्गाधिकारस्थ त्या कार्यविधायक सूत्रात अनुवृत्त होणारे 'अङ्गस्य' हे पद 'असखि' याचे विशेष्य मानता येते व त्यामुळें 'असखि' या विशेषणाहून तदन्तविधि करता येतो या शंकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, अशा रीतीनें, शंकाकारानें म्हटल्याप्रमाणे, 'असखि' या पदाचे 'अङ्गस्य' हे अनुवृत्त पद) विशेष्य मानले तरी, 'असखि' या शब्दाचा, तदन्तविधि केल्यानें, 'सखिशब्दभिन्नान्तस्य' असाच अर्थ होईल, 'सख्यन्तभिन्नस्य' असा अर्थ होणार नाही, कारण 'असखि' या नञ्तत्पुरुषसमासात 'नञ्' या प्रधान पदाशी एकार्थीभावापन्न झालेल्या 'सखि' या शब्दाचा इतर शब्दामध्यें, म्हणजे 'अङ्गस्य' या शब्दामध्यें, अन्वय होऊ शकत नाही ('न सखि असखि' याचा 'सखिभिन्नम्=सखिशब्दभिन्नम्' असा अर्थ होतो व 'सखिशब्दभिन्नम्' हे 'अङ्गम्' याचे विशेषण मानून त्याहून तदन्तविधि केल्यास, 'सखिशब्दभिन्नान्त ह्रस्वइवर्णान्त यदङ्ग तस्य घिसंज्ञा भवति' असा 'शेषो घ्यसखि' या सूत्राचा अर्थ होऊ शकतो, 'सख्यन्तभिन्न यदङ्ग तस्य घिसंज्ञा भवति' असा अर्थ मुळीच होऊ शकत नाही, व भैरवीकार म्हणतात की, 'एवञ्च यदि सखिभिन्नान्तस्याङ्गस्येत्यर्थस्तदा केवले सखिशब्देऽतिप्रसङ्गोऽस्त्येव सखिभिन्नेकारान्तत्वादिति पर्युदासस्य वैयर्थ्यमेव स्यादिति भाव ।' या म्हणण्याचा तात्पर्यार्थ हा आहे की, शंकाकाराच्या म्हणण्याप्रमाणे 'शेषो घ्यसखि' या सूत्रातील 'असखि' हा पर्युदास 'अङ्गस्य' याचे विशेषण मानून त्याहून तदन्तविधि केल्यास, शब्दरत्नात सांगितल्याप्रमाणे त्या सूत्राचा 'सखिशब्दभिन्नान्तस्य अङ्गस्य घिसंज्ञा भवति'

असाच अर्थ होऊं शकत असल्यामुळें, त्या अर्थान्वयें केवळ 'सखि' या शब्दामध्यें जो अन्त्य इकार आहे तो देखील सखिशब्दभिन्न असल्याकारणानें, तसा इकारान्त 'सखि' या अङ्गाला देखील घिसंज्ञा होण्याची व वरील सूत्रांतील 'असखि' हा पर्युदास व्यर्थ ठरण्याची आपत्ति येईल. म्हणून शंकाकारानें या स्थलीं जो तदन्तविधि केला आहे तसा तदन्तविधि करणें योग्य नाहीं; कारण तसा तदन्तविधि केल्यानें अनिष्ट सूत्रार्थ होतो हें वरील विवेचनावरून स्पष्ट होतें.)

'समुदायस्य सखिरूपत्वाभावादसखीति निषेधाऽप्रवृत्तेर्घिसंज्ञा', म्हणजे ज्या शब्दसमुदायाच्या अन्तीं 'सखि' शब्द असतो तो शब्दसमुदाय 'सखि' शब्दाहून भिन्न असल्यामुळें त्याला 'असखि' हा निषेध लागू पडत नाहीं व तो समुदाय घिसंज्ञक ठरतो, असें जें प्रकृत सूत्रावरील कौमुदींत दीक्षितांनीं म्हटलें आहे तें हरदत्ताच्या मतानुसार म्हटलें आहे. (यावरून हें ध्वनित होतें कीं, दीक्षितांचें हें मत शब्दरत्नकारांना मान्य नाहीं व त्यांच्या मतें 'सुसखि' हा शब्द देखील घिसंज्ञक ठरत नाहीं आणि म्हणून त्या शब्दाचें 'सुसखिना' असें तृतीयेचें एकवचन न होतां, 'सुसख्या' असेंच तृतीयेचें एकवचन होऊं शकतें. 'यस्येति च' सू. ६–४–१४८ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं 'इवर्णस्य ईत्वे किमुदाहरणम् ? ।' असा प्रश्न करून त्याचें अखेरीस 'इदं तर्हि अतिसखेरागच्छति, अतिसखेः स्वम् । यदि लोपो न स्यादुपसर्जनह्रस्वत्वे कृतेऽसखीति प्रतिषेधः प्रसज्येत ।' असें उत्तर दिलें आहे. या भाष्याचा भावार्थ हा आहे कीं, 'सखि' या शब्दाहून 'सख्यशिश्वीति भाषायाम्' सू. ५१७ या सूत्रानें 'ङीष्' प्रत्यय केला असतां, 'यस्येति च' सू. ३११ या सूत्रानें 'सखि' यांतील अन्त्य इकाराचा लोप होऊन 'सखि ङीष् = सख् ई = सखी' असें दीर्घ ईकारान्त स्त्रीलिङ्गाचें रूप होतें. 'सखीमतिक्रान्तः अतिसखिः' या प्रादिसमासांत 'गोस्त्रियोरुपसर्जनस्य' सू. ६५६ या सूत्रानें 'सखी' या उपसर्जन झालेल्या शब्दाचा दीर्घ ईकार ह्रस्व होऊन 'अतिसखि' असा जो सामा-

सिक शब्द होतो त्यात जरी शब्दसमुदायाच्या अन्ती ऱ्हस्व इकारान्त 'सखि' शब्द आढळतो तरी त्या शब्दसमुदायाला घिसंज्ञा होते; कारण त्या 'सखि' शब्दांत जो ऱ्हस्व इकार अन्ती आहे तो मूळ 'सखि' शब्दाचा इकार नव्हे. त्या इकाराचा 'यस्येति च' या सूत्रानें लोप होऊन गेला आहे व 'अतिसखि' या सामासिक शब्दाच्या अन्ती 'सखि' शब्दात जो ऱ्हस्व इकार आढळतो तो 'गोस्त्रियोरुपसर्जनस्य' या सूत्रानें 'सखी' या ङीप्प्रत्ययान्त दीर्घ ईकारान्त शब्दाचा ऱ्हस्व झालेला इकार आहे त्यामुळें 'अतिसखि' या शब्दाला घिसंज्ञा होऊन त्याची 'हरि' शब्दाप्रमाणे रूपें होतात. भाष्यकार म्हणतात की, जर 'सखि' शब्दाहून 'ङीप्' प्रत्यय केल्यावर 'सखि' शब्दातील इकाराचा लोप झाला नसता व 'सखि' यातील ऱ्हस्व इकार आणि 'ङीप् = ई' या दोहोंचे जागी 'अकः सवर्णे दीर्घः' सू. ८५ या सूत्रानें सवर्णदीर्घरूप एकादेश झाला असता तर, तो एकादेश पूर्वान्तिवद्भावानें 'सखि' शब्दाचा अन्तावयव मानता येऊ शकला असता व त्यामुळें 'गोस्त्रियो' या सूत्रानें ऱ्हस्वत्वार्थ झाल्यावर 'असखि' हा प्रतिषेध 'अतिसखि' या उदाहरणाला लागू पडण्याची व घिसंज्ञा न होण्याची आपत्ति आली असती या भाष्यावरून हे स्पष्ट होते की, ज्या शब्दाच्या शेवटी मूळ 'सखि' शब्दाचा ऱ्हस्व इकार आहे त्याला घिसंज्ञा होत नाही 'शोभन सखा यस्य स सुसखि' या कौमुदीत दिलेल्या उदाहरणात मूळ 'सखि' शब्दाचा ऱ्हस्व इकार अन्तो असल्यामुळें, त्या शब्दाला वरील भाष्यान्वयें वास्तविक घिसंज्ञा होऊ शकत नाही व त्याला घिसंज्ञा होते असे जें हरदत्तमतानुसार दीक्षितांनी म्हटले आहे ते वरील भाष्याच्या विरुद्ध असल्यामुळें चूक ठरते या विषयाचे विस्तृत विवरण प्रकृत सूत्रावरील शब्देन्दुशेखरात केले आहे व नागेशांनी 'सखिशब्दस्य तदवयवे एकाणया सख्यवयवमिश्रयोरिदुतोरित्यर्थः' असे म्हटले आहे व हाच शब्दरत्नातील प्रकृत पंक्तीचा आशय आहे. ) 'द्वितीयाश्रिता-

लीत ' २-१-२४ या सूत्रावरील भाष्यांत 'तत्पुरुषविषये बहुव्रीहिर्न', म्हणजे 'यत्र तत्पुरुष: प्राप्नोति बहुव्रीहिश्च, तत्र तत्पुरुष एव भवति', असा उपक्रम करून ( त्याचें प्रत्याख्यान करतेवेळीं ) भाष्यकारांनीं ' उभयं खल्वपीष्यते, सोमसखा, गवांसखः ' असें म्हटलें आहे. या भाष्यांतील ' गवांसखः ' या अखेरच्या उदाहरणांत ' षष्ठ्या आक्रोशे ' सू ९७९ या सूत्रान्वयें षष्ठीचा लुक् झाला नाहीं ( व ह्या तत्पुरुषसमास असल्यामुळें ' राजाहस्सखिभ्यष्टच् ' सू. ७८८ या सूत्रानें येथें समासान्त ' टच् ' प्रत्यय झाला आहे. ' सोमसखि ' या बहुव्रीहिसमासांत मूळचा ऱ्हस्व इकारान्त ' सखि ' शब्द अन्तीं असल्यामुळें, त्याला शब्दरत्नकारांच्या मतें घिसंज्ञा होत नाहीं व तो मूळ ' सखि ' शब्दासारखाच चालतो. पण दीक्षितांच्या मतें त्याला घिसंज्ञा होते व त्याचीं पहिली पांच रूपें सोडून ' हरि ' शब्दासारखीं इतर रूपें होतात. )

मनोरमा–"पतिः समास एव" ।। एवकार इष्टतोऽवधारणार्थः । अन्यथा हि समासे पतिरेवेति सम्भाव्येत । "धात्वादेः" इत्यादिज्ञापकानुसरणे च प्रतिपत्तिगौरवं स्यात् । अथ कथं–सीतायाः पतये नमः ।। पराशरश्च—

"नष्टे मृते प्रव्रजिते क्लीबे च पतिते पतौ" इति ।

उच्यते । पतिरित्याख्यातः पतिः णौ टिलोपे "अच इः" इत्यौणादिक इः । अयं पतिशब्दः "पतिः समास एव" इत्यत्र न गृह्यते लाक्षणिकत्वात् । एतेन 'कृष्णस्य सखिरर्जुनः' इति भारतं 'सखिना वानरेन्द्रेण' इति रामायणं च व्याख्यातम् ।

' पतिः समास एव ' सू. २५७ या सूत्रांतील ' एव ' हा शब्द अवधारणार्थक असून तो ' समासे ' या पदाशीच अन्वित होणें इष्ट आहे ( आणि म्हणूनच ' एव ' हा शब्द ' समासे ' या शब्दाच्या लगेंच पुढें घातला आहे. ) ' एव ' हा शब्द ' समासे ' या शब्दाच्या पुढें घातला नसता तर, ' समासे पतिरेव

घिसञ्ज्ञको भवति' असा अनिष्ट सूत्रार्थ होण्याचा संभव होता 'घात्वादे ष स' इत्यादि ज्ञापकाच्या आधारे प्रकृत सूत्राचा अर्थ करण्यामध्ये शब्दार्थबोध होण्यात क्लेश होणे अशा प्रकारचा प्रतिपत्तिगौरवरूप दोष आला असता ('धात्वादे ष स' सू. २२६४ या सूत्रात 'धात्वादे' या पदापुढें 'एव' हे पद घातले नसून देखील त्या सूत्राच्या आरंभसामर्थ्यानें जसा त्या सूत्राचा 'धात्वादेरेव ष स' असा नियामक अर्थ होतो त्याचप्रमाणे प्रकृत सूत्रात 'एव' हे पद घातले नसते तरी या सूत्राच्या आरंभसामर्थ्यानें 'पति समासे एव घिसञ्ज्ञो भवति' असा, वरील ज्ञापकसूत्राच्या आधारे, प्रकृत सूत्राचा नियामक अर्थ झालाच असता व त्यामुळें प्रकृत सूत्रातील 'एव' हे पद व्यर्थ ठरते असे शंकाकाराचे म्हणणे आहे या शंकेवर दीक्षित असे उत्तर देतात की, सूत्रार्थाचा निश्चितपणे बोध होण्याकरिता ज्ञापके शोधून सूत्रार्थ करण हे फार त्रासदायक असून, सूत्रार्थ स्पष्ट होण्याकरिता त्यात इष्ट शब्दाचा प्रयोग करणे हे अधिक सोयिस्कर व हितावह आहे म्हणून प्रकृत सूत्रात पाणिनीनें 'समासे' या पदापुढें जो 'एव' हा शब्द घातला आहे त्यायोगानें सूत्र वाचताक्षणींच सूत्रार्थ स्पष्ट होत असल्यामुळें व सूत्रार्थाचे निश्चित ज्ञान होण्याकरिता ज्ञापके शोधण्याचा त्रास चुकत असल्यामुळें, पाणिनीचे करण अगदी योग्य ठरत दुसर असं की, आरंभसामर्थ्यानें प्रकृत सूत्र नियमार्थक सूत्र ठरते असे मानल्यानें, पतिरेव समासे घिसञ्ज्ञक स्यात्' असा देखील नियम मानता येण संभवनीय होते तशा अनिष्ट नियमाची व्यावृत्ति व्हावी म्हणजे तसा नियम न मानता 'पति समासे एव घिसञ्ज्ञ स्यात' असाच नियम मानणे इष्ट आहे हें स्पष्ट होण्याकरिता, पाणिनीनें प्रकृत सूत्रात 'एव' हे पद 'समासे' या पदापुढें मुद्दाम घातले आहे असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे) आता 'सीतायाः पतये नमः' हा (रामरक्षेतील) प्रयोग व तसेच नष्टे मृते प्रव्रजिते क्लीबे च पतिते पतौ' हा पराशरस्मृतीतील प्रयोग हे कसे

साधु ठरतात असा कोणी प्रश्न केल्यास त्याचें उत्तर हें आहे कीं, 'पतिरित्याख्यात: पति:', या अर्थामध्यें 'पति' या प्रातिपदिकाहून ('प्रातिपदिकाद्धात्वर्थे बहुलमिष्ठवच्च' या गणसूत्रान्वयें) णिच् प्रत्यय करून टिलोप केल्यावर, म्हणजे 'पति' यांतील अन्त्य इकाराचा लोप केल्यावर, ('पत् णि=पत् इ=पति' असा जो णिजन्त धातु होतो तो अजन्त असल्यामुळें) त्याहून 'अच इः' उणादि सू. ५७८ या सूत्रानें औणादिक 'इ' प्रत्यय केला असतां (व 'णेर-निटि' सू. २३१३ या सूत्रानें णिच् प्रत्ययाचा लोप केला असतां) 'पति' असें जें कृदन्त प्रातिपदिक होतें त्याचीं 'पतये' व 'पतौ' हीं वरील श्लोकांतील रूपें आहेत. हा औणादिक 'इ' प्रत्ययान्त 'पति' शब्द लाक्षणिक असल्यामुळें, 'पति: समास एव' या सूत्रांतील प्रतिपदोक्त 'पति' शब्दानें तशा लाक्षणिक 'पति' शब्दाचें ('लक्षणप्रतिपदोक्तयो: प्रतिपदोक्तस्यैव ग्रहणम्'-परि. ११४ - या परिभाषान्वयें) ग्रहण करतां येत नाहीं. याच तऱ्हेनें 'कृष्णस्य सखिरर्जुन:' या भारतप्रयोगाचें व 'सखिना वानरेन्द्रेण' या रामायणांतील प्रयोगाचें व्याख्यान-समर्थन-करतां येतें, म्हणजे दोन्ही ठिकाणीं 'सखि' हा शब्द वरप्रमाणें 'णिच्' प्रत्यय व टिलोप करून व नंतर औणादिक 'इ' प्रत्यय करून सिद्ध झालेला लाक्षणिक शब्द आहे असें मानल्यानें त्याला 'असखि' हा पर्युदास लागू पडत नाहीं व त्यामुळें त्याला घिसंज्ञा होऊन त्याचीं 'हरि' शब्दासारखीं रूपें होतात अशा रीतीनें वरील प्रयोगाचें समर्थन करता येतें.

मनोरमा-"बहुगण"। बहुगणौ प्रातिपदिके संख्यावाचके गृह्येते। न तु संघवैपुल्यवाचकेऽपि, संख्यायते अनयेति अन्वर्थ-संज्ञाविधानात्। अत एव डतिरपि तद्धित एव गृह्यते। वतुना साहचर्याच्च। न तु पातेर्डतिः।

'बहुगणवतुडति सङ्ख्या' सू. २५८ या सूत्रांतील 'बहु' व 'गण' या शब्दांनीं त्या संख्यावाचक प्रातिपदिकांचें ग्रहण केलें

जाते 'सङ्ख्यायते अनया इति सङ्ख्या', म्हणजे जिनें मोजणी केली जाते ती 'सख्या' होय, या अर्थाची वाचक 'सख्या' ही अन्वर्थक सज्ञा असल्यामुळें, 'वैपुल्य' व 'सघ' या अर्थाचा अनुक्रमे बोध करणाऱ्या 'बहु' व 'गण' या शब्दाचे प्रकृत सूत्रातील 'बहु' व 'गण' या शब्दानी ग्रहण करता येत नाही (कारण त्या अर्थाचे वाचक 'बहु' व 'गण' हे शब्द सख्यावाचक नाहीत) आणि म्हणूनच, म्हणजे प्रकृत सूत्र हे सख्या या सज्ञेचे विधान करणारे सूत्र असल्यामुळेंच, 'डति' प्रत्ययानें देखील ('किम सङ्ख्यापरिमाणे डति च' सू १८४२ या सूत्रानें होणाऱ्या सख्यावाचक) तद्धित 'डति' प्रत्ययाचेच ग्रहण होते आणखी अस की, प्रकृत सूत्रात 'डति' प्रत्ययाला ('यसदेतेभ्य परिमाणे वतुप्' सू १८४० या सूत्रानें होणाऱ्या तद्धित) 'वतुप्' प्रत्ययाचे साहचर्य आहे (त्यामुळें देखील तद्धित 'वतुप्' प्रत्ययाच्या साहचर्यानें तद्धित 'डति' प्रत्ययाचेच ग्रहण होते व) 'पातेर्डति' उणादि सू ४९७ या सूत्रानें होणाऱ्या औणादिक 'डति' या कृत् प्रत्ययाचे ग्रहण होत नाही (म्हणून 'पति' या शब्दाला 'सख्या' ही सज्ञा होत नसून 'कति' या शब्दाला ती सज्ञा होते )

शब्दरत्न—सख्यावाचके इति । व्यापिसख्याव्यापकधर्मविशेषवाचके इत्यर्थ । न तु बहुत्व सख्या, नियतविषयपरिच्छेदहेतुत्वरूपसख्यात्वस्य तत्राभावात् । अत एव भाष्ये यदयमसख्या सख्येत्याह इत्युक्तम् । सख्यायते ऽनयेति । साक्षाद्, व्याप्य सख्याद्वारा वेत्यर्थ । अत एव । बहुगणसाहचर्येण सख्यासम्बन्ध्यर्थप्रतिपादकस्य ग्रहणादेव ॥

'बहुगणौ प्रातिपदिके सङ्ख्यावाचके गृह्येते' या मनोरमेच्या पक्तीतील 'सङ्ख्यावाचके' या पदाचा 'तीन इत्यादि सख्यांच ठिकाणी असणारा जो व्यापक धर्म त्या धर्मविशेषाचे वाचक' असा अर्थ आहे 'बहुत्व' ही सख्या नव्हे, कारण अमुक इतके असा

निश्चयात्मकरूपानें बोध करून देणें हा जो धर्म संख्येचे ठिकाणीं असतो तो 'बहु' या शब्दाचे ठिकाणीं नाहीं, आणि म्हणूनच भाष्यांत 'यदयमसङ्ख्यां सङ्ख्येत्याह' असें म्हटलें आहे. ('बहु' व 'गण' या शब्दांनीं जरी 'बहुत्व' या अर्थाचा बोध होतो तरी निश्चित संख्येचा बोध होत नाहीं. तथापि तीन इत्यादि परार्धान्त संख्यावाचक शब्दांत असणारा बहुत्वरूप व्यापक धर्म त्यांचे ठिकाणीं असल्यामुळें, ते निश्चित संख्येचा बोध करणारे नसून देखील त्यांचें प्रकृत सूत्रांत ग्रहण केलें आहे. प्रकृत सूत्रावरील भाष्यांत–सू. १–१–२३–भाष्यकार म्हणतात–'अथवा नेदं संज्ञाकरणं तद्वदतिदेशोऽयम् । बहुगणवतुडतयः सङ्ख्यावद्भवन्तीति । स तर्हि वतिनिर्देशः कर्तव्यो, न ह्यन्तरेण वतिमतिदेशो गम्यते । अन्तरेणापि वतिमतिदेशो गम्यते । तद्यथा । एष ब्रह्मदत्तः । अब्रह्मदत्तं ब्रह्मदत्त इत्याह, ते मन्यामहे ब्रह्मदत्तवदयं भवतीति । एवमिहाप्यसङ्ख्यां सङ्ख्येत्याह सङ्ख्यावदिति गम्यते ।' या भाष्याचें व्याख्यान करितांना कैयटानें 'सङ्ख्याकार्यातिदेशोऽयमित्यर्थः । यदि हि संज्ञा स्याट्टिघुभादिसंज्ञावदेकाक्षरा क्रियेत । तस्माल्लौकिकार्थाभिधायी सङ्ख्याशब्द उपादीयमानोऽतिदेशार्थत्वमस्य बोधयति ।' असें म्हटलें आहे व तसेंच उद्योतकारांनीं 'नियतविषयपरिच्छेदहेतुर्हि सङ्ख्या । एवं च बहुत्वादेरसङ्ख्यात्वमिति भावः । बहुत्वं हि त्र्यादिसङ्ख्याव्यापकमखण्डोपाधिरूपम्' असें म्हटलें आहे. याचा सारांश हा आहे कीं, प्रकृत सूत्र संज्ञाविधायक सूत्र न मानतां 'बहुगणवतुडति' हे जे संख्यावाचक शब्द नाहींत त्यांना देखील संख्येला होणारीं कार्यें व्हावीं याकरितां हें अतिदेशविधायक सूत्र केलें आहे असें मानणें उचित आहे.)

'सङ्ख्यायते अनया इति सङ्ख्या' ही अन्वर्थक संज्ञा आहे असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, निश्चित संख्येचा साक्षात् बोध करून देणारे किंवा त्र्यादिपरार्धान्त संख्येचे ठिकाणीं जो बहुत्वरूप धर्म आहे त्याच्या द्वारें संख्येचा परंपरेनें बोध करून देणारे शब्द संख्यावाचक होत. 'अत एव डतिरपि तद्धित एव गृह्यते'

या मनोरमेच्या पक्तीतील 'अत एव' या पदाचा असा अर्थ आहे की, 'बहु, गण' या शब्दाच्या साहचर्याच्या सामर्थ्याने अशात 'डति' प्रत्ययाचे ग्रहण केले जाते की, जो संख्येशी संबद्ध असणाऱ्या अर्थाचा बोधक आहे. ('पातेर्डति.' या उणादि सूत्राने होणारा 'डति' प्रत्यय संख्येशी संबद्ध असणाऱ्या अर्थाचा बोधक नसल्यामुळे, प्रकृत सूत्रातील 'डति' या प्रत्ययाने त्याचे ग्रहण करता येत नाही व तद्धित 'डति' प्रत्ययाचेच ग्रहण करता येते.)

मनोरमा- "षड्भ्यो लुक्" ॥ षड्भ्यः परयोरिति । बहुवचननिर्देशोऽर्थप्राधान्यसूचनार्थः । षडर्थगतसंख्याभिधायिनोरिति फलितोऽर्थः ।

'षड्भ्यो लुक्' सू २६१ या सूत्रात 'षड्भ्य' असा जो बहुवचनाचा निर्देश केला आहे तो अर्थप्राधान्याचा सूचक आहे. त्यामुळे 'षड्भ्य परयो जश्शसो लुक्' याचा 'षडर्थगतसङ्ख्याभिधायिनो जश्शसो लुक्', म्हणजे षट्संज्ञक शब्दापुढे येणाऱ्या व षट्संज्ञक शब्दांनी बोधित होणाऱ्या संख्येचा वाचक असणाऱ्या 'जस्' व 'शस्' या प्रत्ययाचा लुक् होतो, असा अर्थ फलित-निष्पन्न-होतो. (या पक्तीचे विवरण शब्दरत्नात केले जाईल )

शब्दरत्न- बहुवचनेनेति । अन्यथा षष इत्येव वदेत् अर्थप्राधान्येति । षट् शब्देन षट्संज्ञकः शब्दस्तदर्थसंख्याश्रयश्चेत्युभयमपि विवक्षितम् तेषां बहुत्वादिह बहुवचनम् । तत्रार्थपरत्व स्वगतसंख्यानुवादकत्वरूपं गौण तदाह-षडर्थेति । तेन गौणे न । इद प्राचामनुरोधेन । 'षड्भ्य' इति बहुवचनं 'तिसृभ्य' इतिवत् । षट्संज्ञकानां बहुत्वाच्च । न हि सर्वत्र जातिनिर्देश एवोचितः । आचार्यशैली वा । षष्शब्दस्य बहुवचनान्तस्यैव शक्तत्वाच्च । तस्मादिदं विहितविशेषणम् । परमषड्चादीनामपि संख्याप्रकारकसंख्येयविशेष्यकबोधजनकत्वेन संख्यावाचितया षट्त्वमस्त्येव । लोके गणनायां प्रसिद्धानामेव ग्रहणमित्यत्र न मानम् । उपसर्जने तु

अतिक्रान्ताद्यर्थप्राधान्यं न तु संख्याया इति न दोषः । स्पष्टं चेदं "सर्वादीनि" इति सूत्रे भाष्ये इति तत्त्वम् ।

जर केवळ शब्दपर षट्संज्ञक शब्द प्रकृत सूत्रांत विवक्षित असता तर, म्हणजे जर केवळ शब्दाला प्राधान्य विवक्षित असतें व अर्थाला प्राधान्य विवक्षित नसतें तर, पाणिनीनें 'षड्भ्यः' या ऐवजीं 'षषः' हें पद प्रकृत सूत्रांत घातलें असतें. 'अर्थप्राधान्यसूचनार्थः' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, प्रकृत सूत्रांतील 'षट्' या शब्दानें षट्संज्ञक शब्द व तसेंच त्या शब्दाच्या अर्थामध्यें भासणारी संख्या हे दोन्ही विवक्षित आहेत व हे अनेक असल्यामुळें, प्रकृत सूत्रांत 'षड्भ्यः' असा बहुवचनाचा निर्देश केला आहे. ( सारांश प्रकृत सूत्रांत 'षड्भ्यः' हा शब्द तन्त्रानें दोन अर्थांमध्यें वापरला आहे. एक 'षड्' शब्द शब्दयुक्त अर्थपर असून दुसरा 'षड्' शब्द अर्थयुक्तशब्दपर आहे. अशा रीतीनें येथें शब्द व अर्थ या दोहोंचेंहि प्राधान्य विवक्षित आहे. म्हणून प्रकृत सूत्रानें 'जस्, शस्' प्रत्ययांचा लुक् होण्याकरितां ते प्रत्यय षट्संज्ञक शब्दापुढें असले पाहिजेत व तसेंच त्या षट्संज्ञक शब्दांनीं बोधित होणाऱ्या संख्येचें ते आश्रय-प्राधान्यानें बोधक-असले पाहिजेत. जरी 'प्रत्ययः, परश्च' सू. १८०, १८१ या सूत्रान्वयें प्रत्यय अर्थापुढें होत नसून शब्दापुढें होत असतो तरी) बहुत्वसंख्यावाचक षट्संज्ञक शब्द जेव्हां बहुत्वसंख्येचा प्राधान्येंकरून बोध करतो तेव्हां तशा षट्संज्ञक शब्दापुढें येणारे 'जस्, शस्' हे प्रत्यय त्या बहुत्वसंख्येचा अनुवाद करणारे असल्यामुळें, ते प्रत्यय अर्थापुढें आले आहेत असें गौणरीत्या म्हणतां येतें. त्यामुळें जेथें षट्संज्ञक शब्द गौण-उपसर्जन-होतो तेथें त्याच्या पुढें येणाऱ्या 'जस्, शस्' प्रत्ययांचा लुक् होत नाहीं. (उदाहरणार्थ 'परमपञ्च, परमषट्' इत्यादि स्थलीं उत्तरपदार्थप्रधान तत्पुरुषसमासांत 'पञ्चन्, षष्' हे नरमावयव प्रधान असल्यामुळें, त्यांपुढील 'जस्' प्रत्ययाचा लुक् होतो. पण 'प्रियपञ्चानः, प्रियषषः' इत्यादि अन्यपदार्थप्रधान

बहुव्रीहिसमासात 'पञ्चन्, षष्' हे षट्संज्ञक शब्द अन्यपदार्थाचे उपसर्जन झाले असल्यामुळें, त्यापुढील 'जस्' प्रत्ययाचा लुक् होत नाही, कारण या दोन्ही उदाहरणांत षट्संज्ञक शब्दापुढें येणारा 'जस्' प्रत्यय षट्संज्ञक शब्दाच्या संख्येच्या बहुत्वाचा वाचक नसून अन्यपदार्थगतसंख्येच्या बहुत्वाचा वाचक आहे) दीक्षितांनी हें जे मनोरमेंत व्याख्यान केले आहे ते (प्रकाशकारादि) प्राचीन वैयाकरणांच्या मतानुसार केलें आहे (प्रकाशकारांना 'यत्र षट्संज्ञकानामेव प्रधान तत्र षड्वर्गगतसङ्ख्याभिधायिनोजश्शसो लुक्' असें प्रकृत सूत्राचें व्याख्यान करतेवेळी म्हटलें असून दीक्षितांनी त्याच मताचा मनोरमेंत अनुवाद केला आहे) वास्तविक प्रकृत सूत्रांतील 'षड्भ्य' हें बहुवचन 'तिसृभ्यो जसः' सू. ३७१३ या सूत्रांतील 'तिसृभ्य' या बहुवचनासारखें आहे व दुसरें असें की, षट्संज्ञक शब्द अनेक आहेत ('तिसृ' शब्द जरी एक आहे तरी प्रयोगभेदामुळें शब्दबाहुल्य होत असल्यामुळें, त्या शब्दाचा जसा बहुवचनांत प्रयोग केला आहे तसाच प्रकृत स्थली षट्संज्ञक शब्दाच्या बहुत्वामुळें 'षड्भ्य' असा पाणिनीनें बहुवचनाचा प्रयोग केला आहे अथवा बहुत्व शब्दे आराप्य बहुवचनं तिसृभ्य इति' असें दीक्षितांनी स्वतः मनोरमेंत म्हटलें आहे आता 'सर्वनाम्न स्मै' इत्यादि सूत्रांत जसा सर्वनाम्न' या जातीवाचक शब्दाचा एकवचनांत प्रयोग केला आहे तसाच प्रकृत सूत्रांत 'षष्' या जातिवाचक शब्दाचा एकवचनांत प्रयोग का केला नाही असें कोणी म्हटल्यास, त्यावर शब्दरत्नकार असें उत्तर देतात की,) सर्वत्र जातिवाचक शब्दानें एकवचनांत निर्देश करावा असा कांही नियम नाही व असा तन्हेनें नेहमी निर्देश करण्याची आचार्य पाणिनीची पद्धति देखील नाही (कारण 'सर्वादीनि सर्वनामानि' या सूत्रांत 'सर्वनाम' या जातिवाचक शब्दाचा पाणिनीनें बहुवचनांत निर्देश केलेला आढळतो) आणखी असें की, बहुवचनान्त 'षष्' शब्दाचें ठिकाणीच संज्ञाशास्त्र आहे म्हणजे बहुवचनान्त 'षट्' शब्दालाच षट्संज्ञा आहे. म्हणून (इष्ट रूपाची सिद्धि व्हावी याकरितां

'तस्मादित्युत्तरस्य' सू. ४१ या सूत्राची प्रकृत स्थलीं प्रवृत्ति न करितां व 'षड्भ्य:' ही परपञ्चमी न मानतां) 'षड्भ्य:' ही विहित-पञ्चमी मानणेंच योग्य आहे. (असें मानलें असतां, 'षट्संज्ञकेभ्यो' विहितयो: जश्शसो: लुक् स्यात्' असा प्रकृत सूत्राचा अर्थ होतो.) 'परमपञ्च' इत्यादि शब्द देखील ज्यांची संख्या सांगितली जाते अशा विशेष्यांचा, म्हणजे 'पञ्चन्' इत्यादि विशेष्यांचा, बोध करून देणारें असल्यामुळें, देखील संख्यावाचक ठरतात व त्यांनाहि षट्संज्ञा होतेच. लौकिक व्यवहारांत गणना करण्याकरितां उपयोगीं पडणाऱ्या प्रसिद्ध शब्दांचेंच, षट्संज्ञेच्या विषयांत, ग्रहण करतां येतें असें मानण्यास कांहींच प्रमाण नाहीं. (म्हणून 'पञ्चन्, षष्' हे नान्त षान्त संख्यावाचक शब्द जसें 'ष्णान्ता षट्' सू. ३६१ या सूत्रान्वयें षट्संज्ञक ठरतात त्याचप्रमाणें 'परमपञ्च' परमषट्' इत्यादि शब्द देखील, वर दिलेल्या कारणान्वयें, षट्संज्ञक ठरतात.) जेथें अतिक्रान्त इत्यादि अर्थाला प्राधान्य येत असून संख्या प्रधान ठरत नाहीं व संख्यावाचक षट्संज्ञक शब्द उपसर्जन होतो तेथें कांहीं दोष येत नाहीं, म्हणजे तसा उपसर्जन झालेल्या षट्संज्ञक संख्यावाचक शब्दापुढें आलेल्या 'जस्, शस्' प्रत्ययांचा लुक् होऊं शकत नाहीं. वर जें विवेचन केलें आहे तें 'सर्वादीनि सर्वनामानि' सू. १-१-२७ या सूत्रावरील भाष्यान्वयें योग्य ठरतें. ('परमपञ्च' या पदाचा 'मुख्य पांच' असा अर्थ आहे. यांत 'पञ्चन्' हा षट्संज्ञक संख्यावाचक शब्द प्रधान आहे व तो 'परम' या विशेषणानें विशेष्य आहे, व अशा रीतीनें 'परमपञ्च' हा शब्द ज्यांची संख्या सांगितली जाते अशा 'पञ्च' या विशेष्याचा बोध करून देणारा असल्यामुळें, तो देखील षट्संज्ञक ठरतो व त्यामुळें त्याच्यापुढील 'जस्' प्रत्ययाचा लुक् होतो. परंतु 'प्रियषष:, अतिषष:' इत्यादि स्थलीं 'षष्' हा संख्यावाचक षट्संज्ञक शब्द अन्यपदार्थाचा उपसर्जन होत असल्यामुळें, समुदाय षट्संज्ञक ठरत नाहीं व अशा समुदायापुढें आलेल्या 'जस्, शस्' प्रत्ययांना प्रकृत सूत्रानें होणारा

लुक्' होत नाही. 'सर्वादीनि सर्वनामानि' या सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात–'अथवाङ्गाधिकारे यदुच्यते गृह्यमाण-विभक्तेस्तद्भवति । यद्येव परपञ्च परमसप्त षड्भ्यो लुक् इति लुग्न प्राप्नोति । नैष दोषः । षट्प्रधान एष समासः ।' या भाष्याचा भावार्थ हा आहे की, अङ्गाधिकारात पठित असलेल्या सूत्रांनी जें कार्य होणे सांगितले आहे ते त्या सूत्रात उच्चारलेल्या शब्दाला ज्या ठिकाणी विभक्तिप्रत्यय लावला आहे तशाच शब्दाला होते पण असे मानले तर, 'परमपञ्च, परमसप्त' या उदाहरणात 'षड्भ्यो लुक्' या सूत्राने लुक्ची प्राप्ति होत नाही. पण हा दोष येत नाही; कारण 'परमपञ्च, परमसप्त' या समासामध्ये षट्संज्ञक शब्दच प्रधान आहे हे भाष्य प्रकृत स्थली प्रवृत्त केले असता असा अर्थ होतो की 'षड्भ्यो लुक्' हे सूत्र अङ्गाधिकारात पठित असून त्या सूत्रात उच्चारलेल्या 'षष्'–षट्संज्ञक–शब्दाला विभक्तिप्रत्यय लावला असल्यामुळें, तशा षट्संज्ञक शब्दाहून होणाऱ्या 'जस्, शस्' या विभक्तिप्रत्ययाचा लुक् होतो 'परमपञ्च, परमषट्' इत्यादि स्थली जरी समुदायाहून 'जस्' प्रत्यय होतो तरी त्या समुदायात 'पञ्च, षट्' हे षट्संज्ञक शब्द प्रधान असल्यामुळें, त्या समुदायाला षट्संज्ञा होते व 'जस्' प्रत्यय तशा षट्संज्ञक समुदायाहून झालेला असल्यामुळें, त्याचा प्रकृत सूत्राने लुक् होण्यात काहीं अडचण येत नाही प्रकृत सूत्रावरील उद्योतात 'परे तु गृह्यमाण-विभक्तेरित्यस्य गृह्यमाणाद्विहितविभक्तेरित्येवार्थं परमपञ्चे त्यादेर्लोके गणनाया व्यवहाराभावेन षट्त्वाभाव इति लुगप्राप्तिरिति प्रश्न । सङ्ख्याप्रकारत्वसङ्ख्येयविशेष्यकबोधजनकत्वेन विशिष्ट-स्यापि षट्त्वमस्त्येव । गणनायां प्रसिद्धानामेवेह सङ्ख्यावाचिनां ग्रहणमित्यत्र न मानमित्युत्तरम् षट्प्रधान इत्यस्य स्वाभिमत-षडर्थप्रधानोऽन्त्यः समुदायोऽपि षट्संज्ञ इत्यर्थः ।' असे म्हटले आहे व याचाच अनुवाद शब्दरत्नांत केला आहे यावरून हे स्पष्ट होते कीं, प्रकृत सूत्रांतील 'षड्भ्य' ही वास्तविक विशिष्टपञ्चमी आहे

व ज्या समासांत षट्संज्ञक शब्द चरमावयव असून प्रधान आहे तसा समासरूप समुदाय देखील षट्संज्ञक ठरतो व तशा समुदायाहून होणाऱ्या 'जस्, शस्' प्रत्ययांचा देखील प्रकृत सूत्रानें लुक् होतो.)

**मनोरमा**—"प्रत्ययलोपे" ॥ स्थानिवत्सूत्रेण सिद्धे नियमार्थमिदम् । प्रत्ययस्यासाधारणं यत्र रूपं प्रयोजकं तदेव कार्यं प्रत्ययलोपे सति भवति । न तु प्रत्ययाप्रत्ययसाधारणमिति । तेन शोभना दृषदोऽस्य सुदृषत् प्रासाद इत्यत्र 'अत्वसन्तस्य' इति दीर्घो न । यद्वा । यत्र प्रत्ययः प्राधान्येनाश्रीयते तत्राल्विधिरेऽपि विध्यर्थमिदम् । तेन अतृणेडित्यत्र हलादौ पिति सार्वधातुके विहित इम् लुप्तेऽपि तस्मिन् भवति । 'वर्णाश्रये नास्ति प्रत्ययलक्षणम्' इति तु वर्णप्राधान्यविषयकम् । तेन गवे हितं गोहितमित्यत्र अव् न ॥

'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' सू. २६२ या सूत्रानें जें सांगितलें आहे तें 'स्थानिवदादेश:' सू. ४९ या सूत्रानें सिद्ध होत असून देखील हें सूत्र मुद्दाम पठित केलें असल्यामुळें, हें नियमार्थ सूत्र ठरतें (या पंक्तींचें विवरण शब्दरत्नांत केलें जाईल) व या नियमाचें स्वरूप असें आहे कीं, जेथें प्रत्ययाच्या प्रत्ययत्वरूप असाधारण धर्मामुळें तो प्रत्यय एखाद्या कार्याचें निमित्त होतो तशाच ठिकाणीं, त्या प्रत्ययाचा लोप झाला असतां देखील, त्या प्रत्ययाच्या निमित्तानें होणारें कार्य करतां येतें. परंतु जेथें प्रत्यय व अप्रत्यय या दोहोंत साधारण असणारें रूप एखाद्या कार्याचें निमित्त होत असेल व प्रत्ययाचा लोप झाला असेल, तर तशा ठिकाणीं प्रत्ययनिमित्तक कार्य करतां येत नाहीं. असा नियम असल्यामुळें, 'शोभना: दृषद: अस्य स: सुदृषत् प्रासाद:' या स्थलीं 'अत्वसन्तस्य चाधातो:' सू. ४२५ या सूत्रानें होणारें उपधादीर्घकार्य होत नाहीं. ('सु जस् अस् दृषद् जस् सु' या स्थलीं 'सुपो धातुप्रातिपदिकयो:' सू. ६५० या सूत्रानें अन्तर्वर्ति 'जस् = अस्' या विभक्तिप्रत्ययांचा लुक् झाल्यावर 'सु दृषद् सु' अशी स्थिति झाली असतां, 'दृषद्' पुढील ज्या

'जस् = अस्' प्रत्ययाचा लुक् झाला आहे तो 'अस्' प्रत्यय प्रत्ययलक्षणानें कायम आहे असे मानल्यास, 'सुदृपद् अस् = सुदृपदस्' असे असन्त अङ्ग होते व त्यापुढें प्रथमेच्या एक-वचनाचा 'सु' प्रत्यय असल्यामुळें 'अत्वसन्तस्य चाधातो' या सूत्रानें उपधादीर्घकार्य पावतें परंतु 'अत्वसन्तस्य' या सूत्रात ज्या 'अस्' चे ग्रहण केले आहे ते 'अस्' प्रत्यय या रूपानें केले नसून 'अस्' शब्द या रूपानें केले आहे व 'अस्' हा शब्द प्रत्यय व अप्रत्यय अशा दोन्ही प्रकारचा असू शकतो उदाहरणार्थ 'चन्द्रमस्, यशस् पयस्' इत्यादि असन्त अङ्गाचे अन्ती जो 'अस्' आहे तो प्रत्यय नव्हे तसेच 'अस्' हा धातु देखील आहे पण 'जस् = अस्' हा प्रत्यय आहे. यावरून हे स्पष्ट होते की, 'अस्' याचे स्वरूप असे आहे की, जें प्रत्यय व अप्रत्यय या दोन्ही ठिकाणी सापडणारे, म्हणजेच प्रत्ययाप्रत्ययसाधारण, रूप आहे त्यामुळें वरील उदाहरणात ज्या 'अस्' प्रत्ययाचा लुक् झाला आहे तो 'अस्' प्रत्यय प्रत्ययलक्षणानें विद्यमान आहे असे मानता येत नाही आणि म्हणून उपधादीर्घकार्य प्रयोजक असबुद्धि 'सु' प्रत्यय अङ्गापुढें असून देखील 'अस्' प्रत्यय विद्यमान आहे असे मानता येत नसल्यामुळें, या स्थली उपधा-दीर्घकार्य होऊ शकत नाही प्रकृत सूत्रावरील भाष्यात देखील भाष्यकार म्हणतात-'न तर्हीदानीमय योगो वक्तव्य ? । वक्तव्यश्च । किं प्रयोजनम् ? । प्रत्यय गृहीत्वा यदुच्यते तत् प्रत्ययलक्षणेन यथा स्यात् । शब्द गृहीत्वा यदुच्यते तत् प्रत्ययलक्षणेन मा-भूदिति । किं प्रयोजनम् ? । शोभना दृषदोऽस्य सुदृपदब्राह्मण सामंनसी अलोमोषसी इत्येष स्वरो मा भूदिति ।' या भाष्याचा थोडक्यात भावार्थ हा आहे की, 'सुदृपद्' या बहुव्रीहिसमासात 'दृषद' या उत्तरपदापुढील ज्या 'जस्' प्रत्ययाचा लुक् झाला आहे तो 'जस् = अस्' प्रत्यय प्रत्ययलक्षणानें विद्यमान आहे असे मानल्यास, उत्तर पद असन्त ठरेल व 'सामंनसी' सू ३८५१ या

सूत्रानें उत्तर पदाला आद्युदात्त स्वर होण्याची आपत्ति येईल. तो स्वर न व्हावा असा या नियमाचा उपयोग आहे. या भाष्याला धरूनच मनोरमेंतील वरील पंक्ति लिहिली आहे.) अथवा जेथें प्रत्ययाचा प्राधान्येंकरून आश्रय केला असेल तेथें अल्विधि होत असला तरी, तसा अल्विधि करतां यावा याकरितां प्रकृत सूत्र केलें आहे असें मानावें. तसें मानल्यानें 'अतृणेड्' या उदाहरणांत हलादि पित् सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना होणारा 'इम्' हा आगम, तशा प्रत्ययाचा लोप झाला तरी, होतो. ('अ तृह् त्' या स्थलीं 'तृह्' धातु रूधादिगणांत पठित असल्यामुळें, 'रुधादिभ्यः श्नम्' सू. २५४३ या सूत्रानें 'श्नम् = न' हें विकरण लागतें व तें मित् असल्यामुळे 'मिदचोऽन्त्यात्परः' सू. ३७ या सूत्रान्वयें 'तृह्' यांतील ऋकारापुढें लागून व 'ऋवर्णान्नस्य णत्वं वाच्यम्'— सू. २८२ वरील वार्तिक—या वार्तिकान्वयें त्यांतील नकाराचें णत्व होऊन 'अतृणह् त्' अशी स्थिति झाली असता, 'हल्ङ्याब्भ्यः' सू. २५२ या सूत्रानें 'त्' या अपृक्त प्रत्ययाचा लोप होतो. 'तृणह इम्' सू. २५४५ हें सूत्र जरी 'हल्ङ्याब्भ्यः' या सूत्राच्या मानानें परसूत्र आहे तरी, 'सर्वविधिभ्यो लोपविधिरिड्विधिश्च बलीयान्'—परि. १००—या परिभाषान्वयें लोपविधि बलवत्तर ठरत असल्यामुळें, 'त्' या अपृक्त प्रत्ययाचा लोप प्रथम होतो. त्या प्रत्ययाचा लोप झाल्यावर तो हलादि पित् प्रत्यय कायम आहे असें प्रत्ययलक्षणानें मानल्यानें, 'तृणह इम्' सू. २५४५ या सूत्रानें 'इम् = इ' हा मित् आगम होऊन व 'आद्गुणः' सू. ६९ या सूत्रानें गुणरूप एकादेश होऊन व 'हो ढः' सू. ३२४ या सूत्रानें अन्त्य हकाराचें ढत्व होऊन आणि नंतर 'झलां जशोऽन्ते' सू. ८४ या सूत्रानें ढकाराचें जश्त्व होऊन 'अतृण इ ह = अतृणेह् = अतृणेढ् = अतृणेड्' असें इष्ट रूप सिद्ध होतें. या उदाहरणांत ज्या 'त्' प्रत्ययाचा लोप झाला आहे तो अल् आहे व त्या अल्रूप प्रत्ययाच्या निमित्तामुळें होणारा इमागमविधि अलाश्रयविधि ठरतो

म्हणून 'स्थानिवदादेशः' सू. ४९ या सूत्रात 'अनल्विधौ' हा प्रतिषेध असल्यामुळें, या स्थली 'तृ' प्रत्यय कायम आहे असें स्था मूत्रानें स्थानिवद्भावानें मानता येत नाही. तथापि तसे मानता यावे व अल्विधि होत असला तरी, लुप्त प्रत्यय कायम आहे असें प्रत्ययलक्षणानें मानता यावे यावरितां प्रकृत सूत्र केलें आहे असें समजावे असे दीक्षितांचे म्हणणे आहे. प्रकृत सूत्रावरील भाष्यात देखील भाष्यकार म्हणतात — 'यत्र तर्हि स्थानिवद्भावो नास्ति तदर्थमयं योगो वक्तव्यः । क्व च स्थानिवद्भावो नास्ति ? । योऽल्विधिः । किं प्रयोजनम् ? । प्रयोजनं डौनक्कारलोपेत्त्वेम्विधयः ।' व या भाष्याला धरूनच दीक्षितांनी वरील पंक्ति लिहिली आहे. ) 'वर्णाश्रये नास्ति प्रत्ययलक्षणम्' — परि. २१ — ही परिभाषा जेथें वर्णाला प्राधान्य देऊन कार्य होणे सांगितले आहे तशाच ठिकाणी लागू पडते. त्यामुळें 'गवे हितम् = गोहितम्' या स्थली अवादेश होत नाही. ( 'गो ङे हित सु' या स्थली 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' सू. ६५० या सूत्रानें 'ङे = ए' व 'सु' या अन्तर्वर्ति विभक्तिप्रत्ययाचा लुक् झाल्यावर 'ङे = ए' हा प्रत्यय कायमच आहे असे प्रत्ययलक्षणानें मानल्यास, 'एचोऽयवायावः' सू. ६१ या सूत्रानें 'गो' यातील ओकाराचे जागी अवादेश पावतो व 'गव्हित' असे अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येते. परंतु 'एचोऽयवायावः' या सूत्राने जें आदेशरूप कार्य होणे सांगितले आहे तें अजादि प्रत्यय पुढें असताना होणे सांगितले नसून अच्रूप वर्ण पुढें असताना ए, ओ, ऐ, औ या वर्णांना होणे सांगितले आहे. हें कार्य प्रत्ययनिमित्तक नसून वर्णनिमित्तक असल्यामुळें, या स्थलीं 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' हे प्रकृत सूत्र लागू पडत नाही. त्यामुळें ज्या 'ङे=ए' प्रत्ययाचा लुक् झाला आहे तो प्रत्ययलक्षणानें विद्यमान आहे असे मानता येत नाही आणि त्यामुळें अवादेश होण्याची आपत्ति टळते. )

शब्दरत्न— सिद्धे इति । "तृणह" इति सूत्रे 'अचि' 'न' इत्यनुवृत्त्या तृणहानीत्यादिष्वावृत्तौ 'हलि' इत्यननुवृत्त्या अतृणेडि-

स्यस्य सिद्धिः । 'शास इत्' 'अङि' । अजादौ ङ्किति चेदङ्येवेति नियमेनाजादिव्यावृत्तौ तत्र हल्ग्रहणाकरणेन मित्रशीरित्यस्य सिद्धिरेवमन्यत्रापीति भावः । प्रत्ययस्यासाधारणमिति । इदं द्वितीयप्रत्ययग्रहणेन लभ्यते । यत्र प्रत्ययस्य विशेष्यत्वं तत्रैवेति नियमस्तु न । राजेत्यादौ पदत्वानापत्तेः । दीर्घो नेति । असौ लुकः स्थानिवत्त्वेनासत्त्वे ऽपीति शेषः । न चातुसाहचर्याच्छ्रूयमाणासन्त एव दीर्घ इति वाच्यम् । तदनित्यत्वस्याप्यनेन ज्ञापनात् ।

'तृणह इम्' सू. २५४५ या सूत्रांत 'अचि' व 'न' या दोन पदांची अनुवृत्ति केल्यानें 'तृणह्यानि' या स्थलीं इमागम होण्याची आपत्ति टळत असून, त्या सूत्रांत 'हलि' या पदाची अनुवृत्ति न केल्यानें 'अतृणेड्' या रूपाची सिद्धि होते, म्हणजे या स्थलीं इमागम होऊन इष्ट रूप सिद्ध होतें. तसेंच ('शास इदङ्हलोः' सू. २४८६ या सूत्राऐवजीं) 'शास इत् अङि' एवढेंच सूत्र केलें व अजादि कित् किंवा ङित् प्रत्यय पुढें आला असतां जर 'शास्' यांतील उपधेचा इकार करणें आहे तर 'अङ्' हा अजादि ङित् प्रत्यय पुढें आला असतांनाच तें कार्य करावें असा त्या सूत्राचा नियामक अर्थ केल्यानें इतर अजादि प्रत्ययांची व्यावृत्ति होते, म्हणजे इतर अजादि प्रत्यय पुढें आल्यास 'शास्' यांतील उपधेचा इकार होणें टळतें व त्या सूत्रांतून 'हल्' हें पद गाळल्यानें 'मित्रशीः' या रूपाची सिद्धि करतां येते. अशाच तऱ्हेनें जेथें इतर उदाहरणांत प्रत्ययलक्षण मानण्याची आवश्यकता आहे तीं सर्व उदाहरणें इतर रीतीनें सिद्ध करतां येणें शक्य आहे असा 'स्थानिवत्सूत्रेण सिद्धे नियमार्थमिदम्' असें जें दीक्षितांनीं मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ आहे. (शंकाकाराची शंका अशी आहे कीं, जेथें एखादें सूत्र इतर सूत्र असल्यामुळें गतार्थ होत असून व्यर्थ ठरण्याचा संभव आहे तशाच ठिकाणीं तें सूत्र 'सिद्धे सत्यारम्भो नियमार्थः' या न्यायान्वयें नियमार्थक मानतां येतें. 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' हें प्रकृत सूत्र

असे नाही की, 'स्थानिवदादेश' हे सूत्र असल्यामुळें ते गतार्थ होऊन व्यर्थ ठरू पाहते. कारण 'स्थानिवदादेश' हे सूत्र असून देखील त्या सूत्रानें सर्व इष्ट रूपाची सिद्धि होऊ शकत नाही व ज्या रूपाची त्या सूत्रानें सिद्धि होऊ शकत नाहीं त्या रूपाची सिद्धि होण्याकरिता प्रकृत सूत्र असणे आवश्यक आहे व अशा रीतीनें प्रवृत्त सूत्र आवश्यक ठरत असल्यामुळें ते नियमार्थक सूत्र आहे असे जें दीक्षितानी मनोरमेंत म्हटले आहे ते म्हणणे बरोबर मानता येत नाही या शकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, 'स्थानिवदादेश.' या सूत्रानें अनेक रूपाची सिद्धि होऊ शकते व ज्या थोड्या रूपाची त्या सूत्रानें सिद्धि होऊ शकत नाही ती रूपें, 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' हे प्रवृत्त सूत्र नसून देखील, इतर रीतीनें सिद्ध करता येतात उदाहरणार्थ 'अतृणेड्' व 'मित्रध्री' या दोन्ही उदाहरणात अलाश्रयविधि करणे असल्यामुळें जरी 'स्थानिवदादेश.' हे सूत्र 'अनल्विधौ' या प्रतिषेधामुळें प्रवृत्त होऊ शकत नाही तरी, 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' हे प्रकृत सूत्र न मानता देखील, ती दोन्ही रूपें इतर रीतीनें सिद्ध करता येतात 'तृणह इम्' सू २५४५ या सूत्रात 'नाभ्यस्तस्याचि पिति सार्वधातुके' सू २५०३ या पूर्वसूत्रातून 'पिति सार्वधातुके' एवढ्याच दोन पदाची अनुवृत्ति न करिता त्या सूत्रातून 'अचि न' या दोन पदाची देखील अनुवृत्ति केली व या सूत्रात 'उतो वृद्धिर्लुकि हलि' सू २४४३ या पूर्व सूत्रातून 'हलि' या पदाची अनुवृत्ति न केली तर, 'अतृणहत्' या स्थली 'हल्ङ्याब्भ्य' सू २५२ या सूत्रानें 'त्' या अपृक्त प्रत्ययाचा लोप झाल्यावर अङ्गापुढें अजादि प्रत्यय नसल्यामुळें, त्या अङ्गाला इमागम होण्यात काहीच अडचण येत नाही व तो आगम होण्याकरिता 'त्' या लुप्त प्रत्ययाचे ठिकाणीं प्रत्ययलक्षण मानण्याची मुळीच गरज पडत नाहीं 'तृणह् आनि = तृणहानि' या स्थली जरी 'तृणह्' या अङ्गापुढें सार्वधातुक व 'आडुत्तमस्य पिच्च' सू २२०४ या सूत्रानें पित् असणारा 'आनि' हा प्रत्यय आहे तरी, तो अजादि

असल्यामुळें, 'अचि न' या निषेधान्वयें 'तृणह्' या अङ्गाला इमागम होण्याची आपत्ति सहज टाळतां येते. तसेंच 'मित्राणि शास्तीति मित्रशी: = मित्र शास् क्विप् सु' या स्थलीं 'वेरपृक्तस्य' सू. ३७५ या सूत्रानें 'क्विप् = व्' या अपृक्त प्रत्ययाचा लोप झाल्यावर 'हल्ङ्याब्भ्य:' सू. २५२ या सूत्रानें 'सु' प्रत्ययाचा लोप केला असतां 'मित्र शास्' अशी जेव्हां स्थिति होते तेव्हां 'शास्' या अङ्गापुढें 'अङ्' प्रत्यय नसल्यामुळें, 'शास इदङ्हलो:' सू. २४८६ असें सूत्र पठित न करितां 'शास इदङि' असें तें सूत्र पठित केलें व तें सूत्र नियमार्थ मानून जर 'शास्' या अङ्गापुढें अजादि कित् किंवा ङित् प्रत्यय आला असतां त्या अङ्गांतील उपधेचा इकार होणें असेल तर तो इकार 'अङ्' हा अजादि ङित् प्रत्यय पुढें असतांनाच होतो असा त्या सूत्राचा नियामक अर्थ केला तर, इतर अजादि कित् किंवा ङित् प्रत्ययांची आपोआपच निवृत्ति होते व 'शास् इदङ्हलो:' या सूत्रांतून 'हल्' हें पद गाळलें तरी 'मित्रशास्' यांतील उपधेचा इकार होऊन 'मित्रशिस्' असें रूप झालें असतां 'ससजुषो रु:' सू. १६२ या सूत्रानें पदान्तीं असलेल्या सकाराचें रुत्व होऊन व 'र्वोरुपधाया दीर्घ इक:' सू. ४३३ या सूत्रानें उपधेंतील इकार दीर्घ होऊन आणि 'खरवसानयोर्विसर्जनीय:' सू. ७६ या सूत्रानें अन्त्य रेफाचा विसर्ग होऊन 'मित्रशी:' असें इष्ट रूप सिद्ध होऊं शकतें. प्रकृत सूत्रावरील भाष्यांत देखील 'इत्वमपि। वक्ष्यत्येतत् शास इत्वे आशास: क्वौ इति। इग्विधिरपि। हलीति निवृत्तम्। यदि हलीति निवृत्तं तृणहानि अत्रापि प्राप्नोति। एवं तर्ह्यचि नेत्यनुवर्तिष्यते।' असें भाष्यकारांनी म्हटलें आहे. त्या भाष्यांत दिलेलें 'आशास: क्वौ' हें वचन वार्तिक असून 'अन्त:' सू. ३१८४ या सूत्रावरील कौमुदींत तें पठित केलें आहे. भाष्यकारांच्या म्हणण्याचा आशय हा आहे कीं, 'आशी:' इत्यादि रूपांत जरी 'शास इदङ्हलो:' या सूत्रानें इत्व झालें नाहीं तरी कांहीं हरकत नाहीं; कारण तेथें इत्व होण्या-

करिता वार्तिककारानें 'क्षाशास: क्वौ' हे वार्तिक पठित केले आहे. या भाष्याला धरूनच शब्दरत्नातील वरील पंक्ति लिहिली आहे. सारांश 'स्थानिवदादेश:' या सूत्रानें जी कांही थोडी रूपें सिद्ध होऊं शकत नाहीत ती 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' हे सूत्र नसता देखील सिद्ध होऊ शकत असून ते सूत्र मुद्दाम केले असल्यामुळें नियमार्थक सूत्र ठरतें असा दीक्षिताच्या म्हणण्याचा भावार्थ आहे असे शब्दरत्नकार म्हणतात.) 'प्रत्ययस्यासाधारण यत्र रूप प्रयोजक तदेव कार्य प्रत्ययलोपे सति भवति' असे जें मनोरमेंत म्हटले आहे ते प्रकृत सूत्रांत द्वितीय 'प्रत्यय' शब्दाचे जें ग्रहण केले आहे त्यावरून सिद्ध होते. ('प्रत्ययलोपे तल्लक्षणम्' असे सूत्र न करिता पुन्हा त्या सूत्रात 'प्रत्यय' शब्दाचे ग्रहण करून 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' असे जें सूत्र केले आहे ते अशाकरिता की, जेथें ज्या प्रत्ययाचा लोप झाला आहे तेथें तो प्रत्यय वर्णाचे विशेषण होत नसून प्रत्ययत्वरूपधर्मानें प्राधान्येंकरून कार्याचे निमित्त होतो तशाच लुप्त प्रत्ययाचे ठिकाणी प्रत्ययलक्षण करता येते. 'सुदृषत्' या स्थली ज्या 'अस्' या अन्तर्वर्ति विभक्तिप्रत्ययाचा लुक् झाला आहे तो उपधादीर्घकार्याचे निमित्त नसून त्या कार्याचा कार्यी असल्यामुळें व 'सु' हा प्रत्यय त्या कार्याचे निमित्त असल्यामुळें, 'अस्' प्रत्ययाचे ठिकाणी प्रत्ययलक्षण करता येत नाही व 'सुदृषत्' हे अङ्ग प्रत्ययलक्षणानें असन्त मानता येत नाही) जेथें एखादें कार्य करितांना प्रत्यय विशेष्यरूपानें त्या कार्याचे निमित्त असतो तशाच ठिकाणी त्या प्रत्ययाचा लोप झाला असता, प्रत्ययलक्षण करता येते असा नियम, म्हणजे असे नियमाचे स्वरूप, मानू नये. तसा नियम मानल्यास, 'राजा' इत्यादि स्थली पदसंज्ञा न होण्याची आपत्ति येते. ('राजन् सु' या स्थली 'सर्वनामस्थाने चासम्बुद्धौ' सू. २५० या सूत्रानें उपधा दीर्घ होऊन व नंतर 'हल्ङ्याब्भ्य:' सू. २५२ या सूत्रानें 'सु' प्रत्ययाचा लोप होऊन 'राजान्' असे रूप झाले असता, 'सुप्तिङन्तं पदम्' सू. २९ या सूत्रात प्रत्ययवाचक 'सुप्' हे

पद विशेष्य नसल्यामुळें, वरप्रमाणें नियमाचें स्वरूप मानल्यास, लुप्त 'सु' प्रत्ययाचे ठिकाणीं प्रत्ययलक्षण करतां येणार नाहीं व त्यामुळें 'राजान्' याला पदसंज्ञा होणार नाहीं आणि 'न लोपः प्रातिपदिकान्तस्य' सू. २३६ या सूत्रानें पदान्तीं असलेल्या नकाराचा होणारा लोप होऊं शकणार नाहीं. म्हणून ज्या प्रत्ययाचा लोप झाला आहे तो प्रत्यय विशेष्यरूपानें सूत्रांत निर्दिष्ट असला पाहिजे असा नियम मानूं नये.) 'अत्वसन्तस्य इति दीर्घो न' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्यापूर्वी 'असो लुकः स्थानिवत्त्वेनासन्तत्वेऽपि' हीं पदें अध्याहृत आहेत — म्हणजे ज्या 'अस्' प्रत्ययाचा लुक् झाला आहे तो प्रत्यय स्थानिवद्भावानें विद्यमान आहे असें मानल्यानें अङ्ग असन्त आहे असें मानतां येतें तरी, तो प्रत्यय प्रत्ययस्वरूप धर्मानें उपधादीर्घकार्याचें निमित्त नसल्यामुळें, त्याचे ठिकाणीं प्रत्ययलक्षण करतां येत नाहीं व त्यामुळें अङ्ग असन्त ठरत नाहीं व उपधादीर्घ-कार्य होत नाहीं. 'अत्वसन्तस्य चाधातोः' सू. ४२५ या सूत्रांत 'अस्' याला 'अतु' याचें साहचर्य असल्यामुळें, ज्याप्रमाणें 'अतु' अङ्गाच्या अन्तीं श्रूयमाण असतांनाच उपधादीर्घकार्य होतें त्याच-प्रमाणें 'अस्' हा अङ्गाच्या अन्तीं श्रूयमाण असतांनाच उपधादीर्घ-कार्य होऊं शकतें असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण 'अत्वसन्तस्य चाधातोः' या सूत्रावरूनच हें देखील ज्ञापित होतें कीं, 'सहचरितासहचरितयोः सहचरितस्यैव ग्रहणम्' — परि. ११२—ही परिभाषा अनित्य आहे. (शंकाकाराचें असें म्हणणें आहे कीं, प्रकृत सूत्र नियमार्थक न मानल्यास 'सुदृपत्' या स्थलीं उपधा दीर्घ होण्याची आपत्ति येते असें जें दीक्षितांनीं मनोरमेंत म्हटलें आहे तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण प्रकृत सूत्र नियमार्थक न मानलें तरी, 'सुदृपत्' या स्थलीं 'अस्' प्रत्ययाचा लुक् झाला असल्यामुळें ज्या अर्थी तो 'अस्' प्रत्यय अङ्गाच्या अन्तीं श्रूयमाण नाहीं त्या अर्थीं, उपधादीर्घ होण्याची आपत्ति मुळीच येत नाहीं. 'अत्वसन्तस्य' या सूत्रांत 'अतु' व 'अस्' हे दोन्ही एकत्र

उच्चारले असल्यामुळें, ज्याप्रमाणें श्रूयमाण असन्त अङ्गाच्या उपधेचा दीर्घ होतो त्याचप्रमाणे साहचर्यन्यायान्वयें श्रूयमाण असन्त अङ्गाच्या उपधेचा दीर्घ होतो असे मानलें पाहिजे व असे मानल्यानें, 'सुदृपत्' या स्थली श्रूयमाण असन्त अङ्ग नसल्यामुळें, दीक्षितांनी दिलेली आपत्ति उद्भवतच नाही. या शंकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, ज्या साहचर्यपरिभाषेच्या आधारावर शंकाकारानें वरील शंका उपस्थित केली आहे ती परिभाषा अनित्य असल्यामुळे, दीक्षितांनी दिलेली आपत्ति अयोग्य आहे असे मानता येत नाही. ती परिभाषा अनित्य आहे याचे 'अत्वसन्तस्य' हे सूत्रच ज्ञापक आहे; कारण जसा 'अतु' प्रत्यय नेहमी श्रूयमाण असतो तसा 'असु' नेहमी श्रूयमाण राहत नसून देखील दोहोंचे या सूत्रात एकत्र ग्रहण केले आहे. दुसरे असे की, शंकाकाराचे म्हणणे बरोबर मानल्यास, 'सुदृपत्' या स्थली 'सोर्मनसी' सू. ३८५१ या सूत्रानें उत्तर पदाला आद्युदात्त स्वर होण्याची आपत्ति येते असा दोष ज्या भाष्यात दिला आहे त्या भाष्याशी विरोध येतो. सारांश दीक्षितांनी दिलेली आपत्ति योग्य आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे )

शब्दरत्न– प्राधान्येनेति । तत्त्व च वर्णाविशेषणत्वरूपम् । एतच्च 'स्थानिवत्' इत्यनुवृत्त्यैव सिद्धे प्रत्ययलक्षणमित्येतत्सामर्थ्यालब्धम् । इमिति । मित्रशीरित्यादौ हलादौ ङ्किति विधीयमानमित्त्वं च सिध्यतीत्यपि बोध्यम् । वर्णप्राधान्येति । वर्णस्य तत्त्वं च प्रत्ययनिरूपितविशेष्यत्वमितराविशेषणत्व च । अण् योऽकार इत्याद्यर्थके "टिड्ढाणञ्" इत्यादौ "इको यणचि" इत्यादौ च । तत्रान्त्यमुदाहरति–तेनेति । आद्योदाहरणं तु चित्रायां जाता चित्रेत्यादावण् योऽकारस्तदन्तादिति विहितो ङीब् नेति बोध्यम् । न च गोहितमित्यत्र "न लुमता" इति निषेधः । लुप्तप्रत्ययनिमित्तकाङ्गोद्देश्य ककार्ये एव तेन निषेधात् । अत एवोत्क्रामेत्यादौ "क्रमः परस्मैपदेषु" इति दीर्घसिद्धिः । परस्मैपदपरत्वनिरूपिताङ्गस्य तेन दीर्घविधानात् । "तस्मिन्" इति न्यासेऽपि लुक्स्थानि-

भूतप्रत्ययाव्यवहितप्रकृत्युद्देश्यककार्य एव प्रवृत्तिरिति बोध्यम् । यद्वे-स्यादित्तोक्तो वार्त्तिककृत्सम्मतः पक्षस्तत्फलानामन्यथासिध्या भाष्यकृता दूषयित्वा नियमार्थत्वपक्ष उक्त इति दिक् ।

मनोरमेंत 'यत्र प्रत्ययः प्राधान्येनाश्रीयते' असें जें म्हटलें आहे त्या म्हणण्याचा भावार्थ हा आहे कीं, जो प्रत्यय वर्णाचें विशेषण होत नाहीं तशा प्रत्ययाचे ठिकाणीं प्राधान्य असतें. प्रकृत सूत्रांत 'स्थानिवदादेशः' या पूर्व सूत्रांतून 'स्थानिवत्' हें पद अनुवृत्त करून 'प्रत्ययलोपे स्थानिवत्' असें सूत्र मानल्यानेंच काम भागत असून देखील पुन्हा प्रकृत सूत्रांत 'प्रत्ययलक्षणम्' हें जें पद घातलें आहे त्याच्या सामर्थ्यानें, जो प्रत्यय वर्णाचें विशेषण नाहीं असा जो 'प्राधान्येन' या पदाचा वर अर्थ दिला आहे, तो अर्थ निष्पन्न होतो. ('प्रत्ययलोपे' एवढेंच सूत्र जर केलें असतें व त्यांत वर सांगितल्याप्रमाणें 'स्थानिवत्' या पदाची अनुवृत्ति केली असती तर, कोणत्याहि प्रत्ययाच्या लोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव मानणें भाग पडलें असतें, मग तो प्रत्यय सूत्रांत प्राधान्येंकरून निर्दिष्ट केलेला प्रत्यय असो किंवा वर्णाचें विशेषण या रूपानें निर्दिष्ट केलेला प्रत्यय असो.' तसें न व्हावें व जेथें सूत्रांत प्रत्यय वर्णाचें विशेषण या रूपानें निर्दिष्ट नसून प्रधानरूपानें निर्दिष्ट आहे तशाच प्रत्ययाचे ठिकाणीं प्रत्ययलक्षण व्हावें व त्या प्रत्ययाच्या निमित्तानें होणारें कार्य त्या प्रत्ययाचा लोप झाला असतां देखील व्हावें याकरितांच प्रकृत सूत्रांत 'प्रत्ययलक्षणम्' हें पद मुद्दाम घातलें आहे.) 'यत्र प्रत्ययः प्राधान्येनाश्रीयते तत्राल्विधित्वेऽपि भिव्त्यर्थमिदम्' असें मनोरमेंत व्याख्यान करून त्याचें 'अतृणेट्' हें जें उदाहरण दिलें आहे त्याखेरीज 'मित्रशीः' हें देखील त्याचें उदाहरण आहे. 'मित्रशीः' इत्यादि उदाहरणांत हलादि कित् किंवा ङित् प्रत्यय पुढें असतांना होणारें इत्वकार्यहि सिद्ध होतें हें देखील जाणावें. ('शास इदङ्हलोः' सू. २४८६ या सूत्रांत 'अनिदितां हल उपधायाः' या पूर्व सूत्रांतून 'क्ङिति' या पदाची अनुवृत्ति होते.

हलादि कित् किंवा डित् प्रत्यय पुढें असतां या सूत्रानें होणारे 'शास्' यातील उपधेचे इत्व, 'क्विप् = व्' या हलादि कित अलरूप प्रत्ययाचा 'वेरपृक्तस्य' सू. ३७५ या सूत्रानें लोप केल्यावर तो प्रत्यय प्रत्ययलक्षणानें विद्यमान आहे असे मानल्यानें होऊं शकतेच.) 'वर्णप्राधान्यविषयकम्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, जेथें वर्ण हा प्रत्ययाचे विशेष्य आहे व इतर कशाचेहि विशेषण नाही तशा ठिकाणी वर्णाला प्राधान्य असते (व अशाच ठिकाणी 'वर्णाश्रये नास्ति प्रत्ययलक्षणम्' ही परिभाषा लागू पडते) जेथें प्रत्यय वर्णाचे विशेषण आहे त्याची उदाहरणें 'टिड्ढाणञ्' सू. ४७० इत्यादि सूत्रें आहेत. या सूत्रातील 'क्षण्' हा प्रत्यय 'अणो य. अकार:' अशा प्रकारे 'अ' या वर्णाचे विशेषण आहे. जेथें वर्ण कशाचेहि विशेषण नाही त्याची उदाहरणे 'इको यणचि' सू ४७ इत्यादि सूत्रें आहेत, आणि 'गवे हितम् गोहितम्' हे या सवधाचे मनोरमेंत उदाहरण दिले आहे. ('गो ङे हितम् = गो ए हितम्' या उदाहरणात 'एचोऽयवायाव:' सू. ६१ या सूत्रानें अवादेशाची प्राप्ति होते, म्हणजे ज्या 'ङे' प्रत्ययाचा 'सुपो धातुप्रातिपदिकयो' सू. ६५० या सूत्रानें लुक् होतो तो 'ङे = ए' प्रत्यय प्रत्ययलक्षणानें विद्यमान आहे असे मानल्यानें 'गो' यातील 'ओ' चे जागी अवादेशाची प्राप्ति होते. पण त्या सूत्रात अनुवृत्त असलेले 'अचि' हें पद कशाचेहि विशेषण नसल्यामुळें, ज्या 'ङे = ए' प्रत्ययाचा लुक् झाला आहे तो प्रत्यय, 'गो' यातील 'ओ' चे जागी अवादेश करण्याकरिता, प्रत्ययलक्षणानें कायम आहे असे मानता येत नाही या विषयाचे विवरण पूर्वी केलेच आहे. 'इको यणचि' या सूत्रात देखील 'अचि' हें पद कशाचेहि विशेषण नसल्यामुळें, तें देखील वर्णप्राधान्यविषयक सूत्र आहे हे सिद्ध होते.) जेथें प्रत्यय वर्णाचे विशेषण आहे त्याचे 'चित्रायां जाता चित्रा' इत्यादि उदाहरणे आहेत. या उदाहरणात जो 'अण्' प्रत्यय झाला आहे तो 'अ' या वर्णाचे विशेषण आहे त्यामुळें 'अण्' प्रत्ययाचा

लुक् झाला असतां तो प्रत्यय प्रत्ययलक्षणानें कायम आहे व अण् प्रत्ययान्त प्रातिपदिक आहे असें प्रत्ययलक्षणानें मानतां येत नाहीं आणि त्यामुळें 'टिड्ढाणञ्' सू. ४७० या सूत्रानें होणारा 'ङीप्' प्रत्यय या उदाहरणांत होऊं शकत नाहीं. ('चित्रायां जाता चित्रा' या स्थलीं 'सन्धिवेलाद्यृतुनक्षत्रेभ्योऽण्' सू. १३८७ या सूत्रानें 'तत्र जातः' या अर्थामध्यें 'अण्' प्रत्यय होऊन व त्या प्रत्ययाचा 'चित्रारेवतीरोहिणीभ्यः स्त्रियामुपसङ्ख्यानम्'—सू. १४०८ वरील वार्तिक—या वार्तिकानें लुक् होऊन आणि 'लुक् तद्धितलुकि' सू. १४०८ या सूत्रानें 'चित्रा' यांतील 'टाप् = आ' या स्त्रीप्रत्ययाचा लुक् होऊन 'चित्र' असें अदन्त प्रातिपदिक होतें. ज्या 'अण्' प्रत्ययाचा लुक् झाला आहे तो 'अण्' प्रत्यय प्रत्ययलक्षणानें कायम आहे असें मानल्यास, 'चित्र' हें अणप्रत्ययान्त प्रातिपदिक ठरतें व त्यामुळें 'टिड्ढाणञ्' या सूत्रानें 'ङीप्' प्रत्ययाची प्राप्ति होते आणि 'चित्री' असें अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येते. परंतु 'टिड्ढाणञ्' या सूत्रांत 'अजाद्यतष्टाप्' या पूर्व सूत्रांतून 'अतः' या पदाची अनुवृत्ति होत असून 'अण्' प्रत्यय 'अत् = अ' या वर्णाचें विशेषण होत असल्यामुळें, 'अणो यः अकारः तदन्तं यत् प्रातिपदिकं तस्मात् ङीप् स्यात्' असा सूत्रार्थ होतो. सारांश त्या सूत्रांत 'अण्' हा प्रत्यय प्राधान्येंकरून निर्दिष्ट नसून 'अ' या वर्णाचें विशेषण असल्यामुळें, तशा लुप्त 'अण्' प्रत्ययाचे ठिकाणीं प्रत्ययलक्षण करतां येत नाहीं व त्यामुळें 'चित्र' हें अण्प्रत्ययान्त प्रातिपदिक आहे असें मानतां येत नाहीं. म्हणून या स्थलीं 'टिड्ढाणञ्' या सूत्राची प्रवृत्ति न होतां 'अजाद्यतष्टाप्' सू. ४५४ हें सूत्र प्रवृत्त होऊन 'चित्र' या अदन्त प्रातिपदिकाहून 'टाप् = आ' हा स्त्रीप्रत्यय होतो व 'चित्रा' असें इष्ट रूप सिद्ध होतें.) 'गोहितम्' या उदाहरणांत 'न लुमताङ्गस्य' सू. २६३ हा निषेध लागू पडतो असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण तो निषेध अशाच ठिकाणीं लागू पडतो कीं जेथें लुप्त प्रत्ययाच्या निमित्तामुळें

त्या प्रत्ययाच्या अङ्गाला उद्देशून होणारे कार्य करणे आहे. ( शकाकाराचे असे म्हणणे आहे की, 'गो ङे हितम्' या उदाहरणात 'गो' यातील ओकाराचे जागी जी अवादेशाची प्राप्ति होत नाही तिचे वास्तविक कारण हे आहे की, 'न लुमताङ्गस्य' हा निषेध असल्यामुळें ज्या 'ङे' प्रत्ययाचा लुक् झाला आहे त्याचे ठिकाणी प्रत्ययलक्षण करता येत नाही, म्हणजे तो प्रत्यय प्रत्ययलक्षणानें विद्यमान आहे असे मानता येत नाही या शकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, 'न लुमताङ्गस्य' हा निषेध अशाच ठिकाणी लागू पडतो की, जेथें लुप्त प्रत्ययाच्या निमित्तामुळें त्या प्रत्ययाच्या अङ्गाला उद्देशून कार्य करणे आहे. प्रकृत स्थली 'ङे' या प्रत्ययाच्या निमित्तामुळें त्याच्या 'गो' या अङ्गाला कोणतेहि कार्य करणे नसून, 'गो' यातील 'ओ' या 'एच्' वर्णापुढें 'ङे=ए' हा अच् आला असल्यामुळें, 'एचोऽयवायाव' सू. ६१ या सूत्रानें होणारे वर्णकार्य करणे आहे. म्हणून येथें 'न लुमताङ्गस्य' हा निषेध लागू पडत नाही व 'ङे' या लुप्त प्रत्ययाचे ठिकाणी जें प्रत्ययलक्षण होत नाही त्याचे खरे कारण मनोरमेंत सांगितल्याप्रमाणे 'वर्णाश्रये नास्ति प्रत्ययलक्षणम्' ही परिभाषा आहे. या विषयाचे विस्तृत विवरण मनोरमेंत केलेच आहे ) जेथें लुप्त प्रत्ययाच्या निमित्तामुळें त्या प्रत्ययाच्या अङ्गाला कार्य करणे आहे तशाच ठिकाणी 'न लुमताङ्गस्य' हा निषेध लागू पडत असल्यामुळेंच, 'उत्क्राम' इत्यादि स्थली 'क्रमः परस्मैपदेषु' सू २३२२ या सूत्रानें दीर्घसिद्धि होते; कारण त्या सूत्रानें परस्मैपदी प्रत्यय ज्याच्या पुढें आहे अशा शित्प्रत्ययाच्या अङ्गाला दीर्घकार्य होणे सांगितलें आहे. ('उत् क्रम् शप् हि' या स्थली 'अतो हेः' सू २२०२ या सूत्रानें 'हि' या परस्मैपदी प्रत्ययाचा लुक् झाल्यावर, 'न लुमताङ्गस्य' हा निषेध असल्यामुळें, तो 'हि' प्रत्यय कायम आहे असे प्रत्ययलक्षणानें मानता येत नाही आणि म्हणून 'शप्' या शित् प्रत्ययापुढें 'हि' हा परस्मैपदाचा प्रत्यय आहे असे मानता येऊ शकत नसल्या-

मुळें, 'क्रम्' यांतील अकाराला 'क्रमः परस्मैपदेषु' या सूत्रानें होणारें दीर्घ कार्य होऊं शकत नाहीं असें कोणी म्हटल्यास, त्याला उत्तर हें आहे कीं, या स्थलीं 'न लुमताङ्गस्य' हा निषेध लागू पडत नाहीं; कारण येथें जरी 'क्रमः परस्मैपदेषु' या सूत्रानें होणारें कार्य आङ्गकार्य आहे तरी, ज्या 'हि' प्रत्ययाचा लुक् झाला आहे त्याचें 'क्रम्+शप् = क्रम्+अ = क्रम' हें अङ्ग आहे व त्या अङ्गाला दीर्घकार्य करणें नसून 'शप्' या शित् प्रत्ययाच्या 'क्रम्' या अङ्गाला तें कार्य करणें आहे. म्हणून येथें 'हि' प्रत्यय प्रत्ययलक्षणानें कायम आहे असें मानतां येतें व प्रत्ययलक्षणानें विद्यमान असणारा तो 'हि' प्रत्यय 'शप्' या शित् प्रत्ययाच्या पुढें आहे असें मानतां येत असल्यामुळें, 'क्रमः परस्मैपदेषु' या सूत्रान्वयें 'क्रम्' यांतील अकार दीर्घ होतो व 'उत्क्राम' हें रूप सिद्ध होतें. 'न लुमताङ्गस्य' सू. १–१–६३ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं 'न खल्वपि क्रमेर्दीर्घत्वं परस्मैपदेष्वित्युच्यते । कथं तर्हि ? । शितीति । तद्विशेषणं परस्मैपदग्रहणम्' असेंच म्हटलें आहे.) 'न लुमता तस्मिन्' असें जरी तें सूत्र केलें असतें तरी, ज्या प्रत्ययाचा लुक् झाला आहे त्या लुप्त प्रत्ययाच्या लगेंच पूर्वी असलेल्या प्रकृतीला कार्य करणें असल्यासच तो निषेध प्रवृत्त होतो व प्रत्ययलक्षण होत नाहीं असाच सूत्रार्थ झाला असता. (त्यामुळें ज्या 'क्रम्' या अङ्गाला दीर्घकार्य करणें आहे तें अङ्ग 'हि' या लुप्त प्रत्ययाच्या लगेंच पूर्वी नसून दोहोंमध्यें 'शप्' चें व्यवधान असल्यामुळें व तसेंच 'हि' या लुप्त प्रत्ययाचें 'क्रम' जें अङ्ग आहे त्याला दीर्घकार्य करणें नसल्यामुळें, 'न लुमताङ्गस्य' असें सूत्र न करितां 'न लुमता तस्मिन्' असें सूत्र त्या ऐवजीं पठित केलें असतें तरी, तो निषेध 'उत्क्राम' या स्थलीं लागू पडला नसता.) मनोरमेंत 'यद्वा यत्र प्रत्ययः प्राधान्येनाश्रीयते तत्राल्विधित्वेऽपि विध्यर्थमिदम्' असा जो द्वितीयपक्ष सांगितला आहे तो वार्तिककारास संमत असलेला पक्ष होय. पण तो पक्ष मानल्यानें ज्या फलांची सिद्धि होते तीं सर्व फलें,

प्रकृत सूत्र नियमार्थ मानून देखील, सिद्ध होऊ शकतात असे सांगून भाष्यकारांनी तो द्वितीय पक्ष दूषित ठरविला आहे व नियमार्थपक्षच सिद्धान्तरूपानें सांगितला आहे (प्रकृत सूत्रावरील भाष्यात 'यत्र तर्हि स्थानिवद्भावो नास्ति तदर्थमयं योगो वक्तव्यः । क्व च स्थानिवद्भावो नास्ति ? योऽल्विधि ।' हा वार्तिककारास संमत असलेला पक्ष सांगून व त्याची प्रयोजनें सांगून भाष्यकारांनी ती सर्व प्रयोजनें इतर रीतीनें सिद्ध होऊ शकतात असे सिद्ध करून तो पक्ष त्याज्य ठरविला आहे व अखेरीस 'न तर्हीदानीमयं योगो वक्तव्य । वक्तव्यश्च । किं प्रयोजनम् ? । प्रत्ययं गृहीत्वा यदुच्यते तत्प्रत्ययलक्षणेन यथा स्यात् । शब्दं गृहीत्वा यदुच्यते तत्प्रत्ययलक्षणेन मा भूत् इति ।' असे म्हटले आहे हाच नियमार्थपक्ष होय व भाष्यकारांनी हाच सिद्धान्तपक्ष मानला आहे )

मनोरमा– अस्मदिति । अत्र प्राचा अव्ययेष्वपि पठितं तत्तु अव्ययानां प्रायेण निर्लिङ्गत्वाद् अव्ययीभावस्य क्लीबत्वेऽपि लिङ्गान्तराभावाच्चोपेक्षितम् ।

'न लुमताङ्गस्य' सू. २६३ या सूत्रावरील कौमुदीत 'युष्मदस्मत्षट्संज्ञकास्त्रिषु सरूपा ' असे म्हटले आहे, परंतु प्रक्रियाकौमुदीकारांनी त्यात अव्ययाचा देखील पाठ करून ' अव्ययास्मद्युष्मत्षट्संज्ञास्त्रिषु सरूपा ' असे म्हटले आहे ('त्रिषु सरूपा ' या पदाचा 'त्रिषु लिङ्गेषु समानरूपाः । लिङ्गरहितार्थप्रातिपदिकत्वेन तद्विशेषद्योतका प्रत्ययास्तेभ्यो नोत्पद्यन्ते' असा प्रसादटीकेत अर्थ दिला आहे याचा भावार्थ हा आहे की, 'अव्ययें, युष्मद्, अस्मद् ' हे शब्द, आणि तसेच षट्संज्ञक शब्द यांची तीन्ही लिङ्गात सारखीच रूपें असतात व ही लिङ्गरहित प्रातिपदिके असल्यामुळें, लिङ्गविशेषद्योतक प्रत्यय त्याहून होत नाहीत ) परंतु तिन्ही लिङ्गात समान असणाऱ्या शब्दामध्यें जें त्यांनी अव्ययाचे ग्रहण केले आहे त्याची उपेक्षा केली आहे व ग्रहण केले नाही, कारण अव्ययें बहुधा लिङ्गरहित असतात आणि अव्ययीभाव जरी नपुंसक-

लिङ्गी असतो तरी त्याला इतर दोन लिङ्गें नसतात. (त्यामुळें तो तिन्ही लिङ्गांत समानरूप असतो असें म्हणतां येत नाहीं. 'युष्मद्' व 'अस्मद्' या शब्दांचा जरी तिन्ही लिङ्गांत समानरूपानें प्रयोग होतो तरी ते लिङ्गरहित नाहींत. 'अलिङ्गे युष्मदस्मदी' असें जे भाष्यकारांनी म्हटलें आहे त्याचा तात्पर्यार्थ हा आहे कीं, 'युष्मद्' व 'अस्मद्' हे शब्द पदान्तराच्या सहायाशिवाय उच्चारले असतां त्यांच्या लिङ्गाचा बोध होत नाहीं. त्या भाष्यवचनाचा असा अर्थ समजूं नये कीं, 'युष्मद्, अस्मद्' हे शब्द लिङ्गरहित आहेत. परंतु अव्ययांना लिङ्ग नसल्यामुळें, तीं तिन्ही लिङ्गांत समानरूप असतात हें म्हणणें परस्परविरुद्ध ठरतें. 'अव्ययीभावश्च' सू. ४५१ या सूत्रान्वयें अव्ययीभावाला अव्ययसंज्ञा आहे व 'अव्ययीभावश्च' सू. ६५९ या सूत्रान्वयें जरी अव्ययीभाव नित्य नपुंसकलिङ्गी असतो तरी त्याला इतर दोन लिङ्गें नसल्यामुळें तो तिन्ही लिङ्गांत समानरूप असतो असें त्याच्या संबंधानें देखील म्हणतां येत नाहीं. म्हणून 'त्रिषु समानरूपाः' असे जे शब्द आहेत त्यांत अव्ययाचा पाठ करणें योग्य नाहीं असा दीक्षितांच्या म्हणण्याचा भावार्थ आहे.)

शब्दरत्न–प्रायेणेति । विभक्तिप्रतिरूपकाणां लिङ्गयोगेऽपि त्रिषु सारूप्याभाव इत्याशयः ।

मनोरमेंत 'प्रायेण' असें जें म्हटलें आहे त्याचा आशय हा आहे कीं, विभक्तिप्रतिरूपक अव्ययांचा जरी लिङ्गसहित प्रयोग होतो तरी, तिन्ही लिङ्गांत त्यांचा समानरूपानें प्रयोग होत नाहीं. (भैरवींत 'कस्यांश्चित्, कस्यचित्, किञ्चित्, रात्रौ, सायम्' हीं विभक्तिप्रतिरूपक लिङ्गसहित अव्ययांचीं उदाहरणें दिलीं आहेत. या उदाहरणावरून हें स्पष्ट होतें कीं, विभक्तिप्रतिरूपक अव्ययांचा तिन्ही लिङ्गांत नेहमी समानरूपानें प्रयोग होत नाहीं.)

मनोरमा–वस्तुतस्त्विति । अर्थप्राधान्यबोधकस्य बहुवचनस्याभावात् गौणत्वेऽपि त्रयादेशो न्याय्यः अस्म्याद्यनङ्घर्चदिति भावः ।

'नेस्त्रयः' सू. २६४ या सूत्रावरील कौमुदीत 'गौणत्वे तु नेति केचित् । प्रिय त्रीणाम् । वस्तुतस्तु प्रियत्रयाणाम्' असे म्हटले आहे. असे म्हणण्याचे कारण हे की, 'त्रेस्त्रयः' या सूत्रात 'त्रि' या शब्दाचा अर्थ प्राधान्याचा बोध करणाऱ्या बहुवचनात निर्देश केला नसल्यामुळें, 'त्रि' हा शब्द गौण असला तरी त्याचे जागी प्रकृत सूत्रानें त्रयादेश होणे न्याय्य आहे ज्याप्रमाणे 'अस्थिदधिसक्थ्यक्ष्णामनङुदात्तः' सू ३२२ या सूत्रानें होणारा अनङादेश 'अस्थि, दधि' इत्यादि शब्द गौण असले तरी त्याचे जागी होतो त्याचप्रमाणे 'त्रि' हा शब्द गौण असला तरी त्याचे जागी त्रयादेश होणें न्याय्य ठरते. ('अस्थिदधि' या सूत्रावरील कौमुदीत 'तदन्तस्याप्यनङ् । अतिदध्ना' असे म्हटले आहे. 'अतिदध्ना' या उदाहरणात जरी 'दधि' हा शब्द गौण – उपसर्जन – आहे तरी त्याचे जागी अनङादेश झालाच आहे त्याचप्रमाणे 'प्रिया त्रय येषा तेषा प्रियत्रयाणाम्' या अन्यपदार्थप्रधान बहुव्रीहिसमासात जरी 'त्रि' हा शब्द गौण आहे तरी 'नेस्त्रय' या प्रकृत सूत्रात अर्थप्राधान्याचा बोध करून देणाऱ्या बहुवचनाचा निर्देश नसल्यामुळें, प्रकृत सूत्रानें वरील उदाहरणात 'त्रि' चे जागी त्रयादेश 'आम्' प्रत्यय पुढें असताना होतोच )

शब्दरत्न– अर्थप्राधान्यबोधकस्येति । अर्थप्राधान्य एव प्रवृत्तिबोधकस्येत्यर्थः । बहुवचनस्येत्युपलक्षणम् । तद्बोधकाभावादित्यत्र तात्पर्यम् । गौणमुख्यन्यायस्तु पदकार्य एव न प्रातिपदिककार्ये । किं चाप्रसिद्धत्वरूपस्य वा गौणलाक्षणिकत्वस्य वा गौणत्वस्य तत्र ग्रहणम् । न चाय तथा । इतरविशेषणत्वेन उपसर्जनत्व तु न गौणत्वम् । अत एव प्रियतिसेत्यादौ तिस्रादयो भाष्यकृतोदाहृताः । गौणत्वेऽपीति । उपसर्जनत्वेऽपीत्यर्थः ।

मनोरमेंतील 'अर्थप्राधान्यबोधकस्य' या पदाचा 'अर्थप्राधान्ये एव प्रवृत्तिबोधकस्य', म्हणजे 'जेथे अर्थ प्रधान आहे, तशाच ठिकाणी प्रकृत सूत्र प्रवृत्त होऊ शकते अशा अर्थाचा बोध करणाऱ्या बहुवचनाचा', असा अर्थ आहे मनोरमेंतील 'बहुवचनस्य' हे पद

उपलक्षणात्मक आहे व त्याचा तात्पर्यार्थ असा आहे कीं, 'त्रेस्त्रयः' या सूत्रांत शब्दाला प्राधान्य नसून अर्थाला प्राधान्य आहे हें दर्शविणारें कोणतेंहि पद घातलें नाहीं. ('त्रि' हा शब्द 'तीन' या बहुत्वरूप संख्येचा वाचक असल्यामुळें, 'त्रि' हा शब्द जेथें प्रधान असेल व त्याचा अर्थ विशेषणरूपानें इतर शब्दाच्या अर्थामध्यें गौण–उपसर्जन– झाला नसेल तशाच ठिकाणीं 'त्रि' या शब्दाचे जागीं त्रयादेश व्हावा असें जर पाणिनीला विवक्षित असतें तर, त्यानें 'त्रेस्त्रयः' या सूत्रांत 'त्रेः' असा एकवचनाचा निर्देश न करितां बहुवचनाचा निर्देश केला असता व त्या बहुवचननिर्देशाच्या सामर्थ्यानें असें म्हणतां आलें असतें कीं, जेथें 'त्रि' शब्दाचा बहुत्वरूप अर्थ प्रधान असतो तशाच ठिकाणीं त्याचे जागीं प्रकृत सूत्रानें त्रयादेश करणें योग्य आहे. परंतु पाणिनीनें प्रकृत सूत्रांत बहुवचनाचा निर्देश किंवा 'त्रेः' असा स्थानषष्ठीचा निर्देश केला असून विहितपञ्चमीचा निर्देश केला नसल्यामुळें हें स्पष्ट होतें कीं, त्याला अर्थप्राधान्य विवक्षित नसून शब्दप्राधान्यच विवक्षित होतें, म्हणजे 'त्रि' हा शब्द प्रधान असो किंवा गौण असो त्याचे जागीं त्रयादेश व्हावा असेंच त्याला विवक्षित होतें. सारांश जरी समासांत 'त्रि' हा शब्द प्रधान नसला किंवा त्या शब्दाहून 'आम्' हा विभक्तिप्रत्यय झाला नसला तरी तशा 'त्रि' शब्दाचे जागीं त्रयादेश होतोच. म्हणून 'प्रियाः त्रयः येषां तेषां प्रियत्रयाणाम्' या अन्यपदार्थप्रधान बहुव्रीहिसमासांत जरी 'त्रि' हा शब्द उपसर्जन आहे व त्याहून 'आम्' प्रत्यय झाला नसून 'प्रियत्रि' या संपूर्ण सामासिक शब्दाहून 'आम्' प्रत्यय झाला आहे तरी, प्रकृत सूत्रानें 'त्रि' शब्दाचे जागीं त्रयादेश होऊन 'प्रियत्रयाणाम्' असें रूप सिद्ध होतें; 'प्रियत्रीणाम्' हें रूप शुद्ध नव्हे.) 'गौणमुख्ययोः' हा न्याय पदकार्य कर्तव्य असतांनाच लागू पडतो, प्रातिपदिककार्य कर्तव्य असतांना लागू पडत नाहीं. दुसरें असें कीं, त्या न्यायांतील 'गौण' या शब्दानें अप्रसिद्धत्वरूप व तसेंच गौणलाक्षणिकत्वरूप गौणत्वाचें ग्रहण होतें. 'प्रियत्रयाणाम्' या

समासातील 'त्रि' हा शब्द तशा प्रकारच्या गौणत्वाचा बोधक नाही. जो शब्द इतर शब्दाचे विशेषण होऊन उपसर्जन झाला आहे तशा उपसर्जनरूप गौणत्वाचे वरील न्यायातील 'गौण' शब्दानें ग्रहण होत नाही. (शंकाकार अशी शंका करतो की, 'गौणमुख्ययोर्मुख्ये कार्यसम्प्रत्ययः' – परि. १५– ही परिभाषा असल्यामुळे व 'प्रियत्रयाणाम्' या अन्यपदार्थप्रधान बहुव्रीहिसमासात 'त्रि' हा शब्द अन्यपदार्थाचे विशेषण झाल्याकारणानें गौण–उपसर्जन–झाला असल्यामुळें, जेथे 'त्रि' हा शब्द प्रधान आहे तेथेंच लागू पडणारे 'त्रेस्त्रयः' हे प्रवृत्त सूत्र 'प्रियत्रयाणाम्' या स्थली प्रवृत्त होऊ शकत नाही व गौण–उपसर्जन–झालेल्या 'त्रि' शब्दाचे जागी त्या सूत्रानें त्रयादेश होऊ शकत नाही. या शंकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, 'गौणमुख्ययो' या ज्या परिभाषेच्या आधारावर वरील शंका घेतली आहे ती परिभाषा परिनिष्ठित पदाला कार्य कर्तव्य असतानाच लागू पडते 'प्रियत्रयाणाम्' या स्थली पदाला कार्य करणे नसून 'त्रि' या प्रातिपदिकाला आदेशरूप कार्य करणे असल्यामुळें, असे प्रातिपदिककार्य करतेवेळी ती परिभाषा मुळीच लागू पडत नाही. दुसरें असे की, त्या परिभाषेंतील 'गौण' या शब्दानें उपसर्जनरूप गौणत्वाचे ग्रहण होत नसून अप्रसिद्धत्वरूप गौणत्वाचे व तसेच गौणलाक्षणिकत्वरूप गौणत्वाचे ग्रहण होते. 'प्रियत्रयाणाम्' या समासातील 'त्रि' हा शब्द तशा प्रकारचा गौण शब्द नसून अन्यपदार्थाचे विशेषण झाल्याकारणानें उपसर्जन झाला आहे व तशा उपसर्जनरूप गौणत्वाचे वरील परिभाषेंतील 'गौण' शब्दानें ग्रहण होत नसल्यामुळें, या स्थली वरील परिभाषा मुळीच लागू पडत नाही. या संपूर्ण विषयाचे विस्तृत विवरण परिभाषेन्दुशेखराच्या मराठी भाषान्तरात पान ५३–५८ मध्ये येथे आहे व ते वाचल्यास वरील ग्रन्थ उत्तम रीतीनें ध्यानांत येईल ) 'गौणमुख्ययोः' या परिभाषेंतील 'गौण' शब्दानें उपसर्जनरूप गौणत्वाचे ग्रहण होत नसल्यामुळेंच, 'प्रियतिसा' इत्यादि उदाहरणात 'तिसृ' इत्यादि

आदेश भाष्यकारांनीं करून उदाहरणें दिलीं आहेत. ('प्रियाः तिस्रो ब्राह्मण्यः यस्य ब्राह्मणस्य सः प्रियतिसा ब्राह्मणः' या अन्यपदार्थप्रधान बहुव्रीहिसमासांत जरी स्त्रीलिङ्गी 'त्रि' हा शब्द उपसर्जन आहे, म्हणजे अन्यपदार्थाचें विशेषण होऊन तो शब्द उपसर्जन झाला आहे, तरी भाष्यकारांनीं 'त्रिचतुरोः स्त्रियां तिसृचतसृ' सू. २९८ या सूत्रानें 'त्रि' शब्दाचे जागीं 'तिसृ' असा आदेश करून 'प्रियतिसा' हें 'प्रियतिसृ' या पुल्लिङ्गी शब्दाचें प्रथमेच्या एकवचनाचें उदाहरण दिलें आहे. भाष्यकारांनीं दिलेल्या या उदाहरणावरून हें स्पष्ट होतें कीं, 'गौणमुख्ययोः' ही परिभाषा समासांत उपसर्जन झालेल्या शब्दांना लागू पडत नाहीं आणि म्हणून 'प्रियत्रयाणाम्' या बहुव्रीहिसमासांत जरी 'त्रि' हा शब्द उपसर्जन झाला आहे व त्याचा अर्थ समासांत प्रधान नसून जरी अन्यपदार्थाचें विशेषण–उपसर्जन–झाला आहे तरी, त्याच्यापुढें 'आम्' हा विभक्तिप्रत्यय आला असल्यामुळें, त्याचे जागीं प्रकृत सूत्रानें त्रयादेश होतोच.) मनोरमेंतील 'गौणत्वेऽपि' या पदांचा 'उपसर्जनत्वेऽपि' असा अर्थ आहे, म्हणजे त्या शब्दानें उपसर्जनत्वरूप गौणत्वाचेंच ग्रहण होतें.

**मनोरमा—** अकारो वक्तव्य इति तथा च बहुत्वाभावे औडुलोमीशब्द इकारान्तः। बहुत्वे तु अकारान्त उडुलोमशब्दोऽन्य एव। तस्य च इकारान्तेषु व्युत्पादनं प्रासङ्गिकमिति भावः। तथा चौडुलोमिशब्दस्य इदन्तस्य बहुत्वे अदन्तत्वमिति न भ्रमितव्यम्॥ इति इदन्ताः॥

('त्यदादीनामः' सू. २६५ या सूत्रावरील कौमुदींत 'औडुलोमीः। औडुलोमी। बहुत्वे तूडुलोमाः' असें सांगून दीक्षितांनीं 'लोम्नोऽपत्येषु बहुष्वकारः प्रत्ययो वक्तव्यः' या अर्थाचें 'लोम्नोऽपत्येषु बहुष्वकारो वक्तव्यः' असें वार्तिक पठित केलें आहे. हें वार्तिक असल्यामुळें) जेथें अपत्यांचें बहुत्व विवक्षित नाहीं तशा ठिकाणीं 'औडुलोमि' असें इकारान्त प्रातिपदिक होतें. परंतु जेथें अपत्यांचें बहुत्व विवक्षित आहे तेथें 'उडुलोम' असें अकारान्त प्रातिपदिक होतें

व हा 'उडुलोम' शब्द इकारान्त 'औडुलोमि' शब्दाहून भिन्न आहे इकारान्त पुल्लिङ्गी शब्दाच्या प्रकरणात 'उडुलोम' या अकारान्त शब्दाची जी व्युत्पत्ति सांगितली आहे ती केवळ प्रसङ्गानुरोधानें सांगितली आहे म्हणून असा चुकीचा समज करून घेऊ नये की, इकारान्त 'औडुलोमि' शब्दाची बहुवचनाची रूपें करिताना तो शब्द 'उडुलोम' असा अकारान्त होतो ('उडूनि न क्षत्राणि इव लोमानि यस्य स. उडुलोमा, तस्य अपत्य पुमान् औडुलोमि' या स्थली 'बाह्वादिभ्यश्च' सू १०९६ या सूत्रानें 'उडुलोमन्' शब्दाहून अपत्यार्थक 'इञ्' प्रत्यय झाला आहे 'उडुलोमन् इञ्' या स्थितीत 'नस्तद्धिते' सू ६७९ या सूत्रानें 'उडुलोमन्' या नान्त शब्दाच्या 'अन्' या टिचा लोप होऊन व 'तद्धितेष्वचामादे' सू १०७५ या सूत्रानें आद्य अचाची वृद्धि होऊन 'औडुलोमि' असें इकारान्त प्रातिपदिक होते 'लोम्नोऽपत्येषु बहुष्वकारो वक्तव्य' हे वार्तिक असे सांगत को, जेथें अपत्याची बहुत्वसंख्या विवक्षित आहे तेथें 'लोमन्' शब्दान्त प्रातिपदिकाहून अपत्यार्थक 'इञ्' प्रत्यय न होता 'अ' प्रत्यय होतो म्हणून 'उडुलोम्न अपत्यानि' या अर्थामध्यें 'अ' प्रत्यय होऊन व 'नस्तद्धिते' या सूत्रानें टिलोप होऊन 'उडुलोमन् अ = उडुलोम् अ = उडुलोम' असे अदन्त प्रातिपदिक होते 'अ' हा तद्धित प्रत्यय जित, णित् किंवा कित् नसल्यामुळें, येथें आद्याचाची वृद्धि झाली नाही दीक्षित म्हणतात की, 'औडुलोमि' व 'उडुलोम' ही भिन्न भिन्न तद्धितप्रत्यय होऊन सिद्ध झालेली भिन्न प्रातिपदिकें आहेत व 'औडुलोमि' शब्दाची बहुवचनाची 'उडुलोमा, उडुलोमान्' इत्यादि रूपें होतात असा वरील वार्तिकाचा अर्थ समजू नये सारांश 'औडुलोमि' हा शब्द केवळ एकवचनांत व द्विवचनांत 'हरि' शब्दासारखा चालतो व 'उडुलोम' हा भिन्न शब्द केवळ बहुवचनांत 'राम' शब्दासारखा चालतो असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे ) येथें इदन्त प्रकरण संपलें

शब्दरत्न–न भ्रमितव्यमिति । एतद्भ्रमनिवृत्त्यर्थमेवात्रास्य व्युत्पादनमिति भावः ।। इतीदन्ताः ।।

'औडुलोमि' शब्दाचें बहुवचन 'उडुलोमाः' आहे या भ्रमाचें निवारण करण्याकरितांच दीक्षितांनीं (इदन्त प्रकरणांत) 'उडुलोम' शब्दाची व्युत्पत्ति सांगितली आहे. येथें इदन्त प्रकरण संपलें.

मनोरमा–किदिति । तेन "आतो लोप इटि च" इत्यालोप इति भावः । ययीपप्यादय इति । यत्तु प्राचोक्तम् । एवं देवयज्यतिलक्ष्म्यादय इति । तन्न । देवान् यजत इति विग्रहे "इन्" इत्यौणादिकसूत्रेण ह्रस्वान्तस्यैव देवयजिशब्दस्योज्ज्वलदत्तादिभिः साधितत्वात् । "अच्यो द्विजान्देवयजीन्निहन्म" इति भट्टिप्रयोगस्य ह्रस्वविषयकतयैव व्याख्यातत्वात् । न च यजेर्दीर्घ ईप्रत्ययः प्रतिपदोक्तोऽस्ति । बहुलग्रहणात्कल्प्यत इति चेद् भवेदेवं यद्यनन्यथासिद्धं कल्पकमुपलभ्येत । वेदेऽपि ह्रस्व एव प्रयुज्यते । "आयजि त्वा मनवे जातवेदसे" इति । अतिलक्ष्मीशब्दस्य तु नदीत्वाद्ध्रस्वे आडागमे नुटि आमि च कृते महदेव वैलक्षण्यमिति न वातप्रमीसाम्यम् । एतच्च मूले एव स्पष्टीभविष्यति । विषयन्तेति । एतच्च 'माङ् माने शब्दे च' इति धातौ माधवग्रन्थे स्पष्टम् । बहुश्रेयसीति । "ईयसश्च" इति न कप् । नाप्युपसर्जनह्रस्वः । 'ईयसो बहुव्रीहेर्न' इति निषेधात् ।।

('त्यदादीनामः' सू. २६५ या सूत्रानंतर जें ईदन्तप्रकरण आरंभिलें आहे त्यावरील कौमुदींत 'वातप्रमीरित्युणादिसूत्रेण माङ ईप्रत्ययः, स च कित् । वातं प्रमिमीते वातप्रमीः' असें म्हटलें आहे. 'माङ् माने' या आकारान्त धातूहून आलेला 'ई' हा प्रत्यय कित् असल्यामुळे) 'आतो लोप इटि च' सू. २३७२ या सूत्रानें 'मा' धातूच्या आकाराचा लोप झाला आहे. 'ययी, पपी' इत्यादि शब्द 'वातप्रमी' शब्दाप्रमाणें चालतात. प्रक्रियाकौमुदीकारांनी ('त्यदादीनामः' या सूत्रावरील वृत्तींत) 'एवं देवयज्यतिलक्ष्म्या-

दयः', म्हणजे 'देवयजी, अतिलक्ष्मी' हे शब्द 'वातप्रमी' या शब्दाप्रमाणेच चालतात, असे जें म्हटले आहे तें म्हणणे बरोबर नाही; कारण उज्वलदत्तादिकांनी 'देवान् यजते' असा विग्रह करून व 'इन्' या औणादिक सूत्रानें प्रत्यय करून 'देवयजि' असा ऱ्हस्व इकारान्त शब्द साधला आहे. तसेच 'अद्मो द्विजान् देवयजीन् निहन्म' (भट्टिकाव्य प्रथम सर्ग श्लोक ३४) या भट्टिकाव्यातील 'देवयजीन्' या प्रयोगाचे तो शब्द ऱ्हस्व इकारान्त आहे, असेच व्याख्यान केले आहे. (त्या श्लोकावरील जयमङ्गला टीकेंत 'अच इः इत्यनुवर्तमाने खनीत्यादिषूच्यमानेषु औणादिकेषु सूत्रेषु यद्यपि यजिर्न पठित-स्तथापि यजेरि, प्रकृतेश्च तद्बहुलमिति वचनात्' असे म्हटले आहे. या व्याख्येचा अर्थ असा आहे की, 'खनिकष्यज्यसि' उ सू ५७९ या उत्तर सूत्रात 'अच इः' उ. सू. ५७८ या पूर्व सूत्रातून 'इ' प्रत्ययाची अनुवृत्ति होते व जरी 'खनिकषि' या सूत्रात 'यज्' धातूचा निर्देश केला नाही तरी 'उणादयो बहुलम्' सू. ३-३-१ या सूत्रावरील भाष्यात पठित केलेल्या 'उवतप्रकृतिप्रत्ययादेर्यत्र समुच्चित तस्मिन्विषये प्रकृति दृष्ट्वा प्रत्यय ऊहितव्यः प्रत्यय च दृष्ट्वा प्रकृतिरूहितव्या' या अर्थाच्या बाधक 'यत्र विशेषपदार्थ-समुत्थ प्रत्ययतः प्रकृतेश्च तदूह्यम्' या कारिकान्वयें 'यज्' धातूहून 'इ' प्रत्यय होतो असें कल्पिल्यानें 'देवयजि' हें ऱ्हस्व इकारान्त रूप सिद्ध करता येतें यावरून हे स्पष्ट होतें की, 'देवयजी' असा दीर्घ ईकारान्त शब्द नसून 'देवयजि' असा ऱ्हस्व इकारान्त शब्द आहे. प्रसाददीकेंत 'देवान् यजतीति देवयजीः । यजेरीप्रत्ययः । प्रत्ययतः प्रकृतेश्च तद्बहुलमिति वचनात्' असे जें म्हटले आहे त्याला उद्देशून दीक्षित असें उत्तर देतात की.) 'यजी' असा दीर्घ शब्द सिद्ध करण्याकरितां 'यज्' धातूहून औणादिक 'ई' प्रत्यय झाला आहे असें म्हणतां येत नाही, कारण 'यज्' धातूहून 'ई' प्रत्यय व्हावा असें साक्षात् विधान करणारें कोणतेंहि औणादिक सूत्र नाही. 'उणादयो बहुलम्' सू ३१६१ या सूत्रांत 'बहुलम्' या पदाचे

ग्रहण केलें असल्यामुळें ('प्रत्ययतः प्रकृतेश्च तद्ग्रहणम्' या कारिकान्वयें) 'यज्' धातूहून 'ई' प्रत्यय झाला आहे असें कल्पितां येतें असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण तशी कल्पना तेव्हांच करतां येते कीं जेव्हां प्रचारांत असलेल्या शब्दांची इतर रीतीनें सिद्धि करतां येत नाहीं. वेदांत देखील 'आयजि त्वा मनवे जातवेदसे' या ऋचेंत 'यजि' असा ऱ्हस्व इकारान्त शब्दच पठित केला आहे. ('लक्ष्मीमतिक्रान्तः अतिलक्ष्मीः' अशा रीतीनें सिद्ध होणारा) 'अतिलक्ष्मी' हा शब्द नदीसंज्ञक असल्यामुळें, ऱ्हस्वकार्य, आडागमकार्य, नुडागम व आमादेश हीं चार कार्यें केल्यानें त्या शब्दाच्या रूपांत व 'वातप्रमी' या शब्दाच्या रूपांत मोठेंच वैलक्षण्य–फरक–होत असल्यामुळें, तो शब्द 'वातप्रमी' शब्दासारखा चालतो हें म्हणणें बरोबर नाहीं. ('अतिलक्ष्मीः' या सामासिक शब्दांत जरी नदीसंज्ञक 'लक्ष्मी' हा शब्द उपसर्जन झाला आहे तरी, 'प्रथमस्य समासादिवृत्तिप्रवृत्तेः पूर्वं प्रवृत्तस्य स्त्रीलिङ्गस्य यू स्त्र्याख्यौ नदी इत्यत्र ग्रहणं कर्तव्यम्' = 'समासादिवृत्तिप्रवृत्तेः पूर्वं स्त्रीलिङ्गस्य सतः वृत्तिदशायामुपसर्जनतया स्त्रीलिङ्गत्वाभावेऽपि नदीत्वं वक्तव्यम्' या अर्थाच्या वाचक 'प्रथमलिङ्गग्रहणं च'–सू. २६६ वरील वार्तिक–या वार्तिकान्वयें 'अतिलक्ष्मी' हा सामासिक शब्द नदीसंज्ञक ठरतो. त्यामुळें 'अम्बार्थनद्योर्ह्रस्वः' सू. २६७ या सूत्रान्वयें त्या शब्दाचें 'हे अतिलक्ष्मि' असें संबुद्धीचें रूप होतें. पण 'वातप्रमी' हा शब्द नदीसंज्ञक नसल्यामुळें, त्याचे ठिकाणीं ऱ्हस्वकार्य न होतां 'हे वातप्रमीः' असें त्याच्या संबुद्धीचें रूप होतें. तसेंच 'आण्नद्याः' सू. २६८ या सूत्रान्वयें 'अतिलक्ष्मी' या नदीसंज्ञक शब्दापुढील ङित् प्रत्ययांना आडागम होऊन 'अतिलक्ष्म्यै, अतिलक्ष्म्याः, अतिलक्ष्म्याः' अशीं चतुर्थीच्या पञ्चमीच्या व षष्ठीच्या एकवचनाचीं रूपें अनुक्रमें होतात. पण 'वातप्रमी' हा शब्द नदीसंज्ञक नसल्यामुळें त्याचीं 'वातप्रम्ये, वातप्रम्यः, वातप्रम्यः' अशीं त्या तीन विभक्तींचीं अनुक्रमें रूपें होतात. तसेंच 'अतिलक्ष्मी' या नदीसंज्ञक शब्दाचें

षष्ठीचे बहुवचन करिताना 'ह्रस्वनद्यापो नुट्' सू २०८ या सूत्राने 'आम्' प्रत्ययाला नुडागम होऊन 'अतिलक्ष्मीणाम्' असे रूप होते. पण 'वातप्रमी' या शब्दाचे षष्ठीचे बहुवचन करतेवेळी 'आम्' प्रत्ययाला नुडागम न होता 'वातप्रमी आम्= वातप्रम्याम्' असे रूप होते त्याचप्रमाणे 'अतिलक्ष्मी' या नदीसंज्ञक शब्दाचे सप्तमीच्या एकवचनाचे रूप करिताना 'ङि' प्रत्ययाचे जागी 'ङेराम्नद्याम्नीभ्यः' सू. २७० या सूत्रानें आमादेश होऊन 'अतिलक्ष्म्याम्' असे रूप होते, पण 'वातप्रमी' या शब्दाच्या सप्तमीच्या एकवचनाचे 'वातप्रमी इ= वातप्रमी' असे 'अक. सवर्णे दीर्घ.' सू ८५ या सूत्रानें सवर्ण-दीर्घ होऊन रूप होते अशा रीतीनें 'अतिलक्ष्मी' व 'वातप्रमी' या दोन शब्दाच्या रूपात अनेक विभक्तीत फरक होत असल्यामुळें, 'अतिलक्ष्मी' हा शब्द 'वातप्रमी' या शब्दासारखा चालतो हे म्हणणे चूक ठरते. तसेच 'देवयजि' हा शब्द ह्रस्व इकारान्त असल्यामुळें व त्याची रूपें 'हरि' शब्दासारखी होत असल्यामुळें, तो शब्द दीर्घ ईकारान्त 'वातप्रमी' शब्दासारखा चालतो हे म्हणणे देखील चूक ठरते ) कौमुदीत दिलेल्या रूपावरूनच वरील म्हणणे स्पष्ट होते 'विवबन्तवातप्रमीशब्दस्य त्वमि शसि ङौ च विशेष ' असे जे कौमुदीत म्हटले आहे ते 'माङ् माने शब्दे च' या धातूचे व्याख्यान करिताना माधवानें जे धातुवृत्तीत म्हटले आहे त्यावरून स्पष्ट होते. ('वातप्रमी' या स्थली 'मा' धातूहून 'वातप्रमी' उ सू ४४१ या सूत्रानें औणादिक 'ई' प्रत्यय न करिता 'क्विप् च' सू ०९८३ या सूत्रानें 'क्विप् = व' हा कित् प्रत्यय केल्यानें 'घुमास्था' सू २४६२ या सूत्रानें 'मा' धातूतील आकाराचे जागी ईकारादेश होतो व 'वातप्रमी' शब्दाच्या शेवटी धातूचा ईकार आहे असे स्थानिवद्भावानें मानता येत असल्यामुळें, 'एरनेकाच' सू २७२ या सूत्रानें त्या ईकाराचे जागी यणादेश होऊन 'वातप्रम्यम्, वातप्रम्य , वातप्रम्यि' अशी अनुक्रमें द्वितीयेच्या एकवचनाची व बहुवचनाची आणि सप्तमीच्या एकवचनाची रूपें

होतात. पण जेव्हां 'मा' धातूहून 'ई' हा औणादिक अजादि कित् प्रत्यय केला जातो तेव्हां वर सांगितल्याप्रमाणें 'आतो लोपः' सू. २३७२ या सूत्रानें 'मा' धातूच्या आकाराचा लोप होऊन 'ई' प्रत्यय अन्तीं राहत असल्यामुळें व तो प्रत्यय धातूचा अवयव नसल्यामुळें, 'एरनेकाचः' या सूत्राची प्रवृत्ति होत नाही व त्यामुळें 'वातप्रमीम्, वातप्रमीन्, वातप्रमी' अशीं वरील विभक्तींचीं रूपें होतात. बालमनोरमेंत 'माङ् माने इत्यस्मात् कर्तरि क्विप् घुमास्था इति ईत्वे वातप्रमीशब्द इति केचित्। तन्न, ईत्त्वमवकारादौ इति वार्तिकविरोधात्। मीञ् हिंसायामिति मीधातोः क्विपि तु वातप्रमीशब्दो निर्बाधः।' असें जरी म्हटलें आहे तरी या पक्षाचें शब्दरत्नांत खण्डन केलें असून त्याचें विवेचन शब्दरत्नांत केलें जाईल.) 'बह्व्यः श्रेयस्यः यस्य सः बहुश्रेयसी' या स्थलीं, 'ईयसश्च' सू. ८९४ हा निषेध असल्यामुळें, ('नद्यृतश्च' सू. ८३३ या सूत्रानें होणारा) 'कप्' प्रत्यय होत नाहीं. त्याचप्रमाणें 'ईयसो बहुव्रीहेर्न'— सू. ८९४ वरील वार्तिक—हें वार्तिक असल्यामुळें ('गोस्त्रियोरुपसर्जनस्य' सू. ६५६ या सूत्रानें होणारें) ऱ्हस्वकार्य देखील होत नाहीं.

शब्दरत्न—ऱ्हस्वविषयकतयैवेति। जयमङ्गलायामिति शेषः। माङ माने इति। "घुमा स्था" इतीत्वविधायकसूत्रस्थं 'अवकारादौ' इति वार्त्तिकं भाष्ये प्रत्याख्यातमिति ईत्वं सुलभम्। शंस्थाशब्दे तु भाष्यप्रयोगादेवेत्वाभावः। ततो विजेवेत्यन्ये। न च तेनेत्वेऽपि तस्यासिद्धत्वात्कथं यणिति वाच्यम्। क्वौ ईत्वं, विभक्तौ यणादेश इति व्याश्रयत्वादिति बोध्यम्। न कपिति। समासान्तविधौ लिङ्गविशिष्टपरिभाषाभावस्य "ङ्याप्प्रातिपदिकात्" इति सूत्रे भाष्ये उक्तत्वाद्यस्य तन्निषेधकत्वेनात्र प्रवृत्तिरस्त्येव। "गोस्त्रियोः" इति सूत्रे बहुश्रेयसीति भाष्योदाहरणादनन्तरस्येति न्यायं बाधित्वा "नद्यृतश्च" इत्यस्याप्ययं निषेध इति भावः।

मनोरमेंतील 'ऱ्हस्वविषयकतयैव' या पदापुढें 'जयमङ्गलायाम्' हें पद अध्याहृत आहे, म्हणजे भट्टिकाव्यावरील जयमङ्गलानामक

टीकेत 'देवयजि' हा शब्द ऱ्हस्व इकारान्त आहे असेच व्याख्यान केले आहे 'घुमास्था' सू. ६–४–६६ या ईत्वविधायक सूत्रावरील भाष्यात 'ईत्वे वकारप्रतिषेधो घृत घृतपावान इति दर्शनात' असे जें वार्तिक पठित केले आहे त्याचे भाष्यकारानी प्रत्याख्यान केले असल्यामुळें, 'वातप्रमी' या स्थली ईत्व होण्यात काही अडचण येत नाही (त्या वार्तिकाचा असा अर्थ आहे की, 'घुमास्था' या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या धातूपुढें वकारानें सुरु होणारा कित् प्रत्यय आल्यास या धातूतील अन्त्य आकाराचे ईत्व होत नाही ते वार्तिक न मानल्यास, 'पा' धातूहून 'क्वनिप् = वन्' हा वकारानें सुरु होणारा कित् प्रत्यय केला असता, 'पीवान.' असे रूप होण्याची आपत्ति यते, पण वेदात तर 'पावानः' असा प्रयोग आढळतो म्हणून वार्तिककाराच्या मते तसे वैदिक रूप सिद्ध होण्याकरिता तें वार्तिक असणे आवश्यक आहे त्या वार्तिकान्वयें 'मा' धातूहून 'क्विप = व्' हा प्रत्यय केला असता, तो प्रत्यय वकाराने सुरु होणारा असून कित् असल्यामुळें, 'मा' धातूच्या अन्त्य आकाराचे ईत्व होऊ शकत नाही व 'वातप्रमी' असे ईकारान्त रूप होऊ शकत नाही परतु भाष्यकारानी त्या वार्तिकाचे प्रत्याख्यान केले असल्यामुळें ती आपत्ति टळते भाष्यकार म्हणतात – 'स तर्हि प्रतिषेधो वक्तव्य ? । न वक्तव्य । वनिबेव भविष्यति, न क्वनिबिति ।' भाष्यकाराच्या म्हणण्याचा आशय हा आहे की, 'घृतपावान, वसापावान' इत्यादि वैदिक प्रयोगात 'पा' धातूहून 'क्वनिप्' हा कित् प्रत्यय झाला नसून 'वनिप्' हा अकित् प्रत्यय झाला आहे असे मानल्यानें 'पा' धातूचे ईत्व पावतच नाही साराश ते वार्तिक न मानता देखील वरील वैदिक प्रयोग सिद्ध होऊ शकत असल्यामुळें, भाष्यकाराच्या मते ते वार्तिक असण्याची आवश्यकता नाही ) 'स्थया' या उदाहरणात जो 'स्था' धातूचा ईत्वरहित प्रयोग आढळतो त्याला तसा भाष्यप्रयोगच प्रमाण आहे इतर वैयाकरणांचे असे म्हणणे आहे की या

उदाहरणांत ( क्विप् प्रत्यय झाला नसून ) 'क्विच्' हा अकित् प्रत्यय झाला आहे. ( 'स्था' धातूहून क्विप् प्रत्यय केल्यास तो प्रत्यय कित् असल्यामुळें, वरील वार्तिक न मानलें तर 'शंस्थाः' हें रूप साधु ठरत नाहीं व 'घुमास्था' सू. २४६२ या सूत्रानें 'स्था' यांतील आकाराचें ईत्व झालें पाहिजे. पण 'स्थः क च' सू. ३-२-७७ या सूत्रावरील भाष्यांत 'इदं तर्हि शंस्थः शंस्थाः' या पंक्तींत भाष्यकारांनीं 'शंस्थाः' असा प्रयोग केला असल्यामुळें, तो प्रयोग साधु मानणें भाग आहे. हा भाष्यप्रयोग पाणिनीयरीत्या शुद्ध ठरण्याकरितां कित्येक वैयाकरण असें म्हणतात कीं, 'स्थः क च' सू. २९८७ या सूत्रांतील 'च' या पदानें क्विप् प्रत्ययाचें अनुकर्षण होत नसून 'क्विच्' प्रत्ययाचें अनुकर्षण होतें व 'क्विच्' प्रत्यय कित् नसल्यामुळें 'स्था' धातूहून तो प्रत्यय केल्यास, 'घुमास्था' या सूत्राची प्रवृत्ति होत नाहीं व ईत्व होत नाहीं आणि 'शंस्थाः' हें रूप साधु ठरतें.) 'वातप्रमी' या स्थलीं 'घुमास्था' सू. २४६२ या सूत्रानें 'मा' धातूच्या आकाराचें ईत्व केलें तरी 'असिद्धवदत्राभात्' सू. २१८३ या अधिकारांत 'घुमास्था' व 'एरनेकाचः' सू. २७२ हीं दोन्हीं सूत्रें पठित असल्यामुळें व 'एरनेकाचः' या सूत्रानें यणादेश करतेवेळीं ईत्व असिद्ध ठरत असल्यामुळें, यणादेश होऊं शकत नाहीं (व 'वातप्रम्यम्, वातप्रम्यः, वातप्रम्यि' हीं कौमुदींत ईदन्त प्रकरणांत दिलेलीं रूपें सिद्ध होऊं शकत नाहींत) असें कोणी म्हटल्यास, त्याला उत्तर हें आहे कीं, क्विप् प्रत्ययाच्या कित्वरूप निमित्तामुळें होणारें ईत्व असून, अजादि विभक्तिप्रत्ययाच्या निमित्तामुळें होणारा यणादेश असल्यामुळें आणि अशा रीतीनें हीं दोन कार्यें (समाननिमित्तक नसून) भिन्ननिमित्तक असल्यामुळें, ( आणि समाननिमित्तक कार्यें कर्तव्य असतांच 'असिद्धवदत्राभात्' हें सूत्र लागूं पडत असल्यामुळें) यणादेशाच्या दृष्टीनें ईत्व असिद्ध ठरत नाहीं व त्यामुळें ईकाराचे जागीं यणादेश होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं हें जाणावें. 'ईयसश्च इति न कप्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे

त्याचे कारण हें की, समासान्तविधि करतेवेळी 'प्रातिपदिकग्रहणे लिङ्गविशिष्टस्यापि ग्रहणम्'–परि. ७२–ही परिभाषा लागू पडत नाही असे 'ङ्याप्प्रातिपदिकात्' सू. ४–१–१ या सूत्रावरील भाष्यात म्हटले आहे तरी, 'ईयसश्च' सू. ८९४ हे समासान्तविधीचे निषेधक सूत्र असल्यामुळें, ती परिभाषा 'बहुश्रेयसी' या स्थली प्रवृत्त होतेच. ('बहुश्रेयसी' या नद्युत्तरपदबहुव्रीहिसमासाहून 'नद्यृतश्च' सू. ८३३ या सूत्रानें 'कप्' प्रत्यय पावला आहे व हा समासान्त विधि आहे. 'प्रातिपदिकग्रहणे लिङ्गविशिष्टस्यापि ग्रहणम्' ही परिभाषा मानली असता कोणते दोष येतात हें सांगतेवेळी भाष्यकारानी 'ङ्याप्प्रातिपदिकात्' या सूत्रावरील भाष्यात 'समासान्तेषु च' या वार्तिकाचें व्याख्यान करिताना जें म्हटले आहे त्या म्हणण्याप्रमाणे 'प्रातिपदिकग्रहणे' ही परिभाषा येथें प्रवृत्त होत नाही व त्यामुळें 'बहुश्रेयस्' या शब्दानें स्त्रीप्रत्ययान्त 'बहुश्रेयसी' या शब्दाचे ग्रहण होऊं शकत नाही म्हणून 'ईयसश्च' हा निषेध 'बहुश्रेयसी' या स्त्रीप्रत्ययान्त शब्दाला लागू पडत नाही व 'बहुश्रेयसीकः' असे कप्प्रत्ययान्त रूप झाले पाहिजे असे शंकाकाराचे म्हणणे आहे या शंकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, 'ईयसश्च' हे सूत्र समासान्त प्रत्यय होण्याचे विधान करणारे सूत्र नसून समासान्त प्रत्यय होण्याचा निषेध करणारे सूत्र असल्यामुळें, 'प्रातिपदिकग्रहणे' ही परिभाषा 'बहुश्रेयसी' या स्थली प्रवृत्त होण्यात काही अडचण येत नाही. समासान्त विधि करतेवेळीच ती परिभाषा उपस्थित होत नाही असें भाष्यात सांगितले आहे व प्रकृत स्थली समासान्तविधि करणे नसून समासान्तविधिनिषेध करणे आहे. त्यामुळें 'बहुश्रेयस्' या ईयस्प्रत्ययान्त शब्दानें 'बहुश्रेयसी' या स्त्रीप्रत्ययान्त शब्दाचे ग्रहण होते आणि 'ईयसश्च' या निषेधान्वयें जसा 'बहुश्रेयस्' या शब्दाहून समासान्त 'कप्' प्रत्यय होऊं शकत नाहीं तसाच तो 'बहुश्रेयसी' या स्त्रीप्रत्ययान्त शब्दाहून देखील होऊं शकत नाही.) 'गोस्त्रियोरुपसर्जनस्य' सू. १-२-४८ या सूत्रावरील

भाष्यांत 'बहुश्रेयसी' हें उदाहरण दिलें असल्यामुळें, 'अनन्तरस्य विधिर्वा भवति प्रतिषेधो वा' –परि. ६२– हा न्याय बाधित होऊन 'ईयसश्च' सू. ८९४ हा निषेध (जसा 'शेषाद्विभाषा' सू. ८९१ या सूत्रानें होणाऱ्या वैकल्पिक 'कप्' प्रत्ययाचा बाध करतो त्याचप्रमाणें तो निषेध) 'नद्यृतश्च' सू. ८३३ या सूत्रानें होणाऱ्या नित्य 'कप्' प्रत्ययाचा देखील बाध करतो. ('बहुश्रेयसी' हा शब्द पूर्वी सांगितल्याप्रमाणें नदीसंज्ञक असल्यामुळें, 'नद्यृतश्च' या सूत्रानें त्या शब्दाहून समासान्त 'कप्' प्रत्यय होण्याची प्राप्ति आहे. 'नद्यृतश्च' या सूत्रानंतर 'शेषाद्विभाषा' हें सूत्र अष्टाध्यायींत पठित असून त्यानंतर 'न संज्ञायाम्' व 'ईयसश्च' हीं निषेधक सूत्रें पठित आहेत. 'अनन्तरस्य विधिर्वा' या परिभाषान्वयें 'ईयसश्च' हें निषेधक सूत्र 'शेषाद्विभाषा' या लगेच पूर्वी पठित असलेल्या विधायक सूत्राचा बाध करूं शकतें, त्याच्या पूर्वी पठित असलेल्या 'नद्यृतश्च' या सूत्राचा बाध करूं शकत नाहीं; म्हणून 'बहुश्रेयसी' या शब्दाहून जरी 'शेषाद्विभाषा' या सूत्रानें वैकल्पिक 'कप्' प्रत्यय होऊं शकत नाहीं तरी 'नद्यृतश्च' या अबाधित सूत्रानें पावलेला समासान्त 'कप्' प्रत्यय झाला पाहिजे असें शंकाकाराचें म्हणणें आहे. या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं, वरील परिभाषा असून देखील ज्याअर्थी भाष्यकारांनीं भाष्यांत 'बहुश्रेयसीकः' असा प्रयोग न करितां 'बहुश्रेयसी' असाच प्रयोग केला आहे त्याअर्थी त्या प्रयोगाच्या सामर्थ्यानें हें मानणें आवश्यक आहे कीं, वरील परिभाषा 'ईयसश्च' या सूत्राचे ठिकाणीं लागू पडत नाहीं व तें निषेधक सूत्र जसा 'शेषाद्विभाषा' या सूत्राचा बाध करतें त्याचप्रमाणें त्या सूत्रापूर्वी पठित असलेल्या 'नद्यृतश्च' या सूत्राचा देखील बाध करतें व त्यामुळें 'बहुश्रेयसी' या स्थळीं समासान्त 'कप्' प्रत्यय होत नाहीं आणि दीक्षितांनीं 'ईयसश्च इति न कप्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे तें योग्य ठरतें.)

मनोरमा— " यू स्त्र्याख्यौ " । ईदूदन्ताविति । इह वर्णयोरेव संज्ञेत्यपि पक्षोऽस्ति । " आच्छीनद्योः " इति सूत्रस्वरसात् । तयोरस्त्र्याख्यत्वं तु ङयादिषु स्वतः, क्वचित् स्त्रीवाचकवर्णसमुदायघटकत्वेन प्रवेशात् । शक्तिपर्याप्त्यधिकरणत्वस्याविवक्षितत्वात् । तेन नद्यन्तादित्यादिव्यवहारो न विरुध्यते । एवं घिसंज्ञायामपि इउवर्णौ तदन्तं वा घिसंज्ञि इति पक्षद्वयं बोध्यम् । वर्णसंज्ञापक्षे " असखि " इत्यस्य सखिभिन्नस्यावयव इत्यर्थः । न तु सखिशब्दावयवं वर्जयित्वेति । तेनातिसखिनेत्यादि निर्बाधमित्यवधेयम् । पूर्वमिति । वृत्तेः प्रागित्यर्थः । वक्तव्यमिति । संज्ञाया यथोद्देशप्रवृत्तौ न्यायसिद्धमिदं कार्यकालत्वे तु वाचनिकम् ।

'यू स्त्र्याख्यौ नदी ' सू. २६६ या सूत्रावरील कौमुदीत ' ईदूदन्तौ नित्यस्त्रीलिङ्गौ नदीसंज्ञौ स्तः ' असे म्हटले आहे. परंतु प्रकृत सूत्रातील ' यू ' या पदाने 'ई' व 'ऊ' या वर्णांनाच नदीसंज्ञा होते असा देखील पक्ष आहे; कारण ' आच्छीनद्योर्नुम् ' सू. ४४५ या सूत्रातील ' नदी ' या शब्दाचा प्रयोग त्या पक्षाला अनुकूल आहे. म्हणजे त्या पक्षाचे समर्थन करतो ( ' पच् शप् शतृ ङीप् = पच अत् ई ' या स्थली ' पच ' या अवर्णान्त अङ्गापुढे ' शतृ ' प्रत्यय असून तसा शतृप्रत्ययान्त अङ्गापुढे ईवर्णान्त नदीसंज्ञक शब्द नसून केवळ ' ङीप् = ई ' हा वर्ण आहे हा वर्ण नदीसंज्ञक न मानल्यास, ' आच्छीनद्योर्नुम् ' व 'शप्श्यनोर्नित्यम्' सू ४४६ या सूत्राची प्रवृत्ति होणार नाही व नुमागम होणार नाही. म्हणून ई, ऊ हे वर्ण नदीसंज्ञक मानणे आवश्यक आहे. ) ' ई, ऊ ' हे वर्ण ' ङीप् = ई ' ( ' ऊङ् = ऊ ' ) इत्यादि स्त्रीप्रत्ययात स्त्रीत्वाचे स्वतःच वाचक आहे व क्वचित् स्थली, म्हणजे श्री, भ्रू, लक्ष्मी इत्यादि स्थली, ते वर्ण स्त्रीवाचक शब्दाचे अन्यावयव असल्यामुळें, ते देखील स्त्रीवाचक ठरतात. ' ई, ऊ ' या वर्णांमध्यें स्त्रीत्वबोध करण्याची अभिधाशक्ति असली पाहिजे अशी विवक्षा नाही. ( तशी विवक्षा मानल्यास, श्री, भ्रू इत्यादि ईदूदन्त स्त्रीत्ववाचक शब्द

स्त्रीप्रत्ययान्त नसल्यामुळें, त्यांना नदीसंज्ञा होऊं शकणार नाहीं. म्हणून स्त्रीत्ववाचक शब्द स्त्रीप्रत्ययांन्त नसून देखील ईकारान्त किंवा ऊकारान्त असले तरी त्यांचे अन्त्य ईवर्ण व ऊवर्ण यांना नदीसंज्ञा होते असें मानल्याशिवाय इष्ट रूपांची सिद्धि होणें शक्य नाहीं.) अन्त्य ईकार, ऊकार हे स्त्रीत्ववाचक प्रत्ययच असले पाहिजे असा नियम नसल्यामुळें, ज्या स्त्रीत्ववाचक शब्दांच्या अन्तीं स्त्री-प्रत्यय नसलेला ईकार किंवा ऊकार आहे तशा शब्दांचे ठिकाणीं 'नद्यन्त' इत्यादि व्यवहार करण्यांत कांहीं विरोध येत नाहीं. याच-प्रमाणें ('शेषो घ्यसखि' सू. २४३ या सूत्रानें होणाऱ्या) घिसंज्ञेच्या विषयांत देखील 'इ, उ' वर्ण किंवा इउवर्णान्त शब्द घिसंज्ञक असतात असे दोन पक्ष आहेत हें जाणावें. वर्णाला घिसंज्ञा होते,या वर्णसंज्ञापक्षांत 'शेषो घ्यसखि' या सूत्रांतील 'असखि' या पदाचा 'सखिभिन्नस्यावयवः' असा अर्थ करावा, 'सखिशब्दावयवं वर्ज-यित्वा' असा अर्थ करूं नये. 'सखिभिन्नस्यावयवः' असा 'असखि' या पदाचा अर्थ केल्यानें, 'अतिसखिना' इत्यादि रूपें सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं हें लक्षांत ठेवावें. ('सखिशब्दाद्भिन्नः यः शब्दः तस्य अन्त्यावयवः यः इकारः तस्य घिसंज्ञा भवति' असा 'सखिभिन्नस्यावयवः' या पदांचा अर्थ आहे, म्हणजे जो इकार केवळ 'सखि' शब्दाचा अन्त्यावयव आहे त्यालाच 'असखि' या पर्युदासा-न्वयें घिसंज्ञा होत नाहीं. 'अतिसखि, परमसखि, सुसखि' इत्यादि सामासिक शब्द जरी सखिशब्दान्त आहेत तरी ते 'सखि' या शब्दाहून भिन्न असल्यामुळें, त्यांच्या अन्त्य इकाराला घिसंज्ञा होतेच व त्यामुळें 'अतिसखिना, अतिसखये' इत्यादि इष्ट रूपें सिद्ध होतात. परंतु 'असखि' या पदाचा 'सखिशब्दावयवं वर्जयित्वा' असा अर्थ केल्या नर, 'अतिसखि, परमसखि, सुसखि' इत्यादि समुदायांत असलेला अन्त्य इकार जसा संपूर्ण सामासिक शब्दांचा अन्त्यावयव आहे तसाच तो इकार त्या सामासिक शब्दांच्या अन्तीं असणाऱ्या 'सखि' शब्दाचा देखील अन्त्यावयव आहे व त्यामुळें त्या सामासिक शब्दांना

घिसंज्ञा न होण्याची व इष्ट रूपें सिद्ध न होण्याची आपत्ति येते. ती आपत्ति टाळण्याकरिताच दीक्षितांनी 'असखि' या पर्युदासाचा 'सखिभिन्नस्यावयवः' असा मनोरमेंत अर्थ केला आहे 'औत्' सू. २५६ या सूत्रावरील कौमुदींत 'समुदायस्य सखिरूपत्वाभावात् असखि इति निषेधाप्रवृत्तेर्घिसंज्ञा। सुसखिना सुसखये' असे दीक्षितांनी स्पष्ट व्याख्यान केले आहे. प्रकृत सूत्रावरील कौमुदींत 'प्रथमलिङ्गग्रहणं च' हे वार्तिक पठित करून त्याचे व्याख्यान करितांना 'पूर्वं स्त्र्याख्यस्योपसर्जनत्वेऽपि इदानीं नदीत्वं वक्तव्यम्' असे जें म्हटले आहे त्यातील) 'पूर्वम्' या पदाचा 'वृत्तेः प्राक्' असा अर्थ आहे, म्हणजे समास होण्यापूर्वी जो शब्द नदीसंज्ञक होता तो समास झाल्यावर जरी समासांत उपसर्जन होतो तरी त्याची पूर्वीची नदीसंज्ञा नष्ट न होता कायम राहते असा त्या पदाचा अर्थ आहे. ('बहुश्रेयसी' या अन्यपदार्थप्रधान बहुव्रीहिसमासांत जरी 'श्रेयसी' हा ङीप्प्रत्ययान्त स्त्रीलिङ्गी शब्द उपसर्जन झाला आहे तरी, तो समास होण्यापूर्वी नदीसंज्ञक असल्यामुळें, त्याची समास झाल्यावर देखील नदीसंज्ञा कायम राहते व त्यामुळें, 'बहुश्रेयसी' हा शब्द नद्यन्त ठरतो आणि नदीसंज्ञक शब्दाला होणारी कार्यें त्या शब्दाला होतात.) 'यू स्त्र्याख्यौ नदी' या सूत्रानें नदीसंज्ञा करतेवेळी यथोद्देशपक्ष प्रवृत्त केल्यास, 'प्रथमलिङ्गग्रहणं च' या वार्तिकांतील विधान न्यायानेंच, म्हणजे 'यथोद्देशे पूर्वप्रवृत्तसंज्ञयैव कार्यम्' या न्यायानेंच, सिद्ध होतें. परंतु कार्यकालपक्षाची प्रवृत्ति केल्यास तें वार्तिक असणें आवश्यक आहे ('बहुश्रेयसी' या स्थलीं, वर सांगितल्याप्रमाणें, 'श्रेयसी' या ङीबन्त शब्दाला नदीसंज्ञा असल्यामुळें व एकदां प्राप्त झालेली संज्ञा नष्ट होत नसल्यामुळें, 'बहुश्रेयसी' हा शब्द आपोआपच नद्यन्त ठरतो व त्यामुळें यथोद्देशपक्षांत वरील वार्तिक मानण्याची कांहीं गरज नाहीं परंतु कार्यकालपक्षांत 'बहुश्रेयसी' या सिद्ध पदाचें अन्वाख्यान करतेवेळीं तो पुल्लिङ्गी शब्द नद्यन्त आहे किंवा नाहीं हें ठरवितांना वरील

वार्तिक असणें आवश्यक आहे; कारण 'बहुश्रेयसी' हा शब्द पुल्लिङ्गी असल्यामुळें व त्या समासांतील 'श्रेयसी' हा नदीसंज्ञक स्त्रीलिङ्गी शब्द अन्य पदार्थाचें उपसर्जन झाला असल्यामुळें, वरील वार्तिक मानल्याशिवाय तो सामासिक शब्द प्रकृत सूत्रान्वयें नद्यन्त मानतां येऊं शकत नाहीं.)

शब्दरत्न– ङ्यादिष्विति । बहुवचनं प्रयोगभेदाभिप्रायेण । शक्तीति । स्त्रीत्वनिरूपितशक्तीत्यर्थः । तेन लक्ष्म्यादिशब्दसंग्रहः । तदन्तसंज्ञापक्षे तु "शीनद्योः" इत्यादौ नदीशब्दस्य तदवयवे लक्षणा । नद्यन्तादित्याद्यपि लक्ष्म्याद्यर्थमावश्यकं लक्ष्मीशब्दे व्यपदेशिवद्भावेन तत्वं बोध्यम् । इउवर्णाविति । अत एव 'व्यन्तादजाद्यदन्तं विप्रतिषेधेन' इति सङ्गच्छते । न स्वित्यादि । इदं दृष्टसानुरोधेन । न्यायसिद्धमिति । अन्तरङ्गत्वात्पूर्वं प्रवृत्तनद्यन्तत्वेनैव समुदाये तत्संज्ञत्वात्कार्यसिद्धिरिति भावः । वाचनिकमिति । स्त्रीत्वविशिष्टार्थमात्रबोधकस्यैव संज्ञेत्यभिमानेनेदम् । जहत्स्वार्थावृत्तित्वाभिमानेन वा । भाष्यकृता त्वजहत्स्वार्थायामवयवस्य नित्यस्त्रीत्वविशिष्टार्थबोधजनकत्वेन तस्य संज्ञायां कुमार्यै ब्राह्मणाय खरकुट्यै ब्राह्मणायेत्यादौ विवक्षाविषये आनुपूर्व्यैक्येन भेदाग्रहात्समासे तदन्तत्वात्कार्यसिद्धिमाश्रित्य प्रत्याख्यातमिदम् । 'अवयवस्त्रीविषयत्वात्सिद्धम्' इति तन्मात्रबोधकत्वनिवेशो न मानम् । यौगिकेषूत्तरपदे जहत्स्वार्थत्वाभावश्चेति तदाशयः । अवयवशब्देनात्र वृत्तिप्रकृतिभूतशब्दग्रहणम् । अत एव वयजाद्यन्ते न दोषः । तत्रापीच्छाविशेषणतया कुमारीशब्दादेर्नित्यस्त्रीलिङ्गार्थबोधकत्वात् ।

'स्त्र्याख्यत्वं तु ङ्यादिषु स्वतः' या मनोरमेंतील पंक्तींत 'ङ्यादिषु' असा जो बहुवचनाचा प्रयोग केला आहे (व 'ङ्यादौ' असा एकवचनाचा प्रयोग केला नाहीं) तो ईऊप्रत्ययान्त अनेक स्त्रीत्ववाचक प्रयोग भाषेंत आढळत असल्यामुळें त्या प्रयोगांच्या बाहुल्यामुळें केला आहे. 'शक्तिपर्याप्त्यविकरणस्य' या मनोरमेंतील पदांतील 'शक्ति' या पदाचा 'स्त्रीत्वनिरूपितशक्ति', म्हणजे

स्त्रीत्व द्योतित करण्याची शक्ति, असा अर्थ आहे. ई, ऊ वर्णामध्येंच स्त्रीत्वाचा बोध करण्याची अभिधाशक्ति असली पाहिजे अशी विवक्षा नसल्यामुळे, 'लक्ष्मी' इत्यादि (स्त्रीप्रत्ययान्त नसणाऱ्या) शब्दाचा नदीसंज्ञक शब्दात समावेश होतो, म्हणजे ते शब्द देखील नदीसंज्ञक ठरतात (याचे विवरण मनोरमेंत केलेच आहे) 'ई, ऊ' वर्णांना नदीसंज्ञा होते हा वर्णसंज्ञापक्ष न मानता ईदूदन्ताला नदीसंज्ञा होते हा तदन्तसंज्ञापक्ष मानल्यास, 'आच्छीनद्योर्नुम्' इत्यादि सूत्रात निर्दिष्ट असलेल्या 'नदी' या शब्दाचा 'नद्यन्त शब्दाचा अवयव' असा लक्षणेनें अर्थ केला पाहिजे ('लक्ष्मीमतिक्रान्त. अतिलक्ष्मी.' इत्यादि स्थली) 'अतिलक्ष्मी' इत्यादि नद्यन्त शब्दांना नदीकार्य होण्याकरिता त्या कार्याचे विधान करणाऱ्या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या 'नदी' या शब्दाचा 'नद्यन्तात्' असा अर्थ करणे आवश्यक आहे (आणि म्हणूनच सू. २६७–२७० या सूत्रातील 'नदी' शब्दाचा 'नद्यन्त' असा कौमुदीत अर्थ केला आहे आता नद्यन्त शब्दाला नदीकार्य व्हावी असा अर्थ केला तर, 'लक्ष्मी' हा शब्द जरी नदीसंज्ञक आहे तरी नद्यन्त नाही, म्हणजे त्याच्या पूर्वी कोणताहि वर्णसमुदाय नाही, व त्यामुळें त्याला नदीकार्य कशी व्हावी असा कोणी प्रश्न केल्यास, त्या प्रश्नाचे शब्दरत्नकार असे उत्तर देतात की,) केवळ 'लक्ष्मी' शब्दाला नदीकार्य होण्याकरिता 'व्यपदेशिवदेकस्मिन्'–परि. ३०– या परिभाषान्वयें तो शब्द नद्यन्त मानता येतो इउवर्णांना घिसंज्ञा होते हा पक्ष मानल्यानेंच, 'घ्यन्तादजाद्यन्त विप्रतिषेधेन'–सू. ९०४ वरील वार्तिक–या वार्तिकातील 'घ्यन्तात्' हा प्रयोग सुसङ्गत ठरतो (इउवर्णान्तानाच घिसंज्ञा होते एवढाच जर पक्ष असता तर, वार्तिककारानें वरील वार्तिकात 'घ्यन्तात्' असा प्रयोग न करितां 'घे.' असा प्रयोग केला असता परंतु 'घ्यन्तात्' असा प्रयोग केला असल्यामुळें हे स्पष्ट होतें की, अन्त्य इउवर्णांना घिसंज्ञा होते असा देखील वर्णसंज्ञापक्ष आहे.) 'न तु शक्तिशब्दावयव

वर्णयित्वा ' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे तें हरदत्ताच्या मतानुसार म्हटलें आहे. 'यथोद्देशप्रवृत्तौ न्यायसिद्धम्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्यांतील 'न्यायसिद्धम्' या पदाचा भावार्थ हा आहे कीं, समास किंवा वृत्ति होण्यापूर्वी अन्तरङ्गत्वामुळें प्राप्त झालेली नदीसंज्ञा समास होऊन अर्थान्तरसंक्रम झाल्यावर देखील कायम राहत असल्यामुळें, सामासिक शब्द नद्यन्त ठरतो व त्यामुळें त्याला नदीकार्यें होतात. ( प्रकृत सूत्रावरील भाष्यांतील 'अवयवस्त्रीविषयत्वात्सिद्धम्' या वचनाचें व्याख्यान करितांना कैयटानें देखील 'अन्तरङ्गत्वात्पूर्वमेव स्त्र्याख्यत्वात् प्रवृत्ता नदीसंज्ञा, पश्चादुपजायमाने लिङ्गान्तरयोगे बहिरङ्गे, न निवर्तते' असेंच म्हटलें आहे. ) 'कार्यकालत्वे तु वाचनिकम्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे तें असा आशय मनांत धरून म्हटलें आहे कीं, स्त्रीत्व-विशिष्ट अर्थाच्याच बोधक शब्दाला नदीसंज्ञा होऊं शकते. अथवा जहत्स्वार्थावृत्ति मानून दीक्षितांनीं तसें म्हटलें असावें. ( केवळ स्त्रीत्वबोधक शब्दालाच, म्हणजे स्त्रीलिङ्गी शब्दालाच, नदीसंज्ञा होत असल्यामुळें, 'बहुश्रेयसी' या पुल्लिङ्गी शब्दाला नदीसंज्ञा होऊं शकत नाहीं. ती संज्ञा तशा नद्यन्त पुल्लिङ्गी शब्दाला देखील व्हावी व त्याला नदीकार्यें व्हावीं याकरितां 'प्रथमलिङ्गग्रहणं च' हें वार्तिक कार्यकालपक्षांत मानणें आवश्यक आहे असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे. अथवा समासांतील पृथक् पदें जहत्स्वार्थवृत्तिपक्षांत आपल्या स्वतःच्या अर्थाचा परित्याग करीत असल्यामुळें व त्या पक्षांत 'बहुश्रेयसी' या स्थलीं 'श्रेयसी' या नित्य स्त्रीलिङ्ग शब्दानें स्वार्थाचा परित्याग केल्यानें तो अर्थरहित होत असल्यामुळें अर्थराहित्यामुळें त्याची जी नदीसंज्ञा नष्ट होते ती त्याला पुन्हा प्राप्त व्हावी व 'बहुश्रेयसी' हा शब्द नद्यन्त ठरून त्याला नदीकार्यें व्हावीं याकरितां कार्यकालपक्षांत वरील वार्तिक असणें आवश्यक आहे असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे असें देखील म्हणतां येतें. ) परंतु भाष्यकारांनीं अशा स्थलीं अजहत्स्वार्थावृत्ति मानून

असे म्हटले आहे की, समासातील चरमावयव आपल्या स्त्रीत्व-विशिष्ट अर्थाचा नित्य बोध करून देणारा असल्यामुळें त्याची नदी-संज्ञा नष्ट होत नाही व कायम राहते आणि त्यामुळें 'कुमार्यै ब्राह्मणाय, खरकुट्यै ब्राह्मणाय' इत्यादि उदाहरणात क्विप् प्रत्ययाचा लोप व 'कन्' प्रत्ययाचा लुप् झाला असता, वृत्ति होण्यापूर्वी जी स्त्रीवाचक शब्दाची वर्णानुपूर्वी होती ती, वृत्ति केल्यानंतर देखील, तशीच कायम राहून असल्यामुळें आणि अशा रीतीनें समासात स्त्रीत्वबोधक शब्द समासाच्या अन्ती राहत असल्यामुळें, संपूर्ण सामासिक शब्द नद्यन्त ठरून त्याला नदीकार्यें होऊं शकतात आणि म्हणून 'प्रथमलिङ्गग्रहणं च' हे वार्तिक असण्याची काही आवश्यकता नाही आणि अशा रीतीनें भाष्यकारांनी त्या वार्तिकाचे प्रत्याख्यान केले आहे ('जहत्स्वार्था तु तत्रैव यत्र रूढिविरोधिनी', म्हणजे जहत्स्वार्थावृत्ति अशाच ठिकाणी मानली जाते की, जेथें यौगिक अर्थाचा रूढ अर्थाशीं विरोध येतो, असा न्याय आहे उदाहरणार्थ 'मण्डप' या शब्दातील अवयवांच्या यौगिक अर्थाला धरून समुदायाचा अर्थ केल्यास, 'पेज पिणारा' असा समुदायाचा अर्थ होतो पण रूढीत 'मण्डप' याचा 'मांडव' असा अर्थ आहे म्हणून येथें व 'कुशल, अनुकूल, प्रतिकूल' इत्यादि स्थलीं यौगिक अर्थाचा रूढ अर्थाशी विरोध होत असल्यामुळें, अशा ठिकाणी जहत्स्वार्थावृत्ति मानणे योग्य आहे परंतु जेथें असा विरोध येत नाहीं तेथें जहत्स्वार्थावृत्ति न मानता, अजहत्स्वार्थावृत्ति मानणेंच योग्य आहे असा भाष्यकाराच्या म्हणण्याचा आशय आहे 'बहुश्रेयसी' या बहुव्रीहि-समासात अजहत्स्वार्थावृत्ति मानल्यास समास झाल्यावर देखील ज्याच्या वर्णानुपूर्वीत निळमात्र फरक पडत नाहीं असा 'श्रेयसी' हा नित्य स्त्रीलिङ्गी नदीसंज्ञक शब्द आपल्या स्त्रीत्वविशिष्ट अर्थाचा परित्याग न करिता स्त्रीत्वाचा बोधक कायम राहत असल्यामुळें व अशा रीतीनें त्याची नदीसंज्ञा नष्ट होत नसल्यामुळें, 'बहुश्रेयसी' हा सामासिक शब्द नद्यन्त ठरून त्याला नदीकार्यें होण्यात कांहीं

अडचण येत नाहीं व अशा रीतीनें वरील वार्तिक मानण्याची कांहीं गरज नाहीं असें भाष्यकारांच्या म्हणण्याचें तात्पर्य आहे. 'कुमार्यै ब्राह्मणाय' या स्थलीं 'सुप आत्मनः क्यच्' सू. २६५७ या सूत्रानें 'कुमारीमात्मनः इच्छति' या अर्थामध्यें किंवा 'उपमानादाचारे' सू. २६६४ या सूत्रानें 'कुमारीमिवाचरति' या अर्थामध्यें 'कुमारी' शब्दाहून 'क्यच् = य' हा प्रत्यय केला असतां, 'कुमारीय' असा जो क्यच्प्रत्ययान्त नामधातु होतो त्याहून 'क्विप् च' सू. २९८३ या सूत्रानें कर्तरि 'क्विप् = व्' प्रत्यय केल्यास, 'कुमारीय क्विप्' अशा स्थितींत 'अतो लोपः' सू. २३०८ या सूत्रानें 'य' या प्रत्ययांतील अन्त्य अकाराचा लोप होऊन व नंतर 'लोपो व्योर्वलि' सू. ८७३ या सूत्रानें अवशिष्ट यकाराचा लोप होऊन आणि 'वेर-पृक्तस्य' सू. ३७५ या सूत्रानें 'क्विप् = व्' या अपृक्त प्रत्ययाचा लोप होऊन 'कुमारी' असें वृत्ति केल्यानंतर रूप होतें आणि वृत्ति करण्यापूर्वीं देखील तसेंच रूप होतें व या दोन रूपांच्या वर्णानुपूर्वीत वृत्ति केल्यावर देखील कोणताहि फरक पडत नाहीं. म्हणून वृत्ति करण्यापूर्वी 'कुमारी' या शब्दाला जी नदीसंज्ञा होती ती वृत्ति केल्यावर देखील, जरी वृत्ति केल्यानंतर सिद्ध झालेल्या 'कुमारी' या शब्दाचा 'कुमारीमात्मनः इच्छति' किंवा 'कुमारी-मिवाचरति' असा अर्थ होतो तरी, कायम राहते आणि त्यामुळें 'आण् नद्याः' सू. २६८ या सूत्रानें आडागमरूप नदीकार्य होऊन 'कुमार्यै' असें वृत्ति केल्यावर सिद्ध झालेल्या शब्दाचें चतुर्थीच्या एकवचनाचें रूप, वरील वार्तिक न मानतां देखील, सिद्ध होऊं शकतें. तसेंच 'खरकुट्यै ब्राह्मणाय' या स्थलीं 'खरकुटी' या शब्दाहून 'संज्ञायां च' सू. २०५२ या सूत्रानें 'इव' या अर्थामध्यें 'कन्' प्रत्यय होऊन व 'लुम्मनुष्ये' सू. २०५३ या सूत्रानें त्या 'कन्' प्रत्ययाचा लुप् होऊन वृत्ति करण्यापूर्वीं 'खरकुटी' असें जें नद्यन्त रूप होतें तेंच वृत्ति केल्यावरहि कायम राहतें व त्यामुळें वृत्ति केल्यानंतर सिद्ध झालेला 'खरकुटी' हा शब्द नद्यन्त ठरून

त्याहून 'आण्नद्याः' या सूत्रानें होणारे नदीकार्य होते व 'खरकुटचै ब्राह्मणाय' असा प्रयोग, वरील वार्तिक न मानता देखील, सिद्ध होण्यात काही अडचण येत नाही सारांश भाष्यकारांनी अजहत्स्वार्थावृत्तीचा आश्रय करून वरील वार्तिकाचे प्रत्याख्यान केले आहे प्रकृत सूत्रावरील भाष्यात–१–४–३–ते वार्तिक पठित करून व 'प्रयोजनं क्विब्लुप्समासाः' असे त्या वार्तिकाचे प्रयोजन सांगून भाष्यकार म्हणतात–'क्विप् । कुमार्यै ब्राह्मणाय । लुप् । खरकुटचै ब्राह्मणाय । समास । अतितन्त्र्यै ब्राह्मणाय । अतिलक्ष्म्यै ब्राह्मणाय । तर्त्तांह वक्तव्यम् ? । न वक्तव्यम् । अवयवस्त्रीविषयत्वात्सिद्धम् । अवयवोऽत्र स्त्रीविषयस्तदाश्रया नदीसंज्ञा भविष्यति ।') 'अवयवस्त्रीविषयत्वात्सिद्धम्' हे भाष्यवचन, अवयव (प्राधान्यानें) नित्य स्त्रीत्वाचाच बोधक असला पाहिजे असे मानण्यास, मुळीच प्रमाण नाही (प्रकृत सूत्रावरील उद्योतात देखील 'कुमारीत्यादावपि विशेषणतया नित्यस्त्रीलिङ्गरूपार्थबोधकत्वमस्त्येव । प्राधान्येन तन्मात्रबोधकत्वनिवेशे तु न मानमित्याशयः ।' असेच म्हटले आहे प्राधान्येंकरून स्त्रीत्वाचा बोध करणाऱ्या शब्दालाच नदीसंज्ञा होते असे जर भाष्यकाराचे मत असते तर, त्यांनी वरील भाष्यात दिलेल्या दोन उदाहरणात वृत्तीनंतर सिद्ध झालेल्या व 'ब्राह्मणाय' याचे विशेषण होणाऱ्या 'कुमार्यै, खरकुटचै' या शब्दातील मूळचे 'कुमारी, खरकुटी' हे नदीसंज्ञक शब्द उपसर्जन झाले असून प्राधान्येंकरून स्त्रीत्वाचे बोधक नसल्यामुळे, त्यांना नदीसंज्ञक मानले नसते व त्याहून 'आण्नद्याः' या सूत्रानें होणारे नदीकार्य केले नसते परंतु त्यांनी ते शब्द नदीसंज्ञक मानून त्यांहून नदीकार्य केले असल्यामुळें हे स्पष्ट होते की, एखादा शब्द नदीसंज्ञक ठरण्याकरिता तो प्रधानत्वानें स्त्रीत्वाचाच बोध करणारा शब्द असला पाहिजे याची काही गरज नाही. तो शब्द मूळचा प्राधान्यानें नित्य स्त्रीत्वाचा बोधक असेल तर, वृत्ति केल्यावर जरी तो शब्द उपसर्जन झाला असेल तरी, वृत्ति करण्यापूर्वी

असलेल्या त्या शब्दस्वरूपाची व वृत्ति केल्यानंतर सिद्ध झालेल्या शब्दस्वरूपाची वर्णानुपूर्वी सारखीच असल्यास, वृत्ति केल्यानंतर सिद्ध झालेला तो शब्द देखील नदीसंज्ञक ठरतो व त्याहून नदीकार्यें करतां येतात असें वास्तविक भाष्यकारांचें मत आहे.) 'अवयव-स्त्रीविषयत्वात्सिद्धम्' या भाष्यवचनाचा आशय हा देखील आहे कीं, जेथें सामासिक शब्दाहून यौगिक अर्थाची प्रतीति होते तशा स्थलीं उत्तरपदाचें ठिकाणीं जहत्स्वार्थावृत्ति मानूं नये, म्हणजे समासांतील उत्तर पद स्वार्थाचा परित्याग करतें असें मानूं नये. 'अवयवस्त्री-विषयत्वात्सिद्धम्' या भाष्यवचनांतील 'अवयव' या शब्दानें वृत्ति करण्यापूर्वी जी प्रकृति होती, म्हणजे ज्या प्रकृतीहून वृत्ति केली आहे, त्या मूळ प्रकृतिभूत शब्दाचें ग्रहण होतें. असें असल्या-मुळेंच, नदीसंज्ञक प्रकृतीहून 'क्यच्' इत्यादि प्रत्यय केले तरी वृत्ति केल्यावर बनलेल्या शब्दांचे ठिकाणीं नदीसंज्ञा करण्यांत कोणताहि दोष येत नाहीं; कारण 'कुमारीमात्मनः इच्छति' या वृत्तींत देखील 'कुमारी' इत्यादि शब्द 'इच्छा' या क्रियेमध्यें विशेषणरूपानें–कर्मरूपानें–अन्वित होत असून ते शब्द नित्य स्त्री-लिङ्गरूप अर्थाचे बोधक आहेतच. (भाष्यवचनांतील 'अवयव' या शब्दाचा वर सांगितल्याप्रमाणें अर्थ केल्यानें, ज्याप्रमाणें 'बहु-श्रेयसी' या सामासिक शब्दांतील 'श्रेयसी' या चरमावयवाचें ग्रहण होतें त्याचप्रमाणें ज्या मूळ 'कुमारी' शब्दाहून कृद्वृत्ति केली आहे त्या 'कुमारी' शब्दाचें देखील ग्रहण होतें व दोन्ही शब्द अनुक्रमें नद्यन्त व नदीसंज्ञक ठरून त्यांहून नदीकार्यें होतात. सारांश 'कार्यकालत्वे तु वाचनिकम्', म्हणजे कार्यकालपक्षांत 'प्रथमलिङ्गग्रहणं च' हें वार्तिक मानणें आवश्यक आहे, असें जें दीक्षितांनीं मनोरमेंत म्हटलें आहे तें शब्द-रत्नकारांच्या मतें चूक आहे आणि म्हणूनच त्यांनीं 'स्त्रीत्वविशि-ष्टार्थमात्रबोधकस्यैव संज्ञेत्यभिमानेनेदम् । जहत्स्वार्थावृत्तित्वाभि-मानेन वा ।' या शब्दरत्नांतील दोन्ही पंक्तींत 'अभिमानेन' हें

चातिव्याप्तिः । तद्वारणाय इवर्णोवर्णयोरच्परत्वेन विशेषणे तु क्लिष्टतेति भावः । आन्तरतम्यादिति । स्थानत इति भावः ।

'अचि श्नुधातुभ्रुवां य्वोरियङुवङौ' सू. २७१ या सूत्रांत ('श्नुधातुभ्रुवाम्' असा जरी इतरेतरयोगद्वन्द्वनिर्देश केला आहे तरी त्या सूत्रांतील) 'य्वोः' हें पद द्वन्द्वसमासांतील 'धातु' या शब्दाचेंच विशेषण आहे. तें पद 'श्नु, भ्रू' या शब्दांचें विशेषण होऊं शकत नाहीं; कारण 'श्नु, भ्रू' हे नेहमी उकारान्तच असतात (व ते केव्हांहि इकारान्त नसतात. म्हणून ज्याप्रमाणें 'इ' हें त्यांचें विशेषण होऊं शकत नाहीं त्याचप्रमाणें ते नित्य उकारान्त असल्या-मुळें 'उ' हा त्यांचें विशेषण मानण्याची कांहींच आवश्यकता नाहीं. 'सम्भवव्यभिचाराभ्यां स्याद्विशेषणमर्थवत्' हा न्याय प्रसिद्धच आहे.) हा आशय मनांत धरूनच कौमुदींत 'श्नुप्रत्ययान्तस्य इवर्णोवर्णान्तस्य धातोः भ्रू इत्येतस्य चाङ्गस्येयङुवङौ स्तोऽजादौ प्रत्यये परे' असें प्रकृत सूत्राचें व्याख्यान केलें आहे. 'श्नुधातुभ्रुवामिवर्णोवर्णयोः इयङुवङौ स्तः' असें प्रकृत सूत्राचें व्याख्यान केल्यास, 'इयङ् उवङ्' या आदेशांचें केलेलें ङित्व व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते व वैयधि-करण्यरूप दोष देखील येतो. तसेंच 'क्षिपति, अयुतत्, दिदिवतुः, ऊयतुः' इत्यादि स्थलीं अतिव्याप्तिरूप दोष येतो. या अतिव्याप्ति-रूप दोषाचा परिहार करण्याकरितां प्रकृत सूत्रांतील 'अचि' हें पद इवर्ण उवर्ण यांचें विशेषण मानावें (व प्रकृत सूत्रांत अनुवृत्त होत असलेल्या 'अङ्गस्य' या पदाचें विशेषण मानूं नये) असें कोणी म्हटल्यास, तसा अर्थ करण्यांत क्लिष्टतारूप दोष येतो. ('इय्, उव्' हे आदेश अनेकाल् आहेत व 'अनेकाल् शित्सर्वस्य' सू. ४५ या सूत्रान्वयें ते आदेश संपूर्ण धातूचे ठिकाणीं व 'श्नु' प्रत्ययान्त अङ्गाचे ठिकाणीं आणि 'भ्रू' या संपूर्ण शब्दाचे ठिकाणीं होण्याची जी आपत्ति येत होती ती टाळण्याकरितां पाणिनीनें हे आदेश ङित् पठित केले आहेत. त्यामुळें 'ङिच्च' सू. ४३ या सूत्रान्वयें ते आदेश अन्त्य इउवर्णांचे जागींच होतात. कौमुदींत जसा प्रकृत

सूत्राचा अर्थ केला आहे तसा अर्थ न करिता इउवर्णांचे जागी ते आदेश अनुक्रमें होतात असा अर्थ केला तर, स्थानी सूत्रात निर्दिष्ट आहे असे मानावे लागेल व 'निर्दिश्यमानस्यादेशा भवन्ति'-परि १२-ही परिभाषा असल्यामुळें, ते आदेश सर्वादेश होऊच शकणार नाहीत, केवळ 'इ उ' वर्णांचे जागीच होऊ शकतील आणि त्यामुळें त्या आदेशाचे ङित्वकरण ठरण्याची आपत्ति येते दुसरे असे की, 'य्वो.' हे पद अङ्गाधिकारात पठित असलेल्या प्रकृत सूत्रात अनुवृत्त होत असलेल्या 'अङ्गस्य' या पदाचे विशेषण मानल्यानें, 'येन विधिस्तदन्तस्य' सू २६ या सूत्रान्वयें तदन्तविधि होऊन, 'इउवर्णान्तस्य अङ्गस्य' असा सामानाधिकरण्यानें अन्वय करता येतो पण 'य्वो' हे पद 'अङ्गस्य' याचे विशेषण न मानले व 'अङ्गस्य' ही अवयवषष्ठी मानून 'अङ्गस्य य्वो', म्हणजे 'अङ्गस्य अवयव य. इकार उकार तस्य' असा अन्वय केला तर, तो अन्वय वैयधिकरण्यानें होत असल्यामुळें, 'सम्भवति सामानाधिकरण्ये-वैयधिकरण्यमन्याय्यम्' या न्यायान्वयें, वैयधिकरण्यरूप दोष येतो तिसरे असे की, असा वैयधिकरण्यानें अन्वय केल्यास, मनोरमेंत दिलेल्या 'क्षिपति अद्युतत्' इत्यादि उदाहरणात जो 'क्षिप्, द्युत्' इत्यादि धातूचा इकार किंवा उकार आहे तो अन्त्यावयव नसून देखील त्याचे जागी 'इयङ्, उवङ्' आदेश होण्याची आपत्ति येते, कारण ते 'इउ' वर्ण अङ्गाचे अवयव आहेत ती आपत्ति टाळण्याकरिता अचाच्या लगेंच पूर्वी असलेल्या इउवर्णांचे जागी ते आदेश होतात असा प्रकृत सूत्राचा अर्थ केला तर, जरी इष्टसिद्धि होऊ शकते तरी, 'अचि' हे पद 'अङ्गस्य' या अनुवृत्त पदाचे विशेषण न करिता, 'य्वो.' या पदाचे विशेषण करण्यात क्लिष्टतारूप दोष येतो, कारण 'अचि' या पदाचा 'अजादौ प्रत्यये परे' असा अर्थ आहे व प्रत्ययाला वर्णाची आकाक्षा नसून अङ्गाची आकाक्षा असल्यामुळें, म्हणजे प्रत्ययानें अङ्ग आक्षिप्त होत असल्यामुळें, प्रत्यय अङ्गाचेच विशेषण होणे योग्य आहे तसे न करिता कशी तरी इष्ट रूपाची

सिद्धि होण्याकरितां प्रत्यय वर्णाचें विशेषण करून सूत्रार्थ करणें यांत क्लिष्टतारूप दोष येतो हें उघड आहे.) 'आन्तरतम्यादेरियङ्, ओरुवङ्' असें जें प्रकृत सूत्रावरील कौमुदींत म्हटलें आहे त्यांतील 'आन्तरतम्यात्' या शब्दानें ('स्थानेऽन्तरतमः' सू. ३९ या सूत्रान्वयें) स्थानसाम्याचें ग्रहण होतें. (इकार व यकार यांत तालुरूप स्थानसाम्य आणि उकार व वकार यांत ओष्ठरूप स्थानसाम्य असल्यामुळें, 'इ' चे जागीं 'इय्' व 'उ' चे जागीं 'उव्' आदेश होतो.)

**शब्दरत्न–श्नुप्रभृतीनामिति । तदन्ताङ्गानामित्यर्थः । दोष इति । सामानाधिकरण्ये विशेषणविशेष्यभावमात्रम् । वैयधिकरण्ये तु भेदसम्बन्धः स चेति गौरवं दोष इत्यर्थः । दिदिवतुरिति । अत्र यणापत्तिस्तत्रापि तद्रीत्या वैयधिकरण्यात् । यदि यण्विधौ सामानाधिकरण्यमेव तदेयङ एवापत्तिः । न चेयु लोपेन निर्वाहः, प्रत्ययनिमित्तेयङादेरसिद्धत्वात् । अनित्यत्वात्तदभावेऽप्याह–ऊयतुरिति । क्लिष्टतेति । अजादिप्रत्ययस्याङ्गांशे उदयित्ताकाङ्क्षत्वादिति भावः ।**

'श्नुप्रभृतीनामिवर्णोवर्णयोः' या मनोरमेंतील पंक्तीचा 'तदन्ताङ्गानाम', म्हणजे 'श्नु' प्रत्यय आहे अन्तीं ज्याच्या किंवा धातु आहे अन्तीं ज्याच्या व 'भ्रू' शब्द आहे अन्तीं ज्याच्या अशा अङ्गाचा जो इवर्ण उवर्ण, असा अर्थ आहे. जेथें दोन पदांचा सामानाधिकरण्यानें अन्वय केला जातो तेथें त्या दोन पदांत केवळ विशेषणविशेष्यभावसंबंध असतो, परंतु जेथें दोन पदांचा वैयधिकरण्यानें अन्वय केला जातो तेथें त्या दोन पदांत विशेषणविशेष्यभावसंबंध राहत असून त्या खेरीज भेदसंबंध देखील असतो व अशा रीतीनें वैयधिकरण्यानें अन्वय करण्यांत गौरवरूप दोष आहे असा 'वैयधिकरण्यं च दोषः' या मनोरमेंतील पंक्तीचा भावार्थ आहे. ('य्वोः' हें पद 'अङ्गस्य' याचें विशेषण मानून त्याचा तदन्तविधीनें 'ईवर्णान्तस्य' असा अर्थ केल्यानें,

'इउवर्णान्तस्य' व 'अङ्गस्य' या दोन पदाना सामानाधिकरण्यानें अन्वय होऊ शकतो व त्या दोन पदात विशेषणविशेष्यभावरूप संबंध राहतो पण 'अङ्गस्य य्वो' असा वैयधिकरण्यानें अन्वय केल्यानें त्या दोन पदाचा 'अङ्गावयवयोः य्वो' असा अर्थ होतो व या दोन पदात विशेषणविशेष्यभावरूप भेदसंबंध तर राहतोच पण त्याखेरीज त्या दोन पदात अवयवावयविभावरूप भेदसंबंध देखील राहतो. अशा रीतीनें वैयधिकरण्यानें अन्वय केल्यास दोन संबंध कल्पावे लागत असल्यामुळें व सामानाधिकरण्यानें अन्वय केल्यानें एकच संबंध कल्पावा लागत असल्यामुळें, वैयधिकरण्याने अन्वय करण्यात गौरव आहे हे उघड आहे आणि म्हणूनच दीक्षितानी मनोरमेंत 'वैयधिकरण्य च दोषः' असे म्हटले आहे ) प्रकृत पूर्व सूत्रात वैयधिकरण्यानें अन्वय मानल्यास, 'एरनेकाच' या उत्तर सूत्रात देखील तसाच वैयधिकरण्याने अन्वय मानावा लागेल व त्यामुळें 'दिदिवतु' या स्थली 'दिव्' धातूतील इकाराचे जागी यणादेश होण्याची आपत्ति येईल ('अचि श्नु' व 'एरनेकाच' ही दोन्ही सूत्रें सारखीच – अपवाद अपवादकरूप सूत्रें–असल्यामुळें, प्रकृत पूर्व सूत्रात 'अङ्गस्य य्वो' असा वैयधिकरण्यानें अन्वय केला तर, 'एरनेकाच' या उत्तर सूत्रात भिन्न रीतीनें. म्हणजे सामानाधिकरण्यानें अन्वय करण्याकरिता कोणतेहि सबळ कारण उपलब्ध नसल्यामुळें, त्या उत्तर सूत्रात देखील 'अङ्गस्य ए' असाच वैयधिकरण्यानें अन्वय करावा लागेल व त्यामुळें 'दिव् अतुस् = दिदिव् अतुस्' या स्थली 'दिदिव्' या अनेकाच् धात्वन्त अङ्गापुढें 'अतुस्' हा अजादि प्रत्यय असल्यामुळें, त्या धातूचा अवयव जो इकार तो अजादि प्रत्ययाच्या लगेंच पूर्वी जरी नाही तरी तो धातूचा अवयव असल्यामुळें, त्याचे जागी यणादेश होण्याची आपत्ति येते जरी प्रकृत सूत्रात वैयधिकरण्यानें अन्वय केला जातो तरी ) 'एरनेकाच' या उत्तर सूत्रात 'इवर्णान्तस्य अङ्गस्य' असा सामानाधिकरण्यानेंच अन्वय होतो असे कोणी म्हटल्यास, 'दिदिवतु' या स्थली 'इयङ'

आदेशच होण्याची आपत्ति येते. ( प्रकृत सूत्रांत 'अङ्गस्य य्वोः' असा वैयधिकरण्यानें अन्वय केल्यास व 'एरनेकाचः' या उत्तर सूत्रांत 'इवर्णान्तस्य अङ्गस्य' असा सामानाधिकरण्यानें अन्वय केल्यास, या दोन सूत्रांचे विषय भिन्न होतील, म्हणजे अङ्गाच्या अन्तीं इवर्ण असल्यास त्याचे जागीं 'एरनेकाचः' या सूत्रानें यणादेश होईल व अङ्गाचा अवयव इवर्ण असून तो अङ्गाच्या अन्तीं नसल्यास त्याचे जागीं इयङादेश होईल, व त्यामुळें 'एरनेकाचः' हें उत्तर सूत्र प्रकृत सूत्राचें बाधक ठरणार नाहीं. म्हणून 'दिदिव् अतुस्' या स्थलीं अङ्गाच्या अन्तीं इवर्ण नसून तो वर्ण उपधेंत असल्यामुळें, जरी 'एरनेकाचः' या सूत्रांत सामानाधिकरण्यानें अन्वय केल्यानें तें सूत्र प्रवृत्त होऊं शकणार नाहीं तरी, प्रकृत सूत्रांत वैयधिकरण्यानें अन्वय केल्यानें प्रकृत सूत्रानें 'दिदिव्' या अङ्गांतील उपधेंत असणाऱ्या इकाराचे जागीं इयङादेश होण्याची आपत्ति येईल. आतां शंकाकार असें म्हणतो कीं, 'दिव्' धातूच्या इकाराचे जागीं 'इयङ् = इय्' आदेश केला तरी, आदेशांतील यकारापुढें 'दिव्' धातूतील वकार येत असल्यामुळें, 'लोपो व्योर्वलि' सू. ८७३ या सूत्रानें त्या यकाराचा लोप होऊन 'दिदिवतुः' असेंच रूप सिद्ध होईल. या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं, ) या उदाहरणांत 'लोपो व्योर्वलि' हें सूत्र प्रवृत्त केल्यानें निर्वाह होऊं शकत नाहीं, म्हणजे 'दिदिवतुः' असें रूप सिद्ध होऊं शकत नाहीं; कारण 'इयङ्' इत्यादि आदेश प्रत्ययाच्या निमित्तानें होणारे असल्यामुळें असिद्ध ठरतात. ( 'दिदिव् अतुस्' या स्थलीं 'अतुस्' या पलीकडे असलेल्या अजादि प्रत्ययाच्या निमित्तानें होणारा 'इयङ् = इय्' हा आदेश बहिरङ्ग असून त्याच्या मानानें अलीकडे असलेल्या वकाररूप निमित्तानें होणारें यकारलोपकार्य, 'पूर्वोपस्थितनिमित्तकमन्तरङ्गं परोपस्थितनिमित्तकं बहिरङ्गम्' या न्यायान्वयें अन्तरङ्ग आहे आणि 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' – परि. ५० – ही परिभाषा असल्यामुळें, यकारलोपकार्य करतेवेळीं इयङादेश बहिरङ्ग

ठरतो व तो झालाच नाही, म्हणजे 'इयङ् = इय्' विद्यमानच नाही, असे मानावे लागते आणि अशा रीतीनें जर यकार अविद्यमान आहे तर त्याचा लोप कसा होऊ शकणार? यकारलोप न झाल्यानें 'दिदिय्वतु' असे अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येते ) 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' ही परिभाषा अनित्य मानली असल्यामुळें, त्या परिभाषेची वरील उदाहरणात प्रवृत्ति न केल्यानें यकारलोप होऊ शकतो व 'दिदिवतु' हे इष्ट रूप सिद्ध होऊ शकते असे कोणी म्हटल्यास, (ती शंका मनात धरून) ती परिभाषा प्रवृत्त न केली तरी 'ऊयतु' हे रूप सिद्ध होऊ शकत नाही हे स्पष्ट करण्याकरिता दीक्षित 'ऊयतु' हे उदाहरण मनोरमेंत देतात ('वेञ् तन्तुसन्ताने' या धातूचे लिटाचे रूप करिताना 'वेञो वयिः' सू २४११ या सूत्रानें 'वे' धातूचे जागी 'वय्' असा आदेश होतो 'वे अतुः = वय् अतु' या स्थली 'असंयोगाल्लिट् कित्' सू २२४२ या सूत्रान्वये 'अतुस्' हा प्रत्यय कित् ठरत असल्यामुळें, 'ग्रहिज्यावयि' सू २४१२ या सूत्रानें 'वय्' यातील वकाराचे सम्प्रसारण-उकार-होऊन व 'सम्प्रसारणाच्च' सू ३३० या सूत्रानें 'उ' व 'व' यातील अन्त्य अकार या दोहोंचे जागी 'उ' असा पूर्वरूप एकादेश होऊन 'उय् अतुस्' अशी स्थिति झाली असता, द्विर्वचन करून सवर्णदीर्घ केल्याने 'ऊय् अतुस्' अशी स्थिति होते अशा स्थितीत 'ऊय्' या धातूतील अवयव जो ऊकार त्याचे जागी 'उवङ् = उव' आदेश केल्यास, 'उव्य्' अशी स्थिति होईल व येथें 'उव' यातील वकारापुढें 'वल्' नसून यकार असल्यामुळें, वकारलोप होऊ शकणार नाही व 'उव्यतु' असे अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येईल सारांश बहिरङ्गपरिभाषा-परि ५०-अनित्य मानून तिची प्रवृत्ति न केल्यानें जरी 'दिदिवतु' हे रूप सिद्ध होऊ शकते असे मानले तरी, 'ऊयतु' हें रूप सिद्ध होऊ शकत नाही आणि म्हणून प्रकृत सूत्रात वैयधिकरण्यानें अन्वय करणे योग्य नाही

असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे असें शब्दरत्नकार म्हणतात.) 'विशेषणे तु क्लिष्टता' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, (प्रकृत सूत्रांतील 'अचि' या पदाचा 'यस्मिन्विधिस्तदादावल्ग्रहणे'–परि. ३३ या परिभाषान्वयें 'अजादौ प्रत्यये परे' असा अर्थ होत असल्यामुळें व ) प्रत्ययाला अङ्गाची आकांक्षा असल्यामुळें, 'अचि' या पदाचा 'अङ्गस्य' या प्रकृत सूत्रांत अनुवृत्त होऊं असलेल्या पदाशीं अन्वय न करितां 'य्वोः' या पदाशीं अन्वय करण्यांत क्लिष्टतारूप दोष येतो. ( याचें विवरण पूर्वीं मनोरमेंत केलेंच आहे व यासंबंधानें भैरवींत 'क्लृप्ताकांक्षां विहायाक्लृप्तकल्पनायां मनोव्यापारगौरवं स्पष्टमेव' असें म्हटलें आहे.)

मनोरमाः– "एरनेकाचः" ॥ "अचि श्नुधातु" इति सूत्रे द्वन्द्वनिर्देशेऽपि धातुरेवेह संबध्यते । न तु श्नुभ्रुवौ, तयोरिवर्णासम्भवात् । धातुग्रहणं चावृत्त्या उभयोर्विशेषणं संयोगस्य चाङ्गस्य चेति व्याचष्टे–धात्ववयवसंयोगेत्यादि । तत्र धातुना संयोगस्य विशेषणाविह यण् उन्न्यौ उन्न्यः । अङ्गविशेषणन्तु हरिम् हरी हरीन् इत्यादिसिद्धये । यदि हि धातुनाऽङ्गं न विशेष्येत तर्हि इहापि प्रध्यं प्रध्य इत्यादाविव पूर्वरूपं पूर्वसवर्णदीर्घं च बाधित्वा यण् स्यात् । धात्ववयवसंयोगपूर्वको न भवति य इवर्णस्तदन्तत्वादङ्गस्य । वृश्चिकशब्दस्येति । भाष्यकृता हि वृद्धिपरिकल्पितमपायमाश्रित्य "औत्रार्यानाम्" इति सूत्रं प्रत्याख्यातं ततश्च सम्बन्धमात्रविवक्षायां षष्ठ्येवेति भावः । सूत्रमतेऽप्याह । वृश्चिकसम्बन्धिनीति ।

'एरनेकाचोऽसंयोगपूर्वस्य' सू. २७२ या प्रकृत उत्तर सूत्रांत, 'अचि श्नु' या पूर्व सूत्रांत, जरी 'श्नुधातुभ्रुवाम्' असा इतरेतरयोगद्वन्द्वनिर्देश केला आहे तरी त्या द्वन्द्वसमासांतील, 'धातु' एवढ्याच पदाची अनुवृत्ति होते व तें अनुवृत्त पद प्रकृत सूत्रांतील 'एः' या पदाशीं विशेष्यरूपानें, म्हणजे 'इवर्णान्तो यो धातुः' अशा रीतीनें, संबद्ध–अन्वित–होतें. प्रकृत सूत्रांत 'श्नुभ्रुवौ' यांची

अनुवृत्ति होत नाही; कारण इनुप्रत्ययान्त शब्दाच्या व 'भ्रू' या शब्दाच्या अन्ती इवर्ण असणे शक्य नाही. 'अचि श्नु' या पूर्व सूत्रातून प्रकृत सूत्रांत 'धातोः' हे जें पद अनुवृत्त होते त्याचे दोनदा उच्चारण करून एकदा उच्चारलेले ते पद प्रकृत सूत्रातील 'सयोगस्य' या पदाचे विशेषण केल्यानें व दुसऱ्यानें उच्चारलेले ते पद प्रकृत सूत्रांत अनुवृत्त होणाऱ्या 'अङ्गस्य' या पदाचे विशेषण केल्यानें, कौमुदीत जसा प्रकृत सूत्राचा अर्थ केला आहे तसा अर्थ निष्पन्न होतो आणि हा आशय मनात धरूनच प्रकृत सूत्राचे कौमुदीत 'धात्ववयवसयोगपूर्वो न भवति य इवर्णस्तदन्तो यो धातुस्तदन्तस्याऽने-काचोऽङ्गस्य यण्स्यादजादौ प्रत्यये परे।' असे व्याख्यान केले आहे. 'धातोः' हे अनुवृत्त पद 'सयोगस्य' या पदाचे विशेषण होत असल्या-मुळें, 'उन्न्यौ, उन्न्य.' या स्थली प्रकृत सूत्रानें यणादेश होतो ('उत् नी क्विप्' या स्थली 'सत्सूद्विष' सू. २९७५ या सूत्रानें 'नी' धातूहून क्विप् प्रत्यय केला असता, 'क्विप् = व्' या अपृक्त प्रत्ययाचा 'वेरपृक्तस्य' सू. ३७५ या सूत्रानें लोप होऊन 'उन्नी' असे कृदन्त प्रातिपदिक होतें या दीर्घ इकारान्त शब्दाहून 'औ' व 'जस् = अस्' हे प्रत्यय केल्यास, 'प्रथमयोः पूर्वसवर्णः' सू. १६४ या सूत्राचे प्रकृत सूत्र अपवादक सूत्र असल्यामुळें व 'दीर्घाज्जसि च' सू. २३९ हे पूर्वसवर्णदीर्घाचे निषेधक सूत्र असल्या-मुळें, या स्थली पूर्वसवर्ण दीर्घ होत नाही व 'नी' धातूतील ईकारापूर्वी धातूतील अवयवाचा संयोग नसून धातु व उपसर्ग याच्या अवयवाचा सयोग असल्यामुळें, 'नी' धातील ईकाराचे जागी प्रकृत सूत्रानें यणादेश होतो. 'धातोः' हे पद 'सयोगस्य' याचे विशेषण न मानल्यास, येथें यणादेश न होण्याची आपत्ति येते) 'हरिम् हरी हरीन्' इत्यादि रूपाची सिद्धि होण्याकरिता 'धातोः' हे अनुवृत्त पद 'अङ्गस्य' या अनुवृत्त पदाचे विशेषण मानले आहे. ('हृ' या अजन्त धातूहून 'अच इः' उणादि सू ५७८ या सूत्रानें 'इ' प्रत्यय केला असतां ऋकाराचा गुण होऊन 'हरि' असे उणादि-

प्रत्ययान्त रूप सिद्ध होतें. 'हरि' हें इकारान्त अङ्ग धात्वन्त नसून उणादिप्रत्ययान्त असल्यामुळें, म्हणजे 'हरि' या अङ्गांतील अन्त्य इकार धातूचा अवयव नसून प्रत्यय असल्यामुळें, तशा इकारान्त अङ्गापुढें अजादि विभक्तिप्रत्यय आला असतां, 'एरनेकाचः' या प्रकृत सूत्राची प्रवृत्ति होत नाहीं. व यणादेश होत नाहीं.) जर 'धातोः' हें पद 'अङ्गस्य' याचें विशेषण न मानलें तर, 'प्रध्यम्, प्रध्यः' इत्यादि स्थलीं पूर्वरूप व पूर्वसवर्ण-दीर्घ या कार्यांचा बाध होऊन जसा यणादेश होतो तसा 'हरिम् हरी हरीन्' इत्यादि स्थलीं यणादेश होण्याची आपत्ति येईल. ('प्रकृष्टं ध्यायतीति प्रधीः = प्र ध्यै क्विप् सु' या स्थलीं 'ध्यायतेः सम्प्रसारणं च'—सू. ३१५८ वरील वार्तिक—या वार्तिकान्वयें 'प्र' पूर्वक 'ध्यै' धातूहून क्विप् प्रत्यय केला असतां, त्या धातूंतील यकाराचें इकार असें संप्रसारण होऊन व 'सम्प्र-सारणाच्च' सू. ३३० या सूत्रानें संप्रसारण 'इ' व त्या पुढील 'ऐ' या दोहोंचे जागीं 'इ' असा पूर्वरूप एकादेश होऊन आणि 'हलः' सू. २५५० या सूत्रानें तो इकार दीर्घ होऊन व 'वेरपृ-क्तस्य' सू. ३७५ या सूत्रानें 'क्विप् = व्' या अपृक्त प्रत्ययाचा लोप होऊन 'प्रधी' असें कृदन्त प्रातिपदिक होतें. 'ध्यै' या धातूचें वरील वार्तिकान्वयें, वर सांगितल्याप्रमाणें, 'धी' असें रूपान्तर होत असल्यामुळें, स्थानिवद्भावानें 'धी' हा 'ध्यै' धातूच आहे व 'प्रधी' यांत धातूचा अवयव ईकार अन्तीं असून 'प्रधी' हें धात्वन्त अङ्ग आहे असें मानतां येतें. त्यामुळें 'प्रधी अम्' या स्थलीं 'अमि पूर्वः' सू. १९४ या सूत्रानें पावलेला पूर्वरूप एकादेश बाधित होऊन व 'प्रधी शस् = प्रधी अस्' या स्थलीं 'प्रथमयोः पूर्वसवर्णः' सू. १६४ या सूत्रानें पावलेला पूर्वसवर्णदीर्घ व 'तस्माच्छसो नः पुंसि' सू. १९६ या सूत्रानें 'शस्' यांतील सकाराचे जागीं पावलेला नकारादेश हीं दोन्हीं कार्यें बाधित होऊन, 'प्रधी' या धात्वन्त अङ्गांतील अन्त्य ईकारापूर्वी धात्वयवसंयोग नसल्यामुळें, 'एरनेकाचः'

या उत्तर विशेष सूत्राची प्रवृत्ति होऊन ईकाराचे जागीं यणादेश होतो परतु 'प्रधी' हे जसे धात्वन्त अङ्ग आहे तसे 'हरि' हे धात्वन्त अङ्ग नाही, कारण, पूर्वी सांगितल्याप्रमाणे, 'हरि' यातील अन्त्य इकार धातूचा अवयव नसून औणादिक 'इ' प्रत्यय आहे असा या दोन उदाहरणात फरक असल्यामुळें, 'हरि' या अङ्गापुढें अजादि विभक्तिप्रत्यय आला असला तरी, 'एरनेकाच' या प्रकृत सूत्राची प्रवृत्ति न होता, 'हरि अम्' या स्थली 'अमि पूर्वः' या सूत्रानें पूर्वरूप एकादेश होऊन 'हरिम्' असे रूप होते व 'हरि औ, हरि शस्' या स्थली 'प्रथमयो पूर्वसवर्णः' या सूत्रानें पूर्वसवर्णदीर्घ होऊन 'तस्माच्छसो न पुंसि' या सूत्रानें 'शस्' प्रत्ययातील सकाराचे जागी नकारादेश होऊन 'हरी, हरीन्' अशी रूपें होतात 'धातो' हे 'अङ्गस्य' याचे विशेषण न मानल्यास, 'हरिम् हरी हरीन्' इत्यादि स्थली देखील प्रकृत सूत्रानें यणादेश होण्याची आपत्ति येते, कारण ) 'हरिम' इत्यादि स्थली देखील 'हरि' या अङ्गाच्या अन्ती जो इकार आहे त्याच्या पूर्वी धात्ववयवसंयोग नाही ( पण 'हरि' हे धात्वन्त अङ्ग नसल्यामुळें, यणादेश होण्याची व 'प्रध्यम्, प्रध्यौ, प्रध्य' या रूपासारखी 'हर्यम्' हर्यौ हर्य' अशी अनिष्ट रूपें होण्याची आपत्ति टळते प्रकृत सूत्रावरील कौमुदीत 'गतिकारकेतरपूर्वपदस्य यण् नेष्यते' हे वार्तिक पठित करून दीक्षितानी 'कथं तर्हि दुर्धियं, वृश्चिकभियं' असा प्रश्न केला आहे व 'वृश्चिकभिय' या उदाहरणा-संबधानें उत्तर देताना दीक्षितानी 'वृश्चिकशब्दस्य बुद्धिकृतमपादानत्व नेह विवक्षितम् । वृश्चिकसम्बन्धिनी भीर्वृश्चिकभीरित्युत्तर-पदलोपो वा' असे म्हटले आहे आता या उत्तराचे समर्थन दीक्षित मनोरमेंत करितात ) भाष्यकाराभी बुद्धिकल्पित विश्लेषाचा आश्रय करून 'भीत्रार्थाना भयहेतु' सू ५८८ या सूत्राचे प्रत्याख्यान केले आहे त्यामुळें संबधमात्राची – केवळ संबधसामान्याची – विवक्षा केल्यानें 'वृश्चिक' या शब्दाची षष्ठीच होते ( 'भीत्रार्थाना भयहेतु' सू १–४–२५ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात–

'अयं योगः शक्योऽवक्तुम् । कथम् वृकेभ्यो बिभेति दस्युभ्यो बिभेति ...इति । इह तावतद्वृकेभ्यो बिभेति दस्युभ्यो बिभेतीति य एव मनुष्यः प्रेक्षापूर्वकारी भवति स पश्यति यदि मां वृकाः पश्यन्ति ध्रुवो मे मृत्युरिति । स बुद्धया सम्प्राप्य निवर्तते । तत्र ध्रुवमपायेऽपादानमित्येव सिद्धम् ।' या भाष्याचा अर्थ असा आहे कीं, 'भीत्रार्थानां भयहेतुः' हें सूत्र असण्याची कांहीं गरज नाहीं. तर मग 'वृकेभ्यो बिभेति, दस्युभ्यो बिभेति' या उदाहरणांत 'वृक, दस्यु' यांना अपादानसंज्ञा कशी होईल ? जो मनुष्य विचारशील – विचारपूर्वक कार्य करणारा – आहे तो हें जाणतो कीं, जर मजवर लांडग्यांची नजर जाईल तर माझा मृत्यु खास होईल. म्हणून तो मनानें लांडग्याशीं संबंध पावून तेथून निवृत्त होतो. म्हणून अशा स्थलीं 'ध्रुवमपायेऽपादानम्' सू. ५८६ या सूत्रानेंच अपादानसंज्ञा होऊं शकते. अशा रीतीनें भाष्यकारांनीं 'भीत्रार्थानां भयहेतुः' सू. ५८८ या सूत्राचें प्रत्याख्यान केलें असल्यामुळें, 'वृश्चिकभीः' या स्थलीं 'वृश्चिकात् भीः' असा 'विवक्षातः कारकाणि भवन्ति' या न्यायान्वयें अपादानकारकाची विवक्षा न करितां व पञ्चमीसमास न करितां संबंधसामान्याची विवक्षा करून 'वृश्चिकस्य भीः' असा षष्ठीसमास केल्यानें 'वृश्चिक' हा शब्द पञ्चम्यन्त न होतां षष्ठ्यन्त होतो आणि षष्ठीकारक नसल्यामुळें व अशा रीतीनें 'भी' या धातूपूर्वी अपादानकारक नसून षष्ठी आहे असें मानतां येत असल्यामुळें, या स्थलीं 'गतिकारकपूर्वस्यैवेष्यते यणादेशः' या प्रकृत सूत्रावरील भाष्यांत पठित केलेल्या वार्तिकान्वयें 'भी' यांतील ईकाराचे जागीं प्रकृत सूत्रानें होणारा यणादेश न होतां 'अचि श्नु' या पूर्व सूत्रानें इयङादेश होऊन 'वृश्चिकभियः' हें रूप सिद्ध होतें.) सूत्रकाराच्या मतान्वयें देखील 'वृश्चिकभियः' हें रूप सिद्ध होऊं शकतें हें सांगण्याच्या हेतूनें कौमुदींत 'वृश्चिकसम्बन्धिनी भीर्वृश्चिकभीः' असें म्हटलें आहे. (अशा रीतीनें मध्यमपदलोपीसमास केला असतां, 'भी' या धातूच्या पूर्वी कारक येत नसल्यामुळें,

'गतिकारकपूर्वस्यैवेष्यते' या वार्तिकान्वयें या उदाहरणांत प्रकृत सूत्रानें यणादेश न होता ' अचि श्नु ' या पूर्व सूत्रानें 'इयङ्' आदेश होतो. )

शब्दरत्न– उभयोर्विशेषणमिति । व्याख्यानाल्लक्ष्यानुरोधाच्चैकदेशान्वयेऽपि सौत्रत्वाद् वृत्तिरिति भावः । उन्न्याविति । अत एव स्वरपूर्वा, पदपूर्वा चोपधा यस्येवर्णस्य तस्य यणित्यर्थक ' स्वरपदपूर्वोपधस्य ' इति वार्तिकं सङ्गच्छते । उक्तोपायेन प्रत्याख्यातमित्यन्यत् । तदन्तत्वादिति । न च धात्ववयवसंयोगपूर्वत्वस्य धात्ववयवेकार एव सम्भवेन संयोगवद्विप्रयोगस्यापि विशेषावगतिहेतुत्वेन तद्भिन्नस्यापि धात्ववयवस्यैव ग्रहणान्न दोष इति वाच्यम्, तन्त्रीरित्यादौ धात्ववयवसंयोगपूर्वस्याधात्ववयवस्यापि सम्भवात् । "परिमाणाख्यायाम्" इति सूत्रे भाष्ये ' अजपावपि संज्ञायामेव यथाजातीयक उत्सर्गस्तज्जातीयकेनापवादेनापि भवितव्यम् ' इत्युक्त तन्मूलकेन ' उत्सर्गसमानदेशा अपवादा ' इति न्यायेन तु न निर्वाहः । अङ्गाक्षे तदसम्बन्धे हरिमित्यादावपि तत्प्राप्त्या तेन येन नाप्राप्त्यभावेन तदपवादत्वस्यैवाभावात् । यद्यपि प्रत्यासत्त्या "इको गुणवृद्धी" इति निर्देशोपष्टब्धया धात्ववयवसंयोगपूर्वभिन्नस्य धात्ववयवस्यैव ग्रहणमिति हरिमित्यादौ न दोषस्तथाऽपि स्पष्टप्रतिपत्तये आवृत्तिरेवाश्रितेति दिक् । सूत्रमतेऽपीति । "भीत्रा" इति सूत्र पञ्चमीबाधनार्थमिति वैतण्डिकतया ये वदन्ति तत्सिद्धसूत्रमतेऽपीत्यर्थः । वस्तुतो भयहेतुरित्युक्त्याऽस्य तृतीयाबाधकत्व बोध्यम् ।

' धातुग्रहण चावृत्त्या उभयोर्विशेषण सयोगस्य चाङ्गस्य ' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचे कारण हे आहे की, (भाष्यात) तसे व्याख्यान केले आहे व इष्ट रूपाची सिद्धि होण्याकरिता तसे मानणे, म्हणजे ' धातो ' हा शब्द ' सयोगस्य ' याचें देखील विशेषण मानणे, आवश्यक आहे (' असयोगपूर्वस्य ' या प्रकृत सूत्रात निर्दिष्ट असलेल्या स्थली) एकदेशान्वय होत असून देखील जो समास

केला आहे तो सौत्रत्वामुळें केला आहे. (प्रकृत सूत्रावरील भाष्यांत–६–४–८२–'असंयोगपूर्वे ह्यनिष्टप्रसङ्गः' हें वार्तिक पठित करून त्या वार्तिकाचें प्रत्याख्यान करितांना भाष्यकार म्हणतात – 'तर्हि वक्तव्यम् ? । न वक्तव्यम् । धातोरिति वर्तते । तत्र धातुना संयोगं विशेषयिष्यामः, धातोर्यः संयोगस्तत्पूर्वस्य नेति ।' या भाष्यावरून हें स्पष्ट होतें कीं, भाष्यकारांनीं 'धातु' हा शब्द 'असंयोगपूर्वस्य' या प्रकृत सूत्रांत असलेल्या पदांतील 'संयोग' या शब्दाचें विशेषण मानला आहे. प्रकृत सूत्र अङ्गाधिकारांत पठित असल्यामुळें, या सूत्रांत 'अङ्गस्य' या पदाची अनुवृत्ति होत असून 'धातोः' हें त्या अनुवृत्त पदाचें विशेषण होतें याबद्दल कांहीं वाद नाहीं. अशा रीतीनें 'धातोः' हें पद 'संयोगस्य' व 'अङ्गस्य' या दोहोंचेंहि विशेषण भाष्यकारांनीं मानलें असल्यामुळें, दीक्षितांनीं 'उभयोर्विशेषणं संयोगस्य चाङ्गस्य' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे तें योग्य ठरतें. दुसरें असें कीं, इष्ट रूपांची सिद्धि होण्याकरितां 'धातोः' हा शब्द 'संयोगस्य' याचें विशेषण मानणें आवश्यक आहे; कारण तसें न मानल्यास, 'उन्न्यौ, उन्न्यः, उद्ध्यौ, उद्ध्यः' इत्यादि स्थलीं धातूच्या अन्त्य इकारापूर्वी संयोग असल्यामुळें, त्या इकाराचे जागीं यणादेश न होण्याची आपत्ति येते. परंतु 'धातोः' हें 'संयोगस्य' याचें विशेषण मानल्यानें व वरील उदाहरणांत धातूच्या अन्त्य इकारापूर्वी धातूच्या वर्णांचा संयोग नसून 'धातु' व 'उपसर्ग' यांच्या वर्णांचा संयोग असल्यामुळें ती आपत्ति टळते. आतां येथें असा प्रश्न उद्भवतो कीं, प्रकृत सूत्रांतील 'असंयोगपूर्वस्य' या अन्यपदार्थप्रधान बहुव्रीहिसमासांत 'संयोग' हा शब्द उपसर्जन असल्यामुळें, त्या शब्दाचें 'धातु' हा शब्द विशेषण होऊं शकत नाहीं; कारण 'वृत्तस्य विशेषणयोगो न' असे वचन भाष्यांत पठित केलें आहे. या प्रश्नाचें शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं, जरी 'असंयोगपूर्वस्य' या पदांतील 'संयोग' या एकदेशाशीं 'धातु' हा शब्द विशेषणरूपानें अन्वित होतो व

'वृत्तस्य विशेषणयोगो न' असा जरी न्याय आहे तरी, 'छन्दो-वत्सूत्राणि भवन्ति' व 'दृष्टानुविधिः छन्दसि' अशी वचनें भाष्यात ठिकठिकाणी पठित असल्यामुळें, या स्थली जो समास झाला आहे तो सौत्र समास मानून त्याचे समर्थन करणे भाग आहे. प्रकृत सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी या विषयासंबधानें 'उपसर्जन चै संयोग'। न चोपसर्जनस्य विशेषणमस्ति। धातोरित्यनुवर्तन-सामर्थ्यादुपसर्जनस्यापि विशेषणं भविष्यति' असे म्हटले आहे) 'उन्न्यौ' इत्यादि स्थली यणादेश होणे इष्ट असल्यामुळेंच, ज्या इकाराच्या उपधेपूर्वी स्वर आहे किंवा पद आहे तशा इकाराचे जागी यणादेश होतो या अर्थाचे 'स्वरपदपूर्वोपधस्य च' असे जें वार्तिक पठित केले आहे तें सुसङ्गत ठरते वर सांगितलेल्या उपायाचा आश्रय करून, म्हणजे 'धातोः' हे पद 'संयोगस्य' या पदाचे विशेषण मानून, भाष्यकारानी त्या वार्तिकाचे प्रत्याख्यान केले आहे ही गोष्ट वेगळी (यथापठित प्रकृत सूत्रान्वयें 'उन्न्यौ, उन्न्य.' इत्यादि रूपें सिद्ध होऊ शकत नाहीत आणि म्हणूनच वार्तिककाराला वरील वार्तिक करावे लागले 'उन्नी' या उदाहरणात 'ई' याची उपधा जो नकार आहे त्याच्या पूर्वी 'उत्' हे पद असल्यामुळें व तसेच 'निन्यतु' इत्यादि स्थली 'निनी' या अभ्यस्त अङ्गातील अन्त्य ईकाराची उपधा जो नकार आहे त्याच्या पूर्वी 'अभ्यस्तानामादि' सू ३६७३ या सूत्रान्वयें उदात्त होणारा 'नि' यातील इकार हा अच् उदात्त असल्यामुळें, वरील वार्तिकान्वयें वर दिलेल्या दोन्ही उदाहरणात यणादेश होतो परंतु वरील वार्तिक न मानले तरी, 'धातोः' हा शब्द 'संयोगस्य' या शब्दाचे विशेषण मानल्यानें, यथापठित प्रकृत सूत्रानें देखील इष्ट रूपाची सिद्धि होऊ शकते. कारण 'उन्नी औ, उन्नी अस्' या स्थली 'नी' या धातूतील अन्त्य ईकारापूर्वी जरी संयोग आहे तरी तो धात्ववयवसंयोग नसून, पूर्वी सांगितल्याप्रमाणे, धातु व उपसर्ग यांच्या अवयवाचा संयोग असल्या-

मुळें, या उदाहरणांत प्रकृत सूत्रानें यणादेश होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. तसेंच ' निनी अतुस् ' या स्थलीं 'निनी' या अङ्गांतील अन्त्य ईकारापूर्वी संयोग नसल्यामुळें त्या स्थलीं देखील प्रकृत सूत्रानें यणादेश होऊं शकतोच, आणि म्हणूनच 'धातोः' हें पद ' संयोगस्य ' या पदाचें विशेषण मानून भाष्यकारांनीं वरील वार्तिकाचें प्रत्याख्यान केलें आहे. प्रकृत सूत्रावरील भाष्यांत 'स्वरपदपूर्वोपधस्य च यणादेशः' हें वार्तिक पठित करून भाष्यकार म्हणतात– ' स्वरपूर्वोपधस्य पदपूर्वोपधस्य चेति वक्तव्यम्, स्वरपूर्वा च यस्योपधा पदपूर्वा च । स्वरपूर्वा – निन्यतुः निन्युः । पदपूर्वा – उन्न्यौ उन्न्यः । ' व पुढें त्या वार्तिकाचें प्रत्याख्यान करितांना भाष्यकार म्हणतात –' तत्तर्हि वक्तव्यम् ? । न वक्तव्यम् । धातोरिति वर्तते । तत्र धातुना संयोगं विशेषयिष्यामः, धातोर्यः संयोगस्तत्पूर्वस्य नेति । ' शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय हा आहे कीं, वार्तिककाराला इष्ट असलेलीं प्रयोजनें ' धातोः ' हें पद 'संयोगस्य' या या पदाचें विशेषण मानल्यानेंच सिद्ध होऊं शकत असल्यामुळें, तें पद ' संयोगस्य ' याचें विशेषण मानणें आवश्यक आहे. ) ज्या इवर्णापूर्वी धातूच्या अवयवांचा संयोग असतो तसा इवर्ण धातूचाच अवयवरूप इकार असणें शक्य असल्यामुळें आणि संयोगाप्रमाणेंच विप्रयोग देखील ( 'संयोगो विप्रयोगश्च ' या कारिकान्वयें ) विशेष ज्ञान करून देण्याला कारणीभूत होत असल्यामुळें ज्या स्थलीं इवर्णापूर्वी धात्ववयवसंयोग नाहीं तशा स्थलीं देखील धात्ववयवरूप इवर्णाचेंच ग्रहण होत असल्यामुळें ( ' हरिम् ' इत्यादि स्थलीं ) कोणताहि दोष उद्भवत नाहीं असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण 'तन्व्यः ' इत्यादि स्थलीं अन्त्य ईकारापूर्वी धातूच्या अवयवांचा संयोग असून देखील तो अन्त्य ईकार धातूचा अवयव नसणें संभवतें. ( शंकाकाराचें असें म्हणणें आहे कीं, ज्या इवर्णापूर्वी धातूच्या अवयवांचा संयोग असतो तो इवर्ण धातूचा अवयवच असणें शक्य आहे, आणि म्हणून ' धात्ववयवसंयोगपूर्व इवर्ण ' असें म्हटल्यानें

ज्याप्रमाणे तो इवर्ण धातूचा अवयवच आहे असा विशिष्ट बोध होतो त्याचप्रमाणे 'धात्ववयवासयोगपूर्व इवर्ण' असे म्हटल्यानें देखील तो इवर्ण धातूचा अवयव आहे अशाच प्रकारचा बोध होतो उदाहरणार्थ 'सवत्सा आनीयताम्' असे सयोगबोधक वाक्य उच्चारल्यानें जसा गायीचा बोध होतो त्याचप्रमाणे 'अवत्सा आनीयताम्' असे विप्रयोगबोधक वाक्य उच्चारल्यानें देखील गायीचाच बोध होतो म्हणून 'धातो' हे पद जरी 'सयोगस्य' याचे विशेषण मानणे आवश्यक आहे तरी, ते पद 'अङ्गस्य' याचे विशेषण मानण्याची काही आवश्यकता नाही आणि म्हणून 'धातो' हें पद दोनदा उच्चारण्याची काही गरज नाही या शकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, ज्या पायावर वरील शका रचली आहे तो पायाच शुद्ध नाही, कारण ज्या इवर्णापूर्वी धातूच्या अवयवाचा सयोग असतो तो इवर्ण धातूचाच अवयव असू शकतो असा काही नियम नाही उदाहरणार्थ 'तन्त्रि कुटुम्बधारणे' या चुरादिगणात पठित असलेल्या इदित धातूचे 'इदितो नुम्धातो' सू २२६२ या सूत्रान्वयें 'तन्त्र्' असे रूप झाल्यावर त्याहून 'अवितृस्तृतन्त्रिभ्य ई' उणादि सू ४३८ या सूत्रानें औणादिक 'ई' प्रत्यय केला असता 'तन्त्री' असे जे कृदन्त प्रातिपदिक होते त्यातील अन्त्य ईकारापूर्वी जरी 'तन्त्र्' धातूच्या अवयवाचा सयोग आहे तरी, तो अन्त्य ईकार धातूचा अवयव नसून औणादिक 'ई' प्रत्यय आहे तसेच 'हरि' या उदाहरणात ज्या अन्त्य इकारापूर्वी धातूच्य अवयवाचा समोग नाही तो अन्त्य इकार धातूचा अवयव नसून पूर्वी सांगितल्याप्रमाणे 'अच इ' उणादि सू ५७८ या सूत्रानें झालेला औणादिक 'इ' प्रत्यय आहे अशा रीतीनें ज्या नियमाच्या आधारावर शकाकारानें आपली शका रचली आहे तो नियम सवत्र लागू पडणारा नसून अनेक स्थली व्यभिचरित होत असल्यामुळें, त्याची शका चूक ठरते आणि म्हणून प्रकृत सूत्रातील 'ए' या पदानें धात्वन्त अङ्गातील अन्त्य इवर्णाचे ग्रहण होण्याकरिता

'धातोः' हें पद दोनदां उच्चारणें व एकदां उच्चारलेलें तें पद 'संयोगस्य' याचें विशेषण मानून दुसऱ्यानें उच्चारलेलें तें पद 'अङ्गस्य' याचें देखील विशेषण मानणें आवश्यक आहे ) 'परिमाणाख्यायां सर्वेभ्यः' सू. ३-३-२० या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं 'अजपावपि संज्ञायामेव, यथाजातीयक उत्सर्गस्तज्जातीयकेनापवादेनापि भवितव्यम्', म्हणजे 'परिमाणाख्यायां सर्वेभ्यः' सू. ३१९० या सामान्य सूत्रानें होणारा 'घञ्' प्रत्यय ज्याप्रमाणें संज्ञा गम्यमान असतांनाच होतो त्याचप्रमाणें 'एरच्' सू. ३२३१ या विशेष सूत्रानें होणारा 'अच्' प्रत्यय व 'ऋदोरप्' सू. ३२३२ या सूत्रानें होणारा 'अप्' प्रत्यय हे दोन्ही प्रत्यय देखील संज्ञा गम्यमान असतांनाच होऊं शकतात; कारण ज्या विषयांत सामान्यशास्त्र प्रवृत्त होतें तशाच विषयांत विशेष शास्त्राची देखील प्रवृत्ति होते, असें म्हटलें आहे व या भाष्यवचनावरून 'उत्सर्गसमानदेशा अपवादा भवन्ति', म्हणजे ज्या प्रदेशांत उत्सर्गाची प्रवृत्ति होते त्याच प्रदेशांत अपवादाची देखील प्रवृत्ति होते, असा जो न्याय निघतो तो न्याय प्रकृत स्थलीं लावल्यानें काम भागत नाहीं, म्हणजे 'धातोः' हें पद 'अङ्गस्य' या पदाचें विशेषण मानणें टाळतां येत नाहीं; कारण 'धातोः' हें पद 'अङ्गस्य' या पदाचें विशेषण न मानल्यास, 'हरिम्' इत्यादि स्थलीं देखील यणादेशाची प्राप्ति होत असल्यामुळें, 'एरनेकाचः' या प्रकृत सूत्राला 'येन नाप्राप्ते'–परि. ५८– हा न्याय लागू शकणार नाहीं व त्यामुळें तें सूत्र 'अचि श्नु' या सूत्राचें अपवादक सूत्र ठरूं शकणार नाहीं. ('उत्सर्गसमानदेशा अपवादा भवन्ति' हा जो न्याय भाष्यांत पठित आहे तो लागू पडण्याकरितां, एखाद्या सूत्रानें ज्या सामान्य सूत्राचा बाध करणें आहे तें सूत्र त्या सामान्य सूत्राचें निरवकाशत्वामुळें अपवादक सूत्र असलें पाहिजे. तसें होण्याकरितां जेथें जेथें तें विशेषसूत्र प्रवृत्त होऊं पाहतें तेथें तेथें सामान्यसूत्राची अवश्यप्राप्ति असली पाहिजे. परंतु प्रकृत सूत्रांत 'धातोः' हें पद

'अङ्गस्य' याचे विशेषण न मानल्यास, जेथें अङ्गाच्या अन्ती धातूचा इवर्ण आहे तेथें 'अचि श्नु' या सूत्राची प्रवृत्ति होईल व जेथें अङ्गाच्या अन्ती असलेला इवर्ण धातूचा अवयव नाही तेथें 'एरनेकाचः' हे सूत्र प्रवृत्त होईल व अशा रीतीनें 'एरनेकाचः' हे सूत्र निरवकाश न ठरता भिन्न विषयात सावकाश व चरितार्थ ठरेल आणि त्यामुळें त्या सूत्राला 'येन नाप्राप्ते' हा न्याय लागू पडणार नाही व ते सूत्र 'अचि श्नु' या सूत्राचे अपवादक सूत्र ठरू शकणार नाही आणि 'हरि अम्' इत्यादि स्थली 'हरि' या अङ्गाच्या अन्ती असणारा इकार पूर्वी सांगितल्याप्रमाणे धातूचा इकार नसून प्रत्ययाचा इकार असल्यामुळें, 'एरनेकाचः' या प्रकृत सूत्रानें यणादेश होण्याची आपत्ति येईल. ती आपत्ति टाळण्याकरिता व 'एरनेकाचः' हे प्रकृत सूत्र 'अचि श्नुधातु' या सूत्राचे अपवादक सूत्र ठरण्याकरिता 'धातोः' हे पद 'अङ्गस्य' या पदाचे विशेषण मानणे आवश्यक आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे) 'इको गुणवृद्धी' सू. ३४ या सूत्रातील 'गुणवृद्धी' या निर्देशाच्या सामर्थ्यानें प्रत्यासत्तिन्यायान्वयें जरी असे म्हणता येतें की, धातूचा अन्त्य अवयव जो इकार त्याच्या पूर्वी धातूच्या अवयवाचा संयोग नसल्यास तशाच इकाराचे प्रकृत सूत्रानें ग्रहण होते, म्हणजे तशाच इकाराचे जागी प्रकृत सूत्रानें यणादेश होतो व असा अर्थ केल्यानें 'हरिम्' इत्यादि स्थली जरी दोष येत नाही तरी, प्रकृत सूत्राचा अर्थ स्पष्ट होण्याकरिता 'धातो' या पदाची द्विरावृत्ति केली आहे ( 'स्त्रियां क्तिन्' सू. ३२७२ या सूत्रानें 'वृध्' धातूहून 'क्तिन् = ति' प्रत्यय होऊन व 'झषस्त-थोर्धः.' सू २२८० या सूत्रानें 'ति' या प्रत्ययातील तकाराचा धकार होऊन आणि 'झला जश् झशि' सू. ५२ या सूत्रानें 'वृध्' यातील धकाराचा दकार होऊन 'वृद्धि' असे रूप होते 'वृद्धि' या स्थली जो अन्त्य इकार आहे तो धातूचा अवयव नसून 'ति' प्रत्ययाचा इकार आहे व त्या इकारापूर्वी असलेला संयोग धातूच्या

अवयवांचा संयोग नसून 'वृध्' धातूंतील 'धकार = दकार' व 'ति' प्रत्ययांतील 'तकार = धकार' यांचा संयोग आहे. म्हणून 'इको गुणवृद्धी' या सूत्रांत पाणिनीनें 'गुणवृद्धी' असा जो निर्देश केला आहे त्या निर्देशावरूनच हें स्पष्ट होतें कीं, धातूचा अवयव इकार असून त्याच्या पूर्वी धात्ववयवसंयोग नसल्यासच, त्याचे जागीं यणादेश होतो. असें नसतें तर, 'गुणवृद्धि औ' या स्थलीं 'प्रथमयोः पूर्वसवर्णः' सू. १६४ या सूत्रानें पूर्वसवर्णदीर्घ न करितां, पाणिनीनें 'एरनेकाचः' या प्रकृत सूत्रानें यणादेश करून 'गुणवृद्ध्यौ' असा निर्देश केला असता. म्हणून 'गुणवृद्धी' इत्यादि पाणिनीय निर्देश योग्य ठरण्याकरितां 'एरनेकाचः' या सूत्रांत अनुवृत्त असलेल्या 'धातोः' या पदाच्या सान्निध्यामुळें, जसा कौमुदींत प्रकृत सूत्राचा अर्थ केला आहे तसा अर्थ अनुमानानें आपोआपच निघूं शकतो व त्यामुळें 'धातोः' या पदाची द्विरावृत्ति करण्याची कांहीं गरज नाहीं असें म्हणतां येतें. पण असें जरी आहे तरी, पाणिनीय निर्देशाच्या सामर्थ्यानें सूत्रार्थ अनुमानानें न करितां, सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या किंवा अनुवृत्त होत असलेल्या पदांतूनच सूत्रार्थ निश्चित करणें योग्य असल्यामुळें व 'धातोः' या पदाची द्विरावृत्ति केल्यादिवाय प्रकृत सूत्रांतून इष्ट अर्थ स्पष्टपणें निघूं शकत नसल्यामुळें, 'धातोः' या पदाची द्विरावृत्ति करणेंच इष्ट आहे व तसें केल्यानें अनुमानाचा आश्रय करण्याची व विलक्षण क्लिष्ट रीतीनें सूत्रार्थ निष्पन्न करण्याची गरज राहत नाहीं व गौरवरूप दोष टळतो असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे. ) 'सूत्रमतेऽपि' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा अर्थ हा आहे कीं, जे कोणी वितण्डवाद करून म्हणतात कीं षष्ठीविभक्तीचा बाध होण्याकरितां 'भीत्रार्थानां भयहेतुः' सू. ५८८ हें सूत्र केलें आहे त्यांनें मत स्वीकारलें तरी, 'वृकनिमित्तसम्ब-न्धिनी भीः वृकभीः' अशा मध्यमपदलोपीसमास केल्यानें त्या उदाहरणांत यणादेशाची आपत्ति टाळतां येते. (याचें विवरण पूर्वी मनोरमेंत केलेंच आहे.) वास्तविक 'भीत्रार्थानाम्' या सूत्रांत

'भयहेतु.' असे म्हटले असल्यामुळें, हे सूत्र (पष्ठीचा बाध करणारे सूत्र नसून) तृतीयेचा बाध करणारे सूत्र आहे हे लक्षात ठेवावे. ('वृश्चिकभीः' या स्थली 'वृश्चिक' हा भीतीचा अवधि नसून निमित्त आहे आणि म्हणून 'हेतौ' सू ५६८ या सूत्राने त्या शब्दाला जी तृतीया पावली आहे ती न होता पञ्चमी व्हावी याकरिता 'भीत्रार्थानाम्' हें सूत्र केले आहे असे शब्दरत्नकाराचे म्हणणे आहे)

मनोरमा– अल्लोपयलोपाविति । न च परत्वात् "येरपृक्तस्य" इति स्यादिति वाच्यम् । 'येरपृक्तलोपाद्धलि लोप. पूर्वविप्रतिषेधेन' इति वार्तिककारोक्ते. । क्वौ लुप्तमिति । नपुंसके भावे क्तः । क्वौ लोप इत्यर्थः । इह सर्वं कुमारीमिच्छन् कुमारीत्यत्रापि बोध्यम् । अनन्यतर्येति । गौणत्वेऽपि अनङणित्वयोः प्रवृत्तेरुक्तत्वाच्चेति बोध्यम् । दीर्घस्यापीति । एतदर्थं कृतयणादेशनिर्देश इति भावः । ननु सखेः भूपतेः इति गुणविषये व्यावर्तयितुं यणा निर्देश इति चेत् । अस्त्वेवम् । तथाऽपि दीर्घप्रवृत्तेर्दुर्वारत्वात् । न हि ह्रस्वेषु भाव्य न दीर्घेष्वित्यत्र प्रमाणमस्ति । सौत्रस्य विकृतनिर्देशस्याव्याप्त्यतिव्याप्त्युभयवारकत्वेन तत्सारवत्त्वलाभेन तथैवौचित्यात् भाष्यारूढत्वाच्च ।

('न भूसुधियो' सू. २७३ या सूत्रावरील कौमुदीत 'सखायमिच्छति सखीयति । ततः क्विप् । अल्लोपयलोपौ ।' असे म्हटले आहे याचा भावार्थ हा आहे की, 'सखायमात्मन इच्छति' या अर्थामध्यें 'सखि' शब्दाहून 'सुप आत्मन क्यच्' सू २६५७ या सूत्राने 'क्यच् = य' प्रत्यय केला असता, 'अकृत्सार्वधातुकयो-र्दीर्घ.' सू २२९८ या सूत्राने 'सखि' यातील अन्त्य इकार दीर्घ होऊन 'सखीय' असे जें क्यजन्त रूप होते त्याला 'सनाद्यन्ता धातव' सू २३०४ या सूत्राने धातुसंज्ञा होते या क्यजन्त धातूहून 'क्विप् च' सू २९८३ या सूत्राने 'क्विप् = व्' प्रत्यय केला असता, 'अतो लोप' सू २३०८ या सूत्राने 'सखीय' यातील अन्त्य अकाराचा लोप होऊन नतर 'लोपो व्योर्वलि' सू. ८७३ या सूत्राने अवशिष्ट

यकाराचा लोप होतो. 'न पदान्त' सू. ५१ हा निषेध असल्यामुळें, यकारलोप करतेवेळीं अकारलोपाचे ठिकाणीं स्थानिवद्भाव करतां येत नाहीं. यकारलोप झाल्यावर 'वेरपृक्तस्य' सू. ३७५ या सूत्रानें 'क्विप् = व्' या अपृक्त प्रत्ययाचा लोप होऊन 'सखी' असें ईदन्त प्रातिपदिक होतें.) 'वेरपृक्तस्य' हें 'लोपो व्योर्वलि' या सूत्राच्या मानानें परसूत्र असल्यामुळें, 'सखीय्' यांतील यकाराचा लोप होण्यापूर्वी 'क्विप् = व्' या प्रत्ययाचा लोप होण्याची प्राप्ति होते असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण 'वेरपृक्त-लोपाद्वलि लोपः पूर्वविप्रतिषेधेन', म्हणजे 'वेरपृक्तस्य' हें परसूत्र असून 'लोपो व्योर्वलि' हें पूर्वसूत्र आहे तरी 'लोपो व्योर्वलि' हें पूर्व सूत्र पूर्वविप्रतिषेधानें प्रथम प्रवृत्त होतें, असें वार्तिककारानें म्हटलें आहे. (त्यामुळें यकारलोप प्रथम झाल्यावर नंतर क्विप् प्रत्ययाचा लोप होतो. आतां येथें असा प्रश्न उद्भवतो कीं, 'वेरपृक्तस्य' या परसूत्रानें क्विप् प्रत्ययाचा जरी प्रथम लोप केला तरी, 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' सू. २६२ या सूत्रान्वयें तो क्विप् प्रत्यय कायम आहे असें प्रत्ययलक्षणानें मानतां येतें व त्यामुळें 'लोपो व्योर्वलि' या पूर्वसूत्रानें नंतर यकारलोप करतां येतो. मग पूर्वविप्रतिषेधाचें वरील वार्तिक असण्याची गरज काय? या प्रश्नाचें उत्तर हें आहे कीं, 'लोपो व्योर्वलि' या सूत्रानें होणारें कार्य 'वल्' प्रत्याहारान्तर्गत वर्ण पुढें असतांना होणारें वर्णनिमित्तक कार्य असल्यामुळें व 'वर्णाश्रये नास्ति-प्रत्ययलक्षणम्'-परि. २१-ही परिभाषा असल्यामुळें, क्विप् प्रत्ययाचा लोप केल्यावर तो 'क्विप् = व्' कायम आहे असें प्रत्ययलक्षणानें मानतां येत नाहीं आणि म्हणून वार्तिककारानें वरील वार्तिक मुद्दाम केलें आहे. 'लोपो व्योर्वलि' सू. ६-१-६६ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार म्हणतात- 'नित्यत्वात्परत्वाच्च क्विब्लोपः। क्विब्लोपे कृते वलाद्यभावाद् यलोपो न प्राप्नोति। एवं तर्हि प्रत्ययलक्षणेन भविष्यति। वर्णाश्रये नास्ति प्रत्ययलक्षणम्।' आतां येथें अशी शंका उपस्थित होते

की, जरी 'न पदान्त' हा निषेध असल्यामुळें यकारलोप करतेवेळी अकारलोपाचे ठिकाणी स्थानिवद्भाव करता येत नाही तरी, यणादेश करतेवेळी 'अच: परस्मिन्' सू ५० या सूत्रानें अकारलोपाचे ठिकाणी स्थानिवद्भाव करता येतो आणि म्हणून 'सखी' या शब्दा-पुढें 'अ' विद्यमान आहे असे मानल्यानें यणादेशाची प्राप्ति होते या शंकेवर कौमुदीत दीक्षितांनी असे उत्तर दिले आहे की, 'क्वौ लुप्त न स्थानिवत्', म्हणजे 'क्वि' प्रत्ययाच्या निमित्तामुळें अचाचा लोप झाला असता त्याचे ठिकाणी स्थानिवद्भाव करता येत नाही, असे वार्तिक असल्यामुळें, 'अतो लोप' या सूत्रानें झालेल्या क्विप्प्रत्ययनिमित्तक अकारलोपाचे ठिकाणी तो अकार विद्यमान आहे अशी स्थानिवद्भावानें बुद्धि करता येत नाही व त्यामुळें यणादेशाची प्राप्ति होत नाही ) 'क्वौ लुप्तम्' या वार्तिकातील 'लुप्तम्' हा शब्द 'नपुंसके भावे क्त' सू ३०९० या सूत्रानें सिद्ध झाला आहे व त्याचा 'लोप' असा अर्थ आहे ज्याप्रमाणे 'सखायमिच्छन् सखी' असे वर सांगितल्याप्रमाणे रूप होते त्याचप्रमाणे 'कुमारीमिच्छन् कुमारी' हे रूप देखील सिद्ध होते हे जाणावें 'एकदेशविकृतस्यानन्यवत्त्वात्ङिस्त्वे', म्हणजे 'एकदेश-विकृतमनन्यवत्'-परि ३७-ही परिभाषा असल्यामुळें ज्याप्रमाणे 'अनङ् सौ' सू २४८ व 'सख्युरसम्बुद्धौ' सू २५३ या सूत्रान्वयें 'सखि' शब्दाला 'अनङ्' व णिद्वत्कार्य होतें त्याचप्रमाणे तें कार्य एकदेशविकृत 'सखी' या शब्दाला देखील होतें, असे जें प्रकृत सूत्रावरील कौमुदीत म्हटलें आहे त्याचे कारण हे की, ('सखायमिच्छन सखी' या स्थळी जरी 'सखि' हा शब्द इच्छार्थाचे विशेषण होऊन गौण – उपसर्जन – झाला आहे तरी अशा ) गौण शब्दाहून देखील 'अनङ्' व णिद्वत्कार्य होतें हे पूर्वी सांगितलेच आहे हे लक्षात ठेवावे ('गौणमुख्ययोर्मुख्ये कार्य सम्प्रत्ययः'–परि १५–या परिभाषेतील 'गौण' या शब्दानें अशा रीतीनें उपसर्जन झालेल्या शब्दाचे ग्रहण होत नाही याबद्दल मागें

उल्लेख केलाच आहे.) 'ख्यत्यादिति दीर्घस्यापि ग्रहणादुकारः', म्हणजे 'ख्यत्यात्परस्य' या सूत्रांत 'ख्यत्यात्' असा यणादेशपूर्वक निर्देश केला असल्यामुळें त्या शब्दानें जसें ऱ्हस्व 'खि, ति' यांचें ग्रहण होतें तसेंच दीर्घ 'खी, ती' यांचे देखील ग्रहण होतें व त्यामुळें ईदन्त 'सखी' शब्दापुढें 'ङसि, ङस्' हे प्रत्यय आले असतां यणादेश केल्यावर त्या प्रत्ययांतील अकाराचे जागीं उकार होऊन 'सखी' शब्दाचें पञ्चमीच्या व षष्ठीच्या एकवचनाचें 'सख्युः' असें रूप होतें, असें प्रकृत सूत्रावरील कौमुदींत म्हटलें आहे, आणि ऱ्हस्व 'खि, ति' आणि तसेंच दीर्घ 'खी, ती' या दोहोंचेंहि ग्रहण व्हावें याकरितांच 'ख्यत्यात्परस्य' सू. २५५ या सूत्रांत 'ख्यत्यात्' असा यणादेश करून निर्देश केला आहे. 'अतिसखेः, भूपतेः' या स्थलीं ('घेर्ङिति' सू. २४५ या सूत्रानें) जें गुणकार्य पावलें आहे त्याचा बाध न व्हावा याकरितां 'ख्यत्यात्परस्य' या सूत्रांत 'ख्यत्यात्' असा यणादेश करून निर्देश केला आहे असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर मानलें तरी, दीर्घ 'खी, ती' यांचे ठिकाणीं 'ख्यत्यात्परस्य' या सूत्राची प्रवृत्ति टाळतां येणें अशक्य आहे. ज्या शब्दांच्या अन्तीं ऱ्हस्व 'खि, ति' आहेत तशाच शब्दांना 'ख्यत्यात्परस्य' या सूत्रानें होणारें कार्य व्हावें व ज्या शब्दांच्या अन्तीं दीर्घ 'खी, ती' आहेत त्यांना तें कार्य होऊं नये असें मानण्यास कांहींच प्रमाण नाहीं. 'ख्यत्यात्परस्य' या सूत्रांत ('खितेः' असा निर्देश न करितां) यणादेश करून 'ख्यत्यात्' असा जो विकृत निर्देश केला आहे तो अव्याप्ति व अतिव्याप्ति हे दोन्ही प्रकारचे दोष टाळण्याकरितां केला आहे व तसा सारभूत—ऱ्हस्व व दीर्घ या दोन्ही प्रकारच्या 'खि, ति' व 'खी, ती' या रूपांचा संग्राहक—निर्देश त्या सूत्रांत केला असल्यामुळें, त्या निर्देशाच्या सामर्थ्यानेंच ऱ्हस्व 'खि, ति' व दीर्घ 'खी, ती' या या दोहोंचेंहि ग्रहण होतें हेंच मानणें उचित आहे आणि भाष्यांत देखील असेंच सांगितलें आहे. (शंकाकाराचें असें म्हणणें आहे कीं,

'स्यत्यात्परस्य' या सूत्रांत यणादेश करून 'स्यत्यात्' असा निर्देश केला असल्यामुळें, त्या निर्देशावरून हें स्पष्ट होते की, घिसंज्ञक नसलेल्या 'सखि' व 'पति' या ऱ्हस्वान्त शब्दांनाच तें सूत्र लागू पडावे व जेथें त्या शब्दांना घिसंज्ञा होते व त्यामुळें 'घेर्ङिति' या सूत्रानें गुण होऊन यणादेशाची प्राप्ति होत नाही अशा ठिकाणी तें सूत्र लागू पडू नये याकरिता त्या सूत्रात 'स्यत्यात्' असा विकृत निर्देश केला आहे. म्हणून दीर्घ ईकारान्त 'सखी, पती' या शब्दांना तें सूत्र लावणे योग्य नाही. या शंकेवर दीक्षित असे उत्तर देतात की, पाणिनीच्या मनांत काय होते हे कळण्यास त्यानें केलेला सूत्र-निर्देश एवढेंच साधन उपलब्ध असून इतर कोणतेंहि साधन उपलब्ध नसल्यामुळें आणि ऱ्हस्व 'खि, ति' किंवा दीर्घ 'खी, ती' यांच्यापुढें 'ङसि, ङस्' या प्रत्ययांचा अकार आला असता दोन्ही ठिकाणी यणादेशाची सारखीच प्राप्ति होत असल्यामुळें, यणादेशपूर्वक 'स्यत्यात्' या निर्देशाच्या आधारे जसे ऱ्हस्व 'खि, ति' यांचे ग्रहण करता येते तसेच दीर्घ 'खी, ती' यांचे देखील ग्रहण करता येते. म्हणून दोन्ही प्रकारच्या रूपांचे ग्रहण करणे उचित आहे. 'खिते. परस्य' असे सूत्र केलें असते तर, 'अतिसखे', भूपते' इत्यादि अकृतयणादेशस्थली देखील उत्व होण्याची आपत्ति आली असती व 'सखी, पती' यांच्या रूपांच्या ठिकाणी उत्व न होण्याची आपत्ति आली असती या दोन्ही आपत्ति टाळण्याकरिता 'स्यत्यात्' असा निर्देश केला आहे व त्या निर्देशाच्या बळावर ऱ्हस्व व दीर्घ या दोन्ही प्रकारच्या शब्दांचे ग्रहण करता येते.

'स्यत्यात्परस्य' सू ६–१–११२ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात–' किमिदं स्यत्यादिति? । स्यत्यादिति सखिपत्योर्विकृतग्रहणम् । किं पुन कारणं सखिपत्योर्विकृतग्रहणं क्रियते, न सखिपतिभ्यामित्ये-वोच्येत ? । नैष शक्यम् । गरीयांश्चैव हि निर्देश स्यात् । इह च प्रसज्येत – अतिसखेरागच्छामि अतिसखे स्वम् । इह च न स्यात् सखीयतेरप्रत्ययः – सख्यु पत्युः । लूनीयतेरप्रत्यय. – लून्यु

पून्युः ।' या भाष्यांतील 'सखीयतेरप्रत्ययः सख्युः' हें, ज्याच्या अन्तीं दीर्घ 'खी' आहे अशा 'सखी' शब्दाचें पञ्चमीच्या व षष्ठीच्या एकवचनाचें रूप आहे व या उदाहरणाचें विवरण वर मनोरमेंत केलेंच आहे. बाकीचीं 'पत्युः, लून्युः, पून्युः' हीं जीं भाष्यांत तीन उदाहरणें दिलीं आहेत ती, ज्यांच्या अन्तीं दीर्घ 'ती' आहे अशा शब्दांच्या, पञ्चमीच्या व षष्ठीच्या एकवचनाचीं रूपें आहेत. 'लू, पू' या धातूंहून निष्ठा 'क्त' प्रत्यय केला असतां 'ल्वादिभ्यः' सू. ३०१८ या सूत्रानें 'लू' धातुपुढील निष्ठा 'त' प्रत्ययांतील तकाराचा व 'पूञो विनाशे'—सू. ३०१८ वरील वार्तिक-या वार्तिकानें 'पू' धातूपुढें असणाऱ्या निष्ठा 'त' प्रत्ययाचा नकार होतो व 'लून, पून' अशीं क्तप्रत्ययान्त रूपें होतात. या दोन्ही शब्दांहून 'सुप आत्मनः क्यच्' सू. २६५७ यासूत्रानें 'लूनमात्मनः इच्छति, पूनमात्मनः इच्छति' या अर्थामध्यें इच्छार्थक 'क्यच् = य' प्रत्यय केला असतां, 'क्यचि च' सू. २६५८ या सूत्रानें त्या शब्दांतील अन्त्य अकाराचा ईकार होऊन 'लूनीय, पूनीय' अशीं क्यजन्त धातूचीं रूपें होतात. या धातूंहून 'क्विप् च' सू. २९८३ या सूत्रानें 'क्विप् = व्' प्रत्यय केला असतां, 'अतो लोपः' सू. २३०८ या सूत्रानें त्यांतील अन्त्य अकाराचा लोप होऊन व 'लोपो व्योर्वलि' सू. ८७३ या सूत्रानें अवशिष्ट यकाराचा लोप होऊन आणि 'वेरपृक्तस्य' सू. ३७५ या सूत्राने क्विप् प्रत्ययाचा लोप होऊन 'लूनी, पूनी' अशीं ईदन्त प्रातिपदिकें होतात. या दोन प्रातिपदिकांच्या अन्तीं जरी 'नी' दिसतो तरी, त्या 'नी' तील नकार तकाराचे जागीं 'ल्वादिभ्यः' या त्रैपादिक सूत्रानें व त्या सूत्रावर पठित केलेल्या 'पूञो विनाशे' या त्रैपादिक वार्तिकानें झाला असल्यामुळें, 'ख्यत्यात्परस्य' या सापादिक सूत्राच्या दृष्टीनें तो नकार 'पूर्वत्रासिद्धम्' सू. १२ या वचनान्वयें असिद्ध, ठरतो व 'लूती, पूती' अशी दीर्घ त्यन्त प्रातिपदिकें आहेत असें मानावें लागतें. तसेंच 'पतीय' या क्यजन्त धातूहून क्विप् प्रत्यय केला असतां, वर दिलेल्या प्रक्रियेप्रमाणें, 'पती' असें दीर्घ त्यन्त प्राति-

पदिक' होते. 'सखी, पती, लूनी = लूती, पूनी = पूती' या चारहि शब्दाचे ठिकाणी भाष्यकारानी 'ख्यत्यात्परस्य' हें सूत्र प्रवृत्त करून त्याची 'सख्युः, पत्युः, लून्युः, पून्युः' अशीं पञ्चमीच्या व षष्ठीच्या एकवचनाची रूपें दिली असल्यामुळें, वरील भाष्या-वरून हे स्पष्ट होते की, 'ख्यत्यात्परस्य' या सूत्रातील 'ख्यत्यात्' या निर्देशानें दीर्घ 'खी, ती' याचे देखील ग्रहण होते. म्हणून त्या निर्देशानें केवळ ऱ्हस्व 'खि, ति' याचे ग्रहण होतें असे जें कित्येक वैयाकरणाचे म्हणणे आहे ते वरील भाष्याच्या विरुद्ध अस-ल्यामुळें चूक ठरते हे उघड आहे )।

मनोरमा– यत्तु प्राचा वेति केचित् इत्युक्त्वा सख्युः इत्या-द्युक्तम् । यच्च तद्व्याख्यातृभिरुभयमप्येतद्भाष्ये स्थितमित्युक्तम् । यच्चात्रोपष्टम्भार्थं प्रसादकृता–

सख्युः पत्युः प्रसिध्यै यत् ख्यत्यादित्याह पाणिनिः ।
साधारण तन्मन्वानाः सुख्युः सुत्युः सुखी. सुतीः ॥
सुखीयतिसुतीयत्योर्या क्विबन्तौ तयोर्विदुः ।
निष्ठादेशस्य पूर्वत्रासिद्धत्वाल्लून्युरादिकम् ॥
सुख्य इत्यादि साध्वेतदुभयं भाष्यगौरवात् ।

इति विचारचिन्तामणिस्थश्लोकोपन्यसन कृतं तदेतत्सकलं भाष्यकैयटापर्यालोचनमूलकमिति कृतबुद्धय एव विदाकुर्वन्तु । शुष्किय इति यत्तु शुष्क्युः, पक्व्युः, शुष्क्यः, पक्व्यः, इत्युदाजहरुः । भाष्ये स्थितमिति चोपसजहरुः । तदतिरभसात् ॥ इति ईदन्ताः ॥

प्रक्रियाकौमुदीकारानी 'वेति केचित्', म्हणजे दीर्घ 'खी, ती' याच्यापुढें 'ङसि, ङस्' हे प्रत्यय आल्यास, कित्येक वैयाकर-णाच्या मतें त्या प्रत्ययातील अकाराचे विकल्पेंकरून उत्व होतें व 'सख्युः, सख्यः' अशीं पाक्षिक रूपें होतात, असे जें ('ङेराम्न-द्याम्नीभ्यः' या सूत्रावरील प्रक्रियाकौमुदीत) म्हटले आहे व त्या ग्रन्थाची व्याख्या करिताना दोन्ही प्रकारचीं रूपें भाष्यात आढळतात

असें जें व्याख्याते प्रकाशकार यांनीं म्हटलें आहे आणि त्याचप्रमाणें प्रक्रियाकौमुदींतील 'वेति केचित्' या वचनाचें समर्थन करण्याकरितां प्रसादकारांनीं ( बोपदेवकृत ) विचारचिन्तामणि या ग्रन्थांतून 'सख्युः पत्युः प्रसिध्द्यै यत् ...... उभयं भाष्यगौरवात्' हे जे श्लोक दिले आहेत, हें सर्व त्या ग्रन्थकर्त्यानीं भाष्य व कैयटवृत्ति यांचें नीट पर्यालोचन न करितां म्हटलें आहे हें विद्वज्जनांच्या सहज लक्षांत येण्याजोगें आहे. (विचारचिन्तामणींतील श्लोकांचा असा अर्थ आहे कीं, 'सख्युः, पत्युः' या रूपांची सिद्धि होण्याकरितां 'ख्यत्यात्' असा जो पाणिनीनें निर्देश केला आहे तो निर्देश ह्रस्व व दीर्घ ख्यन्त आणि त्यन्त शब्दांना सारखाच लागू पडतो असें मानून प्राचीन वैयाकरणांनीं 'सुखीयति, सुतीयति' या क्यजन्त धातूहून क्विप् प्रत्यय केला असतां 'सुखी' व 'सुती' अशीं जीं प्रातिपदिकें होतात त्यांचीं 'सुख्युः, सुत्युः' अशीं रूपें मानलीं आहेत. त्याचप्रमाणें 'लू' धातूहून निष्ठा 'क्त' प्रत्यय केला असतां, त्या प्रत्ययांतील तकाराचे जागीं होणारा नकारादेश 'पूर्वत्रासिद्धम्' या सूत्रान्वयें 'ख्यत्यात्परस्य' या सापादिक सूत्राच्या दृष्टीनें असिद्ध ठरत असल्यामुळें, 'लून्युः' इत्यादि रूपें मानलीं आहेत आणि 'सुख्यः, सुत्यः, लून्यः' अशीं पाक्षिक रूपें भाष्याच्या आधारें साधु ठरतात असें त्यांचें म्हणणें आहे. परंतु वर दिलेल्या भाष्यांत 'सख्यः, पत्यः, लून्यः, पून्यः' अशीं पाक्षिक रूपें आढळत नसून 'सख्युः, पत्युः, लून्युः, पून्युः' अशींच रूपें आढळत असल्यामुळें, दोन्ही प्रकारचीं रूपें भाष्यांत आढळतात असें जें प्रकाशकारादिकांनीं म्हटलें आहे तें म्हणणें चूक ठरतें हें उघड आहे.) याचप्रमाणें 'शुष्कयुः, पक्वयुः, शुष्क्यः, पक्व्यः' अशीं जीं पाक्षिक रूपें प्रकाशकारांनीं दिलीं आहेत व अशीं रूपें भाष्यांत आढळतात असें जें म्हटलें आहे तें विचार न करितां म्हटलें आहे, म्हणजे तें म्हणणें चूक आहे. ('शुष्' धातूहून 'क्त' प्रत्यय केला असतां, 'शुषः कः' सू. ३०३० या त्रैपादिक सूत्रानें 'त' प्रत्ययांतील

तकाराचे जागी ककार होऊन 'शुष्क' असे क्तप्रत्ययान्त रूप होते. तसेच 'पच्' धातूहून 'क्त' प्रत्यय केला असता, 'पचो व' सू. ३०३१ या त्रैपादिक सूत्रानें 'त' प्रत्ययातील तकाराचे जागी वकार होऊन व हें वत्व 'चो कुः' या पूर्वत्रैपादिक सूत्राच्या दृष्टीनें असिद्ध असल्यामुळें व 'पच्' यातील चकारापुढें तकार हा हल् कायमच आहे असे मानावे लागत असल्यामुळें, त्या चकाराचे कुत्व होऊन 'पक्व' असे क्तप्रत्ययान्त रूप होते त्रैपादिक सूत्रानी तकाराचे जागी होणारे हे दोन्ही आदेश 'स्यत्यात्परस्य' या सापादिक सूत्राच्या दृष्टीनें असिद्ध ठरतात म्हणून 'शुष्कमात्मन इच्छति, पक्वमात्मन इच्छति' या अर्थामध्यें पूर्वी दिलेल्या प्रक्रियेप्रमाणे होणाऱ्या 'शुष्कीय, पक्वीय' या क्यजन्त धातूहून क्विप् प्रत्यय केला असता, अकारलोप व यकारलोप होऊन 'शुष्की, पक्वी' अशी जी प्रातिपदिके होतात ती 'शुष्वी, पक्ती' अशी दीर्घ त्यन्त प्रातिपदिके आहेत असे मानावे लागते, व त्यांचीं 'स्यत्यात्परस्य' या सूत्रान्वयें 'शुष्ग्यु, शुष्क्य, पक्व्यु पक्व्य' अशी पञ्चमीच्या व षष्ठीच्या एकवचनाची पाक्षिक रूपें प्रकाशकारांनी दिली आहेत पण ही रूपें अशुद्ध आहेत, कारण जेथें यणादेश होतो तेथेंच 'स्यत्यात्परस्य' हें सूत्र प्रवृत्त होऊ शकतें 'शुष्की, पक्वी' या स्थलीं ईकारापूर्वी संयोग असल्यामुळें, 'एरनेकाच' हें सूत्र प्रवृत्त होऊ शकत नाहीं व ईकाराचे जागी यणादेश होऊ शकत नाही म्हणून या स्थलीं 'अचि श्नु' या सूत्रानें ईकाराचे जागी 'इयङ्' आदेश होऊन 'शुष्किय पक्विय' अशींच पञ्चमीच्या व षष्ठीच्या एकवचनाची रूपें होऊ शकतात ) येथें ईदन्तप्रकरण सपलें

शब्दरत्न—न च परत्वादिति। एवं च यलोपो दुर्लभ इति भाव। वार्तिककारोक्तेरिति। "लोपो व्यो" इति सूत्रे 'स्वाद्युपसङ्ख्यानम्' इति वार्तिकम्। तस्यापूर्वत्वापेक्षया यथी यथा लोपे दुर्लभ इष्टसिद्धिर्भवति तथा वक्तव्यमित्यर्थः। सा च पूर्वविप्रतिषेधेनेत्याशयेनैवमुक्तमिति बोध्यम्। योणत्वेऽपीति। इच्छाकर्तृ-

रूपार्थं प्रत्युपसर्जनत्वेऽपीति । कृतयणेति । अन्यथा खितेः परस्येत्येव वदेदिति भावः । गुणविषये इति । प्रकृतिप्रत्ययापेक्षगुणापेक्षया तदवयवमात्रापेक्षयणोऽन्तरङ्गत्वेन ततः पूर्वं प्रवृत्तिः स्यादिति भावः । दुर्वारत्वादिति । तदर्थं कृतस्यान्यसङ्ग्राहकत्वेऽपि बाधकाभावादिति भावः । विकृतनिर्देशस्येति । यकारान्तानुकरणनिर्देशस्येत्यर्थः । अकारस्तूच्चारणार्थ इति भावः । साधारणमिति । ह्रस्वदीर्घसाधारणमित्यर्थः । विदांकुर्वन्त्विति । भाष्येऽस्यार्थस्यास्पष्टत्वादिति भावः । अतिरभसादिति । संयोगपूर्वकत्वेन यणो दुर्लभत्वादिति भावः । इयङ्यतो लोपस्याभीयासिद्धत्वं तु न, व्याश्रयत्वात् ॥ इतीदन्ताः ॥

('सखीय् व्' या स्थलीं) 'वेरपृक्तस्य' हें परसूत्र असल्यामुळें त्या सूत्रानें प्रथम 'क्विप् = व्' या अपृक्त प्रत्ययाचा लोप केल्यास (यकारापुढें 'वल्' राहत नसल्यामुळें) यकाराचा लोप होणें अशक्य आहे असा शंकाकाराच्या म्हणण्याचा भावार्थ आहे. 'लोपो व्योर्वलि' ६-१-६६ या सूत्रावर 'वबावुपसङ्ख्यानम्' असें वार्तिक पठित केलें आहे. हें वार्तिक अपूर्व वचन आहे, म्हणजे पाणिनीनें जें सूत्रांत सांगितलें आहे त्याहून अधिक सांगणारें तें वचन आहे, असें मानण्यापेक्षां, क्विप् प्रत्ययाचा लोप प्रथम केल्यास यकारलोप होऊं शकणार नाहीं व इष्ट रूपांची सिद्धि होऊं शकणार नाहीं आणि म्हणून इष्ट रूपांची सिद्धि होण्याकरितां जसें वचन पठित करणें योग्य आहे तसेंच वचन पठित करावें आणि 'वेरपृक्तलोपाद्वलि लोपः पूर्वविप्रतिषेधेन' असें वचन पठित केल्यानें सर्व इष्ट रूपांची सिद्धि होऊं शकत असल्यामुळें, तशाच प्रकारचें पूर्वविप्रतिषेधाचें वचन पठित करावें असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे हें जाणावें. (वल्प्रत्याहारान्तर्गतवर्ण पुढें आला असतां वकार व यकार यांचा लोप होतो असें 'लोपो व्योर्वलि' सू. ८७३ या सूत्रांत सांगितलें आहे. वार्तिककाराचें असें म्हणणें आहे कीं, या सूत्रांत 'वलि' या निमित्ताचा जो निर्देश केला आहे त्याखेरीज 'क्वौ' या निमित्ताचा देखील निर्देश करणें

आवश्यक आहे. तसे केले असता, विवप् हा प्रत्यय प्रत्ययरूपानें यकारवकारलोपाचें स्वतंत्र निमित्त ठरतो. त्यामुळें 'वेरपृक्तस्य' सू. ३७५ या उत्तर सूत्रानें जरी क्विप् प्रत्ययाचा लोप प्रथम होतो तरी, तो क्विप् प्रत्यय प्रत्ययलक्षणानें विद्यमान आहे असे 'प्रत्यय गृहीत्वा यदुच्यते तत्प्रत्ययलक्षणेन यथा स्यात्' या भाष्य-वचनान्वयें मानता येते आणि त्यामुळें 'लोपो व्योर्वलि' या पूर्व सूत्रानें यकारलोप होण्यात काही अडचण येत नाही. वार्तिककारानें पठित केलेले वरील वार्तिक मानल्यानें क्विप् प्रत्ययाच्या निमित्तानें होणारा यकारलोप वर्णनिमित्तक ठरत नसून प्रत्ययनिमित्तक ठरत असल्यामुळें, 'वर्णाश्रये नास्ति प्रत्ययलक्षणम्' ही परिभाषा आड येत नाही व यथापठित वार्तिकानें सर्व इष्ट रूपाची सिद्धि होऊ शकते. परंतु पाणिनीय सूत्रात जें सांगितलें आहे त्याहून अधिक सांगणारें हें वार्तिक अपूर्व वचन आहे असें मानण्यापेक्षा पूर्वविप्रतिषेध मानल्यानें सर्व इष्ट रूपाची सहज सिद्धि होऊ शकत असल्यामुळें आणि पूर्वविप्रतिषेध मानण्यात लाघव असून वरील अपूर्व वचन मानण्यात गौरव असल्यामुळें दीक्षितानी मनोरमेंत यथापठित वरील वार्तिक न देता, ते केवळ पूर्वविप्रतिषेधाचे वार्तिक मानले जावे या हेतूनें ते वार्तिक भिन्न शब्दात मनोरमेंत पठित केलें आहे आणि तसे पूर्वविप्रतिषेधाचे वार्तिक मानल्यानें 'लोपो व्योर्वलि' या सूत्रात 'क्वौ' हा अधिक शब्द घालण्याची काही गरज राहत नाही ) 'गौणत्वेऽपि अनङ्-णित्वयो प्रवृत्तेरुक्तत्वात्' असे जें मनोरमेंत म्हटलें आहे त्यातील 'गौणत्वेऽपि' या पदाचा 'इच्छाकर्तृरूपार्थे प्रत्युपसर्जनत्वेऽपि', म्हणजे इच्छा करणाऱ्याचें उपसर्जन होत असून देखील, असा अर्थ आहे (याचे विवरण मनोरमेंत केलेंच आहे ) 'एतदर्थं कृतयणादेश-निर्देश.' असें जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, ऱ्हस्व 'खि, ति' व दीर्घ 'खी, ती' या दोहोंचेंहि ग्रहण न होता, ऱ्हस्व 'खि, ति 'चेच ग्रहण व्हावे असे जर पाणिनीच्या मनात असते तर, त्यानें 'ख्यत्यात्' असा यणादेशपूर्वक गुरु निर्देश न करिता,

'खितेः' असा लघु निर्देश केला असता. 'घेर्ङिति' सू. २४५ या सूत्रानें गुण होण्याकरितां घिसंज्ञक प्रकृति व तिच्या पुढें ङित् प्रत्यय असणें या दोहोंचीहि अपेक्षा असल्यामुळें व 'खितेः परस्य' असें सूत्र केलें असतें तर, तें सूत्र प्रवृत्त होण्याकरितां प्रकृतीच्या केवळ अवयवाची, म्हणजे अन्त्य 'खि' किंवा 'ति' या अवयवाची, अपेक्षा राहत असल्यामुळें, 'खितेः परस्य' हें सूत्र अन्तरङ्ग ठरून 'घेर्ङिति' या सूत्रापूर्वीं तें प्रवृत्त झालें असतें (व त्यामुळें 'अतिसखेः, भूपतेः' या स्थलीं गुणादेश न होतां, 'ङसि, ङस्' या प्रत्ययांच्या अकाराचे जागीं उकार झाला असता. पण 'ख्यत्यात् परस्य' या सूत्रांत 'ख्यत्यात्' असा यणादेशपूर्वक निर्देश केला असल्यामुळें, तें सूत्र अशाच ठिकाणीं प्रवृत्त होऊं शकतें कीं, जेथें 'ख्य्' किंवा 'त्य्' असा यणादेश झाला आहे व त्यामुळें तें सूत्र अन्तरङ्ग ठरत नाहीं आणि 'अतिसखि, भूपति' या स्थलीं 'घेर्ङिति' या परसूत्रानें गुण होत असल्यामुळें यणादेशाची प्राप्तीच होत नाहीं व त्यामुळें त्या उदाहरणांत 'ख्यत्यात्परस्य' हें सूत्र प्रवृत्त होऊं शकत नाहीं.) 'दीर्घप्रवृत्तेर्दुर्वारत्वात्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, 'ख्यत्यात्परस्य' या सूत्रांत 'ख्यत्यात्' असा जो यणादेशपूर्वक निर्देश आहे तो जरी 'घेर्ङिति' या सूत्राचा बाध न व्हावा याकरितां केला आहे तरी, तशा निर्देशानें (ह्रस्व 'खि, ति' व दीर्घ 'खी, ती' या दोहोंचेंहि ग्रहण होऊं शकत असल्यामुळें) दीर्घ 'खी, ती' चें ग्रहण करण्यांत कांहीं बाध येत नाहीं. मनोरमेंतील 'विकृतनिर्देशस्य' या पदाचा 'यकारान्तानुकरणनिर्देशस्य', म्हणजे यणादेश झाल्यावर यकारान्त 'ख्य्, त्य्' असें जें रूप होतें त्याचें अनुकरण करून केलेला 'ख्य, त्य' हा निर्देश, असा अर्थ आहे व या निर्देशांतील अकार उच्चारणार्थ आहे. मनोरमेंत दिलेल्या कारिकेंतील 'साधारणम्' या पदाचा 'ह्रस्वदीर्घसाधारणम्', म्हणजे ह्रस्व 'खि, ति' व दीर्घ 'खी, ती' या दोहोंनाहि सारखाच लागू पडणारा

'स्यत्यात्' हा निर्देश असा अर्थ आहे. 'सदेतत्सकल ... विदाकुर्वन्तु' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, दीर्घ 'खी, ती' अन्ती आहेत ज्याच्या अशा शब्दाची पञ्चमीच्या व षष्ठीच्या एकवचनाची दोन पाक्षिक रूपें होतात असा भाष्यात कोठेंहि उल्लेख केला नाही. (याचे विवरण मनोरमेंत केलेच आहे.) 'तदतिरभसात्' असें जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, 'शुष्की, पक्वी' या स्थली अन्ती असलेल्या ईकारापूर्वी संयोग असल्यामुळें, 'एरनेकाचः' या सूत्रानें होणारा यणादेश होऊ शकत नाही. 'शुष्क्यः' या स्थली 'शुष्की' यातील ईकाराचे जागी 'अचि श्नु' सू. २७१ या सूत्रानें इयङादेश करतेवेळी, 'अतो लोप.' सू. २३०८ या सूत्रानें झालेला अकारलोप आभीय-कार्य असून देखील असिद्ध ठरत नाही; कारण अकारलोप व इयङादेश ही दोन कार्यें (समाननिमित्तक नसून) भिन्न-निमित्तक आहेत. ('शुष्कीय क्विप् ङस्' या स्थली क्विप्-प्रत्ययाच्या निमित्तानें अकारलोप होऊन व नंतर 'लोपो व्योर्वलि' सू. ८७३ या सूत्रानें अवशिष्ट यकाराचा लोप होऊन आणि मग 'क्विप् = व्' या अपृक्त प्रत्ययाचा 'वेरपृक्तस्य' सू. ३७५ या सूत्रानें लोप होऊन 'शुष्की ङस्' अशी स्थिति झाली असता, 'ङस् = अस्' हा अजादि प्रत्यय पुढें असल्यामुळें, 'शुष्की' या क्यजन्त धातूतील अन्त्य ईकाराचे जागी 'अचि श्नु' सू २७१ या सूत्रानें ईयङादेश पावला आहे येथें शंकाकार असे म्हणतो की, 'अतो लोप' व 'अचि श्नु' ही दोन्ही सूत्रें आभीया-धिकारात पठित असल्यामुळें, 'अतो लोप.' या पूर्व सूत्रानें झालेला अकारलोप 'अचि श्नु' या उत्तर सूत्रानें इयङादेश करतेवेळी, 'असिद्धवदत्राभात्' सू २१८३ या सूत्रान्वयें, असिद्ध ठरतो व त्यामुळें अकारलोप झालाच नाही असे मानावे लागते. अशा रीतीनें 'शुष्की' यातील अन्त्य ईकार व 'ङस् = अस्' हा अजादि प्रत्यय या दोहोमध्यें अकाराचे व्यवधान आहे असे मानावे लागत असल्या-

मुळें, ईकाराचे जागीं इयङादेश होऊं शकत नाहीं. या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं, 'असिद्धवदत्राभात्' हें सूत्र समाननिमित्तक कार्यानाच लागू पडणारें सूत्र असून भिन्ननिमित्तक कार्यांना लागू पडणारें सूत्र नसल्यामुळें व प्रकृत स्थलीं अकारलोप क्विप् प्रत्ययाच्या निमित्तानें झाला असून इयङादेश अजादि प्रत्ययाच्या निमित्तानें करणें असल्यामुळें, इयङादेश करतेवेळीं पूर्वी झालेला भिन्ननिमित्तक अकारलोप असिद्ध ठरत नाहीं व त्यामुळें इयङादेश होऊन 'शुक्रियः' असें रूप सिद्ध होतें. 'असिद्धवदत्राभात्' या सूत्रावरील काशिकेंत 'व्याश्रयं तु नासिद्धवद्भवति' असें स्पष्ट म्हटलें आहे.) येथें ईदन्त प्रकरण संपलें.

मनोरमा– "तृज्वत् क्रोष्टुः" । क्रुश आह्वाने । अस्मात् 'सितनि' इति तुन्प्रत्यये क्रोष्टुशब्दः, तृचि तु क्रोष्टृशब्दः । द्वावपि सृगालवाचिनौ । तत्राविशेषेण द्वयोः प्रयोगे प्राप्ते सर्वनामस्थाने स्त्रियां च तृजन्त एव । तृतीयादावच्युभयम्, अन्यत्र तु तुन्नन्त एवेति नियमार्थं त्रिसूत्री आरभ्यते । क्रोष्टुरिति तुन्नन्तात् प्रथमा । तृज्व-दिति तृतीयान्ताद्वतिः । निमित्तव्यपदेशतादात्म्यशास्त्रकार्यरूपविषय-कत्वेनातिदेशस्य षड्विधत्वेऽपि प्राधान्यादिह रूपमेवातिदिश्यते । तच्च न पदादेर्यस्य कस्यचित् । किं तु क्रुशेरेव उपस्थितत्वादर्थत आन्तर्याच्चेत्यभिप्रेत्य फलितमाह–क्रोष्टुशब्दस्थाने इति ।

'तृज्वत् क्रोष्टुः' सू. २७४ या सूत्रांतील 'क्रोष्टु' हा शब्द 'क्रुश आव्हाने' या धातूहून 'सितनि' उणादि सू. ६९ या सूत्रानें औणादिक 'तुन्' प्रत्यय होऊन सिद्ध झाला आहे. परंतु 'क्रुश' धातूहून ('ण्वुल्तृचौ' सू. २८९५ या सूत्रानें) 'तृच्' प्रत्यय केला असतां 'क्रोष्टृ' असा शब्द सिद्ध होतो. 'क्रोष्टु' व 'क्रोष्टृ' हे दोन्ही शब्द शृगाल–कोल्हा–या अर्थाचे वाचक आहेत. या दोन्ही शब्दांचीं सर्व विभक्तींत व सर्व लिङ्गांत भिन्न रूपें होण्याची प्राप्ति झाली असतां, सर्वनामस्थान-प्रत्यय पुढें आल्यास व तसेंच स्त्रीलिङ्गमध्यें तृजन्त 'क्रोष्टृ' शब्दा-

चीच रूपें व्हावी व तृतीयादि विभक्तीचे अजादि प्रत्यय पुढें आल्यास 'क्रोष्टृ' व 'क्रोष्टु' या दोन्ही शब्दाची पाक्षिक रुपें व्हावी आणि इतर स्थली तुन्प्रत्ययान्त 'क्रोष्टु' शब्दाचीच रुपें व्हावी याकरितां 'तृज्वत् क्रोष्टुः, स्त्रियां च' सू. ३०५ व 'विभाषा तृतीयादिष्वचि' सू. २७८ ही तीन सूत्रें नियमार्थ पठित केली आहेत. प्रकृत सूत्रातील 'क्रोष्टुः' हा शब्द तुनन्त 'क्रोष्टु' या शब्दाचें प्रथमेचे एकवचन आहे. ('क्रोष्टु सु' या स्थली 'सु' हा सर्वनामस्थानप्रत्यय 'क्रोष्टु' या शब्दापुढें असल्यामुळें, वर दिलेल्या नियमान्वयें 'क्रोष्टु' शब्दाचे 'क्रोष्टा' असेच वास्तविक प्रथमेच्या एकवचनाचे रूप होऊ शकतें, 'क्रोष्टुः' असे रूप होऊ शकत नाही. तरी पण प्रकृत सूत्रात 'क्रोष्टुः' असा जो निर्देश केला आहे तो अर्थाला प्राधान्य न देता केवळ शब्दस्वरूपाला प्राधान्य देऊन केला आहे.) तृतीयान्ताहून 'वति' प्रत्यय केला असता, 'तृज्वत्' हें रूप सिद्ध होतें ('तृचा तुल्यम्' या अर्थामध्यें 'तृचा' या तृतीयान्ताहून 'तेन तुल्यं क्रिया चेद्वतिः' सू. १७७८ या सूत्रानें अतिदेशार्थक 'वति' प्रत्यय होऊन 'तृच् टा वत्' अशी स्थिति झाली असता, या तद्धितान्त समुदायाला 'कृत्तद्धितसमासाश्च' सू. १७९ या सूत्रानें प्रातिपदिकसंज्ञा होत असल्यामुळें, 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' सू. ६५० या सूत्रानें 'टा' या अन्तर्वर्ति विभक्तिप्रत्ययाचा लुक् होऊन व 'झलां जशोऽन्ते' सू. ८४ या सूत्रानें 'तृच्' यातील चकाराचा जकार होऊन 'तृज्वत्' हा शब्द सिद्ध झाला आहे) निमित्तातिदेश, व्यपदेशातिदेश, तादात्म्यातिदेश, शास्त्रातिदेश, कार्यातिदेश व रूपातिदेश असे असे जरी सहा प्रकारचे अतिदेश आहेत तरी, रूपातिदेश प्रधान असल्यामुळें, प्रकृत सूत्रांतील 'तृज्वत्' या शब्दानें रूपाचाच अतिदेश होतो (रूपातिदेश प्रधान आहे असे जें वर म्हटले आहे त्याचे कारण 'सर्वेषां कार्याणां रूपनिष्पत्त्यर्थत्वात्' हे आहे व त्याचा अर्थ हा आहे की, इष्ट रूपें सिद्ध व्हावी याकरिताच पाणिनीय विधायक सूत्रांत कार्यें होणे सांगितली असल्यामुळें, रूपातिदेश प्रधान ठरतो. मनोरमेंत

जरी सहा प्रकारचें अतिदेश सांगितलें आहेत तरी, 'कार्यरूपनिमित्तार्थशास्त्रतादात्म्यशब्दिताः । व्यपदेशश्च सप्तैतानतिदेशान् प्रचक्षते' या तत्त्वबोधिनींत व बालमनोरमेंत दिलेल्या कारिकेंत सात प्रकारचे अतिदेश सांगितले आहेत.) प्रकृत सूत्रांत जो तृजन्त रूपाचा अतिदेश केला आहे तो 'पच्' इत्यादि वाटेल त्या धातूच्या तृजन्त रूपाचा अतिदेश नसून, प्रकृत सूत्रांतील 'क्रोष्टुः' या निर्देशांत 'क्रुश्' हाच धातु उपस्थित असल्यामुळें व 'क्रुश्' धातूच्या तृजन्त रूपांत व 'क्रोष्टु' शब्दांत अर्थसादृश्य असल्यामुळें, 'क्रुश्' धातूच्या तृजन्त रूपाचाच हा अतिदेश आहे हें स्पष्ट होतें. (प्रकृत सूत्रावरील भाष्यांत–सू. ७–१–९५–भाष्यकार म्हणतात–'एवमपि किंचिदेव तृजन्तं प्राप्नोति, इदमपि प्राप्नोति–पक्तेति । आन्तरतम्याच्च सिद्धम् । क्रोष्टोर्यदन्तरतमं तद्भविष्यति । किं पुनस्तत् ? । क्रुशेर्यस्तृज्विहितस्तदन्तम् ।' या भाष्याला धरूनच मनोरमेंतील वरील पंक्ति लिहिली आहे. हा विषय परिभाषेन्दुशेखराच्या मराठी भाषांतरांत पान ४८ मध्यें स्पष्ट केला आहे व तें विवरण वाचल्यास, वरील पंक्ति नीट ध्यानांत येईल.) हा आशय मनांत धरूनच प्रकृत सूत्रावरील कौमुदींत 'क्रोष्टुशब्दस्य स्थाने क्रोष्टृशब्दः प्रयोक्तव्यः' असें फलितरूपानें व्याख्यान केलें आहे.

शब्दरत्न–नियमार्थमिति । फलतः प्रयोगनियमार्थमित्यर्थः । तृतीयान्तादिति । तृजन्तेन तुल्यं रूपं लभत इत्यर्थः । निमित्तेत्यादि "पूर्ववत्सन" "आद्यन्तवत्" "सुबामन्त्रिते पराङ्गवत्" इत्याद्यत्रयस्योदाहरणं, तत्र तृजन्तत्वरूपनिमित्तस्य, तद्व्यवहारस्य वाऽतिदेशो आहत्य = तृच्शब्दं समुच्चार्य विहितकार्यस्यैवापत्तौ जसि गुणावादेशयोस्तृजन्तोद्देश्यको "अप्तृन्" इति दीर्घ एव स्यात् । स्वौजसादिषु चानङ्गुणौ न स्याताम् । न चोत्तरसूत्रद्वयेन सामर्थ्यात् "अप्तृन्" इत्यत्र क्रोष्टुग्रहणेनैव सिद्धावाद्येनापि सामर्थ्यात्कार्यमात्रप्रवृत्तिरिति वाच्यम् । तत्सामर्थ्येन रूपातिदेशस्यैव ज्ञापयितुं युक्तत्वात् । तादात्म्यातिदेशस्त्वसम्भवो, सह

प्रयोगाभावात् । शास्त्रकार्यातिदेशादपि न, तुन्नन्तस्याद्युदात्ततया तृज्वद्भावेनोकारस्य रेफरूपयणादेशेऽपि तस्योदात्तस्यानिकयणोऽभावेन "उदात्तयणो हल्पूर्वात्" इति स्वरानापत्तेः । अर्थातिदेशस्त्वसम्भवी तयोरैक्यस्य स्वत एव सत्वाच्च । षड्विधत्वेऽपीति । अर्थातिदेशासम्भव मत्वेदम् । युक्त्यन्तरमाह–प्राधान्यादिति । स्मारयति । तच्च 'तृज्वत्' इत्यत्र ऋकारस्योपस्थितया तद्विशिष्टं क्रोष्टृ इति । तच्च तृज्वदिति चकारोच्चारणसामर्थ्यादन्तोदात्तस्वरविशिष्टमिति ऋकारस्योदात्तत्वात् 'उदात्तयण' इत्यादिस्वरसिद्धिरिति बोध्यम् ।

'नियमार्थं त्रिसूत्री आरम्यते' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्यातील 'नियमार्थम्' या पदाचा 'फलत प्रयोगनियमार्थम्,' म्हणजे अमुक प्रकारचा प्रत्यय पुढें आला असता किंवा अमुक लिङ्गात 'क्रोष्टृ' व 'क्रोष्टु' या दोन शब्दापैकी अमुकच विशिष्ट शब्दाचा प्रयोग करावा असा नियम घालून देण्याकरिता, असा नियामक, अर्थ फलित होतो 'तृतीयान्तादति' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा ' तृजन्तेन तुल्य रूप लभते', म्हणजे 'क्रोष्टु' शब्दाचे 'क्रोष्टृ' या तृजन्त शब्दाच्या रूपासारखे रूप होते, असा अर्थ आहे मनोरमेंत जे सहा अतिदेश सांगितले आहेत त्यापैकी पहिल्या तीन अतिदेशाची, म्हणजे निमित्तातिदेश, व्यपदेशातिदेश व तादात्म्यातिदेश याची, 'पूर्ववत्सन' सू. २७३४, 'आद्यन्तवदेकस्मिन्' सू. ३४८ व 'सुबामन्त्रिते पराङ्गवत्स्वरे' सू ३६५६ ही अनुक्रमें-उदाहरणे आहेत ('पूर्ववत्सन' या सूत्राचा असा अर्थ आहे की, ज्या धातूहून 'सन्' प्रत्यय केला जातो त्या मूळ धातूचे ज्या निमित्तामुळें आत्मनेपद होतें त्याच निमित्तामुळें सन्नन्त धातूचे देखील आत्मनेपद होते धातूला जे आत्मनेपदाचे प्रत्यय होत असतात ते कोणत्या तरी निमित्तामुळेंच होत असतात उदाहरणार्थ धातुपाठांत जो धातु 'अनुदात्तेत्' किंवा 'ङित्' पठित आहे तशा धातूहून 'अनुदात्तङित आत्मनेपदम्' सू २१५७ या सूत्रानें आत्मने-

पदी प्रत्यय होणें सांगितलें आहे. तसेंच जो धातु धातुपाठांत 'स्वरितेत्' किंवा 'ञित्' पठित आहे तशा धातूहून, क्रियाफल कर्तृगामि असल्यास, स्वरितञितः' सू. २१५८ या सूत्रानें आत्मनेपदी प्रत्यय होणें सांगितलें आहे. त्याचप्रमाणें कौमुदींत दिलेल्या आत्मनेपदप्रकरणांत जीं अनेक सूत्रें दिलीं आहेत तींहि आत्मनेपदिप्रत्यय होण्याचीं निमित्तें होत. 'एध वृद्धौ' हा धातु धातुपाठांत अनुदात्तेत् पठित असल्यामुळें 'अनुदात्तङितः' या सूत्रान्वयें तो आत्मनेपदी ठरतो व या धातूहून 'सन्' प्रत्यय केला असतां, 'पूर्ववत्सनः' या सूत्रान्वयें सन्नन्त धातूहून देखील आत्मनेपदी प्रत्यय होऊन 'एदिधिषते' इत्यादि रूपें होतात. सारांश ज्या निमित्तामुळें मूळ धातूहून आत्मनेपदी प्रत्यय होतात त्याच निमित्तामुळें तशा धातूच्या सन्नन्ताहून आत्मनेपदिप्रत्यय होणें हा निमित्तातिदेश होय. 'आद्यन्तवदेकस्मिन्'. या सूत्राचा असा अर्थ आहे कीं, जो असहाय आहे, म्हणजे एकटाच आहे, त्याचे ठिकाणीं आदिवत् किंवा अन्तवत् असा व्यपदेश–व्यवहार–करतां येतो व हाच व्यपदेशातिदेश होय. 'व्यपदेशिवदेकस्मिन्' – परि. ३० – या परिभाषेनें देखील हेंच सांगितलें आहे; व परिभाषेन्दुशेखराच्या मराठी भाषान्तरांत केलेलें या परिभाषेचें विवरण वाचल्यास, व्यपदेशातिदेश कशाला म्हणतात व तो कोणाचे ठिकाणीं करतां येतो इत्यादि सर्व विषय नीट ध्यानांत येईल. 'सुबामन्त्रिते पराङ्गवत्स्वरे' या सूत्राचा असा अर्थ आहे कीं, सुबन्तापुढें संबोधनाचें रूप आल्यास, तीं दोन्ही पदें मिळून एकच पद आहे असें स्वरविधि करितांना मानावें. उदाहरणार्थ 'परशुना वृश्चन्' या स्थलीं 'परशुना' या सुबन्तापुढें 'वृश्चन्' हें आमन्त्रितसंज्ञक संबुद्धीचें पद आलें असल्यामुळें, स्वरविधि कर्तव्य असतां, 'परशुना' हें पद 'वृश्चन्' या पदाचें अङ्ग मानल्यानें दोन्ही पदें मिळून एक पद आहे असें मानलें जातें आणि त्यामुळें 'परशुना' यांतील पकारापुढें असलेला अकार 'आमन्त्रितस्य च' सू. ३६५३ या सूत्रानें उदात्त होतो.

येथे सुबन्त पद स्वरविधि करतेवेळी आमन्त्रित पदाशी एकजीव होऊन त्याशी तादात्म्य पावत असल्यामुळें, हे तादात्म्यातिदेशाचे उदाहरण ठरते ''मालेभ्यो भववत्' सू १२३७ हें शास्त्रातिदेशाचे उदाहरण असून 'स्थानिवदादेश' सू ४९ हे कार्यातिदेशाचे उदाहरण आहे व प्रकृत सूत्र रूपातिदेशाचे उदाहरण आहे.) प्रकृत सूत्र निमित्तातिदेशाचे किंवा व्यपदेशातिदेशाचे सूत्र आहे (व रूपातिदेशाचे सूत्र नव्हे) असे मानले तर, ज्या ज्या सूत्रात 'तृच' या शब्दाचा उच्चार करून तृजन्ताला कार्य होणे सांगितली आहेत तेवढीच कार्ये 'क्रोष्टु' शब्दाला होऊ शकतील त्यामुळें 'क्रोष्टु' शब्दापुढें 'जस्' प्रत्यय आला असता ('ऋतो ङिसर्वनामस्थानयो.' सू ७७५ या सूत्रात 'तृच' चा उच्चार करून कार्य होणे सांगितले नसल्यामुळें, जरी 'जस्' हा सर्वनामस्थानप्रत्यय आहे तरी, ते सूत्र प्रवृत्त न होता, 'जसि च' सू २४१ हे सूत्र प्रवृत्त होऊन त्या सूत्रानें) गुण व (नंतर 'एचोऽयवायाव' सू ६१ या सूत्राने) अवादेश झाल्याने (क्रोष्टु जस् = क्रोष्टो अस् = क्रोष्टव' अशी स्थिति झाली असता, 'अप्तृन्तृच्' सू २७७ या सूत्रानें 'तृच्' चा उच्चार करून तृजन्ताला उपधादीर्घकार्य होणे सांगितले असल्यामुळें) 'अप्तृन्' या सूत्रानें उपधादीर्घकार्यच होईल (व 'क्रोष्टाव' असे रूप होईल) पण ('ऋदुशनस' सू २७६ या सूत्रानें) 'सु' प्रत्यय पुढें असताना होणारा 'अनङ्' आदेश व तसेच 'सु, औ, जस्' इत्यादि सर्वनामस्थानप्रत्यय पुढें असताना ('ऋतो ङिसर्वनामस्थानयो' या सूत्रानें होणारे) गुणकार्य होऊ शकणार नाही; (कारण या दोन्ही सूत्रात 'तृच्' चा उच्चार करून कार्याचे विधान केले नाही त्यामुळें अनिष्ट रूपें होण्याची आपत्ति येईल. म्हणून प्रकृत सूत्र निमित्तातिदेशाचे किंवा व्यपदेशातिदेशाचे—व्यवहारातिदेशाचे—सूत्र आहे हे मानणे अयोग्य आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे आता पुढील पङ्क्तीत शकाकार अशी शका करतो की, दीक्षितानी मनोरमेंत प्रकृत सूत्र रूपाति-

देशाचें सूत्र आहे असें जें म्हटलें आहे तें बरोबर नसून, वास्तविक तें कार्यसामान्यातिदेशाचें सूत्र आहे. जर पाणिनीचा असा हेतु असता कीं, 'तृच्' या प्रत्ययाचा उच्चार करून 'अप्तृन्' सू. २७७ या सूत्रानें तृजन्ताला जें उपधादीर्घकार्य होणें सांगितलें आहे तेवढेंच कार्य 'क्रोष्टु' या शब्दाला व्हावें व ऋदन्ताला होणारीं इतर कार्यें 'क्रोष्टु' शब्दाला होऊं नयेत तर त्यानें) 'अप्तृन्' या सूत्रांत 'क्रोष्टु' या शब्दाचें ग्रहण केल्यानेंच त्याचा हेतु सिद्धीस गेला असता (व प्रकृत व त्यापुढील तृज्वद्भावाचीं दोन सूत्रें पठित करण्याची त्याला कांहींच गरज नव्हती आणि अशा रीतीनें हीं सूत्रत्रयी व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते. पण पाणिनीनें ही सूत्रत्रयी मुद्दाम आरंभिली असल्यामुळें) या सूत्रत्रयीच्या आरंभसामर्थ्यानें हें सिद्ध होतें कीं, प्रकृत सूत्र कार्यसामान्यातिदेशाचें सूत्र आहे. (या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं,) ही शंका बरोबर नाहीं; कारण प्रकृत सूत्र व त्यापुढील दोन सूत्रें यांच्या आरंभसामर्थ्यानें प्रकृत सूत्र रूपातिदेशाचें सूत्र आहे हें ज्ञापित होतें असेंच मानणें योग्य आहे. ('स्त्रियां च' सू. ३०५ व 'विभाषा तृतीयादिष्वचि' सू. २७८ या, प्रकृत सूत्रापुढें पठित केलेल्या, दोन सूत्रांत तृजन्ताला उद्देशून कोणतेंहि कार्य होणें सांगितलें नसून जरी केवळ तृज्वद्भावाचें विधान केलें आहे तरी, हीं दोन सूत्रें सार्थक ठरावीं याकरितां हें मानणें आवश्यक आहे कीं, ज्याप्रमाणें ऋदन्त प्रातिपदिकाला उद्देशून पाणिनीय शास्त्रांत जीं कार्यें होणें सांगितलीं आहेत तीं सर्व कार्यें 'क्रोष्टु' शब्दाहून केलीं जातात त्याचप्रमाणें प्रकृत सूत्राच्या आरंभसामर्थ्यानें तीं सर्व कार्यें 'क्रोष्टु' शब्दाहून देखील होतात. असें मानल्यानेंच प्रकृत सूत्रत्रयी चरितार्थ ठरते व असें न मानल्यास ही सूत्रत्रयी व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते. सारांश तृजुद्देश्यक व ऋदुद्देश्यक सर्व कार्यें 'क्रोष्टु' शब्दाला व्हावीं म्हणून पाणिनीनें वरील सूत्रत्रयी मुद्दाम आरंभिली असल्यामुळें, प्रकृत

सूत्र कार्यसामान्यातिदेशाचे सूत्र ठरतें असा शकाकाराच्या म्हणण्याचा तात्पर्यार्थ आहे या शंकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात कीं, पाणिनीनें जो सूत्रत्रयी मुद्दाम आरंभिली आहे ती रूपातिदेश मानल्यानें देखील सुसङ्गत ठरत असल्यामुळें, प्रकृत सूत्र रूपातिदेशाचे सूत्र आहे हेंच मानणे योग्य आहे, कारण पूर्वी सांगितल्याप्रमाणे शब्दशास्त्रात-व्याकरणशास्त्रात-रूपातिदेश प्रधान असल्यामुळें, जेथें रूपातिदेश मानणें संभवत नाही तशा स्थली इतर प्रकारचा अतिदेश मानणे उचित आहे परंतु जेथें रूपातिदेश व तसेच इतर प्रकारचा देखील अतिदेश मानणे संभवते तशा स्थली, रूपातिदेश प्रधान असल्यामुळें, रूपातिदेश मानणेच योग्य आहे शंकाकारानें वरील शंका करिताना जें म्हटले आहे ते रूपातिदेशाचे देखील सारखेंच समर्थन करणारे असल्यामुळें, प्रकृत स्थली कार्यसामान्यातिदेश न मानता दीक्षितांनी जसा रूपातिदेश मानला आहे तसेच मानणे उचित आहे असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा आशय आहे सारांश प्रकृत सूत्रात 'तृज्वत्' असा जो निर्देश केला आहे त्या निर्देशातील तकार, गोतो णित्' सू २८४ या सूत्रात जसा गकार अविवक्षित मानला आहे तसा, अविवक्षित मानून व चकार देखील अविवक्षित मानून शंकाकार 'तृच्' या प्रकृत सूत्रातील निर्देशातील फक्त ऋकारच विवक्षित मानतो व अशा रीतीनें प्रकृत सूत्र कार्यातिदेशाचे सूत्र ठरविण्याचा प्रयत्न करतो पण तसे करण्यापेक्षा, प्रकृत सूत्र रूपातिदेशाचे सूत्र आहे हे मानण्यातच लाघव आहे, कारण तसे मानल्यानें 'तृच्' या निर्देशातील तकार व चकार अविवक्षित आहेत असे मानण्याची काही गरज पडत नाही व सूत्रत्रयीच्या आरंभसामर्थ्यानें तो निर्देश चरितार्थ ठरतो म्हणूनच भैरवीकार म्हणतात – 'सूत्रत्रयसामर्थ्यादुच्चारितस्य चकारस्याविवक्षया कल्पनापेक्षया रूपातिदेशे न कस्यचिदर्थस्यैषर्थशङ्केति भाव ।') तादात्म्यातिदेश तर येथें संभवतच नाही, कारण 'क्रोष्टु' व 'क्रोष्टृ' (हे दोन्ही शब्द 'कोल्हा' या एकाच अर्थाचे वाचक असल्यामुळें) या दोन शब्दांच्या

कोणत्याहि रूपांचा वाक्यांत एकेच वेळीं प्रयोग होऊं शकत नाहीं. (तादात्म्यातिदेश होण्याकरितां दोन भिन्न व्यक्तींची आवश्यकता आहे. दोन भिन्न व्यक्ति असल्या तरच एक व्यक्तीचा दुसरे व्यक्तीचे ठिकाणीं तादात्म्यातिदेश करतां येतो. 'परशुना वृश्चन्' या वर दिलेल्या उदाहरणांत दोन भिन्नार्थक स्वतंत्र पदांचा वाक्यांत प्रयोग केला असल्यामुळें, पूर्वपद उत्तरपदाशीं तादात्म्य पावून दोन्ही पदें एकजीव होतात व 'आमन्त्रितस्य च' या षाष्ठ सूत्रानें संबोधनाला होणारें स्वरकार्य पूर्व पदाच्या आद्य अचाला होतें. पण त्रिसूत्री नियमार्थक मानली असल्यामुळें व 'क्रोष्टु' आणि 'क्रोष्टृ' या समानार्थक शब्दांचा वाक्यांत एकेच वेळीं प्रयोग होणें संभवत नसल्यामुळें, प्रकृत सूत्र तादात्म्यातिदेशाचें सूत्र आहे असें मानतां येणें मुळींच शक्य नाहीं.) प्रकृत स्थलीं शास्त्रातिदेश किंवा कार्यातिदेश देखील मानतां येत नाहीं; कारण 'तुन्' प्रत्ययान्त 'क्रोष्टु' शब्द आद्युदात्त असल्यामुळें तृज्वद्भाव करून त्यांतील उकाराचे जागीं जरी रेफरूप यणादेश केला तरी, तो रेफरूप यण् उदात्ताचे जागीं होत नसल्यामुळें, 'उदात्त यणो हल्पूर्वात्' सू. ३७२० या सूत्रानें होणारा स्वर न होण्याची आपत्ति येते. ('क्रोष्टु आ' या स्थलीं शास्त्रातिदेश मानल्यास, 'आङो नाऽस्त्रियाम्' सू. २४४ हें घिसंज्ञक शब्दाला लागू पडणारें शास्त्र प्रवृत्त न होतां, ऋदन्त शब्दापुढें 'टा = आ' हा प्रत्यय आला असतां तशा ठिकाणीं लागू पडणारें 'इको यणचि' सू. ४७ हें शास्त्र प्रवृत्त होईल. कार्यातिदेश मानल्यास, वरील उदाहरणांत 'आङो नाऽस्त्रियाम्' या सूत्रानें कार्य न करितां 'इको यणचि' या सूत्रानें कार्य करावें लागेल. आतां 'ञ्नित्यादिर्नित्यम्' सू. ३६८६ या सूत्रान्वयें तुन्प्रत्ययान्त 'क्रोष्टु' शब्द आद्युदात्त आहे; पण तृच्प्रत्ययान्त 'क्रोष्टृ' शब्द 'चितः' सू. ३७१० या सूत्रान्वयें अन्तोदात्त आहे. वर जे दोन अतिदेश सांगितले आहेत त्यांपैकीं कोणताहि अतिदेश मानला तरी, 'क्रोष्टु आ' या स्थलीं 'आ' प्रत्ययाचे जागीं नादेश न करितां, वर सांगितल्याप्रमाणें,

यणादेशरूप कार्य करावे लागेल व ते कार्य केल्यानें व जें वकाररूप यणादेश कार्य पावले आहे तें न करिता तृज्वद्भाव करून रेफरूप यणादेश केल्यानें 'क्रोष्ट्रा' असे रूप होईल हे खरे. पण येथें जो रेफरूप यणादेश होतो तो अनुदात्त उकाराचे जागी होत असून उदात्तस्थानिक नसल्यामुळें, ज्याप्रमाणे 'क्रोष्टृ आ' या स्थली उदात्तस्थानिक यण् होत असल्यामुळें 'क्रोष्ट्रा' हा शब्द 'उदात्तयणो हल्पूर्वात्' या सूत्रान्वयें अन्तोदात्त होतो तसा, शास्त्रातिदेश किंवा कार्यातिदेश मानून सिद्ध केलेला 'क्रोष्ट्रा' हा शब्द अन्तोदात्त न होता, आद्युदात्त होईल आणि अशा दोहोंतें स्वरात फरक पडण्याची आपत्ति येईल म्हणून येथें शास्त्रातिदेश किंवा कार्यातिदेश मानता येत नाही असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा भावार्थ आहे ) अर्थातिदेश तर या ठिकाणी संभवतच नाही, कारण 'क्रोष्टु' व 'क्रोष्टृ' हे दोन्ही शब्द स्वत. एकाच अर्थाचे वाचक आहेत. (मनोरमेंत जरी सहाच प्रकारचे अतिदेश सांगितले आहेत तरी, 'कार्यरूपनिमित्तार्थशास्त्रतादात्म्यशब्दिता । व्यपदेशश्च सप्तैतानतिदेशान् प्रचक्षते' या पूर्वी दिलेल्या कारिकेत अर्थातिदेश हा एक अधिक सातवा अतिदेश सांगितला आहे तो अतिदेश अशाच ठिकाणी होऊ शकतो की जेथें दोन शब्द भिन्न अर्थाचे वाचक असून एका शब्दाच्या अर्थाचा दुसऱ्या शब्दाच्या अर्थाचे ठिकाणी आरोप केला जातो प्रकृत स्थली 'क्रोष्टु' व 'क्रोष्टृ' हे दोन्ही शब्द 'कोल्हा' या एकाच अर्थाचे वाचक असल्यामुळें, अर्थातिदेश होणे संभवतच नाही. 'स्त्री पुंवच्च' सू ९२२ हे सूत्र अर्थातिदेशाचे उदाहरण आहे ) मनोरमेंत जे सहाच प्रकारचे अतिदेश सांगितले आहेत ते, प्रकृत स्थली अर्थातिदेश संभवतच नाही असे मानून, सांगितले आहेत. (सारांश वास्तविक अतिदेश सात प्रकारचे असून दीक्षितांनी मनोरमेंत जे अतिदेशाचे सहाच प्रकार सांगितले आहेत त्याचे कारण हेच की, सातव्या प्रकारचा अतिदेश, म्हणजे अर्थातिदेश, प्रकृत सूत्रानें होणे मुळींच संभवत नाहीं. प्रकृत स्थली रूपातिदेशच संभवतो याचे

इतर सहा अतिदेश येथें संभवत नसून तो सातवाच अतिदेश होऊं शकतो असें वरील शब्दरत्नांत जें कारण दिलें आहे त्या खेरीज रूपातिदेश मानण्यास दीक्षितांनीं मनोरमेंत ) 'प्राधान्यात्' हें वेगळें कारण दिलें आहे ( व याचें विवरण पूर्वीं मनोरमेंत केलेंच आहे. ) 'रूपमेवातिदिश्यते' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचें कारण हें कीं, प्रकृत सूत्रांतील 'तृज्वत्' या पदांत ऋकार उपस्थित असल्यामुळें, 'क्रोष्टु' शब्दाचे जागीं ऋकारविशिष्ट 'क्रोष्टृ' हें रूप अतिदेशानें होतें. 'तृज्वत्' यांतील 'तृच्' यांत चकाराचें उच्चारण केलें असल्यामुळें त्या उच्चारणसामर्थ्यानें, ज्या 'क्रोष्टृ' शब्दस्वरूपाचा अतिदेश होतो तें शब्दस्वरूप ( 'चितः' सू. ३७१० या सूत्रान्वयें होणारें) अन्तोदात्तस्वरविशिष्ट रूप होय, आणि या अतिदिष्ट रूपांतील अन्त्य ऋकार उदात्त असल्यामुळें, 'उदात्तयणो हल्पूर्वात्' सू. ३७२० इत्यादि सूत्रांनीं होणारें स्वर सिद्ध होण्यांत कांहीं अडचण येत नाहीं. (व 'क्रोष्ट्रा' इत्यादि रूपें अन्तोदात्त होतात.)

मनोरमा– नियमार्थमिति । अन्येषां संज्ञाशब्दानां मा भूदित्येतदर्थमित्यर्थः। क्रोष्टेति । अनङ् । हल्ङ्यादिलोपात्परत्वादुपधादीर्घः। स च "सर्वनामस्थाने च" । इत्यनेन यद्यपि लभ्यते तथापि परत्वात "अप्तृन्" इत्येव न्याय्यः । कृतेऽप्यनङि एकदेशविकृतस्यानन्यत्वेन तृज्वत्वात् । अन्यथा गुणे कृतेऽपि दीर्घो न स्यादिति भावः ।

'अप्तृन्' सू. २७७ या सूत्रावरील कौमुदींत 'नप्त्रादिग्रहणं व्युत्पत्तिपक्षे नियमार्थम्' असें जें म्हटलें आहे त्याचा अर्थ हा आहे कीं, ( उणादिनिष्पन्न तृन्तृजन्त संज्ञावाचक शब्दांना जर उपधादीर्घकार्य होणें असेल तर प्रकृत सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या सात शब्दांनाच तें कार्य व्हावें व) इतर संज्ञावाचक शब्दांना, म्हणजे उणादिनिष्पन्न 'पितृ, भ्रातृ' इत्यादि संज्ञावाचक शब्दांना, तें कार्य होऊं नये. 'क्रोष्टा = क्रोष्टृ सु' या स्थळीं ('ऋदुशनस्' सू. २७६ या सूत्रानें अन्त्य ऋकाराचे जागीं) अनङादेश होतो (व 'अनङ्' आदेश केल्यानें

'क्रोष्टन् सु' अशी स्थिति झाली असतां) 'हल्ङ्याब्भ्यः' सू. २५२ या सूत्राच्या मानानें 'अप्तृन्' हे प्रकृत सूत्र परसूत्र असल्यामुळें, उपधादीर्घकार्य प्रथम होऊन नंतर 'सु' प्रत्ययाचा लोप होतो. जरी 'सर्वनामस्थाने चासम्बुद्धौ' सू. २५० या सूत्रानें देखील वरील उदाहरणात उपधादीर्घकार्य ('क्रोष्टन्' हा शब्द नान्त असल्यामुळें) होऊ शकते तरी, त्या सूत्राच्या मानानें 'अप्तृन्' हे प्रकृत सूत्र परसूत्र असल्यामुळें, 'अप्तृन्' या सूत्रान्वयेंच उपधादीर्घकार्य करणे न्याय्य आहे. 'क्रोष्टृ' शब्दातील अन्त्य ऋकाराचे जागी 'अनङ्' आदेश केला असता जरी 'क्रोष्टन्' असे रूप होतें तरी, 'एकदेश-विकृतमनन्यवत्'—परि. ३७– या परिभाषान्वयें 'क्रोष्टन्' हा एकदेशविकृत शब्द तृजन्त 'क्रोष्टृ' शब्दच आहे असे मानता येते. या स्थली एकदेशविकृतन्याय प्रवृत्त न केल्यास, ['क्रोष्टृ औ' इत्यादि स्थली 'ऋतो ङिसर्वनामस्थानयोः' सू. २७५ या सूत्रानें) गुण केला तरी, उपधादीर्घकार्य होऊ शकणार नाही. ('क्रोष्टृ औ' या स्थली गुण केल्यावर 'क्रोष्टर् औ' अशी स्थिति झाली असता, 'क्रोष्टर्' हा शब्द तृजन्त 'क्रोष्टृ' शब्दच आहे असे एकदेशविकृत-न्यायानें न मानल्यास, उपधादीर्घकार्य होऊ शकणार नाही व 'क्रोष्टारौ' इत्यादि इष्ट रूपें सिद्ध होऊ शकणार नाहीत )

शब्दरत्न—सञ्ज्ञाशब्दानामिति । उणादिव्युत्पन्नानामिति शेषः । अतो धातृशब्दस्य दीर्घो भवत्येव । परत्वादिति । इदमग्रिमं च कार्यद्वयेऽसम्भवाभावे विप्रतिषेध इत्यभिमानेन । यद्वा परत्वादुत्कृष्टत्वात् विशेषविहितत्वेन शीघ्रोपस्थितिकरत्वादित्यर्थः ।

मनोरमेंतील 'सञ्ज्ञाशब्दानाम्' या पदापूर्वी 'उणादि-व्युत्पन्नानाम्' हे पद अध्याहृत आहे उणादिनिष्पन्न सञ्ज्ञावाचक शब्दानाच 'अप्तृन्' या सूत्रानें घालून दिलेला नियम लागू पडत असल्यामुळें (व 'धातृ' हा सञ्ज्ञावाचक शब्द उणादिसूत्रान्वयें सिद्ध झाला नसून, 'धा' धातूहून 'ण्वुल्तृचौ' सू. २८९५ या पाणिनीय सूत्रानें 'तृच्' प्रत्यय होऊन सिद्ध झाला असल्यामुळें,

प्रकृत सूत्रानें) 'धातृ' या शब्दाला उपधादीर्घकार्य होतेच. 'परत्वात् अप्तृन् इत्येव न्याय्य:' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे व पुढें ('हे रमे' या रूपाची सिद्धि करितांना दीक्षितांनीं मनोरमेंत 'यथाश्रुतेऽपि एङ्ह्रस्वात् इति लोपस्यैव परत्वेन न्याय्यत्वात्' असें) जें म्हटलें आहे तें असें मानून म्हटलें आहे कीं, जरी 'सर्वनामस्थाने चासम्बुद्धौ' व 'अप्तृन्' या दोन्ही सूत्रांत उपधादीर्घ होणें हेंच कार्य सांगितलें आहे व त्या दोन सूत्रांपैकीं कोणत्याहि सूत्रानें तें कार्य केल्यास कांहींच विरोध येत नाहीं तरी असंभवाचा अभाव असून देखील, त्या दोन सूत्रांत पूर्वपरभाव असल्यामुळें, विप्रतिषेध होतोच. (जेथें एखाद्या उदाहरणांत इतरत्र सावकाश व चरितार्थ असणाऱ्या दोन तुल्यबल सूत्रांची युगपत् प्रवृत्ति होणें असंभवनीय आहे तशाच ठिकाणीं भाष्यकारांनीं विप्रतिषेध मानला आहे. म्हणून वास्तविक येथें वरील दोन सूत्रांत विप्रतिषेध मानतां येत नाहीं; कारण त्या दोन सूत्रांपैकीं कोणतेंहि सूत्र प्रथम प्रवृत्त केलें तरी उपधादीर्घकार्यच होणार आणि म्हणूनच शब्दरत्नकारांनीं प्रकृत पंक्तींत 'इत्यभिमानेन' हीं अरुचिप्रदर्शक पदें घातलीं आहेत. तथापि प्रकृत स्थलीं विप्रतिषेध नसून देखील एक पूर्व सूत्र व दुसरें पर सूत्र असल्यामुळें, 'पूर्वात्परं बलवत्' या न्यायान्वयें दीक्षितांनीं येथें विप्रतिषेध मानला आहे.) अथवा मनोरमेंतील 'परत्वात्' या पदाचा 'उत्कृष्टत्वात्', म्हणजे 'विशेषविहितत्वेन शीघ्रोपस्थितिकत्वात्' असा अर्थ करावा. ('सर्वनामस्थाने चासम्बुद्धौ' हें उपधादीर्घकार्याचें विधान करणारें सामान्य सूत्र असून, 'अप्तृन्' हें उपधादीर्घकार्याचें विधान करणारें विशेष सूत्र आहे; कारण या सूत्रांत 'तृच्' प्रत्ययाचा उच्चार करून तृजन्ताला उपधादीर्घकार्य होणें सांगितलें आहे. म्हणून जेथें तृजन्त शब्दाला उपधादीर्घकार्य करणें आहे तेथें 'अप्तृन्' हें विशेष सूत्र एकदम प्रथम उपस्थित होतें व तें प्रतिपादक सूत्र [illegible]त्यामुळें, विलंबोपस्थितिक 'सर्वनामस्थाने चासम्बुद्धौ' या सामान्य सूत्राचा बाध करून, स्वतःच प्रवृत्त होतें.)

मनोरमा--"रात्सस्य" ॥ इह तकारोऽपि प्रश्लिष्यत इति पक्षान्तरम् । तेन हल्ङ्याादिसूत्रस्थाने ङ्यापः सोरिति निष्कर्षे अबिभर्भवानित्यादि सिद्धयति । अजर्घर्त् इत्यत्र तु चर्त्वस्यासिद्धत्वात् तलोपो न । ननु कीर्तयतेः क्विपि कीर्त् इह स्यादिति चेन्न । 'यथालक्षणमप्रयुक्ते' इति वाच्यम् । एतेनावर्वर्त् इति व्याख्यातम् । परत्वादिति । न च नुम्विधिरिति वाच्यम्, तृज्वद्भावे कृते सन्निपातपरिभाषया नुटो दुर्लभत्वादिति भावः । नुमचिरेति । ननु रेण स्वविषये प्राप्तं सर्वं बाध्यम् । बाध्यसामान्यचिन्ताश्रयणात् । तथा च वक्ष्यते । 'गुणदीर्घोत्वानामपवादः' इति । एवं चाविशेषाद् नुडप्यनेन बाध्यः । सत्कथं विप्रतिषेधः । उत्सर्गापवादयोस्तदयोगादिति चेत्सत्यम् । अत एव तदंशे विप्रतिषेधं दूषयित्वा "न तिसृचतसृ" इति ज्ञापकाद् नुडिति भाष्यकृतोक्तमिति सन्तोष्टव्यम् इत्युक्ताः ॥

'रात्सस्य' सू. २८० या सूत्रात तकार देखील प्रश्लिष्ट आहे असाहि एक पक्ष आहे व हा पक्ष मानल्यास, 'हल्ङ्याब्भ्यः' सू. २५२ या सूत्राऐवजी 'ङ्यापः सोः' एवढेंच सूत्र जरी पठित केले तरी, 'अबिभर्भवान्' इत्यादि प्रयोग सिद्ध होऊं शकतात. ('अ बिभृ त्' या स्थली 'सार्वधातुकार्धधातुकयोः' सू. २१६८ या सूत्रानें 'बिभृ' यातील अन्त्य ऋकाराला गुण होऊन 'अबिभर् त्' अशी स्थिति झाली असता, रकारापुढें तकार आला असल्यामुळें, तकाराचा प्रश्लेष करून 'रात् सस्य' असे सूत्र मानल्यानें, तकाराचा लोप होऊन 'अबिभर्' असे रूप सिद्ध होऊं शकते. या विषयाचें विवरण मागें केलेच आहे) 'अजर्घर्त्' या स्थली चर्त्व असिद्ध असल्यामुळें तकारलोप होत नाही. ('गृधु अभिकाङ्क्षायाम्' या धातूच्या यङ्लुकाच्या लङाचे प्रथमपुरुषाच्या एकवचनाचे 'अजर्घर्त्' हे रूप आहे. या उदाहरणांत 'सन्यङोः' सू. २३९५ या सूत्रानें द्विर्वचन होऊन व 'उरत्' सू २२४४ या सूत्रानें अभ्यासातील ऋकाराचे जागीं अकार होऊन व 'कुहोश्चुः'

सू. २२४५ या सूत्रानें अभ्यासांतील गकाराचे जागीं जकार होऊन व 'रुग्रिकौ च लुकि' सू. २६५२ या सूत्रानें अभ्यासाला 'रुक् = र्' आगम होऊन व 'पुगन्तलघूपधस्य च' सू. २१८९ या सूत्रानें 'गृधु' धातूंतील उपधाऋकाराचा गुण होऊन 'अजर्गर्धृत्' अशी स्थिति झाली असतां, 'हल्ङ्याब्भ्यः' हें यथापठित सूत्र न मानलें तरी 'संयोगान्तस्य लोपः' सू. ५४ या सूत्रानेंच तकारलोप केल्यावर 'अजर्गर्ध्' असें रूप होतें. येथें 'गर्ध्' हा एकाच् पदान्तीं असल्यामुळें 'एकाचो बशो भष्' सू.३२६ या सूत्रानें 'गर्ध्' यांतील गकाराचा घकार होऊन व 'वाऽवसाने' सू. २०६ या सूत्रानें अन्त्य धकाराचा तकार होऊन 'अजर्घर्त्' असें रूप होतें. या रूपांत रकारापुढें तकार असल्यामुळें, 'रात् ससस्य' या सूत्रानें त्या तकाराचा लोप पावला आहे. परंतु 'रात् ससस्य' हें त्रैपादिक पूर्व सूत्र असून 'वाऽवसाने' हें त्रैपादिक परसूत्र असल्यामुळें, 'रात्ससस्य' या सूत्रानें तकारलोप करतेवेळीं 'वाऽवसाने' या परसूत्रानें धकाराचे जागीं झालेला तकार, 'पूर्वत्रासिद्धम्' सू. १२ या वचनान्वयें, असिद्ध ठरतो, म्हणजे धकाराचे जागीं तकार झाला नसून धकारच विद्यमान आहे असें मानावें लागतें व त्यामुळें तकाराचा लोप होत नाहीं.) 'कृत संशब्दने' या चुरादिगणांत पठित असलेल्या धातूहून णिच् करून क्विप् प्रत्यय केल्यावर ('कृत् णिच् क्विप्' या स्थितींत 'उपधायाश्च' सू. २५७१ या सूत्रानें उपधाभूत दीर्घऋकाराचे जागीं इकार होऊन व 'उरण् रपरः' सू. ७० या सूत्रानें तो इकार रपर होऊन व 'उपधायां च' सू. २२६५ या सूत्रानें तो इकार दीर्घ होऊन व 'णेरनिटि' सू. २३१३ या सूत्रानें णिलोप होऊन आणि 'वेरपृक्तस्य' सू. ३०५ या सूत्रानें 'क्विप् = व्' या अपृक्त प्रत्ययाचा लोप होऊन) 'कीर्त्' असें जें रूप होतें त्या रूपांत रकारापुढें तकार असल्यामुळें, 'रात् सस्य' असें सूत्र मानल्यास, तकारलोप पावतो असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण '[illegible]' असें भाष्यवचन आहे व त्या भाष्यवचनान्वयें

'अववर्तं' या स्थली देखील (जरी रकारापुढें तकार आहे तरी त्या) तकाराचा लोप होत नाही.' ('यथालक्षणमप्रयुक्ते' या भाष्य-वचनाचे 'लोके प्रयुक्तानामिदमन्वाख्यानमित्यप्रयुक्ते लक्षणाम-प्रवृत्तिलक्षणं लक्षणमित्यर्थः' असे कैयटानें व्याख्यान केले आहे व या व्याख्यानाचा अर्थ असा आहे की, लौकिकप्रयोगात जे शब्द आढळतात त्यांचेच अन्वाख्यान करण्याकरिता पाणिनीय शास्त्र रचले असल्यामुळें, ज्या शब्दाचा भाषेत प्रयोग आढळत नाही अशा शब्दाची सिद्धि करण्याकरिता पाणिनीय शास्त्राची प्रवृत्ति होत नाही. 'कीर्द' व 'अववर्द' हे प्रयोग भाषेत आढळत नाहीत. म्हणून त्यांचे ठिकाणीं 'यथालक्षणमप्रयुक्ते' या भाष्यवचनान्वयें 'रात् सस्य' या सूत्राची प्रवृत्ति करता येत नाही असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे 'अववर्द' हे 'वृत्' धातूच्या यङ्लुकाच्या लङाचे प्रथमपुरुषाचे एकवचन आहे. आता 'क्रोष्टु आम्' या स्थली 'विभाषा तृतीयादिष्वचि' सू. २७८ या सूत्रानें तृज्वद्भावाची प्राप्ति आहे व तसेच 'ह्रस्वनद्यापो नुट्' सू. २०८ या सूत्रानें 'आम्' प्रत्ययाला नुडागमाची प्राप्ति आहे या दोन सूत्रांपैकी, तृज्वद्भावाचे सूत्र परसूत्र असल्यामुळें, तृज्वद्भाव प्रथम करून, म्हणजे 'क्रोष्टृ' असे रूप प्रथम करून, नतर 'आम्' प्रत्ययाला नुडागम केल्यास, 'नामि' सू २०९ या सूत्रानें ऋकार दीर्घ होऊन 'क्रोष्टॄणाम्' असे रूप होईल पण तसे रूप होणे इष्ट नसून 'क्रोष्टूनाम्' असेच रूप होणे इष्ट असल्यामुळें, वार्तिककारानें 'नुमचिरतृज्वद्भावेभ्यो नुट् पूर्वविप्रतिषेधेन' असे वार्तिक पठित केले आहे व त्या वार्तिकान्वयें पूर्वविप्रतिषेधानें 'आम्' प्रत्ययाला प्रथम नुडागम होतो, म्हणजे 'नाम्' असा हलादि प्रत्यय होतो, व अशा रीतीनें 'क्रोष्टु' शब्दापुढें अजादि विभक्तिप्रत्यय राहत नसल्यामुळें, तृज्वद्भाव होत नाही व 'नामि' या सूत्रानें 'क्रोष्टु' यांतील अन्त्य उकार दीर्घ होऊन 'क्रोष्टूनाम्' असे इष्ट रूप सिद्ध होते. ) नुडागमकार्य नित्य आहे ( व तें नित्य असल्यामुळें,"

'परान्नित्यं बलवत्' या न्यायान्वयें तृज्वद्भावरूप परकार्याचा बाध करून तें आपोआपच प्रथम होईल आणि म्हणून पूर्वविप्रतिषेधाचें वरील वार्तिक असण्याची कांहीं गरज नाहीं ) असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण सन्निपातपरिभाषा–परि. ८६–असल्यामुळें, परसूत्रानें तृज्वद्भाव प्रथम केल्यावर नुडागम मुळींच होऊं शकणार नाहीं. ('क्रोष्टु आम्' या स्थलीं तृज्वद्भाव प्रथम केला किंवा मागून केला तरी 'ह्रस्वनद्यापो नुट्' या सूत्रानें नुडागमाची अवश्यप्राप्ति आहे. म्हणून 'कृताकृतप्रसङ्गि नित्यम्' या वचनान्वयें नुडागमकार्य नित्य ठरत असल्यामुळें, परसूत्रानें होणाऱ्या तृज्वद्भावाचा बाध करून तें 'परान्नित्यं बलवत्' या न्यायान्वयें प्रथम होईलच. मग पूर्वविप्रतिषेधाचें वरील वार्तिक मानण्याची गरज काय असें शंकाकाराचें म्हणणें आहे. या शंकेवर दीक्षित असें उत्तर देतात कीं, 'क्रोष्टु आम्' या स्थलीं तृज्वद्भाव प्रथम केल्यास, म्हणजे 'क्रोष्टृ आम्' अशी प्रथम स्थिति केल्यास, ज्या 'आम्' प्रत्ययाच्या अजादित्वामुळें तृज्वद्भाव झाला आहे तो 'आम्' प्रत्यय, सन्निपातपरिभाषान्वयें नुडागमकार्य होऊं देणार नाहीं; कारण नुडागम केल्यास, 'क्रोष्टु' व 'आम्' या दोहोंत नुडागमाचें व्यवधान होऊन तो नुडागम त्या दोहोंच्या सन्निपाताचा नाश करील व अशा रीतीनें नुडागमकार्य 'कृताकृतप्रसङ्गि' ठरत नसल्यामुळें, म्हणजे तृज्वद्भाव प्रथम केल्यास नंतर नुडागम होऊं शकत नसल्यामुळें, तें कार्य नित्य मानतां येत नाहीं आणि म्हणून तें पूर्वसूत्रानें होणारें कार्य असल्यामुळें परसूत्रानें होणाऱ्या तृज्वद्भावकार्याचा बाध तें करूं शकत नाहीं. तसा बाध व्हावा याकरितां पूर्वविप्रतिषेधाचें वरील वार्तिक असणें आवश्यक आहे.) आतां 'नुमचिरतृज्वद्भावेभ्यो नुट् पूर्वविप्रतिषेधेन' या पूर्वविप्रतिषेधाच्या वार्तिकासंबंधानें अशी शंका करण्यांत येते कीं, ('अचि र ऋतः' सू. २९९ या सूत्रानें होणारा) रेफादेश होतेवेळीं ज्या ज्या सूत्रांची प्राप्ति होत असेल त्या सर्व

सूत्रांचा, 'बाध्यसामान्यचिन्ता' या पक्षाचा आश्रय केल्यानें, तो रेफादेश बाध करील आणि म्हणूनच तो रेफादेश ('ऋतो ङिसर्वनामस्थानयो.' सू २७५ या सूत्रानें होणाऱ्या) गुणकार्याचा व ('प्रथमयो पूर्वसवर्णः' सू १६४ या सूत्रानें होणाऱ्या) सवर्णदीर्घ-कार्याचा आणि ('ऋत उत्' सू. २७९ या सूत्रानें होणाऱ्या) उत्वकार्याचा अपवाद आहे असे ('अचि र ऋतः' सू २९९ या सूत्रावरील कौमुदीत) सांगण्यात येणार आहे. अशा रीतीनें हा रेफादेश ज्या ज्या सूत्राची प्राप्ति आहे त्या सर्व सूत्रानी होणाऱ्या कार्यांचा अविशेषेंकरून बाधक ठरत असल्यामुळें, नुडागमाचा देखील बाध करीलच मग येथें विप्रतिषेध होणे कसे शक्य आहे, कारण (इतरत्र सावकाश व चरितार्थ होत असणाऱ्या दोन तुल्यबल शास्त्रातच विप्रतिषेध होत असल्यामुळें, ज्याच्यात बाध्यबाधकभाव आहे व त्यामुळें जे तुल्यबल नाहीत अशा) उत्सर्ग व अपवाद या दोन शास्त्रामध्यें विप्रतिषेध होऊ शकत नाही. (या शकेवर दीक्षित असे उत्तर देतात की.) ही शंका यथार्थ आहे. म्हणूनच नुडागमानें 'अचि र ऋत' या सूत्रानें होणाऱ्या रेफादेशाचा पूर्वविप्रतिषेधानें बाध केला पाहिजे असे जें वार्तिककारानें पूर्वविप्रतिषेधाच्या वरील वार्तिकात म्हटले आहे त्या अशाला दूषित ठरवून, 'न तिसृचतसृ' सू ३०० या ज्ञापकान्वयें 'अचि र ऋत' या सूत्रानें होणाऱ्या रेफादेशाचा बाध करून नुडागम होतो असे भाष्यकारानी म्हटले आहे आणि (अशा रीतीनें ते भाष्य शंकाकाराच्या शंकेचे एक प्रकारे समर्थन करणारे आहे असे जाणून) त्यानें संतोष मानावा ('तृज्वत् क्रोष्टुः' सू ७-१-९५ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात- 'तस्मान्नुड्विषये रादेशस्य प्रतिषेधो वक्तव्य । न वक्तव्यः । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न रादेशो नुट बाधत इति, यदय न तिसृचतसृ इति प्रतिषेध शास्ति नामि दीर्घत्वस्य ।' या भाष्याचा भावार्थ हा आहे की, नुडागम रेफादेशाचा पूर्वविप्रतिषेधानें बाध करितो असे जें वरील वार्तिकात वार्तिककारानें म्हटले आहे तसे म्हणणे बरोबर

नाहीं; कारण 'तिसृ, चतसृ' या शब्दांपुढें 'नाम्' प्रत्यय आला असतां 'नामि' सू. २०९ या सूत्रानें पावलेलें दीर्घकार्य करूं नये या अर्थाचें 'न तिसृचतसृ' हें निषेधक सूत्र आचार्य पाणिनीनें केलें असल्यामुळें त्यावरून हें ज्ञापित होतें कीं, रेफादेश नुडागमाचा बाध करीत नाहीं. जर रेफादेशानें नुडागमाचा बाध व्हावा व 'तिसृ, चतसृ' या शब्दांपुढें 'आम्' प्रत्यय आला असतां त्या प्रत्ययाला नुडागम न होतां 'तिसृ, चतसृ' यांतील अन्त्य ऋकाराचे जागीं रेफादेश व्हावा असें पाणिनीला इष्ट असतें तर, त्याला वरील निषेधक सूत्र करण्याची कांहींच गरज नव्हती. या विषयाचें अधिक विवरण शब्दरत्नांत करण्यांत येईल.) येथें ऋदन्त प्रकरण संपलें.

शब्दरत्न—निष्कर्षेति । अस्य पूर्वपक्षिण इति शेषः । यथालक्षणमिति । अप्रयुक्ते लक्षणाभावस्य योग्यतेत्यर्थः । बाध्यसामान्यचिन्तेति । सा च तृज्वत्सूत्रे भाष्ये स्पष्टा । एवं च 'अचि र' इति सूत्रस्थं 'अचि रादेशो जस्युपसंख्यानं गुणपरत्वात्' इति वार्तिकं बाध्यविशेषचिन्ताभिमानेन प्रवृत्तमिति भावः । एतेन तद्वार्तिकबलाज्जसोऽन्यत्र प्रियतिसरमित्यादौ गुणं कल्पयन्तः परास्ताः, तृज्वत्सूत्रस्थभाष्यविरोधात् । "मपर्यन्तस्य" इति सूत्रस्थप्रियतिस्रावित्यादिभाष्यविरोधाच्च, अनेन=रेण । विप्रतिषेध इति अचि रेणेत्यर्थः । दूषयित्वेति । यद्यपि "न तिसृ" इति ज्ञापकेन तदपवादत्वाभावकल्पनया विप्रतिषेध उपपद्यते । तथापि ज्ञापकानुसरणस्यावश्यकत्वेनैव तं दूषयित्वेत्यर्थः । इदं तृज्वत्सूत्रे भाष्ये । सन्तोष्टव्यमिति । अतिक्षोदस्तदंशे वार्तिके न कार्य इति भावः ॥

मनोरमेंतील 'निष्कर्षे' या पदापूर्वी 'पूर्वपक्षिणः' हें पद अध्याहृत आहे. ('हल्ङ्याब्भ्यः' सू. २५२ हें यथापठित सूत्र न मानतां 'ङ्यापः सोः' एवढेंच सूत्र मानावें हें वास्तविक दीक्षितांचें म्हणणें नसून पूर्वपक्षीचें म्हणणें आहे असें शब्दरत्नकार म्हणतात व तें म्हणणें दूषित करून भाष्यकारांनीं हाच सिद्धान्त सांगितला

आहे की, 'इयापः सोः' असे सूत्र पठित केल्यास अनेक दोष उपस्थित होत असल्यामुळें, यथापठित सूत्रच असणे आवश्यक आहे. 'हल्ड्याब्भ्यः' सू. ६–१–६८ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात:–'तस्मादशब्योऽप्रवृत्तलोपः संयोगान्तलोपो विज्ञातुम् । न चेद्विज्ञायते ? । द्विहल्ग्रहणं तिस्योश्च ग्रहणं कर्तव्यमेव ।') 'यथालक्षणमप्रयुक्ते' या भाष्यवचनाचा 'अप्रयुक्ते लक्षणाभावस्य योग्यता' असा अर्थ आहे. (या विषयाचें विवरण मनोरमेंत केलेंच आहे ) ज्या ज्या सूत्राची प्राप्ति होते त्या सर्व सूत्रांनी होणाऱ्या कार्यांचा 'ऋचि र ऋत.' या सूत्रानें होणारा रेफादेश बाधक ठरतो असे, बाध्यसामान्यचिन्तापक्ष मानून, भाष्यकारानी 'तृज्वत् क्रोष्टु.' सू ७–१–९५ या सूत्रावरील भाष्यात म्हटले आहे. 'ऋचि र ऋतः' या सूत्राच्या विषयात भाष्यकारानी बाध्यसामान्यचिन्तापक्ष मानला असल्यामुळें, 'ऋचि रादेशे अस्युपसङ्ख्यानं गुणपरत्वात्' हें जें वार्तिक त्या सूत्रावर वार्तिककारानें केलें आहे ते बाध्यविशेष-चिन्तापक्ष मानून पठित केले आहे असे समजावे (पण बाध्यसामान्य-चिन्तापक्ष मानल्यास, त्या वार्तिकाची व त्या सूत्रावर जी इतर वार्तिके पठित केली आहेत त्याची काही गरज राहत नाही हें उघड आहे ) 'ऋचि रादेशे जस्युपसङ्ख्यानम्' या वार्तिकाच्या आधारें ('प्रियतिसृ अम्' इत्यादि स्थली) 'जस्' प्रत्यय पुढें नसल्यामुळें जे वैयाकरण ('ऋतो ङिसर्वनामस्थानयो' सू २७५ या सूत्रानें) गुण करून 'प्रियतिसरम्' इत्यादि रूपें सिद्ध करतात ते त्याचे करणे वरील विवेचनावरून चूक ठरते; कारण ते म्हणणे 'तृज्वत् क्रोष्टुः' या सूत्रावरील भाष्याच्या विरुद्ध ठरते (भाष्यकारानी बाध्य-सामान्यचिन्तापक्ष मानून ज्याअर्थी असे म्हटले आहे की, ज्या ज्या सूत्राची प्राप्ति होते त्या सर्व सूत्राना बाध करून 'ऋचि र ऋत.' हें सूत्र प्रवृत्त होतें त्याअर्थी हे स्पष्ट होतें की, ते सूत्र 'ऋतो ङि' सू २७५ या सूत्राना देखील बाध करते त्यामुळें 'प्रियतिसृ अम्' या स्थली 'ऋतो ङि' या सूत्रानें गुण न होता व तसेच 'अमि पूर्वः'

सू. १९४ या सूत्रानें पूर्वरूप एकादेश न होतां, रेफादेश होऊन 'प्रियतिस्रम्' असेंच रूप सिद्ध होतें.) त्या वैयाकरणांचें म्हणणें बरोबर मानल्यास, 'मपर्यन्तस्य' ७–२–९१ या सूत्रावरील भाष्यांत 'प्रियतिस्रौ' इत्यादि जीं उदाहरणें भाष्यकारांनीं दिलीं आहेत त्यांशी देखील विरोध येतो. (वास्तविक 'प्रियतिस्रौ' इत्यादि उदाहरणें 'मपर्यन्तस्य' या सूत्रावरील भाष्यांत दिलीं नसून 'प्रत्ययोत्तरपदयोश्च' सू. ७–२–९८ या सूत्रावरील भाष्यांत दिलीं आहेत. त्या भाष्यांत भाष्यकार म्हणतात–'यद्यपि समासः पुंसि नपुंसके वा वर्तते त्रिचतुरौ च स्त्रियां वर्तेते, भवत्येव तिसृचतसृभावः, प्रियास्तिस्रो ब्राह्मण्योऽस्य ब्राह्मणस्य, प्रियतिसा प्रियतिस्रौ प्रियतिस्रः। प्रियचतसा प्रियचतस्रौ प्रियचतस्रः।' या भाष्यांतील उदाहरणांवरून हें स्पष्ट होतें कीं, 'अचि र ऋतः' हें 'ऋतो ङिसर्वनामस्थानयोः' या सूत्राचें बाधक सूत्र आहे. तें तसें बाधक सूत्र नसतें तर, भाष्यकारांनीं गुण करून 'प्रियतिसरौ प्रियतिसरः' अशा प्रकारचीं रूपें दिलीं असतीं.) 'नुडप्यनेन बाध्यः' या मनोरमेच्या पंक्तींतील 'अनेन' या पदाचा 'रेण', म्हणजे 'अचि र ऋतः' या सूत्रानें होणाऱ्या रेफादेशानें, असा अर्थ आहे. 'तत्कथं विप्रतिषेधः' या मनोरमेंतील पंक्तीचा 'अचि रेण कथं विप्रतिषेधः', म्हणजे 'अचि र ऋतः' व 'ह्रस्वनद्यापो नुट्' सू. २०८ या दोन सूत्रांत बाध्यबाधकभाव असल्यामुळें व अशा रीतीनें तीं दोन सूत्रें तुल्यबल नसल्यामुळें त्यांच्यामध्यें विप्रतिषेध कसा संभवतो, असा अर्थ आहे. (याचें विवरण मनोरमेंत केलेंच आहे.)

'न तिसृचतसृ' सू. ३०० हें ज्ञापकसूत्र मानलें असल्यामुळें, 'अचि र ऋतः' सू. २९९ हें सूत्र 'ह्रस्वनद्यापो नुट्' या सूत्राचें अपवादक सूत्र ठरत नाहीं व त्यामुळें या दोन सूत्रांमध्यें विप्रतिषेध संभवतो हें जरी खरें आहे तरी, ('न तिसृचतसृ' हें सूत्र ज्ञापकसूत्र मानल्याशिवाय 'अचि र ऋतः' या सूत्राचें अपवादकत्व नष्ट होत नाहीं व अशा रीतीनें) ज्ञापकाच्या आधारेंच 'अचि र ऋतः'

हें सूत्र नुडागमाचे बाधक ठरत नसल्यामुळें नुडागम होतो असे सांगून भाष्यकारांनी 'नुड्विधये रप्रतिषेधो वाच्यः' हा वार्तिकांश दूषित ठरविला आहे असा मनोरमेंतील 'दूषयित्वा' या पदाचा अर्थ आहे. भाष्यकारांनी हा जो विप्रतिषेधपक्ष दूषित ठरविला आहे तो 'तृज्वत् क्रोष्टुः' ७-१-९५ या सूत्रावरील भाष्यात ठरविला आहे. (बाध्यसामान्यचिन्तापक्ष मानल्यानें 'अचि र ऋतः' हे सूत्र ज्या ज्या सूत्राची प्राप्ति होते त्या सर्व सूत्रांचा बाध करणारे सूत्र ठरून नुडागमाचा देखील बाध करीलच. पण त्या सूत्राने जर नुडागमाचा बाध केला तर, 'न तिसृचतसृ' हे सूत्र व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते; कारण त्या सूत्रात असे विधान केले आहे की, 'तिसृ, चतसृ' या शब्दापुढें 'नाम्' प्रत्यय आल्यास, 'नामि' सू २०९ या सूत्रानें होणारे दीर्घकार्य होत नाही 'प्राप्तस्यैव निषेध' हा न्याय असल्यामुळें, 'न तिसृचतसृ' हा निषेध चरितार्थ ठरण्याकरिता हे मानणें आवश्यक आहे की, 'तिसृ, चतसृ' या शब्दापुढें 'नाम्' प्रत्यय येतो, म्हणजे नुडागम-सहित 'आम्' प्रत्यय येतो, व अशा रीतीनें हे ज्ञापित होत की, नुडागम प्रथम होतो व 'अचि र ऋतः' हे सूत्र 'ह्रस्वनद्यापो नुट्' या सूत्रानें होणाऱ्या नुडागमाचा बाध करीत नाही व त्याचे अपवादक सूत्र ठरत नाही म्हणून वरील ज्ञापकाच्या आधारे नुडागम प्रथम होतो हे सिद्ध होत असल्यामुळें, नुडागमाच्या विषयात पूर्वविप्रतिषेध मानण्याची काही गरज नाही असा भाष्यकाराच्या म्हणण्याचा आशय आहे व हे भाष्य मनोरमेच्या विवरणात दिलेच आहे) मनोरमेंत 'सन्तोष्टव्यम्' असे जें म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, पूर्वविप्रतिषेधानें नुडागम होतो असे जें वार्तिककारानें म्हटलें आहे त्यासबंधानें अधिक ऊहापोह करण्याची काही गरज नाही, म्हणजे भाष्यकाराच्या मताप्रमाणे ज्ञापकाधारे नुडागम येतो किंवा वार्तिककाराच्या मताप्रमाणे पूर्वविप्रतिषेध मानून नुडागम केला तरी दोन्ही पक्षात इष्टरूपसिद्धि होत असल्या-

मुळें, वार्तिकासंबंधानें जास्त खल – चर्चा – करण्याची कांहीं आवश्यकता नाहीं.

**मनोरमा– "हूहूरिति" । अव्युत्पन्ना संज्ञेयम् । अतिचमूशब्दे त्विति । 'प्रथमलिङ्गग्रहणं च' इत्युक्तेः । तथा च एवमतिचम्वादय इति प्राचो ग्रन्थो भाष्यविरुद्ध इति भावः ॥**

(कौमुदींत 'रात्सस्य' सू. २८० या सूत्रावरील वृत्तीनंतर दिलेल्या ऊदन्त प्रकरणामध्यें) जो 'हूहू' शब्द दिला आहे तो अव्युत्पन्न प्रातिपदिक असून संज्ञावाचक शब्द आहे, म्हणजे तो शब्द गन्धर्वविशेषाची संज्ञा आहे. (या विषयीं 'हाहाहूहूश्चैवमाद्या गन्धर्वास्त्रिदिवौकसाम्' हा अमरकोशांतील श्लोक प्रमाण आहे.) 'अतिचमूशब्दे तु नदीकार्यं विशेषः' असें जें कौमुदींत ऊदन्त प्रकरणांत म्हटलें आहे तें 'प्रथमलिङ्गग्रहणं च' हें वार्तिक असल्यामुळें म्हटलें आहे. म्हणून 'एवमतिचम्वादयः' असें जें प्रक्रियाकौमुदीकारांनीं म्हटलें आहे तें भाष्यविरुद्ध ठरतें. ('चमूमतिक्रान्तः अतिचमूः' हा सामासिक शब्द जरी पुल्लिङ्गी आहे तरी, त्यांतील अन्त्यावयव 'चमू' हा ऊकारान्त नित्यस्त्रीलिङ्गी शब्द 'यूस्त्र्याख्यौ नदी' सू. २६६ या सूत्रान्वयें नदीसंज्ञक असल्यामुळें व 'प्रथमलिङ्गग्रहणं च' हें वार्तिक असल्यामुळें आणि भाष्यकारांनीं तें वार्तिक मानलें असल्यामुळें, 'अतिचमू' हा शब्द नदीसंज्ञक ठरतो व त्यामुळें त्याला नदीकार्यें होतात. म्हणून तो शब्द 'हूहू' शब्दासारखा चालतो हें प्रक्रिया-कौमुदीकारांचें म्हणणें भाष्यविरुद्ध ठरतें; कारण 'हूहू' हा पुल्लिङ्गी शब्द नदीसंज्ञक नसल्यामुळें त्याला नदीकार्यें होऊं शकत नाहीत. प्रसादकारांनीं आपल्या टीकेंत हें कबूल केलें आहे व असें म्हटलें आहे कीं, 'अतिचमूशब्दो हूहूशब्दवदित्यर्वाचीनमतम् । भाष्य-कारमते तु नदीकार्यं स्यादिति ।')

**मनोरमा– "वर्षाभ्वश्च" ॥ वर्षाभूशब्दस्य नित्यस्त्रीत्वात् स्त्रीलिङ्गप्रकरण एव एतत्सूत्रं वक्तुं युक्तम् । पुल्लिङ्गे तु**

क्रियाशब्दाभिप्रायेण कथं विद्योजयमिति व्याचख्युः, तद्भ्रमसात् । दर्दुरे हि पुल्लिङ्गोऽयम्–

भेके मण्डूकवर्षाभूशालूरप्लवदर्दुराः ।

इत्यमरोक्तेः । भिन्नलिङ्गानां न द्वन्द्व इति तेन परिभाषितत्वात् ।

भेक्यां पुनर्नवायां स्त्री वर्षाभूर्दर्दुरे पुमान् ॥

इति यादवकोशाच्च । दर्दुरे पणीति पाठान्तरम् । पणीति-पुल्लिङ्गस्य प्राचां संज्ञा । दृभतीति । दृभी ग्रन्थे तुदादिः । व्युत्पादित इति । यद्यप्युज्ज्वलदत्तेन दृम्फूरिति पवर्गद्वितीयं पठित्वा दृम्फेर्नलोपाभावो निपात्यते इति व्याख्यातं तथाऽपि वृत्त्यन्तरेषु दृभी ग्रन्थे इत्यस्मात् कूप्रत्यये नुमागमो निपात्यत इत्युक्तम् । एतच्च माधवग्रन्थे स्पष्टम् । दशपादीवृत्तौ तु दर्भणं दृम्भूः । नुमागमोऽनुस्वारश्च निपात्यते इत्युक्तम् । अयमूकारो न धातोरित्युवङोऽप्रसङ्गात् "इको यणचि" इति यण् । स च "अमि पूर्वः" "प्रथमयोः पूर्वसवर्णः" इत्याभ्यां बाध्यत इत्याशयेनोदाहरति-दृम्भूमित्यादि । न चेह 'दृम्फर' इति यण् शङ्क्यः । तत्र अर्थवत एव ग्रहणात् । अस्य तु दृन्शब्दस्य भूशब्दस्य च अनर्थकत्वादिति भावः । एवं चायं हूहूवदिति फलितम् । श्रीपतिमतेनाह–दृन्निति । माधवस्तु – 'अन्वूदृम्भू' इत्यादिसूत्रेण दृढशब्दे उपपदे कूप्रत्ययः । उपपदस्य दृभादेशश्च निपात्यत इत्याह । दृम्भूरिति तरुः सर्पजातिभेद इति केचित् । कपिरित्यन्ये ।

'वर्षाभ्वश्च' सू. २८२ या सूत्रात निर्दिष्ट असलेला 'वर्षाभू' हा शब्द नित्यस्त्रीलिङ्गी असल्यामुळें हे सूत्र प्रक्रियाकौमुदीकारानी वास्तविक स्त्रीलिङ्गप्रकरणात पठित करावयास पाहिजे होते, तथापि तो शब्द क्रियाशब्द–यौगिक शब्द–मानून, म्हणजे 'वर्षासु भवति यः स वर्षाभूः' असा यौगिक शब्द मानून, प्रकृत सूत्र पुल्लिङ्गप्रकरणांत पठित केले आहे. अशा रीतीनें कसे तरी समाधान करावे असे जें प्रकाशकारानी म्हटले आहे ते विचार न करिता म्हटले आहे, म्हणजे

तें म्हणणें चूक आहे. दर्दुर—बेडुक—या अर्थाचा वाचक 'वर्षाभू' हा शब्द पुल्लिङ्गी आहे; कारण 'भेके मण्डूकवर्षाभूशालूरप्लवदर्दुरा:' असें अमरकोशांत म्हटलें आहे, व ज्या शब्दांचीं लिङ्गें भिन्न आहेत त्यांचा द्वन्द्वसमास केला जाणार नाहीं अशी त्या कोशाच्या प्रारंभीं परिभाषा—प्रतिज्ञा—केली आहे. ('भेदाख्यानाय न द्वन्दो नैकशेषो न सङ्कर: । कृतोऽत्र भिन्नलिङ्गानामनुक्तानां क्रमादृते ।।' ही ती परिभाषा—प्रतिज्ञा—होय.) 'भेक्यां पुनर्नवायां स्त्री वर्षाभूर्दर्दुरे पुमान्' या यादवकोशांतील श्लोकांत देखील 'वर्षाभू' हा शब्द 'दर्दुर' या अर्थामध्यें पुल्लिङ्गी आहे असें म्हटलें आहे. 'दर्दुरे पुमान्' या ऐवजीं 'दर्दुरे षणि' असें पाठान्तर आढळतें. 'षण्' ही प्राचीन वैयाकरणांची पुल्लिङ्गाची संज्ञा आहे. 'दृभतीति दृम्भू:' हा (ऊदन्त प्रकरणांत कौमुदींत दिलेला) शब्द 'दृभी ग्रन्थे' या तुदादिगणांत पठित असलेल्या धातूहून 'अन्दूदृम्भू' उणादि सू. ९३ या उणादि सूत्रानें 'कू' प्रत्यय करून व निपातनानें नुमागम करून साधला आहे. ('दृभी' धातु नं. १३२३ हा धातु इदित नसून ईदित् असल्यामुळें 'इदितो नुम्धातो:' सू. २२६२ या सूत्रानें होणाऱ्या नुमागाची त्याला प्राप्ति नाहीं. तथापि निपातनानें नुमागम करून व 'नश्चापदान्तस्य झलि' सू. १२३ या सूत्रानें त्या 'नुम् = न्' चा अनुस्वार करून आणि 'अनुस्वारस्य ययि परसवर्ण:' सू. १२४ या सूत्रानें त्या अनुस्वाराचा परसवर्ण मकार करून 'दृम्भू' हा शब्द साधला आहे.) जरी उज्ज्वलदत्तानें 'दम्फू' असा पवर्गद्वितीययुक्त, म्हणजे पकारयुक्त, शब्द पठित केला आहे व (त्यानें तो शब्द 'दृम्फ् उत्क्लेशे' तुदादि धातु नं. १३१४ या धातूहून साधला आहे व) असें म्हटलें आहे कीं, या स्थलीं निपातनानें नकारलोप झाला नाहीं तरी, इतर वृत्तिग्रन्थांत 'दृभी ग्रन्थे' या धातूहून औणादिक 'कू = ऊ' प्रत्यय होऊन 'दृम्भू', हा शब्द सिद्ध झाला असून या स्थलीं निपातनानें नुमागम झाला आहे असें म्हटलें आहे व हें माधवाच्या ग्रन्थावरून स्पष्ट होतें. (उज्ज्वलदत्तानें

'दृम्फ्' धातूहून 'कू' हा औणादिक कित् प्रत्यय केला असल्यामुळें व तो धातु इदित् नसल्यामुळे, 'अनिदितां हल उपधाया' सू ४१५ या सूत्रान्वयें त्या धातूतील नकाराचा लोप पावला आहे पण निपातनानें नकारलोप झाला नाही असे त्याचें म्हणणे आहे. परतु इतर धातु वृत्तिग्रन्थात 'दृभी ग्रन्थे' या धातूहूनच 'कू' प्रत्यय होऊन व निपातनानें नुमागम होऊन 'दृम्भू' हा शब्द सिद्ध झाला आहे असे म्हटले आहे म्हणून या शब्दाची उज्वलदत्तानें जी व्युत्पत्ति दिली आहे ती बरोबर नसून प्रकृत सूत्रावरील कौमुदीत त्या शब्दाची जी व्युत्पत्ति दिली आहे तीच बरोबर आहे असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे आणि आपल्या म्हणण्याच्या समर्थनार्थ ते माधवाच्या ग्रन्थाचा आधार देतात माधवानें आपल्या धातुवृत्तीत 'भू' धातूचे व्याख्यान करिताना 'दृन्भू तव । सर्पजातिभेद इति पुरुषकारे । अन्धूदृम्भूजम्भूकफेलूकर्कन्धूदिधिषू इति दृढशब्द उपपद कूप्रत्ययान्तो निपातित । उपपदस्य च दृन्भावोऽस्मादेव निपातनात् । केचिदुपपद नान्त पठन्ति । अजादावस्य वनिति वर्षाभूप्रस्तावेऽवोचाम । क्वचिदुणादिवृत्तौ दृभी ग्रन्थ इत्यस्मात्कूप्रत्यये निपातनमित्युक्तम । तत्राप्ययमूकारो न धातोरित्युवङोऽप्रसङ्गाद्यणेवेति न रूपभेद ।' या वरील उताऱ्यावरुन देखील दीक्षिताचेच म्हणण, म्हणजे 'दृभी ग्रन्थे' या धातूहूनच औणादिक 'कू' प्रत्यय होऊन व निपातनानें नुमागम होऊन 'दृम्भू' असा शब्द सिद्ध झाला आहे हेंच म्हणणे, योग्य ठरते येथें हे सागणे आवश्यक आहे की, मनोरमेच्या कित्येक छापील प्रतीत 'डूप्रत्यये' असा जो पाठ आढळतो तो चूक असून 'कूप्रत्यये' असा पाठ मानणे योग्य आहे, कारण 'दृम् धातूहून 'डू' प्रत्यय केल्यास तो प्रत्यय डित् असल्यामुळे, 'अभस्यापि टेर्लोपो डिति' या वचनान्वयें त्या धातूतील 'टि' चा म्हणजे 'ऋम्' चा लोप होण्याची आपत्ति येत जरी येथें निपातनानें नुमागम होणे सागितले आहे तरी, त्याच्या सामर्थ्यानें टिलोप टाळता येणे शक्य नाहीं. म्हणून ही आपत्ति टाळण्या-

करितां 'क्' प्रत्ययच मानणें योग्य आहे व माधवाच्या धातुवृत्तींतील उतारा जो वर दिला आहे त्यावरून देखील 'क्' प्रत्यय होणें सांगितलें आहे हेंच स्पष्ट होतें. हें खरें कीं, तो प्रत्यय कित् असल्यामुळें 'अनिदितां हल उपधायाः' सू. ४१५ या सूत्रानें नकारलोप पावतो. पण निपातनानें नुमागम होत असल्यामुळें त्या निपातनसामर्थ्यानें नकारलोप होत नाहीं. कदाचित् नलोपाची ही आपत्ति टाळण्याकरितांच मनोरमेच्या एका प्रतींत 'ऊप्रत्यये' असा पाठ दिला आहे. पण तो पाठ माधवाच्या धातुवृत्तींत जें म्हटलें आहे व ज्याचा दीक्षितांनीं आधार दिला आहे त्याविरुद्ध असल्यामुळें, तो पाठ स्वीकारला नाहीं.) दशपादीवृत्तींत 'दर्भणं दृम्भूः नुमागमोऽनुस्वारश्च, निपात्यते' असें म्हटलें आहे (तो ग्रन्थ येथें उपलब्ध नसल्यामुळें त्या ग्रन्थांत 'दृभ्' धातूहून कोणता प्रत्यय होणें सांगितलें आहे हें सांगतां येत नाहीं.) 'दृम्भू' या शब्दांत जो अन्त्य ऊकार आहे तो धातूचा अवयव नसल्यामुळें (व तो औणादिक प्रत्ययाचा ऊकार असल्यामुळें, त्या शब्दापुढें अजादि विभक्तिप्रत्यय आला असतां 'अचि श्नु' सू. २७१ या सूत्रानें होणाऱ्या) उवङादेशाची प्राप्ति होत नाहीं व 'इको यणचि' सू. ४७ या सूत्रानें येथें यणादेशाची प्राप्ति आहे. ('ओः सुपि' सू. २८१ या सूत्रानें या स्थलीं यणादेश होऊं शकत नाहीं; कारण त्या सूत्रांत देखील धातूचा अवयव जो उवर्ण त्यालाच यणादेश होणें सांगितलें आहे आणि तो यणादेश देखील तेव्हांच होऊं शकतो कीं, जेव्हां त्या उवर्णापूर्वी धात्ववयवसंयोग नाहीं. 'दृम्भू' या स्थलीं जो अन्त्य ऊकार आहे तो धातूचा अवयव नाहीं व त्याच्यापूर्वी धात्ववयवसंयोगहि आहे. म्हणून येथें 'ओः सुपि' या सूत्रानें यणादेश होऊं शकत नाहीं व 'इको यणचि' या सूत्रानेंच यणादेशाची प्राप्ति आहे.) परंतु 'अमि पूर्वः' सू. १९४ व 'प्रथमयोः पूर्वसवर्णः' सू. १६४ या परसूत्रांनीं 'इको यणचि' या पर्वसूत्राचा बाध होऊन 'दृम्भू अम्' या स्थलीं यणादेश न होतां पूर्वरूप एकादेश होतो व हा आशय मनांत धरूनच 'दृम्भू' शब्दाची

'दृम्भूम्' इत्यादि रूपे कौमुदीत दिली आहेत 'दृम्भू अम्' या स्थली 'दृन्करपुनःपूर्वस्य भुवो यण् वक्तव्य'–सू २८२ वरील वार्तिकऱ्या वार्तिकानें यणादेश होऊ शकतो अशी शंका मनात आणू नये, कारण त्या वार्तिकात अर्थवान् शब्दाचेच ग्रहण केले आहे परंतु 'दृम्भू' या शब्दात 'दृन्' व 'भू' हे दोन्ही शब्द अनर्थक आहेत ('दृम्भू' हा संपूर्ण शब्द अर्थवान् आहे पण या शब्दांतील 'दृन्' हा अवयव असून स्वतंत्र अव्ययरूप 'दृन्' शब्द नसल्यामुळें अनर्थक आहे आणि तसेच त्यातील 'भू' हा अवयव 'दृम्भू' धातूचा भकार व ओणादिक 'ऊ' प्रत्यय मिळून झाला आहे आणि म्हणून तो देखील अनर्थक आहे व 'अर्थवद्ग्रहणे नानर्थकस्य'–परि १४–ही परिभाषा असल्यामुळें, वरील वार्तिकातील अर्थवान् 'दृन्' व 'भू' या शब्दानी 'दृम्भू' यातील अनर्थक 'दृन' व 'भू' याचे ग्रहण करता येत नाही 'दृन्' हे नकारान्त हिंसाथक अव्यय उपपद असता, 'भू' धातूहून क्विप् प्रत्यय केल्यानें 'दृन्भू' असा जो शब्द सिद्ध होतो त्यातील 'दृन्' व 'भू' हे शब्द अर्थवान आहेत व तसा 'दृन्भू' शब्दापुढें 'अम्' हा अजादि विभक्तिप्रत्यय आला असता वरील वार्तिकान्वयें यणादेश होऊन 'दृन्भ्वम्' असें रूप सिद्ध होते ) सारांश 'दृम्भू' हा शब्द 'हूहू' शब्दासारखाच चालतो हें फलित–सिद्ध–होतें 'दृन् इति नान्तो हिंसार्थेऽव्यये भुव क्विप्। दृन्भू।' असे जें 'वर्षाभ्वश्च' या प्रकृत सूत्रावरील कौमुदीत म्हटले आहे तें श्रीपतीच्या मतानुसार म्हटले आहे परंतु माधवाचे असे म्हणणे आहे की, 'दृढ' हा शब्द उपपद असता 'भू' धातूहून 'अन्दूदृम्भू' उ सू ९३ या सूत्रानें 'कू' प्रत्यय झाला आहे व 'दृढ' या उपपदाचे जागी निपातनानें 'दृन्' आदेश झाला आहे (माधवाच्या धातुवृत्तीतून वर जो उतारा दिला आहे त्यावरून हें स्पष्ट होतें ) 'दृन्भू' हा शब्द 'वृक्ष' या अर्थाचा वाचक आहे क्षिरस्वामीच्या मतें तो सर्पजातिविशेषाचा वाचक आहे. इतरांच्या मतें तो वपि – वारर – या अर्थाचा वाचक आहे

मनोरमा– दृन्करेति । अत्र दृन्निति नान्तपाठो मुख्यः । मान्तपाठोऽपि केषांचित् । वक्तव्य इति । "वर्षाभ्वश्च" इति चकारोऽनुक्तसमुच्चयार्थः । अनुक्तं च भाष्यवार्तिकबलान्निर्णेयमिति भावः । तथा च वर्षाभूपुनर्भ्वश्चेति वार्तिकं व्याख्याय भाष्यकार आह–अल्पमिदमुच्यते, वर्षादृन्कारपुनःपूर्वस्य भुव इति वक्तव्यमिति । वामनेन तु दृन्शब्दो न पठित एव । एवं स्थिते यत्प्राचा दृक्कारेति पठितं, यच्च तत्पौत्रेण महाभाष्यकारवचनमर्थतोऽनुवदति इत्युक्तम् । यच्चान्यैर्वार्तिकेन पुरितमर्थमुदाहरतोत्यवतारितं, तत्सर्वं रभसकृतमेव । न च भाष्येऽपि दृगित्येव पाठ इति भ्रमितव्यम् । अन्दूदृन्भू इति निपातित इति माधवग्रन्थेन, कैयटादिग्रन्थैश्च विरोधापत्तेरिति यत्किंचिदेतत् । दीर्घपाठे इति । अयं च भाष्यवृत्त्यादिबहुग्रन्थसंमतः पाठः । अनुभूतौ तु ह्रस्वः पठ्यते । यत्तु तद्विवृतावुक्तम् । एकदेशविकृतस्यानन्यत्वात् कारपूर्वस्यापि सिद्धमिति । तन्न । तथाप्यण्प्रत्ययविशिष्टस्यान्यत्वात् । न ह्यण्प्रत्ययोऽपि विकारः । तस्माद्ह्रस्वपाठे कारपूर्वकस्य उवङेव । तथा दीर्घपाठे करपूर्वस्य उवङिति विवेकः । स्वयम्भूशब्दवदिति । प्राचा तु दृग्भूकाराभूशब्दौ वर्षाभूशब्दवदुदाहृतौ । तन्निर्मूलत्वादुपेक्ष्यमिति भावः ।। इत्यूदन्ताः ।।

'दृन्कर' या वार्तिकांत 'दृन्' असा नकारान्त पाठ प्रधान मानला आहे. कित्येकांच्या मतें त्या वार्तिकांत 'दृम्' असा मकारान्त पाठ देखील आहे. 'वर्षाभ्वश्च' या सूत्रांतील 'च' या पदानें त्या सूत्रांत निर्दिष्ट नसलेल्या शब्दांचें देखील ग्रहण व्हावें याकरितां तो 'च' शब्द त्या सूत्रांत घातला आहे. त्या सूत्रांत निर्दिष्ट नसलेल्या कोणत्या शब्दांचें ग्रहण व्हावें याचा भाष्यावरून व वार्तिकांवरून निर्णय केला पाहिजे. प्रकृत सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं 'वर्षाभूपुनर्भ्वश्च' या वार्तिकाचें व्याख्यान करून पुढें असें म्हटलें आहे कीं, 'अल्पमिदमुच्यते, वर्षादृन्कारपुनःपूर्वस्यभुव इति वक्तव्यमिति', म्हणजे प्रकृत सूत्रांत 'पुनर्भू' हा शब्द देखील पठित करावा असें जें

वार्तिककारानें म्हटले आहे तें फारच कमी म्हटले असून 'भू' शब्दापूर्वी 'वर्षा, दृन्, कार, पुनः' यापैकी कोणतेहि उपपद असता 'भू' यातील अन्त्य ऊकाराचे जागी अजादि विभक्तिप्रत्यय पुढें आल्यास यणादेश व्हावा असे म्हटले पाहिजे. वामनानें काशिकेंत प्रकृत सूत्रावर जें वार्तिक पठित केले आहे त्यात 'दृन्' या शब्दाचा पाठ मुळीच केला नाही. अशी स्थिति असून देखील प्रक्रियाकौमुदी-कारांनी ('ओः सुपि' या सूत्रावरील वृत्तीत) 'दृक्कारपुनर्पूर्वस्येति वक्तव्यम्' असे जें वार्तिक पठित केले आहे व त्याच्या पौत्रानें – प्रसादकारांनी – हे वार्तिक महाभाष्यकाराच्या वचनाच्या अर्थाचा अनुवाद करणारे आहे असें जें म्हटले आहे आणि त्याच-प्रमाणे त्या वार्तिकात ज्या शब्दाचा निर्देश केला आहे त्याच्या अर्थाचे वाचक शब्द प्रक्रियाकौमुदीकारांनी उदाहृत केले आहेत असें जें इतरांनी – प्रकाशकारांनी – म्हटले आहे ते सर्व त्या तिघांनीहि विचार न करिता म्हटले आहे, म्हणजे चूक आहे. (*प्रसादकारांनी आपल्या टीकेत 'महाभाष्यकारवचनमर्थतोनूद्य तद्वचनबलादत्र यण् भवतीत्याह।...... दृग्भूशब्दस्य यण् न स्यात् काशिकादावदृष्ट-त्वादिति शंका न कार्या, साक्षाद्भाष्ये उक्तत्वादिति।'* असे म्हटले आहे. वास्तविक प्रकृत सूत्रावरील भाष्यात भाष्यकारांनी जें वार्तिक पठित केले आहे त्यात 'दृक्' हा शब्द पठित केला नसून 'दृन्' हा शब्द पठित केला आहे म्हणून प्रक्रियाकौमुदी-कारादिकांचे म्हणणे चूक ठरते हें उघड आहे.) भाष्यांत देखील 'दृक्' असाच पाठ आहे असा चुकीचा ग्रह करून घेऊं नये. *'अन्दूदृन्भू इति निपातितः.' असे जें माधवाच्या धातु-वृत्तीत म्हटले आहे त्याशी व तसेच कैयटादिकांच्या ग्रन्थाशी, 'दृक्' असा पाठ मानल्यानें, विरोध येण्याची आपत्ति येते* आणि म्हणून तो पाठ चूक आहे असेंच मानले पाहिजे वरील वार्तिकांत 'कार' असा जो दीर्घ पाठ आढळतो तो भाष्यकार, काशिकाकार इत्यादि अनेक ग्रन्थकारांना सम्मत असलेला पाठ आहे. परंतु अनुस्मृति-

नामक ग्रन्थांत 'कर' असा ऱ्हस्व शब्द त्या वार्तिकांत पठित केला आहे. त्या ग्रन्थावरील टीकेंत, एकदेशविकृत 'कार' शब्द 'कर' शब्दच आहे असें मानतां येत असल्यामुळें 'कार'शब्दपूर्वक 'भू' धातूहून देखील यणादेशच होतो, म्हणजे 'कारभू' शब्दापुढें देखील अजादि विभक्तिप्रत्यय आल्यास त्यांतील अन्त्य ऊकाराचे जागीं यणादेश होतो, असें जें म्हटलें आहे तें म्हणणें बरोबर नाहीं; कारण अण्प्रत्ययविशिष्ट, म्हणजे अण् प्रत्यय करून सिद्ध झालेला, 'कार' शब्द 'कर' शब्दाहून भिन्न आहे. 'अण्' प्रत्यय देखील विकार आहे हें म्हणणें बरोबर नाहीं. (सारांश 'कार' व 'कर' हे भिन्नप्रत्ययान्त स्वतंत्र शब्द असल्यामुळें, 'कार' हा शब्द 'एकदेशविकृतमनन्यवत्'–परि. ३७–या परिभाषान्वयें 'कर' शब्दच आहे असें मानतां येऊं शकत नाहीं.) म्हणून वरील वार्तिकांत 'कर' असा ऱ्हस्व पाठ मानल्यास, 'कार'पूर्वक 'भू' धातूंतील ऊकाराचे जागीं (वरील वार्तिक लागू पडत नसल्यामुळें यणादेश न होतां, 'अचि श्नु' सू. २७१ या सूत्रानें होणारा) 'उवङ्' आदेशच होतो. परंतु वरील वार्तिकांत 'कार' असा दीर्घ पाठ मानल्यास, 'कर'पूर्वक 'भू' धातूंतील ऊकाराचे जागीं (यणादेश न होतां, 'अचि श्नु' या सूत्रानें होणारा) 'उवङ्' आदेश होतो आणि अशा रीतीनें दोन भिन्न पाठ मानल्यानें रूपांत फरक पडतो हें लक्षांत ठेवावें. 'दृम्भूकाराभूशब्दौ स्वयम्भूवत्' असें प्रकृत सूत्रावरील कौमुदींत म्हटलें आहे. पण प्रक्रियाकौमुदी-कारांनीं 'दृभू, काराभू' हे शब्द 'वर्षाभू' शब्दासारखे चालतात असें म्हटलें आहे. परंतु या त्यांच्या म्हणण्याला कांहीं आधार नसल्यामुळें त्यांचें म्हणणें उपेक्षणीय ठरतें, म्हणजे बरोबर मानतां येत नाही (कारण 'दृक्' व 'कारा' हे शब्द वरील वार्तिकांत पठित नसल्यामुळें, 'दृम्भू, काराभू' या शब्दांना तें वार्तिक लागू पडत नाहीं व त्या शब्दांपुढें अजादि विभक्तिप्रत्यय आल्यास यणादेश न होतां 'उवङ्' आदेशच होतो.) येथें ऊदन्त प्रकरण संपलें.

शब्दरत्न–दशपादीति । अत्राहविबीजं तु नुम्निपातनं व्यर्थम् । न च परसवर्णाभावार्थमुभयनिपातनम् । नुम्येव निपात्येऽनुस्वार-निपातनसामर्थ्येनैव तदभावसिद्धेरिति । एव चायमूकारो न धातोरि-युवङोऽप्रसङ्गाद्यणा भाव्यमिति दृन्पूर्वकभूप्रकृतिकदृन्भूशब्देन सह न रूपविशेष इति माधवश्चिन्त्य. । निपात्यत इति । एकादेशस्य पूर्वान्तत्वेन भूत्वमिति भावः । वार्त्तिकमिति । एतेन भाष्ये पूर्वग्रहणं व्यवहितेऽपि प्रवृत्त्यर्थमिति वर्षाभ्वोद्भूरित्यादावपि यणिति परास्तम् । सूत्रवार्तिकानुरोधेन पूर्वग्रहणस्य परिभाषाप्राप्तार्थानुवादत्वौचित्यात् । उपेक्ष्यमिति । काराभूरित्यत्र काराशब्दः करोतेर्ण्यन्ताद्भिदादयङि निष्पन्नो बन्धनगृहवाचकस्तस्य टापा सहैकादेशस्य पूर्वान्तत्वेऽपि वार्तिके ग्रहण न, प्रसिद्धत्वेन ह्रस्वपाठैकवाक्यतया च हस्तवाचकस्यैव ग्रहणा-दिति भावः ॥

'दशपादीवृत्तौ तु' या मनोरमेंतील वचनांत 'तु' हा जो अरुचिप्रदर्शक शब्द घातला आहे त्याचें कारण हे की, 'दृभू' या स्थली निपातनानें नुमागम करणे व्यर्थ आहे. अनुस्वाराचा परसवर्ण न व्हावा याकरिता नुमागम व अनुस्वार हे दोन्ही निपातनानें होण्याचें विधान केले आहे हे म्हणणे बरोबर नाही, कारण नुमा-गमाच्या निपातनाचेंच विधान न करिता त्या ऐवजी केवळ अनु-स्वाराच्या निपातनाचें विधान केल्यानें त्या विधानसामर्थ्यानेंच अनुस्वाराचा परसवर्ण झाला नसता (सारांश शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय हा आहे की, नुमागमनिपातनाचें विधान न करिता केवळ अनुस्वारनिपातनाचें विधान केले असते तरी, अनुस्वारनिपातन-सामर्थ्यामुळें, 'अनुस्वारस्य ययि परसवर्णः' सू १२४ या सूत्रानें होणारा अनुस्वाराचा परसवर्ण न होता ता अनुस्वार तसाच कायम राहू शकला असता ) मनोरमेंत सांगितल्याप्रमाणे 'दृम्भू' या शब्दांतील धातूच ऊकार धातूचा ऊकार नसल्यामुळें, त्याचे जागीं ('अचि श्नु' सू २७१ या सूत्रानें होणारा 'उवङ्' आदेश पावत नाहीं व त्यामुळें) यणादेशाची प्राप्ति होते. (पण 'भ्रम्' इत्यादि

प्रत्यय पुढें आले असतां यणादेश कां होत नाहीं याचें कारण मनोरमेंत दिलेंच आहे ) म्हणून 'दृन्' उपपदपूर्वक 'भू' शब्द व 'दृन्भू' शब्द या दोहोंचीं रूपें सारखींच होतात असें जें माधवानें म्हटलें आहे तें बरोबर नाहीं; (कारण 'दृन्' उपपदपूर्वक 'भू' शब्दाला वरील वार्तिक लागू पडत असून 'दृभ्' धातूहून औणादिक 'कू' प्रत्यय करून व निपातनानें नुमागम करून सिद्ध झालेल्या 'दृन्भू' शब्दाला तें वार्तिक लागू पडत नाहीं व त्या शब्दांतील अन्त्य ऊकार धातूचा अवयव नसून तो धात्ववयवसंयोगपूर्वकहि आहे. म्हणून 'एरनेकाचः' हें सूत्र त्या शब्दाला लागू पडत नसल्यामुळें, त्या दोन शब्दांचीं रूपें सारखीं न होतां भिन्न रूपें होतात व हें प्रकृत सूत्रावरील कौमुदींत व मनोरमेंत सांगितलेंच आहे.) 'उपपदस्य दृन्नादेशश्च निपात्यते' असें जें माधवानें म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, एकादेशाचे ठिकाणीं पूर्वान्तवद्भाव केल्यानें 'दृन्भू' हा शब्द भूधात्वन्त आहे असें मानतां येतें. ('दृढ' उपपदपूर्वक 'भू' धातूहून 'कू=ऊ' हा औणादिक प्रत्यय केला असतां, 'दृढ' चे जागीं 'दृन्' असा आदेश निपातनानें होतो असें माधवानें म्हटलें आहे. 'भू' धातूहून 'कू = ऊ' प्रत्यय केल्यास 'भू+ऊ = भू' असें जें 'अकः सवर्णे दीर्घः' सू. ८५ या सूत्रानें सवर्णदीर्घ होऊन रूप होतें त्यांतील 'ऊ' हा एकादेश 'भू' धातूचा अन्तावयवच आहे असें पूर्वान्तवद्भावानें मानतां येत असल्यामुळें, 'दृन्भू' हा शब्द भूधात्वन्त आहे असें मानतां येऊं शकतें व त्यामुळें त्या शब्दाला 'दृन्कर' हें वरील वार्तिक लागू पडतें असा माधवाच्या म्हणण्याचा आशय आहे.) भाष्यवचनांत 'पूर्व' या शब्दाचें ग्रहण अशाकरितां केलें आहे कीं, त्या भाष्यवचनांत पठित असलेले शब्द व 'भू' शब्द या दोन शब्दांमध्यें व्यवधान असलें तरी तें वचन प्रवृत्त व्हावें आणि त्यामुळें 'वर्षाभ्वः' इत्यादि स्थलीं देखील यणादेश होतो, असें जे कोणी म्हणतात तें त्यांचें म्हणणें, मनोरमेंत 'वार्तिकं व्याख्याय' इत्यादि जें विवेचन केलें आहे त्या विवेचनान्वयें, चूक ठरतें. प्रकृत

सूत्र व त्यावर पठित केलेले वार्तिक याच्याकडे लक्ष दिले असता, त्याच्या अनुरोधानें, भाष्यवचनात जें 'पूर्व' शब्दाचे ग्रहण केले आहे ते ('तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य' या) परिभाषेंतील 'पूर्व' शब्दाचा जो अर्थ होतो त्या अर्थाचेच, म्हणजे 'अव्यवहितपूर्वस्य' या अर्थाचेच, अनुवादक–वाचक–आहे हे मानणे उचित आहे (प्रकृत सूत्रावर 'वर्षाभ्वश्च पुनर्भ्वश्च' असे जें भाष्यात वचन पठित केले आहे तें शब्दरत्नकारानी वार्तिक मानले असून 'वर्षादि-कारपुन पूर्वस्य भुव' हे त्या भाष्यात पठित केलेले वचन वार्तिक न मानता भाष्य-काराची इष्टि, म्हणजे भाष्यकारवचन, मानली आहे असे वरील पंक्तीवरून दिसून येते शब्दकाराची शंका अशी आहे की, 'वर्षादृन्कारपुनर्भ्यो भुव' असे वचन पठित न करिता त्यात 'पूर्वस्य' हा अधिक शब्द घालून 'वर्षादृन्कारपुन पूर्वस्य भुव' असे वचन भाष्यकारानी पठित केले असल्यामुळें त्यावरून असे म्हणता येते की, त्या वचनात जें 'पूर्व' शब्दाचे ग्रहण केले आहे ते अशाकरिता की, केवळ अव्यवहितपूर्वाचे ग्रहण न होता व्यवहित-पूर्वाचे देखील ग्रहण व्हावे त्यामुळें 'वर्षोद्भू' या उदाहरणात जरी 'भू' शब्दाच्या लगेच पूर्वी 'वर्षा' हा शब्द नसून दोहोंमध्यें 'उत्' या शब्दाचें व्यवधान आहे तरी, त्या शब्दाला भाष्यवचन लागू पडते आणि तो शब्द देखील 'वर्षाभू' शब्दासारखाच चाल-विता येतो या शंकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, ही शंका बरोबर नाही, कारण प्रकृत सूत्रात 'वर्षाभू' हा जो शब्द पठित आहे व वार्तिकात 'पुनर्भू' या ज्या अधिक शब्दाचे ग्रहण केले आहे त्या दोन्ही शब्दात 'भू' शब्दाच्या लगेच पूर्वी 'वर्षा' व 'पुनर्' हे शब्द असल्यामुळें, भाष्यवचनात जे उपपदें पठित आहेत तीं देखील 'भू' शब्दाच्या लगेच पूर्वी असली पाहिजेत असेच प्रकृत सूत्राच्या व वार्तिकाच्या अनुरोधानें मानणे योग्य आहे व भाष्य-वचनातील 'पूर्वस्य' या शब्दाचा 'तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य' या परिभाषेंतील 'पूर्वस्य' या पदाचा 'अव्यवहितपूर्वस्य' असा जो

अर्थ आहे तोच अर्थ आहे हें मानणें उचित आहे असा शब्दरत्न-कारांच्या म्हणण्याचा आशय आहे.) 'तन्निर्मूलत्वादुपेक्ष्यम्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, 'काराभू' यांतील 'कारा' हा शब्द, 'कृ' धातूहून 'णिच्' प्रत्यय केला असतां व त्या णिजन्ताहून 'षिद्भिदादिभ्योऽङ्' सू. ३२८१ या सूत्रानें 'अङ्' प्रत्यय केला असतां 'कार' असा जो 'कारागृह' या अर्थाचा वाचक शब्द सिद्ध होतो त्याहून ('अजाद्यतष्टाप्' सू. ४५४ या सूत्रानें) 'टाप् = आ' प्रत्यय केल्यास, सिद्ध होतो. 'कार+आ = कारा' या स्थलीं ('अकः सवर्णे दीर्घः' सू. ८५ या सूत्रानें) जो सवर्णदीर्घरूप 'आ' असा एकादेश होतो, तो जरी पूर्वान्तवद्भावानें 'कार' या शब्दाचा अन्तावयव मानतां येतो तरी, वार्तिकांत 'कारा' या शब्दाचें ग्रहण केलें नाहीं. 'हस्त' या प्रसिद्ध अर्थाचा वाचक जो 'कर' हा ऱ्हस्व शब्द पठित आहे त्याचीच 'कार' या शब्दाची एकवाक्यता—जुळणी—होत असल्यामुळें, 'हस्त' या अर्थाच्याच वाचक 'कार' शब्दाचें वार्तिकांत ग्रहण केलें आहे हेंच मानणें योग्य आहे. (सारांश 'कारा' हा शब्द पूर्वान्तवद्भावानें 'कार'च असें जरी मानतां येतें तरी, वार्तिकांत 'कर' असा जो ऱ्हस्व पाठ मानला आहे तो 'हस्त' या अर्थाचा वाचक प्रसिद्ध असल्यामुळें, 'कार' हा दीर्घ पाठ देखील त्याच अर्थाचा वाचक आहे, म्हणजे 'करः एव कारः' अशा रीतीनें तो शब्द देखील 'हस्त' या अर्थाचाच वाचक आहे, हेंच मानणें उचित आहे व तसें मानलें असतांच, दोन्ही शब्दांची एकार्थत्वामुळें एकवाक्यता होते. म्हणून 'कारा' हा शब्द कारा-गृहाचा वाचक असून 'कार' हा शब्द 'हस्त' या अर्थाचा वाचक असल्यामुळें व अशा रीतीनें या दोन शब्दांच्या अर्थामध्यें अत्यन्त वैलक्षण्य असल्यामुळें, भाष्यवचनांतील 'कार' या शब्दानें 'कारा' या शब्दाचें ग्रहण करतां येत नाहीं व त्यामुळें 'काराभू' हा शब्द 'वर्षाभू' या शब्दाप्रमाणें चालवितां

येत नाही असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे असे शब्द-रत्नकार म्हणतात.)

मनोरमा- " नृ च " । इह 'छन्दस्युभयथा " इति सूत्रात् 'उभयथा' इत्यनुवर्तते । 'छन्दसि' इति तु निवृत्तम् । तेन 'चिन्ताजर्जरचेतसां बत नृणां का नाम शान्तेः कथा' 'नृणामेको गम्यस्त्वमसि' इत्यादिप्रयोगाः सङ्गच्छन्ते । केचित् 'छन्दसि' इत्यनुवर्तयन्ति । तदयुक्तम् । पूर्वसूत्रेणैव सिद्धे 'नृ च' इति सूत्रस्य वैयर्थ्यापत्तेः । यदपि पूर्वसूत्रे 'तिसृचतसृ' इत्यनुवर्तयन्ति । तदप्ययुक्तम् । अविशेषेण विकल्पदर्शनात् तथा च धाता, धातृणामिति मन्त्रे तैत्तिरीयैर्ह्रस्वः पठ्यते । बहृवृचैस्तु दीर्घ इति दिक् ।। इत्यूचतः ।।

'नृ च' सू २८३ या सूत्रात 'छन्दस्युभयथा' या पूर्व सूत्रांतून 'उभयथा' हे पद अनुवृत्त होत असून 'छन्दसि' हे पद अनुवृत्त होत नाही. त्यामुळें 'चिन्ताजर्जरचेतसां बत नृणां का नाम शान्ते कथा, नृणामेको गम्यस्त्वमसि' इत्यादि श्लोकांतील 'नृणाम्' हा ऱ्हस्व पाठ सुसङ्गत-योग्य-ठरतो (प्रकृत सूत्रात 'छन्दसि' हे पद अनुवृत्त केले तर, जरी वेदात 'नृणाम्, नृणाम्' अशी पाक्षिक रूपें होतील तरी भाषेंत, 'नामि' सू २०९ हें सूत्र असल्यामुळें, 'नृणाम्' हे ऱ्हस्व रूप साधु ठरणार नाही.) कित्येक वैय्याकरण प्रकृत सूत्रात 'छन्दसि' या पदाची देखील अनुवृत्ति करतात, पण तसे करणें बरोबर नाही, कारण 'छन्दस्युभयथा' सू ३५४० या पूर्व सूत्रानेंच 'नृणाम्, नृणाम्' ही दोन्ही पाक्षिक रूपें वेदात सिद्ध होऊ शकत असल्यामुळें, 'छन्दसि' हें पद अनुवृत्त केल्यानें 'नृ च' हें प्रकृत सूत्र व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते. (सारांश वेदात जसा पूर्व सूत्रानें विकल्प सिद्ध होतो तसा भाषेंत देखील सिद्ध व्हावा याकरितां प्रकृत सूत्रांत 'छन्दसि' या पदाची अनुवृत्ति करणें अयोग्य आहे) इतर वैय्याकरण 'छन्दस्युभयथा' या पूर्व सूत्रांत (त्याच्या पूर्वी असलेल्या 'न तिसृचतसृ' या सूत्रांतून)

'तिसृचतसृ' या पदाची अनुवृत्ति करितात. पण तसें करणें देखील बरोबर नाहीं; कारण वेदांत अविशेषेंकरून विकल्प आढळतो; म्हणजे 'तिसृ, चतसृ' या शब्दांच्याच षष्ठीच्या बहुवचनांत विकल्प आढळतो असें नसून इतर शब्दांच्या षष्ठीच्या बहुवचनाच्या रूपांत देखील तो विकल्प आढळतो. उदाहरणार्थ तैत्तिरीय 'धातृणाम्' असा ह्रस्व पाठ करितात, परंतु बहृच 'धातॄणाम्' असा दीर्घ पाठ करितात. (म्हणून 'छन्दस्युभयथा' या सर्वत्र वेदांत लागू पडणाऱ्या पूर्वसूत्राचा संकोच करणारी तशी अनुवृत्ति त्या सूत्रांत करणें योग्य नाहीं.) येथें ऋदन्त प्रकरण संपलें.

मनोरमा- "ओतो णिदिति वाच्यमिति"। गोत इत्यपहाय ओत इति वाच्यमित्यर्थः। तथा च गामित्यत्र परत्वाद्वृद्धौ सत्या-मात्वं न स्यादित्याशङ्क्य निरवकाशतया आत्वेन वृद्धिर्बाध्यत इति "औतोऽम्शसोः" इति सूत्रे भाष्यकृतोक्तम्। कैयटोऽपि तत्रैत्य-माह-ओत इति सूत्रे पाठ्यम्। गोत इत्योकारोपलक्षणतया वा व्याख्येयमिति। वृत्त्यादिग्रन्थेष्वप्येवमेव स्थितम्। स्मृतौरिति। यत्त्वाहुः-गोशब्देन औणादिकेन सादृश्याद् द्योशब्द एव लक्ष्यते। न त्वोकारान्तमात्रम्। तेन स्मृतोः स्मृतवौ स्मृतव इत्येव भवतीति। तद्भाष्यविरुद्धम्। गोद्योभ्यामेव परस्य णित्त्वाभ्युपगमे हि 'औतोऽ-म्शसोः' इत्यात्वस्य स्मृतामित्यादिरवकाशः स्यात्। तथा च गामित्यत्र परत्वाद्वृद्धेर्दुर्वारतया उदाहृतभाष्योक्तमात्वस्य बाधकत्वं निरवकाशत्वं च न सङ्गच्छेतेति दिक्॥ इत्योदन्ताः॥

('औतोऽम्शसोः' सू. २८५ या सूत्रावरील कौमुदीत) 'ओतो णिदिति वाच्यम्' असें जें वचन दिलें आहे त्याचा अर्थ असा आहे कीं, 'गोतो णित्' सू. २८४ या पूर्व सूत्रांतील 'गोतः' हें पद काढून त्याच्या ऐवजीं 'ओतः' हें पद पठित करावें, म्हणजे 'ओतो णित्' असें तें सूत्र पठित करावें. 'गो अम्' या स्थलीं परत्वामुळें वृद्धि केल्यास आत्व होणार नाहीं अशी शंका प्रकृत

सूत्रावरील भाष्यात उपस्थित करून भाष्यकारानी त्या शंकेवर असे उत्तर दिले आहे की, निरवकाशत्वामुळें आत्वकार्य वृद्धीचे बाधक ठरते. ('गो अम्' या स्थली 'गो' शब्दापुढें 'अम्' हा सर्वनामस्थानप्रत्यय असल्यामुळें, 'गोतो णित्' या परसूत्रानें णिद्वत्कार्य–वृद्धिकार्य–पावले असून, प्रकृत पूर्व सूत्रानें आत्व पावले आहे व 'पूर्वात्पर बलवत्' हा न्याय असल्यामुळें, येथें प्रकृत पूर्व सूत्रानें आत्व न होता 'गोतो णित्' या परसूत्रानें वृद्धिकार्य झाले पाहिजे अशी शंकाकाराची शंका आहे. या शंकेवर भाष्यकार असे उत्तर देतात की, 'गो अम्' या स्थली जर 'गोतो णित्' हे सूत्र प्रवृत्त केले तर, 'अम्' या विभक्तिप्रत्ययाच्या विषयात प्रकृत सूत्र निरवकाश–व्यर्थ–ठरण्याची आपत्ति येते पण अशा रीतीनें ते सूत्र निरवकाश ठरत असल्यामुळें, त्याच्या निरवकाशत्वामुळेंच, 'येन नाप्राप्ते'–परि ५८–या न्यायान्वयें, ते 'सूत्र 'गोतोणित्' या सूत्राचे 'अम्' प्रत्ययाच्या विषयांत बाधक ठरते व त्यामुळें वृद्धिकार्य न होता आत्व होऊन 'गाम्' असे इष्ट रूप सिद्ध होतें प्रकृत सूत्रावरील भाष्यांत–६–१–९३–'अमि परत गोशब्दे वृद्ध्यभावस्य उपसङ्ख्यानं कर्तव्यम्' या अर्थाचे 'अम्युपसङ्ख्यानं वृद्धिबलीयस्त्वात्' हे वार्तिक पठित करून भाष्यकार म्हणतात–'अम्युपसङ्ख्यानं कर्तव्यम्। गां पश्य। किं पुनः कारणं न सिध्यति ?। वृद्धिबलीयस्त्वात्। परत्वात् वृद्धिः प्राप्नोति। न वाऽनवकाशत्वात्। न वा कर्तव्यम्। किं कारणम् ?। अनवकाशत्वात्। अनवकाशमात्वं वृद्धिं बाधिष्यते।') कैयटानें देखील त्या सूत्रावरील भाष्याच्या वृत्तीत 'गोतो णित्' या सूत्रातील 'गोतः' या पदाऐवजी 'ओतः' हे पद पठित करावें, अथवा त्या सूत्रातील 'गो' हा शब्द ओकारान्त शब्दाचे उपलक्षण आहे असे मानून, त्या सूत्राचे व्याख्यान करावें असे म्हटलें आहे. (कारण 'तपरस्तत्कालस्य' सू. १५ या सूत्रान्वयें वर्ण तपर केला जात असून वर्णसमुदाय तपर केला जात नसतो. परन्तु 'गोतो णित्' या सूत्रांत 'गो' हा शब्द तपर केला असल्यामुळें, आतिदिप्र 'गो'

यांतील 'ओ' हा अच् तपर केला आहे असें मानून, 'गो' हा शब्द ओकारान्त शब्दाचें उपलक्षण आहे असें समजावें असा कैयटाच्या म्हणण्याचा आशय आहे. त्या सूत्रावरील भाष्याच्या वृत्तींत 'ओतो णिदिति सूत्रं पठितव्यम्, गोत इत्योकारान्तोपलक्षणार्थं वा व्याख्येयम्। वर्णनिर्देशे हि तपरत्वं प्रसिद्धम्' असें कैयटानें म्हटलें आहे.) काशिका इत्यादि वृत्तिग्रन्थांत देखील असेंच म्हटलें आहे. (काशिकेंत 'केचिदोतो णिदिति पठन्ति। द्योशब्दादपि विद्यते तदर्थम्। द्यौः द्यावौ द्यावः। गोत इत्येव तपरकरणनिर्देशादोकारान्तोपलक्षणं द्रष्टव्यम्। वर्णनिर्देशेषु हि तपरकरणं प्रसिद्धम्।' असें म्हटलें आहे.) प्रकृत सूत्रावरील कौमुदींत 'स्मृतोः' असें रूप दिलें आहे. परंतु प्रकाशकारांचें असें म्हणणें आहे कीं, 'गो' शब्दानें औणादिक प्रत्ययाच्या सादृश्यामुळें 'द्यो' या शब्दाचेंच ग्रहण करतां येतें व कोणत्याहि ओकारान्त शब्दाचें ग्रहण करतां येत नाहीं. त्यामुळें 'स्मृतो' या ओकारान्त शब्दाचीं 'स्मृतोः स्मृतवौ स्मृतवः' अशींच रूपें होतात. पण हें त्यांचें म्हणणें भाष्यविरुद्ध आहे. 'गो, द्यो' या दोन शब्दांपुढेंच

शब्दाने कोणत्याहि ओकारान्त शब्दाचे ग्रहण होत नसून केवळ 'द्यो' या ओकारान्त शब्दाचे औणादिकप्रत्ययसादृश्यामुळें ग्रहण होते, कारण ज्याप्रमाणे 'गमेर्डो' उ सू २२५ या सूत्रानें 'गो' हा शब्द सिद्ध झाला आहे त्याचप्रमाणे 'द्यो' हा शब्द देखील 'द्युत्' धातूहून औणादिक 'डो' प्रत्यय होऊन सिद्ध झाला आहे आणि 'गमेर्डो.' या सूत्रावरील कौमुदीत 'बाहुलकात् द्युतेरपि डो.' असेच म्हटले आहे त्यामुळें 'स्मृतो' या ओकारान्त शब्दापुढें सर्वनामस्थान-प्रत्यय आला असता, 'गोतो णित्' या सूत्राने होणारे णिद्वत्कार्य — वृद्धिकार्य—होत नाही यावर दीक्षित असे म्हणतात की, प्रकाशकाराचे हे म्हणणे भाष्यविरुद्ध आहे; कारण भाष्यकारांनी प्रकृत सूत्रानें होणारें आत्वकार्य 'गोतो णित्' या सूत्रानें होणाऱ्या वृद्धिकार्याचे निरवकाशत्वा-मुळें बाधक ठरते असे म्हटले आहे परंतु 'गो, द्यो' या दोन शब्दा-पुढेंच सर्वनामस्थानप्रत्यय आला असता वृद्धिकार्य होते असे मानले तर, 'औतोऽम्शसो' हे प्रकृत सूत्र 'अम्' प्रत्ययाच्या अशामर्थ्यें 'स्मृतो अम् = स्मृताम्' इत्यादि ओकारान्त प्रातिपदिकाच्या विषयात सावकाश ठरेल व सावकाशत्वामुळें आत्वकार्य वृद्धिकार्याचे बाधक ठरणार नाही आणि त्यामुळें 'गो अम्' या स्थली 'गोतो णित्' या परसूत्राने पावलेलें वृद्धिकार्य टाळता येणार नाही आणि 'गावम्' असे अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येईल. साराश प्रकाशकाराचे म्हणणे भाष्यविरुद्ध ठरत असल्यामुळें स्वीकारार्ह नाही आणि 'स्मृतो' या शब्दाची कौमुदीत जी रूपें दिली आहेत तीच शुद्ध असून प्रकाशकारांनी त्या शब्दाची दिलेली रूपें अशुद्ध आहेत असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे ) येथें ओदन्त प्रकरण संपलें.

शब्दरत्न—इत्यपहायेति । एतदवयवगकारमपहायेत्यर्थः । इत्योकारोपलक्षणतयेति । तपरकरणेन ग्रस्याविवक्षितत्वलाभादिति भावः । निरवकाशत्व चेति । चो हेतौ । यतो निरवकाशत्वमतो बाधकत्वमित्युक्तं न सङ्गच्छेतेत्यर्थः ।

'गोत इत्यपहाय' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा 'एतदवयवगकारमपहाय', म्हणजे 'गो' शब्दांतील गकार हा अवयव गाळावा, असा अर्थ आहे. 'गोत इत्योकारोपलक्षणतया वा व्याख्येयम्' असें जें कैयटानें म्हटलें आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, 'गोतः' या स्थलीं तपरकरण केलें असल्यामुळें गकार विवक्षित नाहीं असें आपोआपच सिद्ध होतें. (याचें विवरण मनोरमेंत केलेंच आहे.) 'बाधकत्वं निरवकाशत्वं च न सङ्गच्छेत' या मनोरमेच्या पंक्तींतील 'च' हें पद 'हेतु' या अर्थाचें वाचक आहे आणि त्या पंक्तीचा 'यतो निरवकाशत्वमतो बाधकत्वमित्युक्तं न सङ्गच्छेत', म्हणजे आत्व निरवकाश असल्यामुळें वृद्धिकार्याचें बाधक ठरलें असें जें भाष्यांत म्हटलें आहे तें असङ्गत–चूक–ठरण्याची आपत्ति येते, असा अर्थ आहे. (निरवकाशत्वामुळेंच सूत्र बाधक ठरलें. म्हणून निरवकाशत्व हा बाधकत्वाचा हेतु ठरतो व हे दोन स्वतंत्र अनन्वित पदार्थ नाहींत.)

**मनोरमा–"रायो हलि"। 'अर्थरैविभवा अपि' इत्यमरात्पुंस्त्वम्। संराया भूयसासृजेत्यादिप्रयोगाच्च। 'रा यि छान्दस' इति भाष्यम्। तच्च यजन्तस्य रैशब्दस्य छान्दसत्वपरं न तु केवलस्यापीति 'वान्तोयि' इति सूत्रे कैयटः। केवलोऽपि च्छान्दस इति पक्षान्तरं स एवाह। इत्यदन्तः॥**

'रायो हलि' सू. २८६ या सूत्रांतील 'रै' हा शब्द 'अर्थरैविभवा अपि' या अमरोक्तिप्रमाणें पुल्लिङ्गी आहे. 'संराया भूयसा सृज' इत्यादि प्रयोगांवरून देखील 'रै' हा शब्द पुल्लिङ्गी आहे हें सिद्ध होतें. 'रा यि छान्दसः' असें भाष्यवचन आहे. ('वान्तो यि प्रत्यये' सू. ६–१–७९ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकार म्हणतात– 'एवमपि रायमिच्छति रैयति–अत्रापि प्राप्नोति। रायिश्छान्दसो, दृष्टानुविधिश्छन्दसि भवति।') तें भाष्यवचन यजन्त 'रै' शब्द छान्दस आहे व केवळ 'रै' शब्द छान्दस नाहीं या अर्थानें वाचक

आहे असे कैयटानें 'वान्तो यि प्रत्यये' सू. ६-१-७९ या सूत्रावरील भाष्याच्या वृत्तीत म्हटले आहे केवळ 'रै' शब्द देखील छान्दस आहे, म्हणजे 'रै' शब्दाचा प्रयोग भाषेंत होत नसून वेदातच होतो, असेंहि पक्षान्तर त्या वृत्तीत कैयटानेंच सांगितले आहे. (त्या वृत्तीत कैयटानें 'एतद्भाष्यवशाद् भाषाया रै शब्दोऽसाधुरिति लक्ष्यते। अथवा क्यच्परः रायि छान्दस इति व्याख्यायते।' असें म्हटले आहे.) येथें ऐदन्त प्रकरण संपले.

शब्दरत्न-अमरात्पुंस्त्वमिति । भिन्नलिङ्गानां न द्वन्द्व इति परिभाषणादिति भावः। भाष्यमिति । स्थानेऽन्तरतमसूत्रे इति भावः। क्यजन्तस्येति । राः = रैशब्दो यि = यकारादिप्रत्ययान्तःछान्दस इति भाष्याक्षरार्थः । यकारेण यकारादिः प्रत्ययो लक्ष्यते । इकार उच्चारणार्थः । प्रायेण विसर्गरहित एव पाठः । तदा यादौ प्रत्यय इत्यर्थ इति भावः । न त्विति । अत एव रायमिच्छतीति विग्रहप्रदर्शनपरभाष्यं सङ्गच्छते, न हि विग्रहश्छन्दः । अत एव रायि आशा राय्याशा इति "अचः परस्मिन्" इत्यत्र भाष्ये प्रयुक्तमिति भावः । पक्षान्तरमिति । अत्रारुचिबीजं स्पष्टमेव ॥

'अमरात्पुंस्त्वम्' असें जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचें कारण हे की, ज्या शब्दाची लिङ्गें भिन्न आहेत त्याचा द्वन्द्व केला जाणार नाही अशी परिभाषा अमरकारानी ग्रन्थारम्भी सांगितली आहे. (म्हणून 'अर्थरैविभवाः' या द्वन्द्वसमासातील 'अर्थ' व 'विभव' हे शब्द पुल्लिङ्गी असल्यामुळें 'रै' हा शब्द देखील पुल्लिङ्गी ठरतो.) 'रा यि छान्दस इति भाष्यम्' असें जें मनोरमेंत म्हटले आहे ते 'स्थानेऽन्तरतम.' सू १-१-५० या सूत्रावरील भाष्य होय ('वान्तो यि प्रत्यये' या सूत्रावरील भाष्यांत जें म्हटले आहे तेच या सूत्रावरील भाष्यात देखील म्हटले आहे.) 'रा यिश्छान्दस' या भाष्यवचनाचा अक्षरार्थ असा आहे कीं, 'रा.', म्हणजे 'रै' हा शब्द, 'यिः', म्हणजे यकारादिप्रत्ययान्त, 'छान्दसः', म्हणजे वेदांत आढळतो. 'यि'

यांतील यकारानें, यकार आहे आदि ज्याच्या असा प्रत्यय, लक्षणेनें बोधित होतो. भाष्यवचनांतील 'यि' यांतील इकार उच्चारणार्थ आहे. भाष्याच्या प्रतींत 'यि' असा विसर्गरहित पाठ प्रायः आढळतो. (शब्दरत्नकारांनीं 'यिः' असा विसर्गसहित पाठ मानून 'यिः' या पदाचा 'यकारादिप्रत्ययान्तः' असा वर अर्थ दिला आहे.) 'विसर्गरहित 'यि' असा पाठ मानल्यास ('यस्मिन्विधिस्तदादावल्ग्रहणे'–परि. ३३–या परिभाषान्वयें) 'यि' या पदाचा 'यादौ प्रत्यये परे' असा अर्थ होतो. 'न तु केवलस्यापि' असें कैयटानें म्हटलें असल्यामुळें 'रायमिच्छति रैयति' हें विग्रह दाखविणारें भाष्यांतील वाक्य सुसङ्गत ठरतें. (त्या लौकिकविग्रहवाक्यांत 'रै' शब्दाचें 'रायम्' असें द्वितीयेच्या एकवचनाचें रूप दिलें असल्यामुळें व तें विग्रहवाक्य वैदिकप्रयोग नसून लौकिकप्रयोग असल्यामुळें, त्यावरून हें स्पष्ट होतें कीं, 'रै' शब्दाचा भाषेंत प्रयोग होतो.) विग्रहवाक्य हें वेद नव्हे आणि म्हणूनच 'रायि आजा राय्याजा' असा प्रयोग 'अचः परस्मिन्' सू. १–१–५७ या सूत्रावरील भाष्यांत केला आहे. (त्या सूत्रावरील भाष्यांत

मनोरमा– 'ग्लौर्मृगाङ्क कलानिधि' इत्यमर. । एव जनानवतीति जनौ. । 'ज्वरत्वर' इत्यूठ् । 'एत्येधति' इति वृद्धि । जनावौ जनाव इत्यादि ॥

॥ इत्यजन्ताः पुंल्लिङ्गा ॥

( कौमुदीत 'रायो हलि' सू २८६ या सूत्रानंतर दिलेल्या ओदन्त प्रकरणात 'ग्लौ' हा जो औकारान्त शब्द दिला आहे त्या ) 'ग्लौ' शब्दाचा 'ग्लौर्मृगाङ्क कलानिधि' या अमरवचनान्वये 'चन्द्र' असा अर्थ आहे 'ग्लौ' या शब्दाप्रमाणेच 'जनानवतीति जनौ' हा औकारान्त शब्द चालतो 'जनौ' या स्ली 'ज्वरत्वर' सू २६५४ या सूत्रानें ( 'अव्' धातूतील अन्त्य वकार व उपधाभूत अकार या दाहोंचे जागी ) 'ऊठ्' आदेश झाला आहे 'एत्येधत्यूठ्सु' सू ७३ या सूत्रानें वृद्धि झाली आहे व 'जनावौ, जनाव' इत्यादि रूपें होतात ('जन अव क्विप्' या स्थली 'अव' चे जागी 'ऊठ् = ऊ' असा आदेश होऊन व 'क्विप् = व' या प्रत्ययाचा 'वेरपृक्तस्य' सू ३७५ या सूत्रानें लोप होऊन 'जन ऊ' अशी स्थिति झाली असता 'एत्येधत्यूठ्सु' या सूत्रानें वृद्धिरूप एकादश होऊन जनौ' असे औदन्त रूप होते व या प्रातिपदिकाहून 'औ, जस् = अस्' हे प्रत्यय केले असता, 'एचोऽयवायाव' सू ६१ या सूत्रानें 'जनौ' यातील 'औ' चे जागी 'आव्' आदेश होऊन 'जनावौ, जनाव' अशी रूपें सिद्ध होतात ) येथें अजन्त पुल्लिङ्ग प्रकरण सपले

॥ अजन्तपुल्लिङ्गप्रकरण समाप्तम् ।

# भोंसला वेदशास्त्र महाविद्यालय

## (संशोधन व प्रकाशन मंडळ)


अध्यक्ष:– १. महामहोपाध्याय साहित्याचार्य
वाळशास्त्री हरदास.

कार्यवाह:– २. कृ. मा. उपाख्य दादासाहेब चौरीकर.

सभासद:– ३. डॉ. ग. त्र्यं. उपाख्य नानासाहेब देशपांडे, एम्. ए., डी. लिट्.

४. प्रा. श्री. भा. वर्णेकर, एम्. ए.

५. श्री. शं. गो. चट्टे, एम्. ए.

६. पं. शंकरशास्त्री आर्वीकर, प्राचार्य.





पत्रव्यवहाराचा पत्ता:–
श्री. कृ. मा. चौरीकर
कार्यवाह,
भोंसला वेदशास्त्र महाविद्यालय,
सर्कल ६, अयाचित रोड, नागपूर २


